ग्रंथ संपादक व प्रसारक मंडळीची ग्रंथमाला, ग्रंथ ३४ वा.

॥ श्री ॥

# महाराष्ट्रकविचरित्र

## भाग १ ला.

लेखक

जगन्नाथ रघुनाथ आजगांवकर.

भरतपुरचा वेढा, कवनकुतूहल, नेपाळवर्णन इ. पुस्तकांचा कर्ता.

प्रकाशक,

**दामोदर सांवळाराम आणि मंडळी.**

मुंबई.

सन १९०७; शके १८२९.




किंमत २ रुपये

## ग्रंथार्पण.

श्रीमंत राजश्री माधवराव मोरेश्वर,

ऊर्फ

# बाळासाहेब पंत अमात्य

हुकुमत पन्हा

संस्थान बावडा

यांस,

त्यांची गुणग्राहकता, अत्यंत शुद्धाचरण, औदार्य व स्वभावसौजन्य, इत्यादि, राजेलोकांचे ठायीं दुर्मिळ अशा अनेक सद्गुणांस लुब्ध होऊन हा ग्रंथ अत्यंत सन्मानपूर्वक समर्पण करितों.

श्रीमंतांचा नम्र सेवक,

ग्रंथकर्ता.

# अनुक्रमणिका.



# प्रस्तावना.

जयंति ते सुकृतिनो रससिद्धाः कवीश्वराः ।
नास्ति तेषां यशः काये जरामरणजं भयम् ॥ १ ॥

भर्तृहरीसारख्या तत्ववेत्त्या रसिकपुरुषानें व रामदासासारख्या ईशस्वरूप परमहंसानें ज्या कवींच्या वर्णनाकडे आपल्या पवित्र वाणीचा उपयोग करण्यांत भूषण मानिलें, त्या 'अमृताच्या मेघांचें' वर्णन माझ्यासारख्या सामान्य माणसाकडून काय व्हावयाचें आहे ? कवींचा व्यापार चालू नसता तर सृष्टीचा व्यवहार चालण्याचें काम मोठें बिकट झालें असतें असें जें समर्थांनीं आपल्या दासबोधांत झटलें आहे, त्याचा येथें अनुवाद करणें भाग आहे. जगांतील सर्व कवींचा वर्ग वस्तुतः जरी एकच आहे तरी विषयपरत्वें त्यांच्यांत कांहीं भेद झालेले आहेत. या भेदांत ऐहिक अथवा प्रापंचिक कवि व पारलौकिक अथवा पारमार्थिक कवि हे कवींचे दोन भेद मुख्य होत. कालिदास, बाण, भवभूती, दंडी, शेक्सपीयर, रघुनाथपंडित, प्रभाकर, इत्यादि कवि हे पहिल्या भेदांतील कवि होत. व ज्ञानदेव, एकनाथ, तुकाराम, रामदास इत्यादि कवि हे दुसऱ्या भेदांतील कवि होत. पहिल्यांच्या काव्यांत, सृष्टिसौंदर्य, स्त्रीसौंदर्य, शृंगारलीला वगैरे मनोरंजक गोष्टींचीं वर्णनें करण्याकडे विशेष प्रवृत्ति दिसून येते व दुसऱ्यांच्या काव्यांत भक्ति, योग, ज्ञान, वैराग्य वगैरे विषयांचा खल करण्यांतच विशेष लक्ष पुरविलेलें दिसून येतें.

आमच्या महाराष्ट्रांत आजपर्यंत जेवढे ह्मणून प्रसिद्ध कवि होऊन गेले तेवढे बहुतेक वरील दोन भेदांपैकीं दुसऱ्या भेदांत मोडणारे कवि होत. या कवींपैकीं कांहीं कवींनीं आपल्या काव्यशक्तीचा, सृष्टिसौंदर्य व शृंगार यांच्या वर्णनाकडे जरी क्वचित् स्थलीं उपयोग केलेला आढळतो तरी एकंदरींत त्यांचा कल परमार्थाकडेच फार; तथापि स्वधर्म व स्वराज्य याच्यासंबंधानें ते अगदींच पराङ्मुख होते किंवा राष्ट्रीयत्वाची त्यांस मुळींच कल्पना नव्हती असें ह्मणतां येणें अशक्य आहे. ज्या भागवतधर्माचा प्रसार करण्यांतच आमच्या साधुसंतांनीं आपलीं आयुष्यें घालविलीं तो भागवतधर्म, अलीकडील कांहीं लोक ह्मणतात त्याप्रमाणें खचीत पंगु नव्हता. उलट या भागवतधर्मीय कवींनीं लिहिलेल्या ग्रंथांचा, तत्कालीन महाराष्ट्रीय योद्धे व

मुत्सद्दी यांच्या मनांवर उत्कृष्ट परिणाम झालेला होता व त्यामुळेंच स्वराजस्थापनेच्या कामीं आपले देहही समर्पण करण्यास त्या लोकांनीं मागें पुढें पाहिलें नसावें, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. समर्थांच्या दासबोधाचा व त्यांनीं इतर प्रसंगीं केलेल्या उपदेशाचा छत्रपति शिवाजीमहाराजांच्या मनावर झालेला परिणाम, राजकारणें करीत असतां, उत्कृष्ट काव्यग्रंथ लिहिणाऱ्या निरंजन माधवासारख्या कवींचें चरित्र, परशुराम त्रिंबक प्रतिनिधीसारख्या राजकारणपटु गृहस्थाचा काव्यरचनेकडे असलेला ओढा व 'मुक्तेश्वरी हरिश्चंद्राख्यानाची प्रत पाठविली आहे, ती वाचावी, मानसिक व्यथा दूर होईल' अशा अर्थाचें गोपाळराव पटवर्धन यांस त्यांच्या तीर्थरूपांनीं लिहिलेलें पत्र, यांचा विचार केल्यास माझ्या वरील विधानाची सत्यता सहज कळून येणार आहे.

रा. रा. विश्वनाथ काशीनाथ राजवाडे, बी. ए. या प्रसिद्ध इतिहास व काव्य-संशोधक गृहस्थांनीं 'ग्रंथमालेंत' 'रामदास' या विषयावर एक मोठा विस्तृत निबंध लिहून, त्यांत रामदासापूर्वीं महाराष्ट्रांत जेवढे ह्मणून साधुसंत व कवि होऊन गेले तेवढे सारे प्रपंचासंबंधानें पराङ्मुख असल्यामुळें व त्यांस राष्ट्रीयत्वाची कल्पना नसल्यामुळें त्यांचा धर्म व त्यांनीं लोकांस केलेला उपदेश, हे पंगु होते व त्यामुळें महाराष्ट्राचें राष्ट्रीयदृष्ट्या बरेंच नुकसान झालें आहे असें सिद्ध करण्याचा प्रयत्न केला होता. त्यावर, रा. रा. पांगारकर यांनीं पुणें येथें एक व्याख्यान देऊन व केसरी पत्रांत, 'मराठी कवींना राष्ट्रीयत्वाची कल्पना नव्हती काय?' या मथाळ्याखालीं एक वाचनीय लेख लिहून रा. राजवाडे यांचें विधान अगदीं चुकीचें असल्याचें सिद्ध केलें. (ता. २७ आक्टोबर १९०३ चा केसरीचा अंक पहा.) वास्तविक पाहिलें असतां रा. राजवाडे यांच्या विधानांत कांहींच अर्थ नव्हता. स्वराज्य स्थापनेच्या कामीं साहाय्य केल्याचें श्रेय एकट्या रामदासांस द्यावयाचें त्यांच्या मनांत होतें व तेवढ्यापुरती वकिली पतकरून त्यांनीं त्या लोकांत आपला लेख लिहिला होता, परंतु महाराष्ट्र आदिकवि व साधु ज्ञानदेवापासून तों शेवटच्या अनंतफंदीपर्यंत महाराष्ट्रांत जितके साधु व कवि होऊन गेले तितक्या सर्वांचे ग्रंथ नुसते वर वर चाळून पहाणारासही असें आढळून येईल कीं, आमचे साधु राष्ट्रहितपराङ्मुख खचीत नसून त्यांस राष्ट्रीयत्वाची खरी कल्पना होती; एवढेंच नव्हे तर ते जें काय करीत होते तें सर्व अप्रत्यक्षपणें स्वराज्यस्थापनेच्या कामीं उपयोगीं पडावें याच हेतूनें

करीत होते. परकीयांच्या सुलतानी अमलाखालीं खचून गेलेल्या महाराष्ट्रीयांस आमच्या साधूंनीं एकदम बंड करण्याची सल्ला दिली नाहीं, एवढ्यासाठींच जर रा. राजवाडे त्यांजवर पंगुपणाचा आरोप करीत असतील तर त्यांस देशकालवर्तमानाचा बिलकूल विचार झाला नाहीं असें ह्मणावें लागेल. रामदासांनीं जो स्वराज्यस्थापनेचा मार्ग दाखविला व उपदेश केला तो छत्रपति शिवाजीसारखा कर्ता पुरुष निर्माण झाला ह्मणूनच केला. ज्ञानदेव, एकनाथ, तुकाराम इत्यादि इतर संतांस शिवाजी सारखा शिष्यच मिळाला नाहीं. जर तसला शिष्य त्यांस मिळाला असता, तर त्याच्या योग्यतेप्रमाणें त्यास उपदेश करण्यास त्यांनीं कमी केलें असतें असें मला वाटत नाहीं. तसें नसतें तर शिवाजी महाराजांनीं पाठविलेल्या पत्रास तुकाराम बुवांनीं जें उत्तर दिलें आहे, त्यांत त्यांनीं महाराजांस "राज्य सोडून गोसावी हो" असा पंगुपणाचा उपदेश खात्रीनें केला असता; परंतु हें तुकारामाचें उत्तर वाचून पाहतां असें स्पष्ट दिसून येतें कीं, तुकारामबुवा जसे वैराग्यज्ञानसंपन्न होते, तसेच ते राजनीतिनिपुणही होते. आमच्या साधुसंतांस स्वदेश व स्वभाषा यांचा जर अभिमान नसता, तर ज्ञानदेवांनीं आपल्या ज्ञानेश्वरीच्या शेवटीं रामदेवराव जाधवांचें व महाराष्ट्र देशाचें एवढें स्तुतिस्तोत्र कां गाइलें असतें? एकनाथांनीं जें आपलें भागवत काशींत राहून पुरें केलें, त्याच्या शेवटीं 'स्वदेश' शब्दानें महाराष्ट्राचा जो मोठ्या प्रेमानें उल्लेख केला आहे तो कां केला असता? देवदास कवीनें आपल्या अमृतवाणीचा उपयोग, राष्ट्रीय संकटें दूर करण्याकरितां परमेश्वराची प्रार्थना करण्याकडे कां केला असता? श्रीमत्कृष्णदयार्णवानें आपल्या 'हरिवरदा' ग्रंथांत

'शिवनृपती पावतां मुक्ति। दक्षिणे येवोनि ताम्रपति।
केली विजयपुरा समाप्ति। महा विपत्ति राष्ट्रातें॥ १॥'

अशा प्रकारचे दुःखोद्गार काढून, 'मुक्ति' शब्दानें शिवाजीच्या ठायीं पूज्यबुद्धि, 'ताम्रपति' शब्दानें, औरंगजेबासंबंधानें तिरस्कार व 'महाविपत्ति राष्ट्रातें' या वाक्यानें महाराष्ट्रासंबंधानें खरी कळकळ, ही कां व्यक्त केली असती? तर एकंदरींत आमच्या साधुसंतांस राष्ट्रीयत्वाची कल्पना नव्हती, असें ह्मणणें ह्मणजे त्यांच्या ग्रंथांचा व मतांचा विनाकारण विपर्यास करून आपल्या अज्ञानाचें प्रदर्शन करणें होय. महाराष्ट्रांतील साधुसंतांस देशाभिमान, भाषाभिमान जर मुळींच नसता तर त्यांनीं मराठी भाषेस सजविण्याच्या व तिचें ग्रंथभांडार वृद्धिंगत करण्याच्या

कामीं आपलीं जीं आयुष्याचीं आयुष्यें घालविलीं तीं कोणत्या उद्देशानें? एकनाथ-स्वामींनीं आपल्या भागवताच्या दहाव्या अध्यायांत म्हटलें आहे, 'गाईब्राह्मणासी जाण। पीडा करिती दारुण। क्षेत्र-वित्त-दाराहरण। स्वार्थें प्राण घेताती॥' या ओंवींत तत्कालीन यवनांकडून होणाऱ्या महाराष्ट्रीयांच्या छलाचें नाथांनीं उघड वर्णन केलें आहे. त्यावेळीं सर्वत्र यवनी राज्य असल्यामुळें व इंग्रजी राज्याप्रमाणेंच त्या वेळींही राजाविरुद्ध उघड बोलतां येणें शक्य नसल्यामुळें, एवढ्या वर्णनावरच एकनाथ स्वामीस आपली राष्ट्रीयछलवर्णनाची तहान भागवून घेणें भाग पडलें, त्यास उपाय नाहीं. मुक्तेश्वरांनीं तर, 'महाराष्ट्र जे सर्व राष्ट्रांसि राजे। जयाच्या भयें व्यापिले लोक लाजे॥' असे उद्गार काढून स्वदेशाचा मोठेपणा मोठ्या डौलानें वर्णन केला आहे. तसेंच इंग्रज, फिरंगी वगैरे परदेशीय व परधर्मीय लोकांचा त्यांनीं आपल्या ग्रंथांत उल्लेख केलेला असून, त्यांच्या युद्ध करण्याच्या पद्धतीसंबंधाचीही माहिती दिलेली आहे. तर देशस्थितीचें सूक्ष्मपणें निरीक्षण केल्याशिवाय असले उद्गार काढणें व असली माहिती देतां येणें कितपत शक्य आहे, याचा वाचकांनींच विचार करावा. मुक्तेश्वरांच्या ग्रंथांत ठिकठिकाणीं, त्यावेळीं महाराष्ट्र वीरांच्या अंगीं जें वीरश्रीचें पाणी खळखळत होतें त्याचा आवाज स्पष्ट ऐकूं येतो. महाराष्ट्र देश उदयोन्मुख झाला त्यावेळच्या त्याच्या प्रभावाची प्रभा मुक्तेश्वरांच्या वाणींत आलेली आहे व महाराष्ट्रदेश प्रत्यक्ष उदय पावला, तेव्हांचें त्याचें तेज व कर्तृत्व हीं समर्थांच्या वाणींत उतरलीं! माझे विद्वान् व रसिक मित्र रा. रा. लक्ष्मण रामचंद्र पांगारकर यांनीं एके ठिकाणीं लिहिलें आहे, 'संभाजीच्या काळीं व पुढें राजारामाच्या काळीं मुसलमानापासून मराठ्यांना जो त्रास झाला व मुसलमानी धर्मानें महाराष्ट्र धर्माचा जो छल केला, त्याचा प्रतिकार मराठे वीरांनीं तरवारीच्या धारेनें केलाच; परंतु आमच्या कवींनींही आपल्या तोंडाला अगदींच कुलूप घातलें नव्हतें. संभाजीच्या काळीं यवनाच्या त्रासानें त्रस्त झालेल्या महाराष्ट्रीयांस तारण्यासाठीं देवदासानें आपल्या कुलस्वामीची 'व्यंकटेशस्तोत्रांत' सद्गदरवानें करुणा भाकावी व संकटकालीं देवानें कोणकोणत्या भक्तांस कसें तारीलें हें 'संतमालिका' स्तोत्रांत सांगून लोकांस धीर द्यावा, हें राष्ट्रगीतें करणाऱ्या देवदासासारख्या राष्ट्रीय कवीस सर्वथैव शोभण्यासारखें होय. आमचे मराठी कवि भोंवतालच्या राष्ट्रपरिस्थितीविषयीं खात्रीनें उदासीन नव्हते.' तर या प्रकारें रा. राजवाडे यांचा आमच्या संतमंडळा-

वरील पंगुपणाचा आरोप अगदीं उडून जातो व त्यांचा प्रयत्न निष्फळ झाल्याबद्दल वाईट वाटतें! आमच्या संतांच्या ग्रंथसंग्रहाचें चांगलें परिशीलन केल्याशिवाय असलीं भलभलतीं विधानें करणें हें कोणासही भूषणास्पद नाहीं. रामदासांनीं छत्रपति शिवाजीकडून जें पीक काढून घेतलें, तें पीक ज्या जमिनींत उगवलें; त्या जमिनीची मशागत ज्ञानदेवापासून तुकारामापर्यंत झालेली । सर्व महाराष्ट्रीय साधुसंतांनीं आपापल्या सामर्थ्याप्रमाणें चालू ठेविली होती, व त्या जमिनींत खत घालून ती उत्तम पीक देईल, अशी व्यवस्था त्याच सत्पुरुषांनीं करून ठेविलेली असल्यामुळें छत्रपति शिवाजीमहाराजांसारख्या अवतारी पुरुषाच्या हातून रामदासस्वामींनीं जर कांहीं महत्त्वाचा कार्यभाग करून घेतला असेल, तर त्याचें अधिक श्रेय रामदासांपूर्वी होऊन गेलेल्या संतमंडळाच्या पदरांत पडणें अवश्य आहे हें निर्विवाद सिद्ध होतें. ' महाभारताचे मराठी अवतार ' या निबंधाच्या आरंभीं रा. पांगारकर म्हणतात, ' एकनाथ–शहाजींच्या वेळीं जमीन नांगरण्याचें काम चाललें होतें पण पेरणीची वेळ आली नव्हती, ती रामदास–शिवाजीच्या वेळीं आली. मालोजीच्या जन्मकालापासून तों महादजी शिंदे यांच्या मृत्युपर्यंत महाराष्ट्रांत वीरही पुष्कळ निर्माण झाले. शिवाजीचे वडील शहाजी राजे कांहीं सामान्य प्रतीचे वीर व मुत्सद्दी नव्हते. शहाजी, शिवाजी, तानाजी मालुसरे, मोरोपंत पिंगळे, बाजी प्रभु, धनाजी व संताजी, बाजीराव व राघोबादादा पेशवे, मल्हारराव होळकर, रघुजी भोंसले, गोविंदपंत बुंदेले, रत्नाकर अण्णा, विठ्ठलराव विंचुरकर, महादजी शिंदे, पटवर्धन वगैरे असंख्य वीर या अडीचशें वर्षांच्या काळांत निर्माण झाले. तसेच शहाजी शिवाजी, रामचंद्रपंत व प्रल्हाद निराजी, बाळाजी विश्वनाथ, सखाराम बापू, नाना फडणीस, रत्नाकरपंत अण्णा, बाळोबा तात्या वगैरे मुत्सद्दीही निर्माण झाले. वीरांचे हात व मुत्सद्यांचीं डोकीं, हीं दोनशें वर्षेपर्यंत राष्ट्रकार्य साधण्यांत गुंतलीं होतीं. वीरश्री सर्वत्र [illegible] चढली होती. या वेळीं या कार्यक्षम मंडळाला प्रेरणा करून त्यांच्या मनांत सद्धेतु नेहमीं जागृत ठेवणारे संतकवीही निर्माण झाले. हा मुख्यतः वीरश्रीचा–शौर्याचा व मुत्सद्दी-पणाचा काळ असल्यामुळें अशा काळाला उत्कृष्ट शिक्षण देणारा हिंदुराष्ट्राचा महाग्रंथ महाभारत इकडे सर्वांचें लक्ष गेलें. द्रोणार्जुनाच्या पराक्रमाच्या गोष्टी व भीष्मकृष्णाच्या जनहितपर मुत्सद्दीपणाच्या गोष्टी प्राकृत भाषेत सामान्य जनसमूहास शिकविणारे राष्ट्रीय शिक्षक पाहिजे होते व ते निर्माणही झाले. महाभारतांतील गोष्टी ऐकून शिवाजी महाराजांनां वीरश्री चढली; मिरजेच्या वेढ्यामुळें व एकंदर प्रतिकूल

काळामुळें हताश झालेल्या गोपाळराव पटवर्धनाला धीर द्यायाला आमच्या मुक्तेश्वराचें 'हरिश्चंद्राख्यान' कारण झालें. मराठी कवींच्या वाणींत जिवंतपणा होता व त्याचा राष्ट्रांतील कर्त्या पुरुषांवर पुष्कळ परिणाम झाला.' एकंदरींत, आमच्या कवींच्या प्रासादिक वाणीचा देशोद्धाराच्या कामीं किती उपयोग झाला आहे हें वरील उताऱ्यावरून वाचकांच्या सहज ध्यानांत येईल. आमच्या अंगांत जे आज नाहींत, परंतु ज्यांची आज आह्मांस फार आवश्यकता आहे, ते स्वार्थत्याग, करारीपणा, दीर्घोद्योग इत्यादि अमोलिक गुण, जर आमच्या अंगीं येणें शक्य असेल तर तें, आमच्या कवींच्या काव्यांचा व त्यांच्या चरित्रांचा मननपूर्वक अभ्यास केल्यानेंच होय, अशी माझी अल्प समजूत असून हा लहानसा ग्रंथ हें त्या समजुतीचेंच फल होय.

हल्लींच्या काळीं ज्ञानदेव मोरोपंतासारखे कवि निर्माण होणें शक्य आहे कीं अशक्य आहे व तशा प्रकारचे महाकवि निर्माण होण्यास हल्लींचा काळ अनुकूल कीं प्रतिकूल आहे, हा एक मोठा वादग्रस्त प्रश्न आहे वस्तुतः अमुक एक काल कवींच्या अस्तित्वास अनुकूल आहे असें सिद्धांतरूपानें सांगतां येणें कठिण आहे. तरीपण स्वातंत्र्याचा काल कवींच्या उत्कर्षास व कवितेच्या अभिवृद्धीस विशेषक उत्तेजक असतो, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. ज्ञानेश्वर हे महाराष्ट्राच्या स्वातंत्र्यकाळीं उदयास आले; मुक्तेश्वर हे महाराष्ट्र उदयोन्मुख झाला त्याकाळीं उदय पावले, समर्थ हे स्वराज्याचा पाया घातला गेला, त्या वेळीं उदयास आले, व मोरोपंत हे स्वराज्यसुखाचा अनुभव घेतलेले शेवटले जुने कवि होत. या चौघांशिवाय इतर कांहीं कवि महाराष्ट्राच्या पारतंत्र्यावस्थेंत होऊन गेलेले असून त्यांच्या कवितेंत त्या पारतंत्र्यासंबंधाचा तिरस्कार अनेक ठिकाणीं प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणें व्यक्त केलेला आढळतो, हें नाथांच्या व कृष्णदयार्णवांच्या उदाहरणानें पूर्वीं दाखविलेंच आहे. जुने मराठी कवि अगदीं स्वतंत्रवृत्ति होते व स्वतंत्रता हें कवितादेवीचें मुख्य निवासस्थान असल्यामुळें

---

१ गोपाळरावांचे वडील त्यांस लिहितात 'हरिश्चंद्राख्यान' प्राकृत आह्मीं पुण्याहून पांच अध्याय लिहून आणले होते. संग्रहीं होते. तुह्मांस वाचावयास पाठविले आहेत. पांच सात वेळ पारायण करणें,' (ऐतिहासिक लेखसंग्रह, लेख १२८)

ती त्यांच्याठायीं उत्कटत्वानें वास करीत होती. आज ग्रंथ लिहून उद्यां कीर्ती आणि द्रव्य एकदम मिळवूं. अशा हेतूनें ते ग्रंथरचना करावयास बसत नसत. कोठें तरी कोनाकोंपऱ्यांत रहावें, कसा तरी उदरनिर्वाह करावा, आणि स्वतः संपादिलेलें ज्ञान आपल्या देशबांधवांस सुलभ व्हावें म्हणून स्वभाषेंत ग्रंथरचना करावी, हा त्यांचा आयुष्यक्रम. इंग्लंडांतल्या मिल्टनपासून किप्लिंगपर्यंतच्या सरसकट सगळ्या कवींनीं आपापल्या काव्यांवर यथाशक्ति द्रव्यसंचय केला, कोणी लॉर्ड झाले आणि एकानें तर नुसत्या काव्य आणि कादंबरीलेखनावर दहा लाख रुपये मिळविले! अशा स्थितींत आमच्या कफल्लक कविजनांची या द्रव्यलोलुप आंग्लकविजनांशीं तुलना करितां येणेंही शक्य नाहीं. सामान्य जनांस खुष करून त्यांजकडून द्रव्य उकळण्यास आमचे कवी हपापलेले नव्हते. आंग्लकविजनांचा विषय म्हणजे सृष्टींतील दृश्य पदार्थ; आमच्या कविजनांचा विषय सृष्टीचें मूळ कारण जें परब्रह्म तें! आमच्या कवींनीं नाटकें लिहिलीं नाहींत; तर मुख्य नाटककार जो भगवान् परमेश्वर त्याचे गुणानुवाद गायिले. ज्यांस द्रव्याची किंवा मानसन्मानाची बिलकुल अपेक्षा नाहीं त्यांजकडून केवळ लोकरंजन कसें होणार? स्वतंत्र मनुष्याच्याच मनांतून स्वतंत्र विचार बाहेर पडतात, गुलामाच्या मनांतून पडत नाहींत. 'न गणिसि मज जातां, तुच्छ मानूनि तूतें' किंवा 'नहीं गरज तेरी। हम बेपरवा फकीरी!॥' अशा प्रकारच्या स्पष्ट शब्दांनीं, वैभवानें धुंद झालेल्या राजांची कानउघाडणी करणारे; दान दिलेल्या राज्याचा स्वीकार न करितां, लोकसंग्रह करण्याच्या उदात्त हेतूनें 'भिक्षेसारिखें नाहीं सुख' असें मानणारे आणि दिवस्या छत्री घोडे। हें तों बऱ्यांत न पडे॥ मानदंभचेष्टा। हे तों सूकराची विष्टा। असे स्पष्टोद्गार काढणारे सत्पुरुषच खरे कवि असूं शकतात; रमाविंदच्चरणीं मिलिंदायमान होण्यांत किंवा पोटासाठीं धर्मांतर करून येशू ख्रिस्ताचे गुणानुवाद गाण्यांतच सगळा जन्म आणि सगळी विद्वत्ता खर्च करणाऱ्या लोकांस माळ घालण्यास कवितादेवी तयार होत नाहीं, हें, हल्लींच्या काळीं चांगले कवि कां निर्माण होत नाहींत, या प्रश्नाचा विचार करितांना अवश्य लक्ष्यांत ठेविलें पाहिजे.

आमच्या बहुतेक जुन्या कवींचें आचरण अत्यंत शुद्ध होतें. 'बोले तैसा चाले' या कोटींतले ते होते, अर्थात् त्या त्यांच्या सदाचरणाचा ठसा त्यांच्या कवितेवर उमटला आहे. बेकनसारखे लांचखाऊ, गोल्डस्मिथसारखे दारूबाज, बायरनसारखे

व्यभिचारी किंवा शेरिडनसारखे दिवाळखोर आमचे कवि नव्हते. प्राणीमात्राचें दुःख पाहून त्यांचें कोमल हृदय तीळ तीळ तुटत असे. उन्हानें तप्त होऊन मरणोन्मुख झालेल्या गाढवास पवित्र गंगोदकानें आंघोळ घालणारे, प्रत्येक वेळीं आंघोळ करून गोदेंतून बाहेर पडतांच अंगावर थुंकणाऱ्या यवनाचे आभार मानणारे, दुष्काळग्रस्तास सरकारचें धान्य देऊन टाकून स्वतःचा जीव धोक्यांत घालणारे, स्वतःस पाहतांच भयानें उडून गेलेल्या पक्षांस पाहून दुःख करणारे आणि आपलें बोट कापलें असतां झालेल्या दुःखामुळें आपला वंशपरंपरेचा खाटकाचा धंदा सोडून देणारे पूर्वींचे सत्पुरुष कवि कोठें आणि खाविंदास खूष ठेवण्यासाठीं त्यांच्या शिकारीची व्यवस्था ठेवणारे आणि भर दुष्काळांत गांजलेल्या गरीब लोकांपासून सरकारी कराचे पैसे जबरदस्तीनें उकळणारे कवि कोठें ? पूर्वींचे कवि मेलेल्या स्त्रियांसाठीं आणि पोरांसाठीं बायकांसारखे धाय मोकलीत बसणारे नव्हते. झाडें, फुलें, मुलें, स्त्रिया, आगपेट्या, साबण, परीट, शाई, घड्याळ, ग्यासलेट, खाणावळ, आणि मर्जी इत्यादिकांवर कविता करण्यांत त्यांस आनंद वाटत नसे; तर हे सगळे पदार्थ ज्यानें निर्माण केले, त्या परमेश्वराच्या अतुल कुतूहलाची लीला गाण्यांत, त्यानें दिलेल्या कविताशक्तीचा ते उपयोग करीत असत. भौतिक सुखाच्या उत्कट लालसेनें वेडावून जाऊन दिसेल त्या सृष्ट पदार्थावर कविता करणें ह्मणजे दुर्लभ कविताशक्तीचा आणि नरदेहाचा दुरूपयोग करणें होय अशी त्यांची समजूत होती व ह्मणूनच ते सृष्टिवर्णनांत गुंगून न जातां, सृष्टीच्या आदिकारणाकडे—मूलाकडे गेले. तर अशा ईश्वरी विभूतींच्या काव्यांतला प्रसाद हल्लींच्या काव्यांत आढळला नाहीं, तर त्यांत काय आश्चर्य आहे ? उलटपक्षीं आमचे जुने कवि जितके मवाळ होते तितकेच ते जहालही होते. आपणास भिऊन उडून गेलेल्या पक्ष्यांस पाहून दुखित होणारे तुकाराम बुवा, ‘ विंचू देवाऱ्यासी आला । देवपूजा नावडे त्याला ॥ तेथें पैजारेचें काम । अधमासी तों अधम ॥ ’ हा ‘ जशास तसें ’ चा न्याय सांगत आहेत व उसानें आपली पाठ फोडणाऱ्यास शेत इनाम करून देणारे समर्थ ‘ मैंदास उभा करावा भैंद ’ असा उपदेश करीत आहेत. ‘ एका थोबाडींत मारलें तर दुसरें थोबाड पुढें करा ” किंवा ‘ दिधलें दुःख परानें उसने फेडूं नयेचि, सोसावें ’ असली नेभळट भाषा, आमच्यांतल्या अत्यंत वैराग्यसंपन्न तुकारामबुवांस सुद्धां ठाऊक नव्हती, हें, आमच्या साधुसंतांवर पंगुत्वाचा आरोप करणाऱ्या मुग्धांनीं अवश्य लक्ष्यांत ठेवावें.

वरील विवेचन करितांना मी नुसत्या कवित्वगुणाचाच विचार केलेला नाहीं. आचरण, विचारस्वातंत्र्य, भूतदया आणि ईश्वरीप्रसाद, या चार गुणांचा विचार करून जुन्या व नव्या कवींची सदर तुलना मी केली आहे. कवित्वाचा विचार करितांना, आचरणाकडे लक्ष्य देण्याचें काय कारण आहे, असा एक प्रश्न, स्वतःच्या आचरणासंबंधानें साशंक असणाऱ्या एखाद्या नव्या कवीकडून पुढें येण्याचा संभव आहे. त्यास उत्तर इतकेंच कीं नुसत्या कवित्वापेक्षां कवीच्या आचरणामुळेंच त्याची प्रसिद्धि अधिक होते. शुद्धाचरण व विचारस्वातंत्र्य यांच्या अनुकूलतेनें एक प्रकारचा अधिकार प्राप्त होतो, भूतदयेनें अंतःकरण कोमल होतें; व ईश्वरी प्रसादामुळें एक प्रकारचें अलौकिकत्व अंगीं येतें व या गुणचतुष्टयाच्या समुच्चयानें काव्यास अत्यंत तेजस्विता प्राप्त होते, शिवाय, आम्हां पौर्वात्य लोकांच्या दृष्टीनें नुसत्या कवित्वापेक्षां सदाचरण व साधुत्व यांच्यामुळेंच कवीचें वजन समाजावर अधिक बसतें, हें, तुकाराम, ज्ञानदेव, रामदास व एकनाथ यांच्या उदाहरणांवरून स्पष्ट होत आहे. रामजोशीबुवांची कविता श्रीधरांच्या किंवा महिपतींच्या कवितेपेक्षां सरस आहे, हें कोणीहि तज्ञ कबूल करील; परंतु जोशीबुवांपेक्षां श्रीधर आणि महिपति यांची प्रसिद्धि आणि लोकप्रियता महाराष्ट्रांत विशेष आहे याचें कारण वर्तनक्रमांतील भिन्नता हें होय. मनाचा कोमलपणा हें कवित्वाचें मुख्य अंग नव्हे, हें खरें आहे; पण तुकारामासारख्या नवनीतसम मृदुलांतःकरणाच्या कवींच्या कवित्वास त्याच गुणामुळें अधिक शोभा आली आहे, हेंही तितकेंच खरें आहे. असो.

वर लिहिलेंच आहे कीं, जुन्या मराठी कवींस प्रसिद्धीची किंवा द्रव्याची फारशी अपेक्षा नव्हती; हल्लींच्या कवींस, एखाद्या वर्तमानपत्रांत किंवा मासिक-पुस्तकांत आपलें नांव चमकलें म्हणजे मोठा आनंद होतो, मोठी धन्यता वाटते व एखाद्या मासिकपुस्तककारानें 'तुमची कविता प्रसिद्ध करण्याजोगी नाहीं' असें म्हटलें, तर त्याला मोठा विषाद वाटतो. पूर्वी हल्लींच्यासारखी ग्रंथप्रकाशनाची साधनें आणि द. ह. सोसायटीसारख्या ग्रंथोत्तेजक संस्था नव्हत्या, तरीही आमच्या कवींनी आपली ग्रंथरचना जी एकसारखी चालू ठेविली होती, याचें कारण त्यांच्या डोळ्यांपुढें एक प्रकारचें उद्दिष्ट कार्य ( Mission ) होतें, हें होय. आपणास जें ज्ञान अत्यंत परिश्रमानें प्राप्त झालें, तें इतर जनांस सुलभ करून द्यावें, हा उदात्त हेतु प्राचीन कवींचा होता; हल्लींच्या कवींचा असा कोणता उदात्त हेतु आहे ?

जुनी मराठी कविता जी इतकी प्रसादपूर्ण उतरली आहे, याचें कारण ती लिहिणा रांचें वैराग्य, परोपकारबुद्धि, दयालुत्व, ईश्वरविषयक प्रेम ( स्त्रीविषयक नव्हे ! ) आणि सदाचरण हीं अत्यंत जागृत होतीं, हें होय. या गुणांच्या दृष्टीनें पाहतां, इंग्रजी भाषेंत तर काय, पण संस्कृत भाषेंतही ज्ञानेश्वरी, दासबोध, नामदेवतुकारामाचे अभंग यांच्या तोडीची प्रेमळ कविता फारशी नाहीं, असें ह्मटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं. आतां इंग्रजी कवितेशीं तुलना करून पाहिल्यास आमची बहुतेक कविता परमार्थपर आहे असें दिसून येईल हें खरें; पण तेवढ्यामुळेंच ती कुचकामाची ठरते, असें ह्मणणें ह्मणजे अत्यंत अरसिकपणा प्रगट करणें होय. आधिभौतिक ज्ञानापेक्षां ईश्वरीज्ञान जोंपर्यंत श्रेष्ठ मानलें जात आहे; तत्त्ववेत्ता, मुत्सद्दी आणि योद्धा यांपेक्षां सत्पुरुषाची योग्यता जोंपर्यंत अधिक मानली जात आहे; आणि प्रपंचापेक्षां परमार्थाची श्रेष्ठता जोंपर्यंत बहुजनसमाजास मान्य आहे, तोंपर्यंत तरी आमच्या जुन्या मराठी कवितेस ‘ नादान ’ ह्मणण्याचा कोणासही अधिकार पोंचत नाहीं, हें सर्वांनीं लक्ष्यांत ठेवावें. शिवाय पॅराडाइज लॉस्ट, प्रिन्सेस, लेडी ऑफ धि लेक, चाइल्ड हॅरोल्ड अशाप्रकारचीं काव्यें मराठींत उपलब्ध नाहींत, हें जरी घटकाभर खरें मानिलें तरी उलट पक्षीं, ज्ञानेश्वरी, तुकारामाचे अभंग आणि दासबोध यांच्या तोडीचे ग्रंथ आंग्लवाङ्मयांत तरी कोठें व कितीसे आहेत ? आमचे जुने कवि स्वतंत्र विषयांवर कविता लिहित नव्हते, रामायण महाभारतांतील कथानकें मराठींत उतरण्यावरच त्यांचा सगळा भर होता, असा एक भयंकर आरोप, एका मोठ्या विद्वान् गृहस्थांनीं हल्लीं त्यांजवर लादला आहे; या आरोपातून ते बिचारे भोळे कवि कसे काय सुटून जातात, पहावें ! तोंपर्यंत, ‘ आपण मराठी कविता अद्याप फारशी वाचलीं नाहीं ’ असा आरोप सदर विद्वान् गृहस्थांवर लादण्याची मी नम्रपणें परवानगी घेतों.

या गृहस्थांस माझा असा प्रश्न आहे कीं, ‘ मनुष्यस्वभावाचें हुबेहूब वर्णन करणें ’ ह्मणजे कवित्व, ही व्याख्या जर बरोबर आहे, तर रामायण महाभारतांत आणि इतर पुराण ग्रंथांत कोणत्या प्रकारच्या स्वभाववैचित्र्याची उणीव आहे ? ‘ युरोपांतील सुधारलेल्या भाषांतील काव्यग्रंथांचा सारखा अभ्यास करा ’ असा उपदेश करण्यापूर्वीं हॅमलेट, अथेल्लो, आयागो इत्यादि पात्रें आमच्याही जुन्या ग्रंथांत निराळ्या नांवांनीं अस्तित्वांत आहेत कीं नाहींत, याचा विचार करावयास नको काय ? आतां

कदाचित्, शेक्सपियरच्या नाटकांतल्यांसारखा, खुनी, दरोडेखोर, लफंगे, व्यभिचारी, जादुगार, भुतें, दारूबाज, वात्रट, इत्यादिकांचा आमच्या काव्यांत सुळसुळाट नसेल; पण त्यामुळें आमचें एवढें कोणतें महत्कार्य अडून राहिलें आहे? ते लोक पक्के प्रापंचिक; आह्मी पारमार्थिक; अशा स्थितींत आमच्या कवींचा कल परमार्थाकडेच असावा, यांत विलक्षण तें काय? देशाच्या पूर्वापार परिस्थितीचा दोष बिचाऱ्या कवींवर काय ह्मणून लादावयाचा? 'मराठी कविता वाचणें ह्मणजे कालाचा अपव्यय करणें होय' आणि खरी प्रतिभा काय ती इंग्रजी काव्यांत भरली आहे, अशीच जर या लोकांची ठाम समजूत असेल, तर मात्र निरुपायाची गोष्ट आहे; मग बिचाऱ्या जुन्या मराठी कवींच्या दुर्दैवास कधींच अंत नाहीं, असें ह्मटलें पाहिजे! पण या बाबतींत श्रीज्ञानेश्वरांच्या पुढील तीन ओंव्या या लोकांनीं अवश्य वाचाव्या अशी विनंति करितों:—

" पाहें पां दूध पवित्र आणि गोड । पाशीं त्वचेचिया पदरा आड ।
परी तें अव्हेरूनि गोचिड । अशुद्धचि सेवी ॥
अहो ! निर्दैवाच्या परिवरीं । लोह्या रुतलिया आहाती सहस्रवरी ।
तेथ बसोनी उपवास करी । दारिद्र्य जियें ॥
पाहें पां कमळकंदा आणि दर्दुरा । नांदणूक एकेचि घरीं ।
परी मकरंद सेविजे भ्रमरीं । येरां चिखलचि उरे ॥ "

प्राचीन कवींचा व्यासंग मोठा जबर होता. आपल्या पूर्वी होऊन गेलेल्या बहुतेक कवींच्या ग्रंथांचा अभ्यास ते लक्ष्यपूर्वक करीत असत. तपेंच्या तपें अभ्यास करून, समकालीन थोर पुरुषांचीं दर्शनें घेऊन, तीर्थयात्रेच्या निमित्तानें प्रवास करून, आणि तत्कालीन राजकीय, सामाजिक आणि धार्मिक परिस्थितीचें सूक्ष्म दृष्टीनें निरीक्षण करून, बुद्धिप्रागल्भ्य संपादन केल्यावर ते कविता रचावयास बसत असत; किंबहुना तशा स्थितींत त्यांचे उच्च मनोविकार इतक्या उत्कटतेनें बाहेर पडत असत कीं, त्यांच्या तोंडून जे शब्द निघाले ते काव्यरूपानेंच निघावे, असें होत असे. 'Poetry is a spontaneous overflow of powerful feelings' ही कवितेची व्याख्या आमच्या बहुतेक जुन्या कवींच्या काव्यांस जी इतकी यथार्थत्वानें लावतां येते, त्याचें कारण हेंच होय. ज्ञानदेव, नामदेव, मुक्तेश्वर, रामदास, जयराम, रंगनाथ, वामन, मोरोपंत, एकनाथ, कृष्णदयार्णव, सोहिरोबा, देवनाथ व

अवचितसुतकाशी या कवींनीं बहुतेक सगळें हिंदुस्थान पाहिलें होतें, हें त्यांच्याच ग्रंथांवरून उघड होत आहे. ज्ञानदेव व नामदेव हे तीर्थयात्रेस गेले होते व त्या तीर्थयात्रेचें वर्णन नामदेवाच्या तीर्थावळीवरील अभंगांत दिलें आहे. मुक्तेश्वरानें इंग्रज लोकांचें वर्णन आपल्या ग्रंथांत दिलें आहे, यावरून निदान सुरतेपर्यंत तरी त्यानें प्रवास केला होता, हें उघड होत आहे. जयराम व रंगनाथ हे तर हिमालयावरही जाऊन आले होते. वामन, मोरोपंत, कृष्णदयार्णव व एकनाथ हे काशीस गेले होते. यांपैकीं कृष्णदयार्णव कवीनें तर इतके दिवस प्रवास केला होता कीं, तो प्रवास संपवून तो महाराष्ट्रांत आला, त्यावेळीं राज्यक्रांतीमुळें महाराष्ट्राची स्थिति अगदीं पालटून गेलेली त्याच्या दृष्टीस पडली व तशा प्रकारचे उद्गार त्यानें आपल्या ग्रंथांत काढिले आहेत. सोहिरोबा राहणारे कोंकणचे व देवनाथ वऱ्हाडांत राहात होते, पण ते दोघेही ग्वाल्हेर येथें समाधिस्थ झाले, हें प्रसिद्धच आहे. अवचितसुतकाशी कवि तर ‘ दिल्लींद्राच्या बंधनपाशीं ’ आपण सांपडलों होतों, हें स्वतःच आपल्या ग्रंथांत सांगत आहे. निरंजनमाधव कवि तर पक्का राजकारणी असून, त्यानें कर्नाटकांत प्रवास केला होता हें त्याच्याच ग्रंथांवरून सिद्ध होत आहे. रामजोशीबुवांनीं संस्कृताचें अध्ययन केलें तें कर्नाटकांत केलें व त्यांस पांचसहा भाषा उत्तमप्रकारें येत होत्या. एकंदरींत तात्पर्य काय कीं, जुने मराठी कवि चांगले विद्वान, व्यवहारचतुर, सदाचारी, प्रेमळ आणि हरिभक्त होते व इतक्या सर्व गुणांचा त्यांच्या काव्यांत ठिकठिकाणीं ठसा उमटलेला असल्यामुळें तें काव्य सहजच निसर्गमनोहर उतरलें आहे. शिवाय त्यांचा अधिकार फार मोठा होता.

आमचे जुने कवि ‘ एकीकडे भीक मागणारे आणि दुसरीकडे राजास आज्ञा करणारे होते. परधर्मासंबंधानें त्यांचे विचार आकुंचित नव्हते. ‘ सगळे धर्म ईश्वरानें केले आहेत, ते पाहून आनंद मानावा ’ असे उद्गार निरंजनमाधव कवीनें आपल्या ‘ संप्रदाय परिमळ ’ ग्रंथांत काढिले आहेत. तसेंच स्त्रियांसंबंधाचे त्यांचे विचार सर्वांत अनुदारपणाचे नव्हते. मुक्ताबाईचे अभंग प्रसिद्धच आहेत. नामदेवाच्या घरच्या सगळ्या स्त्रिया कविता रचित असत, चोख्यामेळ्याच्या स्त्रीचे अभंग फार सुरस आहेत; तुकारामानें आपल्या स्त्रीस उपदेश केला होता, ते अभंग आज उपलब्ध आहेत; नाथांची कन्या लीलाबाई चांगली सुशिक्षित होती; मोरोपंतांनीं आपल्या मुलींस व सुनांस उत्तम प्रकारचें शिक्षण दिलें होतें; सोहिरोबांची सगळी कविता त्यांची बहीण मुक्ताबाई हिनें लिहिली आहे; वामनांनीं प्रियसुधा काव्य

आपल्या पत्नीसाठीं लिहिलें आणि निरंजनमाधवानें 'संप्रदायपरिमळ' हा ग्रंथ आपल्या पत्नीस आपल्या संप्रदायाची माहिती करून देण्यासाठीं रचिला. तर या सगळ्या गोष्टी काय दाखवितात? आमच्या जुन्या कवींचे स्त्रियांसंबंधाचे विचार नुसते उदार नसून, तें विचारौदार्य त्यांनीं कृतींत उतरलें होतें, हें यावरून सिद्ध होत नाहीं काय? 'आमचीं सामाजिक बंधनें खुलीं झाल्याशिवाय चांगले कवि निर्माण होणार नाहींत' असें कित्येक सुधारक म्हणतात. पण आमच्या जुन्या कवींच्या कालीं हीं सामाजिक बंधनें हल्लींच्यापेक्षां अधिक दृढत्वानें अस्तित्वांत नव्हतीं काय? हल्लींच्या दुष्काळांत सांपडून मरणोन्मुख झालेल्या माणसावर कविता केल्यास ती करुणरसास अत्यंत परिपोषक होईल, असें कोणी म्हणतो; पण मरणोन्मुख झालेल्या माणसाच्या दुःस्थितीशीं आपलें तादात्म्य करून घेण्याइतकी भूतदया, दामाजीपंताप्रमाणें, हल्लींच्या कोणत्या कवींत आहे? "आम्हीं आमच्या मुलांचे मनोविकार वाढवून त्यांची जोपासना केली पाहिजे, म्हणजे ते चांगले कवि होतील" असें कित्येकांस वाटतें व तें कांहीं अंशीं खरें आहे; पण हल्लीं आम्हीं आमच्या मुलांस जें शिक्षण देतों तें द्रव्यदृष्टीनें देतों; आमचीं मुलें विद्वान् व्हावीं, त्यांचे उदात्त मनोविकार जागृत व्हावे व ते कवितारूपानें बाहेर पडावे, इतका आमचा उदात्त हेतु कोठें आहे?

आमच्या जुन्या कवींची परस्परांशीं असलेली वर्तणूक फार अभिनंदनीय होती. क्षुल्लक दोषांकडे लक्ष्य देऊन एकाद्या उद्योगी गृहस्थाची टर उडविण्याकडे त्यांची प्रवृत्ति बिलकूल नव्हती. 'योजी हिताप्रति निवारुनि पापकर्मे। वर्णी बरेच गुण झांकुनियां कुकर्मे॥' या भर्तृहरीच्या उक्तीप्रमाणें ग्रंथकाराची ग्रंथकारांशीं वर्तणूक असली पाहिजे. गुणज्ञता हवी आहे, दोषैकदृष्टी नको. मोरोपंती आर्या रामजोशीबुवांनीं प्रसिद्ध केल्या, व मोरोपंत एवढे विद्वान्, पण आपली कविता पसंतीसाठीं जोशीबुवांकडे पाठवीत असत. स्वतःच्या विद्वत्तेबद्दल जशी त्यांची निरभिमानबुद्धि होती तशीच रामजोशीबुवांच्या ठायीं परोत्कर्षाऽसहिष्णुतेची वार्ताही नव्हती. पंतांनीं आपल्या सन्मणिमालेंत आणि इतरत्र आपल्यापूर्वी होऊन गेलेल्या सगळ्या लहान मोठ्या कवींची मोकळ्या मनानें स्तुति केली आहे. 'मी 'वीर कवींचा नायक;' तुकारामासारख्या निव्वळ प्राकृत शूद्र कवीची स्तुति मी काय करावी?' अशी क्षुद्र भावना त्यांच्या मनांत उत्पन्न झाली नाहीं. पण हल्लींच्या विद्वानांतले कांहीं

गृहस्थ तुकारामास, जेथें तेथें, 'शूद्र कवि' ह्मणण्यास बिलकूल लाजत नाहींत. पूर्वी जातिभेदास फार महत्व दिलें जात होतें, त्यावेळची स्थिति पहा; आणि हल्लीं जातिभेद शिथिल होत चालला असतांही, कनिष्ठ जातीच्या ग्रंथकारानें लिहिलेल्या ग्रंथाची श्रेष्ठ जातीच्या लोकांकडून कशी संभावना होते, तेंही पहा. माझ्या एका विद्वान् मित्रानें, जुन्या कवींच्या काव्यांतले कांहीं निवडक वेंचे प्रसिद्ध केले आहेत; ते वेंचे पहिल्यानें सुवाच्य रीतीनें लिहून काढावयाचे होते. त्यावेळीं माझ्या मित्रास, एका भिन्न जातीच्या गृहस्थांनीं त्या कामीं मदत करण्यास आपण तयार आहों, असें कळविलें. परंतु 'ते वेंचे ब्राह्मणाच्याच हातानें लिहिले गेले पाहिजेत' अशा सबबीवर, सदर गृहस्थांची मदत घेण्याचें माझ्या प्रेमळ मित्रानें नाकारिलें! पण, आपण आपल्या पुस्तकांत जे वेंचे देणार आहेत, त्यांत चोखामेळा, नामदेव, तुकाराम, गोराकुंभार इत्यादि ब्राह्मणेतर कवींच्या काव्यांतल्या वेंचांचीच संख्या मोठी आहे, हें माझ्या मित्राच्या लक्ष्यांत आलें नाहीं! ही कथा थोडीशी अप्रिय आहे; परंतु ती सत्य व पथ्य असल्यामुळें, तिचा मला येथें समावेश करावा लागला, याबद्दल समंजस वाचकांच्या सहानुभूतीची मी अपेक्षा करितों. महाराष्ट्रांतल्या एका प्रसिद्ध इतिहाससंशोधकाची ज्यांत निष्कारण टर उडविली आहे, असा एक लेख, एका प्रसिद्ध मराठी लेखकानें लिहिलेला माझ्या अवलोकनांत आला आहे! एकंदरींत, हल्लींच्या काळीं 'मनाचा मोठेपणा फार दुर्मिळ होत चालला आहे, असें मोठ्या खेदानें ह्मणावें लागतें. एकादा वक्ता आपल्या वक्तृत्वाच्या भरांत आला असतां आणि सगळी श्रोते मंडळी त्याचें भाषण औत्सुक्यानें श्रवण करीत असतां, वेळेची किंवा दुसरी कसली तरी क्षुद्र सबब पुढें करून, त्यास खालीं बसावयास लावणें ह्मणजे उत्तेजन देणें नसून, त्याचा हिरमोड करणें होय; त्याचप्रमाणें एकादा लहानसा ग्रंथकार, एखाद्या मोठ्या ग्रंथकाराकडे आपला ग्रंथ घेऊन गेला असतां 'तूं आपला ग्रंथ बांधून ठेव' असें त्यास सांगणें हेंही उत्तेजन देणें नव्हे. हल्लींच्या ग्रंथकारांत आणि कवींत जर थोडीशी उत्तेजनबुद्धि असती, तर तेच ग्रंथकार, तेच नाटककार, तेच कवि आणि तेच इतिहासकार वरचेवर पुढें कां येते? तर पंतांनीं ह्मटल्याप्रमाणें 'हरिदासातें निंदिति हरिदास नव्हे नवीच हे रीती। गोपी अंगुलि मोडिति कुब्जेवरि शुक कवीच हेरी ती॥' हा प्रकार हल्लींच्या ग्रंथकारांत पदोपदीं दृष्टीस पडतो, तो चांगला नाहीं.

वरील विवेचन वाचून, 'जुन्या कवींची आंधळी तरफदारी केल्याचा आरोप मजवर लादला जाण्याचा संभव आहे, हें मी जाणून आहें; परंतु जुन्या कवींवर व त्यांच्या कवितेवर आक्षेप घेणारे लोकही असाच आंधळेपणा करीत असतात, हें लक्ष्यांत ठेविलें पाहिजे. जुन्या कवींच्या अंगीं किंवा त्यांच्या कवितेंत बिलकूल दोष नव्हते किंवा नाहींत, असें मी कधीं ह्मटलें नव्हतें व ह्मणणारही नाहीं. शेवटीं, 'जुन्या कवींचे ग्रंथ शोधून काढून ते प्रसिद्ध करणारे लोक नव्या कवींसंबंधानें उदासीन राहतात, असा जो कित्येक लोकांचा आक्षेप आहे, त्यासंबंधानें दोन शब्द लिहून, प्रस्तावनेचा हा भाग पूर्ण करितों. जुन्या कवींच्या अभिमान्यांस नव्या कवींबद्दल सहानुभूति वाटत नाहीं, हें विधान अगदीं खोटें आहे. जुन्या कवींचे अनुपलब्ध ग्रंथ जर लवकर शोधून काढून उजेडांत आणले नाहींत तर कालांतरानें ते नष्ट होऊन जातील, ही गोष्ट लक्षांत घेऊन कांहीं शोधक गृहस्थांनीं त्या बाजूनें आपल्या उद्योग चालविला, तर नव्या कवींसंबंधाच्या औदासीन्याच्या आरोपास ते कसे पात्र होतात, हें समजत नाहीं. जो कवितेचा भक्त आहे, त्यास 'जुनी आणि नवी कविता' असा भेदभाव बाळगितां येणें शक्यच नाहीं; कारण तो रसिक असतो. अशा स्थितींत, जुन्या कवींचीं अनुपलब्ध काव्यें शोधून काढण्याचें परिश्रमाचें काम करणारास नव्या कवींसंबंधानें जरूर सहानुभूति असली पाहिजे, हें उघड आहे. आतां नव्या कवींचीं काव्यें फुकट जाण्याचा संभव नाहीं, छापखाने झाल्यामुळें तीं केव्हांना केव्हां तरी प्रसिद्ध होतील, या भावनेनें त्या काव्यांकडे थोडेसें दुर्लक्ष होणें साहजिक आहे. असो.

आपल्या या महाराष्ट्र देशांत इसवी सनाच्या दहाव्या शतकापासून महाराष्ट्र भाषेत ग्रंथरचना करणारे कवि निर्माण होऊं लागले. तेव्हांपासून पेशवाईच्या अखेरीपर्यंत, पुष्कळ लहान मोठ्या मराठी कवींनीं आपल्या मधुर वाणीनें कविता रचून आपल्या भाषेची यथाशक्त्या सेवा केली आहे. आजपर्यंत ज्या कवींची काव्यें उपलब्ध झालेलीं आहेत अशा कवींची संख्या ३०० जवळ जवळ जाते व त्यांपैकीं मोरोपंत वामनासारख्या कांहीं मोठ्या कवींशिवाय इतरांचीं नांवें ही कित्येकांस माहित नसतील. याशिवाय ज्यांच्या ग्रंथांचा अद्याप कांहींच पत्ता लागला नाहीं असेही कांहीं कवी होऊन गेले आहेत. आह्मी जीं उपलब्ध असलेलीं मराठी काव्यें पाहतों त्यांच्या दसपट कविता अद्याप छापून निघाली नाहीं अशी आहे. यावरून आमच्या सत्पुरुषांनीं, मराठी भाषेस भूषित करण्यासाठीं निरपेक्षबुद्धीनें केवढे श्रम

केले आहेत, त्याची कल्पना होईल. आमचे बहुतेक कवी साधु होते, व त्यामुळें त्यांची कविता परमार्थपर आहे. नलदमयंतीस्वयंवराख्यानासारखीं जरी कांहीं शृंगारिक आख्यानें आढळतात तरी शेवटीं त्यांचें पर्यवसान पारमार्थिक उपदेशांत झालेलें असावयाचें. कोणताही जुना कवी घ्या, त्याच्या वाणींत बहुधा प्रसाद भरून राहिलेला असावयाचा. चोख्यामेळ्याचे बायकोनें केलेल्या अभंगांत जो प्रसाद आढळतो आणि जें प्रेम दृष्टोत्पत्तीस येतें, तो प्रसाद आणि तें प्रेम, आजकालच्या सर्वांत उत्तम ह्मणून मानिलेल्या कवींच्या काव्यांत क्वचितच दृष्टीस पडतात. सांप्रतच्या कट्ट्या सुधारकांनीं काढिलेल्या प्रार्थनासमाजासारख्या समाजांतून सुद्धां ज्या कवींच्या पदांशिवाय प्रार्थना चालत नाहीं ( त्यांत थोडासा फेरफार करितात ही गोष्ट निराळी ! ) त्या कवींस माझ्यासारख्या सामान्य माणसाच्या स्तुतीची आवश्यकता आहे असें मुळींच नाहीं.

वास्तविक पाहिलें असतां हा विषय अत्यंत महत्वाचा असून त्याचा अद्याप व्हावा तसा विचार झालेला नाहीं असें माझ्या अल्पबुद्धीस वाटतें. ज्ञानदेवादि साधुसंतांनीं आपल्या उपदेशपरिप्लुत अमृततुल्य वाणीनें केवढें मोठें देशकार्य व धर्मकार्य केलें आहे, किती लोकांस अज्ञानांधःकारांतून बाहेर काढून भागवत धर्माच्या उज्वल प्रकाशांत आणून सोडिलें आहे, किती जडमूढांचा उद्धार केला आहे, आर्यधर्मांत शिरत चाललेल्या कित्येक दुष्ट रूढींस किती जोराचा प्रतिबंध केला आहे आणि एकंदरींत केवढी विचारक्रांति करून महाराष्ट्रास एक प्रकारचें नवीन वळण लावून दिलें आहे हें, इसवी सनाच्या दहाव्या शतकापासून अठराव्या शतकापर्यंतच्या महाराष्ट्रांतील लोकस्थितींत होत गेलेल्या फेरफाराचा इतिहास अवलोकन केल्यास, व जुनीं मराठी काव्यें एकवार लक्ष्यपूर्वक वाचण्याची तरुदी घेतल्यास, कोणासही कळून येणार आहे. तर अशा त्या वंदनीय सत्पुरुषांच्या चरित्रांचा, कवितांचा व तदंगभूत उपदेशाचा जेवढा जेवढा आह्मीं व्यासंग ठेवूं, तेवढा तेवढा उन्नतीच्या बाजूनें आमचा फायदाच होणार आहे, यांत संशय नाहीं.

हल्लीं, मराठी कवि व कविता यांजकडे बऱ्याच विद्वान् लोकांचें लक्ष लागत चाललें आहे, ही आनंदाची गोष्ट होय. रा. पांगारकर, राजवाडे, भावे, देव, भिडे इत्यादि गृहस्थ आज या बाबतींत पुष्कळ परिश्रम करीत आहेत, व सगळ्या महाराष्ट्रावर हे त्यांचे मोठे उपकार आहेत. काव्यसंग्रहाचे प्रस्तुतचे संपादक रा. भिडे

यांचा, मराठी कवींवर लहान लहान निबंध लिहिण्याचा प्रयत्नही स्तुत्य आहे; मात्र त्यांनीं नुसते तर्कावर तर्क लढवीत न बसतां, पहिल्यानें शक्य तितकी खरी माहिती मिळविण्याचा अवश्य प्रयत्न करावा. धुळ्याची सत्कार्योत्तेजक मंडळी समर्थांच्या ग्रंथांसंबंधानें जें कार्य करीत आहे, तें तर मोठ्याच महत्त्वाचें होय; श्रीसमर्थांच्या कृपेनें त्यांस त्या कामीं पूर्ण यश येईल यांत शंका नको. याप्रमाणें, या विषयासंबंधानें प्रस्तुत बरीच चळवळ सुरू आहे, तथापि एकंदर जनसमूहाकडे, विशेषतः सुशिक्षितांकडे पाहिल्यास, या बाबतींत औदासीन्याचाच पगडा विशेष दिसतो. मोठमोठ्या सभांतून, व्याख्यानमालांतून स्वभाषेच्या पोकळ अभिमानानें प्रेरित होऊन आवेशाचीं भाषणें केलीं, मराठी भाषेची स्थिति अद्याप सुधारावी तशी सुधारली नाहीं, असें ह्मणणारे महामूर्ख नसले तर निराशावादी आहेत, अशीं विधानें वक्तृत्वाच्या भरांत ठोकून दिलीं, आणि प्रसवतांना ओरड करून शेवटीं उंदराचें पिलूं बाहेर टाकणाऱ्या इसापनीतींतील डोंगराप्रमाणें, एकाद्या गुजराथी, इंग्रजी नाहींतर बंगाली कादंबरीचें जेमतेम मराठी भाषांतर केलें, ह्मणजे आपण मराठी भाषेची मोठी सेवा केली व तत्संबंधानें आतां आपलें कर्तव्य ह्मणून कांहीं उरलें नाहीं, अशीच ह्या इंग्रजी ग्रंथांच्या लायब्ररीच्या घरांत बाळगणाऱ्या नवपंडितांची जर समजूत असेल तर ती चुकीची होय. इतर बाबतींत जर परकीयांचें अनुकरण करावयाचें, तर या वाङ्मयाच्या बाबतींतही तें कां करूं नये ? इंग्लंडांतील एकाद्या साधारण प्रतीच्या कवीनें एकादें शंभर ओळींचें काव्य लिहिलें तर त्याचें काय स्तोम माजतें आणि केवढा गौरव होतो ! आणि इकडे पहावें तों लाखांनीं मोजण्याइतकी उत्तम कविता लिहिलेल्या कवीचें कोणास नांवही माहीत नाहीं ! जुन्या ग्रंथांची किंमत काय आहे हें इंग्रजी वाङ्मयाचा अभ्यास करणारांस समजूं नये हें आश्चर्य नव्हे काय ? बेकननें आपल्या " अॅडव्हान्समेंट ऑफ् लर्निंग " या निबंधांत, जुन्या ग्रंथांसंबंधानें लिहितांना ह्मटलें* आहे, " हें ज्ञानामृत जर पुस्तकरूपी पात्रांत सांठविलें गेलें नसतें तर तें नष्ट झालें असतें किंवा कालरूपी कीटकांच्या भक्ष्यस्थानीं पडलें असतें. "

हे विचार सुचावयास कारण काव्यसंग्रहासारख्या मासिक पुस्तकांची शोचनीय स्थिति हें होय. सर्वसंग्रह बंद झाला व काव्येतिहाससंग्रहही बंद झाला. कारण

---

* This excellent liquor of knowledge would soon perish and vanish to oblivian if it were not preserved in books.

काय तर छापणावळीचा खर्च भागण्याइतकेही वर्गणीदार नव्हते. परंतु ही वीस वर्षांपूर्वींची स्थिति झाली. त्यावेळीं मराठीभाषा, काव्य व इतिहास यांसंबंधानें व्हावा तसा अभिमान उत्पन्न झाला नव्हता असें ह्मणतां येईल. पण आतां मराठी पुस्तकांची संख्या सात हजारांवर गेली आहे, शेंकडो वर्त्तमानपत्रें व मासिक पुस्तकें निघत आहेत, मराठीग्रंथसंग्रहालयें स्थापन झालीं आहेत, व एकंदरींत मराठीभाषेचा उत्कर्ष होत आहे असें बड्या विद्वान् गृहस्थांकडून विधान करण्यांत येत आहे; असें असतां काव्यसंग्रहासारख्या सर्वांत चांगल्या व अत्यंत महत्वाच्या अशा मासिक पुस्तकास एक हजारही वर्गणीदार नसावे, असलेल्या तीनशें वर्गणीदारांपैकीं शंभरांनीं पैसा खर्च न करितां ग्रंथसंग्रह करण्याची अजब युक्ति योजावी व मालकांस ती एक नुकसानीची बाब झाल्यामुळें " लवकरच बंद करावा लागेल " असे आपल्या विनंतिपत्रांत उद्गार काढण्याचा त्यांजवर वरचेवर प्रसंग यावा ही अत्यंत शरमेची, दुःखाची व आश्चर्याची गोष्ट होय !

ज्यांची मातृभाषा मराठी आहे व जे वर्षाकांठीं पांच रुपये ग्रंथसंग्रहासारख्या उपयुक्त कार्याकडे सहज खर्च करूं शकतील असे लोक कांहीं थोडे नाहींत. परंतु नाहीं काय? कळकळ. ती उत्पन्न झाली पाहिजे. कै. रानडे व मोडक यांनीं विश्वविद्यालयांत जिचा प्रवेश होण्याकरितां एवढे आटोकाट प्रयत्न केले त्या मराठी भाषेचें मूलस्वरूप जी आमची मराठी कविता, जी आमच्या परमपूज्य कवींनीं आपला अमूल्य वेळ खर्च करून, केवळ आमच्याकरितां लिहून ठेविली आहे तिचा आह्मीं जर अशा प्रकारें अनादर केला तर आह्मीं आमच्या पूर्वजांचा अपमान केल्यासारखें नाहीं का होत ?

काव्यसंग्रहासारखीं मासिकपुस्तकें काढणारांस येथें एक सूचना करावीशी वाटते. अशा मासिकपुस्तकांतून पूर्वीं छापून निघालेलीं काव्यें पुनः प्रसिद्ध करण्याचें कधींही प्रयोजन नसतें. जीं काव्यें अगदीं दुर्मिळ व अप्रसिद्ध अशीं असतील तेवढींच छापणें हें श्रेयस्कर होय- अशाप्रकारच्या मासिक पुस्तकांचा उद्देश, छापून निघालेल्या काव्यग्रंथांची पुनरावृत्ति काढण्यापेक्षां नष्ट होत चाललेले दुर्मिळ ग्रंथ पहिल्यानें छापून काढावयाचे, हा असावा असें माझ्या अल्पबुद्धीस वाटतें. कवितेसारख्या विषयाचे भोक्ते फार थोडे असल्यामुळें व कवितेची अभिरुची लोकांत नवीन उत्पन्न करावयाची असल्यामुळें अशा पुस्तकांची किंमत होईल तेवढी कमी ठेविली पाहिजे. दुसरें असें कीं सगळ्याच कवींच्या काव्यांस एकदम प्रारंभ केल्यामुळें, वर्गणीदारांस, एकेक कवी पूर्णपणें हातीं येण्यास तपांचीं तपें वाट पहावी,

लागते. तर अशा रीतीनें वर्गणीदारांस तिष्ठत ठेवण्यापेक्षां, पाहिल्यानें एकाच कवीच्या काव्यांस प्रारंभ करून तो संपल्यावर दुसरा, या पद्धतीचा स्वीकार केल्यास एका वर्षांत ३।४ लहान कवी किंवा १।२ मोठे कवी सहज छापून निघतील. असो.

अलीकडे रा. रा. पांगारकर यांनीं, सर्व महाराष्ट्र कवींस ललामभूत असणारे जे मोरोपंत त्यांच्यासंबंधाची पुष्कळ खरी माहिती मिळवून ती केसरीपत्रांत प्रसिद्ध करून आह्मां महाराष्ट्र जनांवर मोठे उपकार केले आहेत. हा कालपर्यंत आमच्यांत पुष्कळ विद्वान् होऊन गेले, परंतु त्यांत मराठी कवितेच्या उद्धारार्थ ज्यांनीं प्रयत्न केला असे कै० माधव चंद्रोबा, परशुरामपंत तात्या, जनार्दन बाळाजी मोडक आणि वामन दाजी ओक हे फक्त काय ते चार गृहस्थ होत. यांशिवाय डॉ. कुंटे, निबंधमालाकार, तेंडुलकर, तुकाराम तात्या, व बाळाजी कंपनी, ह्यांनींहि इकडे बरेंच लक्ष्य दिलें होतें. " अहो, मराठी कविता ती काय? ती लिहिणारांची योग्यता ती काय? धुरानें काळीं आणि हात लावतांच कोसळून पडतील अशीं जर्जरीभूत झालेलीं दप्तरें सोडून आपले कपडे खराब करून घ्यावे कोणी, आणि आहे काय प्रकरण? मराठी कवी ह्मणजे काय निव्वळ भाषांतरें! त्यांची शब्दरचना काय, विचार काय, सारेंच वेडें चमत्कारिक! मिल्टनच्या "प्याराडाइज लॉस्ट"ची किंवा टेनिसनच्या " प्रिन्सेस " काव्याची बरोबरी करणारें मराठींत एक देखील काव्य मिळावयाचें नाहीं. " असेंच ह्मणणारे आजकाल शेंकडा नव्वद विद्वान् आढळतील. हें मी कांहींतरी आपलें विधान ठोकून दिलें असें समजण्यापूर्वीं प्रत्येकानें आपल्याला मराठी कवितेसंबंधानें कितीशी कळकळ आहे असा आपल्या मनास प्रश्न करून पहावा; मग मी ह्मणतों हें खरें कीं खोटें हें लक्ष्यांत येईल. निदान माझा तसा अनुभव आहे व तो येथें दाखल करण्यांत मला कांहीं कमीपणा वाटत नाहीं.

उच्च प्रतीचें वाचन ह्मटलें ह्मणजे काव्यवाचन होय, कादंबरीवाचन नव्हे. आतां ज्याअर्थीं, आमचे सर्व कवि बहुतकरून साधु होते त्याअर्थीं अर्थबोधापलीकडे आपली कविता सजविण्याचा त्यांनीं विशेषसा यत्न केलेला नाहीं हें कबुल करणें भाग आहे, पण निबंधमालाकारांनीं ह्मटल्याप्रमाणें " पुढील शतकांत सगळेंच पारडें फिरून जाऊन नवे प्रभु, नवी विद्या, नवे महाकवि आणि नवे रसिक अशी गर्दीच गर्दी उसळून जाणार आहे आणि उपमा, उत्प्रेक्षा, सृष्टिसौंदर्यवर्णन वगैरे पदार्थ तोलण्याचे कांटे विलायतेहून या देशांत येऊन थडकणार आहेत हें तरी त्या बिचाऱ्यांस थोडेंच माहित होतें? "

इंग्रजीच्या धर्तीवर मराठी कवींवर टीकात्मक ग्रंथ लिहिण्याचें काम प्रथम आपल्या इकडे कै. बाळकृष्ण मल्हार हंस यांनीं केलें. ते फार विद्वान् व रसिक पुरुष होऊन गेले यांत संशय नाहीं. त्यांनीं मोरोपंत, वामन व तुकाराम या तीन मुख्य महाराष्ट्र कवींवर निबंध लिहिले आहेत व त्यांस दक्षिणाप्राइझ कमीटीनें बक्षिसेंही दिलीं होतीं. कै. ओक यांनीं या हंसांच्या निबंधांची फार तारिफ केली आहे व काव्यसंग्रहांतील आपल्या टीपांच्या समर्थनार्थ त्या निबंधांतील उतारे दिले आहेत ते फार उत्तम आहेत.

त्यानंतर खरोखर नावाजण्यासारखें आणि अभिमान बाळगण्यासारखें कृत्य कै विद्वन्मणी वामनरावजी ओक यांचें होय. कै. ओकांचे वेळचा काव्यसंग्रह आणि त्यानंतरचा काव्यसंग्रह यांची तुलना करून पाहिल्यास त्यांचा मराठी कवितेचा व्यासंग केवढा जबरदस्त होता याची कल्पना करितां येईल.

आतां आह्मीं काय केलें पाहिजे याचा थोडासा विचार करून व प्रस्तुत यत्ना-संबंधानें दोन शब्द लिहून हा लांबलेला प्रस्तावलेख पुरा करितों. मराठी कवींचे न छापलेले असे ग्रंथ बाहेर गांवीं बरेच अवलोकनांत येतात व त्यांना जर ते आहेत त्याच स्थितींत आणखी पांच दहा वर्षें राहूं दिलें तर ते नष्ट होऊन जातील व आमचें फार नुकसान होईल यांत संशय नाहीं. मुक्तेश्वरी भारताचीं कांहीं पर्वें व भागवत, नामदेवी महाभारत, नरहरी मोरेश्वरकृत महाभारत, माधवस्वामीकृत महा-भारत व रामायण, नारायणभट्टकृत जैमिनी अश्वमेध वगैरे बरेच मोठमोठे ग्रंथ व इतर लहान लहान काव्यें जिकडे तिकडे पडून राहिलीं आहेत. असे ग्रंथ व अशीं काव्यें मिळवून तीं एकवार छापणें हें *सुशिक्षितांचें कर्तव्य होय. छापून प्रसिद्ध करण्यास सवड नसेल तर निदान त्यांच्या नवीन हस्तलिखित प्रती तरी तयार केल्या पाहिजेत व हें काम विशेषतः ग्रंथसंग्रहालयासारख्या संस्थानींच करावयाचें आहे. पुस्तकें जमविलीं व तीं वर्गणीदारांस वाचावयास दिलीं हाणजे कार्यभाग आटोपला असें होत नाहीं. वर्तमानपत्रांतून चर्चा केली पाहिजे, बाहेरगांवीं राहणाऱ्या शोधक गृहस्थांच्या द्वारें जुने ग्रंथ पैदा केले पाहिजेत, ते जीर्ण झालेले असतील तर त्यांच्या नव्या प्रती करून ठेविल्या पाहिजेत व सवडीप्रमाणें ते ग्रंथ छापूनही काढिले पाहिजेत, तरच " मराठीग्रंथसंग्रहालय " हें नांव सार्थ होईल !

---

* हल्लीं, ' महाराष्ट्र साहित्यपरिषद ' स्थापन झाली आहे, ती या बाबतींत कांहीं तरी प्रयत्न करील अशी आशा आहे. मात्र, अद्याप तसें कांहीं लक्षण दिसत नाहीं !

शेवटीं, कवींचीं विश्वसनीय चरित्रें. यां बाबतींत आपली स्थिति अद्याप इतकी शोचनीय आहे कीं मराठी भाषेचा आदिकवी कोण याचाही अद्याप निकाल लागत नाहीं. ज्ञानेश्वर एक कीं दोन हा वाद अद्याप आश्लेषा नक्षत्रांतील पर्जन्याप्रमाणें मधून मधून चालूच आहे. तरी पण या वादाचे पूर्वपक्षकार " भारद्वाज " यांचें आह्मीं आभार मानिले पाहिजेत, कारण त्यांनीं हा वाद उपस्थित केला ह्मणून ज्ञानेश्वरांचे वेळची बरीच नवीन माहिती आज उपलब्ध झाली आहे व मराठी कवींचीं चरित्रें लिहिणारांस तिचा फार उपयोग होईल यांत शंका नाहीं. महाराष्ट्रांतील बहुतेक सत्पुरुषांचीं चरित्रें लोकोपकारार्थ महिपतिबावांनीं आपल्या भक्तविजय, भक्तलीलामृत, संतविजय व संतलीलामृत या चार मोठाल्या ओंवीबद्ध ग्रंथांत भक्तिपुरःसर व विस्तारेंकरून वर्णन केलीं आहेत. याशिवाय एकनाथ, ज्ञानेश्वर व रामदास यांच्या शिष्यमंडळापैकीं कित्येकांनीं त्यांचीं चरित्रें लिहून ठेविलीं आहेत. सच्चिदानंदबावांनीं " ज्ञानेश्वरविजय " या नांवाचा ग्रंथ लिहिला आहे, केशवदासांनीं " एकनाथचरित्र " लिहिलें आहे व उद्धवसुत, आत्मारामबुवा व हनुमंतस्वामी यांनीं रामदासचरित्रांवर ग्रंथ लिहिले आहेत. हें ग्रंथ विस्तारानें लिहिलेले असून त्यावेळच्या देशस्थितीच्या इतिहासाचा अभ्यास करूं इच्छिणारांस फार उपयोगीं पडण्यासारखे आहेत.

यानंतर इकडे इंग्रजी अंमल सुरू झाल्यापासून कविचरित्र, ज्ञानेश्वरचरित्र, माणिकप्रभूचें चरित्र, एकनाथचरित्र, नामदेवचरित्र, तुकारामचरित्र, रामदासचरित्र, व वामनपंडितांचें चरित्र हे कविचरित्रपर गद्यग्रंथ विद्वान् लोकांनीं लिहिले आहेत व त्यांतील बहुतेक सर्वमान्य झाले आहेत. परंतु अनेक कवींच्या चरित्रांविषयीं व त्यांच्या काव्यांविषयीं ज्यांत माहिती मिळूं शकेल असें रा. सा. नारायणराव पावगी यांच्या " महाराष्ट्र भाषेचा इतिहास " या पुस्तकाशिवाय दुसरें पुस्तक अद्याप प्रसिद्ध झालेलें नाहीं. शेवटीं सांप्रतच्या पुस्तकासंबंधानें दोन शब्द लिहितों. हें पुस्तक, आजपर्यंत मराठी कवितेसंबंधानें जी माहिती उपलब्ध झाली आहे तिच्या आधारानें लिहिण्याचा मी प्रयत्न केला आहे. या भागांत, जे कवि विशेष प्रसिद्ध नाहींत व ज्यांची कविता पुष्कळ असतांही ज्यांच्या चरित्रांसंबंधानें ह्मणण्यासारखी माहिती कोणीं दिलेली नाहीं अशा कवींच्या चरित्रांचा समावेश केला आहे. यांतील चरित्रविषयक कांहीं गोष्टी वादग्रस्त दिसतील, कालमानांत चुक्या झालेल्या असतील व कांहीं ठिकाणीं दिलेली माहिती अगदींच अपुरी आहे असें

वाटेल, परंतु ज्या अर्थी या बाबतींत प्रत्यक्ष विश्वसनीय असा ऐतिहासिक पुरावा मिळणें अशक्य आहे त्या अर्थी असले प्रकार होणें असंभाव्य नाहीं हें सुज्ञ वाचकांस सांगावयास नको; तसेंच या पुस्तकांत दिलेले कवितांचे वेंचे, माझ्या मतें जे रमणीय व हृदयंगम असे वाटले, तेच देण्याचा मी प्रयत्न केला आहे. परंतु 'भिन्न रुचिर्हि लोकाः' या न्यायानें ते कोणास तसे वाटले नाहींत तर त्याबद्दल मला क्षमा होईल, अशी आशा करितों.

कै. न्या. रानडे यांच्या कित्येक वर्षांच्या दीर्घ प्रयत्नानें, मुंबईच्या विश्वविद्यालयाच्या अत्युच्च परीक्षेंत हल्लीं मराठी भाषेचा प्रवेश झाला असून, त्यासाठीं जीं मराठी पुस्तकें नेमण्यांत आलीं आहे, तीं बहुतेक सर्वमान्य ग्रंथकारांनीं लिहिलेलीं असून, निबंधमाला व कै. हंस यांचे निबंध, हे ग्रंथ तर सर्वोत्कृष्ट आहेत. प्रस्तुत ग्रंथही, मराठी भाषा हा मुख्य विषय घेऊन, एम्. ए. च्या परीक्षेस बसणाऱ्या विद्यार्थ्यांस बराच उपयुक्त होईल, अशी माझी नम्र भावना आहे. शिवाय, मराठी कविता व कवि यांच्यासंबंधानें ज्या लोकांस बिलकूल अभिमान वाटत नाहीं किंवा गैरसमजानें, मराठी कवितेसंबंधानें ज्यांचा ग्रह वाईट झालेला आहे, अशा मुग्धवृत्ति लोकांच्या मनावर, हा ग्रंथ वाचून, कांहीं सत्परिणाम झाल्यास, या माझ्या पांच वर्षांच्या परिश्रमाचें पूर्ण साफल्य झालें, असें मी मानीन. मात्र, अशा लोकांच्या हातीं हा ग्रंथ कसा पडावा, हा मोठा प्रश्न आहे. तथापि ज्या रसिकांच्या हातीं, हा ग्रंथ पहिल्यानें जाईल, त्यांनीं आपल्या मित्रमंडळीस त्यांतील कांहीं चरित्रें वाचून दाखविण्याची तसदी घेतल्यास, ही गोष्ट सहज घडून येण्यासारखी आहे.

या पुस्तकांत ज्या कवींचीं व साधूंचीं चरित्रें आलीं आहेत, त्यांनीं केलेल्या अलौकिक चमत्कारांच्या गोष्टी या ग्रंथांत द्याव्या कीं न द्याव्या या संबंधानें बराच मतभेद होता, परंतु चमत्कारांच्या खरेपणाबद्दल व शक्यतेबद्दल माझी व माझ्या अनेक विद्वान् मित्रांची खात्री असल्यामुळें, तसे चमत्कार या ग्रंथांत देण्यास मला कांहीं हरकत वाटली नाहीं. परवां होऊन गेलेले अक्कलकोटचे प्रसिद्ध स्वामी, यांच्या चरित्राचे कर्ते, रा. सा. गणेश बल्लाळ मुळेकर हे त्या ग्रंथाच्या प्रस्तावनेंत लिहितात:— हल्लींचा मनु मनांत आणिला ह्मणजे कुत्सित कल्पना मनांत आणणारे सुधारक कांहीं कांहीं लेखांस नाकें मुरडतील यांत संशय नाहीं. व्यक्तिमात्राची मति भिन्न आहे व ती एकोणिसाव्या शतकांत (आतां विसाव्या शतकांत) पूर्ण स्वातंत्र्यास पावली आहे. सबब भिन्न मत कोणत्याही गोष्टीबद्दल असणें साहजिक आहे.

पूर्वींचे शतकांत, तुकाराम, ज्ञानोबा, रामदास, वगैरे मोठे मोठे साधु कां निपजले व हल्लींचे काळीं धर्मपुस्तकांचे डोंगरच्या डोंगर छापखान्यांतून बाहेर पडत असून साधूंची उणीव कां? असा प्रश्न कोणी केल्यास, मतीची अमर्याद धांव, हेंच कारण असल्याचें दिसून येईल. पूर्वींचे भाविक लोक आपल्यापूर्वीं निपजलेले संतांचे वाक्यांवर विश्वास ठेऊन पुढें आपली मति चालवून धर्म वाढवित. हल्लींचा काळ असा आहे कीं, सुधारकांचा साधुसंतांचे वाक्यावर विश्वास नाहीं, एवढेंच नाहीं, तर ईश्वरप्रणीत वेद-वाक्यांवरही त्यांची श्रद्धा नाहीं, मग रामकृष्णादि अवतारांबद्दल त्यांना आस्तिक्य-बुद्धि कोठून असणार? अर्थातच हल्लींचे काळांत साधुत्व अंगीं येणें फार कठीण आहे. कोणतेंही शास्त्र घ्या, त्याची वृद्धि होण्यास, पूर्वाचार शास्त्रकर्त्यांनीं केलेल्या शोधांचा विचार होऊन त्यांत बुद्धि चालवून भर घालावी लागते. हीच गोष्ट धर्मशास्त्रास लागू आहे, आणि धर्माचे बाबतींत आमचे देशांत जितका विचार झाला आहे तितका पृथ्वीचे पाठीवर दुसरे कोणतेंही देशांत झाला नाहीं. गीताशास्त्राची थोरी पाश्चिमात्य लोकांनीं वर्णन केली म्हणजे आम्हांस खरी वाटते! असो. धर्मावर व साधुसंतांवर श्रद्धा असणें हें धर्माचें मूलतत्त्व आहे. सत्पुरुषाच्या पुढें आपली किंमत किती हें जर सुधारकांस किंवा सत्पुरुषांनीं केलेल्या चमत्कारांवर विश्वास न ठेवणाऱ्या दुसऱ्या कोणांस समजून घ्यावयाचें असेल तर त्यांनीं, 'रावसाहेब मुळेकरकृत' अक्कलकोटच्या स्वामीच्या चरित्रांतील, २१८।२१९ या पृष्ठांवरील मजकूर अवश्य वाचावा अशी त्यांस माझी नम्र सूचना आहे. शिवाय, नरसोबाची वाडी, गाणगापूर इत्यादि ठिकाणीं, आजही, जे कांहीं चमत्कार अवलोकनांत येतात, त्यांचा खोटेपणा अद्याप कोणी सप्रमाण सिद्ध केला नाहीं. दुसरें असें कीं, हिंदुस्थानांतील प्रख्यात शास्त्रज्ञा-नींही, हिंदूंसच नव्हे, तर कित्येक युरोपीयनांसही असे चमत्कार करून दाखविले आहेत कीं, ते पाहून त्यांस या बाबतींत मोठें आश्चर्य उत्पन्न झालें आहे. निशाणाचें चालणें म्हणजे केवढी भयंकर गोष्ट! पण आज गोमांतकांत एका देवस्थानांत हा प्रकार प्रसिद्धपणें चालू आहे. तसेंच वाळलेल्या लांकडांना पालवी येत चाललेला कधीं कोणी पाहिला कीं ऐकिला आहे? पण रत्नागिरी जिल्ह्यांत, वेंगुर्लें तालुक्यांत केळूस नामक एक गांव आहे, तेथें, एका पुरातन सत्पुरुषाची समाधि आहे, तेथें, शिवरात्रीच्या सुमारास वरील प्रकार घडत असलेला पुष्कळांनीं पाहिला आहे व इतरांनीं जाऊन खुशाल पहावा. जेजुरी व औदुंबर येथें जे अलौ-किक चमत्कार घडतात, त्यांपैकीं कांहीं चमत्कारांची माहिती मुंबई येथील टाइम्स

ऑफ इंडिया पत्रांत, पुराव्यानिशीं प्रसिद्ध झाली आहे. शोधक इंग्रजांस[*] असल्या चमत्कारांचें मोठें कौतुक वाटून, ते त्यासंबंधानें शक्य तितकी माहिती मिळवून ती प्रसिद्ध करितात आणि आमच्या नवपंडितांस चमत्कार ह्मणजे निव्वळ कल्पना-सृष्टि आहे, असें वाटतें! कारण कांय, तर हे पडले परप्रत्ययनेयबुद्धि! स्वतः शोध करावयाचा नाहीं, दुसऱ्यानें दिलेल्या माहितीवर विश्वास ठेवावयाचा नाहीं. असो. एकंदरींत, ज्या विषयांचा अर्वाचीन आधिभौतिक शास्त्रज्ञांस अद्याप पुरा शोध लागला नाहीं अशांपैकींच 'चमत्कार' हा एक विषय होय. 'भुताटकी' खोटी आहे, असें आजपर्यंत मोठमोठे विद्वान् मानीत व प्रतिपादित होते; आमच्या मालाकारांचाही तसाच समज होता, परंतु हल्लीं सर आलिव्हर लॉजसारख्या शास्त्रज्ञासही या भुताटकीनें पछाडलें असून, भुताटकी खरी आहे, अशाबद्दल कित्येक पुरावे त्यांनीं प्रसिद्ध केले आहेत.

सुमारें एक वर्षापूर्वी हिंदुस्थानांत येऊन विलायतेस गेलेल्या एका विद्वान् इंग्रजानें, आपल्या प्रवासाची हकीकत प्रसिद्ध केली आहे, तींत त्यानें, 'बंगाल्यांत जमीनीपासून एक हात उंचीवर, अधांतरीं, समाधि लावून बसलेल्या एका विद्वान् व आंग्लविद्याविभूषित हिंदु योग्याची गोष्ट,' स्वनेत्रांनीं पाहून लिहिलेली वाचल्याचें मला आठवतें. मालेगांव येथें एका जैन यतींनीं थोड्या दिवसांपूर्वी जे अलौकिक चमत्कार करून दाखविले, ते अहमदनगरचे वकील रा. बळवंत बाबाजी देशपांडे यांनीं, आपल्या डोळ्यांनीं पाहून, त्यांची हकीकत सुधारक[1]पत्रांत प्रसिद्ध केली आहे. वरवंटा अधांतरीं ठेवणें, टेबल चालविणें, चौरंगाकडून छत्री आणविणें व दोन गांवांमधील अंतर ठोके मारवून वदविणें, इत्यादि चमत्कार जर आज होतात, तर ७०० वर्षांपूर्वी, ज्ञानदेवांनीं भिंत चालविली, हा चमत्कार खोटा कां ह्मणावा? वरील जैन यतींच्या चमत्कारांची हकिकत सुधारकांत प्रसिद्ध झाली त्याच सुमारास अहमदाबाद येथील एका दक्षिणी डॉक्टरसाहेबांनीं, 'भिंत चालविण्याचा चमत्कार आजही लहानशा प्रमाणांत करून दाखवितां येईल' असें, इंदुप्रकाश पत्रांत प्रसिद्ध केलें होतें. तर एकंदरींत, चमत्कार तेवढे सगळे खोटे किंवा अशक्य असें ह्मणण्याचें धाष्टर्य, यापुढें तरी, कोणी करूं नये हें चांगलें.

---

१ सुधारकाचे, ता. १० मे १९०७ व ता. ३ जून १९०७ हे दोन अंक पहा.

शेवटीं ! हा ग्रंथ लिहिण्याच्या कामीं मला ज्या इतर ग्रंथांचा प्रमुखत्वानें उपयोग झाला, त्यांचा येथें निर्देश करितों. काव्यसंग्रह, महाराष्ट्रकवि, बाळाजी आणि कंपनीचे वामनीग्रंथ, कविचरित्र, काव्येतिहाससंग्रह, लोकमित्र व ग्रंथमाला यांचा उपयोग फार झाला व त्याबद्दल त्या ग्रंथकारांचा मी फार फार आभारी आहें. ह्याशिवाय, मला जे शेंकडो जुने ग्रंथ चाळावे लागले त्यांची यादी येथें देण्यांत कांहीं फायदा नाहीं; उलट, स्वतःच्या विस्तृत ग्रंथावलोकनाचें प्रदर्शन केल्याचा आरोप मात्र कित्येकांकडून होण्याचा संभव आहे, तेव्हां त्या भानगडींत मी पडत नाहीं.

ह्या ग्रंथांतील निरंजनमाधव, प्रल्हाद, अनंत व रामचंद्र बहवे ह्या चार कवींचीं चरित्रें लिहिण्याच्या कामीं, माझे प्रेमळ मित्र, रा. रा. लक्ष्मण रामचंद्र पांगारकर बी. ए. यांचें मला पुष्कळ साहाय्य झालें, त्याबद्दल मी त्यांचे जितके आभार मानावे तितके थोडेच होतील. प्रस्तुत ग्रंथाचा हा पहिला भाग, माझ्या प्रिय महाराष्ट्र वांचकांस पसंत पडला, तरच पुढील भाग लिहिण्यास मला उत्तेजन येईल, हें सांगा-वयास नकोच. प्रस्तुत ग्रंथ, गगनबावडा संस्थानचे विद्यमान अधिपति श्रीमंत राजश्री माधवराव मोरेश्वर ऊर्फ बाळासाहेब, पंत अमात्य, हुकुमत पन्हा, यांजकडे पाठविला होता. त्यांनीं अवघ्या आठ दिवसांत ग्रंथ वाचून त्यासंबंधाचें आपलें मत कळविलें व ग्रंथाची यथाशक्ति संभावना केली. हें सर्व अवघ्या आठ दिवसांत झालें, हें लक्षांत घेतलें म्हणजे इंग्रजी पद्धतीनें वागणाऱ्या कित्येक संस्थानिकांपेक्षां, जुन्या तऱ्हेनें वागणारे कांहीं संस्थानिक आपला कारभार किती व्यवस्थेनें चालवितात, गरिबांची दाद घेण्यास किती तत्पर असतात, गुणज्ञता त्यांच्याठायीं कशी वास करिते, याचा चांगला खुलासा होतो. शेवटीं,

‘ आपुलिया बळें नाहीं मी बोलत । सखा भगवंत वाचा त्याची ॥ १ ॥
साळुंकी मंजुळ बोलतसे वाणी । शिकविता धणी वेगळाची ॥ ३ ॥
काय म्यां पामरें बोलावीं उत्तरें । परि त्या विश्वंभरें बोलविलें ॥ ४ ॥
तुका म्हणे त्याची कोण जाणे कळा । वागवी पांगुळा पायांविण ॥ ५ ॥

या तुकारामबुवांच्या प्रासादिक वाणीनें ही प्रस्तावना पुरी करितों.

पुणें. }
१३–१२–०७ }

ज. र. आजगांवकर.

# महाराष्ट्रकविचरित्र.

## भाग १ ला.

## मुकुंदराज.

वंदन नंदनसा मी करितों भावें मुकुंदराजाला ॥
वश झाल्या सद्विद्या सत्कीर्ति सुमुक्ति सुंदरा ज्याला ॥ १ ॥

सन्मणिमाला—मोरोपंत.

मुकुंदराज हे मराठी भाषेचे आदिकवि होत, असा समज आहे. हे कोणत्या काळीं होऊन गेले, याचा निर्णय करणें फार कठीण आहे. कारण त्यासंबंधानें विश्वास ठेवण्यासारखें असें एकही प्रमाण सांपडत नाहीं. केवळ कल्पनातरंगावर काम भागविलें पाहिजे. आमच्या बहुतेक मराठी कवींनीं आपल्या ग्रंथांचे आरंभीं व शेवटीं स्वतःचा जीवनवृत्तांत व ग्रंथ समाप्तीचा काल निर्दिष्ट केला आहे; परंतु मुकुंदराजांनीं आपल्या एकाही ग्रंथांत तसें केलेलें नाहीं. फक्त विवेकसिंधु ग्रंथांत मात्र, ज्याच्याकरितां त्यांनीं तो ग्रंथ रचिला, त्या जयत्पाळ राजाचा उल्लेख केला आहे. उद्धवसुतकृत "रामदासचरित्र अथवा रामदासी कीर्तनसंग्रह" या नांवाच्या एका ओवीबद्ध ग्रंथांत मुकुंदराजांचें लहानसें चरित्र दिलें आहे, त्याचा भावार्थ येथें देतों.

"कोणी अत्यंत विषयासक्त मलय नांवाचा गंधर्व होता. तो एके दिवशीं आपल्या स्त्रियांसहवर्तमान उन्मत्त वेषानें सरोवरांत जलक्रीडा करीत असतां तिकडून नारदमुनींची स्वारी आली. नारदांनीं गंधर्वाकडे पाहिलें, परंतु विषयाच्या योगें-करून त्याचे नेत्र धुंद झालेले असल्यामुळें त्याचें लक्ष नारदांकडे गेलें नाहीं. हा त्याचा उन्मत्तपणा पाहून नारद परम क्रोधायमान झाले व त्यांनीं त्याला शाप दिला कीं, "तूं मृत्युलोकीं जाऊन जन्म धारण कर." ही शापोक्ति श्रवण करितांच

गंधर्व शुद्धीवर आला व त्यानें नारदांची क्षमा मागून " उःशाप द्या, " अशी विनंति केली. नारदांनीं सदयांतःकरणानें उःशाप दिला कीं, " पहिल्या जन्मीं तूं जयत्पाळ राजाचे घरीं उत्तम जातीचा घोडा होशील, तेथें मुकुंदराज नामक एका महान् साधूच्या हस्तस्पर्शानें तुझा उद्धार होईल. " असें ह्मणून नारद अंतर्धान पावले.

शापाप्रमाणें, मृत्युलोकांत, जोगाईच्या आंब्याचा राजा जयत्पाळ याचे घरीं तो मलय गंधर्व अश्व झाला.

जयत्पाळ राजा मोठा चतुर व हरिभक्तिपरायण होता. त्यानें अनेक ग्रंथ वाचले व तदनुसार वर्तन केलें; तथापि त्याला साक्षात्कार होईना. त्यामुळें तो थोडासा भ्रमिष्ट झाला होता. जे जे महापुरुष व साधु त्याच्या राजधानींत येत, त्यांस राजानें " मला कशानें साक्षात्कार होईल ? " असा प्रश्न करावा. असे शेंकडो लोक आले तरी राजाचें समाधान एकाकडूनही झालें नाहीं. ते नुसतें शाब्दिक ज्ञान मात्र सांगत; परंतु अनुभवाची गोष्ट एकासही बोलतां येईना. शेवटीं राजास मोठा राग आला व त्यानें, तलाव खणण्याचें काम चालविलें होतें, त्या कामावर मजुरांचे ऐवजीं या शास्त्री व पंडितांची योजना केली !

अशा प्रकारें बिचाऱ्या ब्राह्मणांचे हाल होत असतां, प्रत्यक्ष मुकुंदावतार, ज्ञान-बुद्धीचे सूर्य, शांत, दांत व करुणाघन असे मुकुंदराज हातांत वेताची छडी घेऊन ब्रह्मचारी वेषानें त्या ठिकाणीं प्राप्त झाले. त्यांनीं विचारल्यावरून त्या ब्राह्मणांनीं यथाभूत हकीकत मुकुंदराजांस निवेदन केली. ती ऐकून मुकुंदराज ह्मणाले, " मला तुह्मीं राजाजवळ घेऊन चला. " ब्राह्मण ह्मणाले, " जर आम्हीं तुह्मां-बरोबर आलों, तर राजसेवक आह्मांस मारतील. " मुकुंदराजांनीं फारच आग्रह केला, तेव्हां सर्व ब्राह्मण त्यांस बरोबर घेऊन राजवाड्याकडे यावयास निघाले. त्या वेळीं सेवकांनीं त्यांस प्रतिबंध केला. मुकुंदराजांनीं त्यांस सांगितलें कीं, तलावाचें काम चालू आहे, मग तुह्मीं आह्मांस व्यर्थ प्रतिबंध कां करितां ? हें ऐकून दूत पाहतात तों कुदळी व पावडीं आपोआप जमीन खणीत आहेत व पांट्या माती बाहेर आणून टाकीत आहेत ! हा चमत्कार अवलोकन करितांच, सर्वांस मोठें आश्चर्य वाटलें. राजसेवकांनीं धांवत जाऊन हें वृत्त जयत्पाळ राजास निदेवन केलें.

राजा धांवतच निघाला व त्यानें मुकुंदराजांस मोठ्या सन्मानानें राजवाड्यांत

आणिलें. मुकुंदराज म्हणाले कीं, ब्राह्मण लोकांस अशा प्रकारें त्रास देणें हें कुलक्षयास कारण होण्यासारखें होय. राजानें सांगितलें कीं महाराज, माझा यांत कांहीं अपराध नाहीं. यांना आत्मज्ञान कसें होईल ह्मणून मी विचारिलें असतां मला यांनीं शब्दज्ञान मात्र सांगितलें. यांना खरें ज्ञान कांहींच नसतां केवळ साधुत्वाचें ढोंग मात्र माजवितात, तरी अशा लोकांना हीच शिक्षा योग्य आहे. हें राजाचें भाषण ऐकून मुकुंदराज ह्मणाले, मी तुला आत्मज्ञानाचा उपदेश करितों, परंतु या ब्राह्मणांस पहिल्यानें मुक्त कर व त्यांचें क्षौर वगैरे करवून त्यांची पूजा कर." राजानें तें मान्य केलें व स्वामींनीं सांगितल्याप्रमाणें ब्राह्मणांची व स्वामींची त्यानें यथासांग पूजा केली.

मग मुकुंदराज अश्वशाळेंत गेले व त्यांनीं मलयगंधर्वरूपी घोड्यास आणून राजास सांगितलें कीं, "या घोड्यावर बैस, मग तुला उपदेश देतों." राजानें घोड्यावर बसण्याकरितां रिकिबींत पाय ठेविला, तोंच मुकुंदराजांनीं त्याजवर हातांतील छडीचे प्रहार सुरू केले. बावन्न वेळ छड्या पाठींत बसतांच राजा ब्रह्मरूप झाला व त्याची समाधि लागली !

मग मुकुंदराजांनीं जयत्पाळास खालील अभंग ह्मणून आत्मज्ञानाची ओळख करून दिली.

अभंग ( मुकुंदराजकृत ).

दृष्टीचें अग्र शून्याचें तें सार ॥ तेंची दशमद्वार पाहीं बापा ॥ १ ॥
तेथें मधुकर नित्य खेळें आतां ॥ सूक्ष्म पाहतां अति लीन ॥ २ ॥
लीन होऊनियां भुंगिणीचे परी ॥ जिताचि ओवरी ग्रासियेली ॥ ३ ॥
ह्मणे मुकुंदराज अवघाचि गोविंद ॥ गो नामें तो शब्द लीन तेथें ॥ ४ ॥

अभंग.

सत्व रज तम गेलें निरसोनी ॥ दृश्याची लावणी कैसी झाली ॥ १ ॥
गेली गा माझारीं पाहतां न दिसे ॥ स्वयें तें प्रकाशे सदोदित ॥ २ ॥
आंत बाहेरीही पाहतांची जरी ॥ शून्याची ओवरी ग्रासियेली ॥ ३ ॥

अभंग.

जाणतां हे कळा हारपोनी गेली ॥ दृष्टी माझी वळली तयामाजी ॥ १ ॥
रूपातीत दृष्टी पाहतां अगोचर ॥ देखतां सादर जवळी असे ॥ २ ॥
दृष्टीवीण पाहणें शब्देंवीण बोलणें ॥ मुकुंदराज ह्मणे ऐसें झालें ॥ ३ ॥

असो; यानंतर तेथें जमलेल्या सर्व ब्राह्मणांस हें मुकुंदराजांचें अलौकिक कृत्य पाहून फार आश्चर्य वाटलें. मग मुकुंदराजांनीं त्या अश्वरूपी मलयगंधर्वाचाही तेथेंच उद्धार केला. पुढील दोन जन्मांत हा गंधर्व अनुक्रमें रेडा व महार झाला, व ज्ञानदेव व रामदास यांनीं त्याचा उद्धार केला, अशी कथा आहे. विवेकसिंधु हा ग्रंथ जयत्पाळ राजास उपदेश करण्याकरितांच स्वामींनीं लिहिला. ते ह्मणतातः—

नृसिंहाचा बल्लाळु । त्याचा कुमर जयत्पाळु ॥
तेणें करविला ग्रंथ रोळु । ग्रंथरचनेचा ॥ ५५ ॥
भगीरथाचेनी दैवयोगें । विश्व सुस्नात गंगे ॥
तैसें जगत्पाळाचेनी प्रसंगें । जग सुखिया झालें ॥ ५६ ॥

विवेकसिंधु, पूर्वार्ध प्रकरण ७.

येथपर्यंत मुकुंराजांसंबंधानें जुन्या लोकांस जी माहिती होती, तिचें निरूपण झालें. या गोष्टींत अलौकिक प्रकार बरेच दिसतात, परंतु ऐतिहासिक दृष्ट्या पाहणारास त्याचा विचार करण्याची कांहीं अवश्यकता नाहीं. वरील वेंच्यावरून एवढें सिद्ध होतें कीं, जोगाई आंबेचा राजा जयत्पाळ याच्या कारकीर्दींत मुकुंदराज उदयास आले. आतां हा राजा कोणत्या कालीं होऊन गेला, याचा विचार करावयाचा. प्रसिद्ध शोधक कै. जनार्दन बाळाजी मोडक यांनीं अशी माहिती दिली आहे. “ मुकुंदराज हा शके ११२३ त विद्यमान होता. जातीचा महाराष्ट्र ब्राह्मण. यानें द्वारसमुद्र येथील वीरबल्लाळ राजाचा पुत्र जयत्पाळ यास ब्रह्मज्ञान शिकवून आपला शिष्य केलें. याची समाधि जोगाईच्या आंब्याजवळ आहे. ” या उताऱ्यांतील शक कै. मोडकांनीं कशाच्या आधारानें दिला आहे, हें समजत नाहीं. द्वारसमुद्र हें कदाचित् जोगाईच्या आंब्याचें प्राचीन नांव असेल.

रा. सा. नारायणराव पावगी हे “ भारतीयसाम्राज्य, पुस्तक ११ ” यांत लिहितात, “ हा प्रख्यात कवि व साधुवर्य शालीवाहन शकाच्या ९०० वर्षांच्या सुमारास ह्मणजे इसवी सन ९७७ वर्षाच्या आंत बाहेर उदयास आल्याचें समजतें. हा जयत्पाळ राजाच्या कारकीर्दींत होता असें ह्मणतात. आणि जयत्पाळाची कारकीर्द इसवीसन ९५० पासून १००८ पर्यंत असल्याविषयीं ऐतिहासिक प्रमाण आहे. तेव्हां मराठी भाषेचा हा आद्यकवि इसवी सनाच्या दहाव्या शतकांतच होऊन गेला असावा, असें वाटतें. ” हें ऐतिहासिक प्रमाण काय व कोठें आहे, याचा उल्लेख रावसाहेबांनीं केला असता, तर ठीक झालें असतें.

या उताऱ्यांतील काळ पूर्वींच्या उताऱ्यांतील काळाशीं जुळत नाहीं. तेव्हां आतां खरें काय समजावें ? परंतु रा. सा. पावगींनीं दिलेली कारकीर्द जयत्पाळाची नसून जयपाळाची आहे. दोन्ही नांवें भिन्न असून हे राजे भिन्न भिन्न काळीं झाले होते, त्या अर्थीं मोडकांनीं दिलेला काल विषेष आदरणीय होय, असें ह्मणावें लागतें.

कै. वामन दाजी ओक यांनीं मुकुंदराजांसंबंधानें काव्यसंग्रहांत थोडीशी माहिती दिली आहे, ती येथें उतरून घेतों. " मुकुंदराज या नांवाचा एक साधु कवि सुमारें सातशें वर्षांपूर्वीं झाला. हा जातीचा देशस्थ ब्राह्मण असून जोगाईचें आंबें या गांवचा रहाणारा होता. जोगाईचें आंबें ह्मणजे जाधव कुळांतील जयंतपाळाचें प्रधाननगर ( राजधानी ). हें निजामशाहींत असून त्याला हल्लीं मोमिनाबाद असें ह्मणतात. मुकुंदराजानें जयंतपाळास आत्मज्ञानाचा उपदेश करण्यासाठीं "विवेकसिंधु" नामक ग्रंथ रचिला. याचा " परमामृत " ह्मणून दुसरा ग्रंथ आहे. या ग्रंथांतील वर्णन शांकरदर्शनानुसारी आहे. याची वाणी शुद्ध प्रौढ आणि रसाळ आहे. याची समाधि जोगाईच्या अंब्यास डोंगराच्या कड्यावर आहे. "

या उताऱ्यांतील काल आणि मोडकांनीं दिलेला काल हे एक आहेत व एकंदरींत ह्याच काल खरा असें मानण्यास हरकत नाहीं. असें वाटतें कीं हा जयत्पाळ ज्या अर्थीं जोगाईच्या अंब्याचा राजा होता, त्या अर्थीं तो कोणी अप्रसिद्ध राजा असावा. डॉ. भांडारकरांनीं आपल्या दख्खनच्या इतिहासांत " सेऊण व कोल्हापूर येथें जे बल्लाळ राजे होऊन गेले असें लिहिले आहे, त्यांचा व या जयत्पाळाचा कांहीं संबंध असेल असें वाटत नाहीं. कारण बल्लाळ राजे हे " बल्लाळ " या नांवानें प्रचलित असलेल्या वंशांत होऊन गेलेले राजे होत. व जयत्पाळ राजाच्या बापाचें नांव मात्र बल्लाळ असें होतें, असें मुकुंदराजच सांगतात. एकंदरींत मुकुंदराजांच्या कालासंबंधानें निश्चयात्मक असें कांहींच लिहितां येत नाहीं. तथापि हल्लीं, मुकुंदराजांनीं तयार करविलेली ज्ञानेश्वरीची ५०० वर्षांपूर्वींची एक प्रत रा. रा. वि. का. राजवाडे यांस उपलब्ध झाली आहे. त्यावरून, मुकुंदराजांस पांचशें वर्षे होऊन गेलीं असें स्पष्टपणें लिहावयास हरकत नाहीं. रा. राजवाडे यांनीं आपल्या सरस्वतीमंदिरांतील 'नाभाजीनें व महिपतीनें वर्णिलेले संत' या लेखांत मुकुंदराजांचा काल शक ११६०–१२६०, हा दिला आहे. या कालावरून, मुकुंदराजांस आज सुमारें ५५० वर्षे होऊन गेलीं असें मानावयास हरकत नाहीं.

असें समजतें कीं, मुकुंदराजांच्या पूर्वजांस नांदेड गांवची वंशपरंपरेनें चालत आलेली वृत्ति होती व तेथील कांहीं वतनाचा त्यांस भागही मिळत असे. मुकुंदराज हे माध्यंदिन वाजसनेय यजुर्वेद शाखेचे देशस्थ ब्राह्मण. ते बाळपणापासूनच सत्वगुणसंपन्न असून तेव्हांपासूनच त्यांची वृत्ति परमार्थाकडे अगदीं तल्लीन झाली होती. मुकुंदराजांनीं आपली गुरुपरंपरा व गुरूची जन्मभूमी यासंबंधानें विवेकसिंधूंत एके ठिकाणीं थोडीशी माहिती दिलेली आहे:—

ओंव्या.

तरी आदिगुरु श्री आदिनाथ । तेथूनि श्री हरिनाथ ॥
तयाचा शिष्य रघुनाथ । जो गुणसिंधु ॥ ३४ ॥
बाणगंगेच्या तीरीं । मनोहर अंबा नगरी ॥
तेथें प्रगटले श्रीहरी । जगदीश्वर ॥ ३५ ॥
माध्यंदिनी शाखे । अवतार केला परमपुरुषें ॥
चांपे गोरटें निवेशें । अति मनोहर ॥ ६६ ॥

विवेकसिंधु उत्तरार्ध प्रकरण ११.

या ओंव्यांवरून मुकुंदराजांचे गुरु " रघुनाथ " या नांवाचे कोणी नाथसांप्रदायी सत्पुरुष होते, असें दिसतें. रघुनाथांचे गुरू श्रीहरी शैव होते. श्रीशंकरास प्रसन्न करून घेण्याकरितां त्यांनीं किती श्रम केले होते, हें मुकुंदराज सांगतात—

ओंव्या.

बारा वर्षें पाशुपत । आचरला महाव्रत ॥
तेणें पार्वतीसहित । शंभू प्रसन्न केला ॥ ४७ ॥

मुकुंदराज अद्वैतमतवादी होते. त्यांचे ग्रंथ शंकरमतानुसारी असून त्यांत ते ह्मणतात—

शंकरोक्तिवरी । मीं बोलिलें मराठी वैखरी ॥
ह्मणूनि निर्धारावी चतुरीं । शास्त्रबुद्धि ॥

मुकुंदराज पूर्ण निर्गुणोपासक होते तरी मूर्तिपूजा करूं नये, असें त्यांचें मत नव्हतें. विवेकसिंधूंच्या दुसऱ्या प्रकरणांत ते ह्मणतात—

चित्त अवलंबनेवीण । जरी न राहे स्थिरपण ॥
तरी देवाचें सगुण । स्वरूप चिंतावें ॥ १ ॥

तेथं हृदयाच्या शेजारीं । षोडशोपचारें पूजा करीं ॥
उपासावा श्रीहरी । अनन्य भावें ॥ २ ॥
रजतमें करून समूळ । तें चित्त होय वेगें निर्मळ ॥
मग निर्गुणभक्ति सबळ । अपसयां होय ॥ ३ ॥

आतां मानसिक प्रतिमा करणें आणि प्रत्यक्ष प्रतिमा करणें यांत मोठासा भेद आहे, असें नाहीं.

येथपर्यंत अर्वाचीन शोधकांकडून मिळालेली आणि मुकुंदराजांनीं स्वतः दिलेली माहिती नमूद केली. आतां मुकुंदराजांच्या आदिकवित्वासंबंधाचा एक मोठा वादग्रस्त मुद्दा राहिला व तो शेवटीं वादग्रस्तच राहणार. परंतु माझ्या अल्पबुद्धिप्रमाणें मी त्याचा थोडासा विचार करितों.

"ज्ञानेश्वरीचा कर्ता आळंदीचा ज्ञानदेव नव्हे" या वादाचे पूर्वपक्षकार "भारद्वाज" ह्मणतात कीं, मुकुंदराज हे ज्ञानेश्वरीकार ज्ञानदेवानंतर बऱ्याच वर्षांनीं होऊन गेले. महाराष्ट्र साधुसंतांचा व इतर जनांचा, ते मराठी भाषेचे आदिकवि होते असा ग्रह आहे. तथापि एकनाथ, मुक्तेश्वर व सुभानंतस्वामी या तीन मराठी कवींनीं अनुक्रमें एकनाथी भागवत, भारत आदिपर्व व भीष्मपर्व या तीन ग्रंथांच्या आरंभीं आपणापूर्वीं होऊन गेलेल्या कवींस वंदन केलें आहे, त्यांत मुकुंदराजांचें नांव नाहीं. एकनाथांनीं तर चांगदेवासमुद्धां कवि ह्मणून वंदन केलें आहे. असें असतां या आदिकवीच्या नांवाचा तेथें उल्लेख नसावा हें आश्चर्य होय! तथापि, एकनाथकृत संतमालिका नामक एक अभंग प्रसिद्ध आहे; (तत्वविवेचक छापखान्यांतील एकनाथी गाथा, पृष्ठ ७१२ पहा) त्यांत मुकुंदराजांचा उल्लेख केलेला आहे. पहिल्यानें ज्ञानदेव व त्यांचीं भावंडें यांचा उल्लेख करून, नंतर मुकुंदराजांचें नांव दिलें आहे. यावरून ज्ञानदेवानंतर मुकुंदराज झाले, अशी एकनाथांस माहिती असावी, असें वाटतें. सदरहू संतमालिकेंत दुसऱ्या एका 'मुकुंद' साधूचें नांव आलें आहे. व यांशिवाय मुकुंदराज झारेकरी या नांवाचा तिसरा एक साधु महाराष्ट्रांत होऊन गेलेला आहे. व यामुळें मुकुंदराजांच्या चरित्रासंबंधानें बराच घोंटाळा होण्याचा संभव आहे. भाषा, विषयप्रतिपादनपद्धति व देशस्थितीचा ग्रंथांतून प्रसंगवशात् झालेला उल्लेख, यांवरून पाहिलें असतां ज्ञानेश्वरीनंतर बऱ्याच वर्षांनीं विवेकसिंधु झाला असावा, असें ह्मणणें भाग पडतें. रा० रा० नारायणराव पावगी यांच्या

मताप्रमाणें मुकुंदराजांस दहाव्या शतकांत घातल्यास, त्या वेळच्या विवेकसिंधूची भाषा व तेराव्या शतकांत ह्मणजे त्यानंतर दोनशें–अडिचशें वर्षांनीं झालेल्या ज्ञानेश्वरीची भाषा, यांत एवढ अंतर कां पडावें हा मोठा प्रश्न राहतो. विवेकसिंधूची भाषा ज्ञानेश्वरीपेक्षां जुनी, किंबहुना ज्ञानेश्वरीइतकीच जरी जुनी असती, तरी कदाचित् तेवढ्याच पुराव्यावरून मुकुंदराजांस आदिकवीची जागा देतां आली असती. परंतु वस्तुस्थिति याच्या उलट आहे. ज्ञानेश्वरींतल्या जुन्या शब्दांच्या दशांशाइतकेही जुने शब्द विवेकसिंधूंत नाहींत, एवढेंच नव्हे, तर ज्ञानेश्वरी नंतर ३०० वर्षांनीं झालेला दासोपंती गीतार्णवही भाषासौलभ्यांत विवेकसिंधूची बरोबरी करूं शकेल. इतर सर्व मुद्दे जरी सोडून दिले, तरी एकट्या भाषेवरूनच विवेकसिंधु हा ज्ञानेश्वरीनंतर झालेला ग्रंथ आहे, हें सहज सिद्ध होईल.

श्रीमत्कृष्णदयार्णव, श्रीधर व महिपति या तीन महाराष्ट्र कवींनीं मुकुंदराजांच्या नांवाचा आपल्या ग्रंथांत उल्लेख केला आहे. श्रीहरिवरदाकार श्रीमत्कृष्णदयार्णव लिहितात—

मुकुंदराज ज्ञानेश्वर । प्रमुख देशभाषाकार ॥
सिद्धांत वक्ते ज्ञानभास्कर । स्मरोनि सादर वांदिले ॥ १९ ॥

हरिवरदा—उत्तरार्ध अध्याय ९०.

येथें मात्र मुकुंदराजांस आदिस्थान दिलें आहे. परंतु हरिवरदा ग्रंथ होऊन अवघीं २२५ वर्षें झालीं आहेत, यावरून मुकुंदराजांच्या ग्रंथांचा प्रसार पहिल्यानें फारसा न होतां वरील काळाच्या सुमारास तो विशेष झाला असावा, असें अनुमान करावयास हरकत नाहीं.

रा. सा. नारायणराव पावगी लिहितात, " मुकुंदराजांच्या ग्रंथांनीं महाराष्ट्रांत या वेळीं मोठें धर्मकार्य केलें. त्यांचे ग्रंथ वाचून लोकांच्या मनांत एकदम धर्मजागृति उत्पन्न होऊन त्या वेळीं दीन दीन करीत सर्व महाराष्ट्र म्लेंच्छमय करूं इच्छिणाऱ्या मुसलमानांच्या स्वेच्छाचारास त्या जागृतीनें बराच प्रतिरोध केला. " परंतु मुकुंदराज दहाव्या शतकांत झाले असें जर रावसाहेब ह्मणतात, तर त्या वेळीं हे दीन दीन करणारे मुसलमान कोठें होते बरें ?

आतां मुकुंदराजांच्या ग्रंथांसंबंधानें थोडासा विचार करून हा चरित्रभाग संपवितों. मुकुंदराजांच्या नांवावर मोडणारा, विवेकसिंधु, परमामृत व मूलस्तंभ हे तीन ओंवीबद्ध ग्रंथ व कांहीं पदें व अभंग इतकी कविता आहे. त्यांची कविता शुद्ध,

प्रौढ व प्रासादिक अशी आहे. त्यांचे ग्रंथ वेदांतपर असल्यामुळें त्यांत निरनिराळे अलंकार, रस किंवा सृष्टिसौंदर्यवर्णन इत्यादिकांचा केवळ अभाव आहे. येथें मुकुंदराजांचें एक पद उतरून घेतों.

पद.

विठ्ठले रुक्माई ! सांवळे विठले रुक्माई ! ॥ ध्रुवपद० ॥
नक्रें धरितां गजेंद्राशी श्रम झाले तेव्हां ॥
पिता पुत्र हे आप्तहि मानुनि गौरविलें सर्वां ॥
परंतु कोणी नये कामा ममता जिवभावा ॥
तेव्हां हे मायिक जाणुनि आठविले तवपाय ॥ विठ्ठले० ॥ १ ॥
हरि हरि स्मरतां प्रल्हादासी गांजितसे वैरी ॥
शस्त्रें अस्त्रें विष घालुनी अग्नीमाझारी ॥
पिता पुसे " हरि कोठें आहे ? " स्तंभीं गुर्गुरी ॥
प्रल्हादू पाचारी नरहरी, धांव लौकरी ॥ विठ्ठले० ॥ २ ॥
सती द्रौपदी पांडवजाया धरोनियां केशीं ॥
सभेसि नेतां दुःशासन तो पापाचा राशी ॥
वस्त्र फेडितां व्याकुळ झाली घाबरली खाशी ॥
मनोदूत धाडिला तुजला आळवी कृष्णमाय ॥ विठ्ठले ॥ ३ ॥
पतितपावन करुणासिंधु या नांवासाठीं ॥
युगायुगीं अवतार धरुनियां तारिसि जगजेठी ॥
अजामिळ ध्रुव वाल्मिक गणिका रिस वानरकोटी ॥
तारावा हा **मुकुंदराज** एवढें अवघड काय ? ॥ विठ्ठले० ॥ ४ ॥

वरील पदाच्या भाषेवरून तर मुकुंदराज बरेच अर्वाचीनकाळीं होऊन गेले असावेत, असें वाटतें. कदाचित्, मुकुंदराज झारकऱ्यानें वरील पद लिहिलें असेल. विवेकसिंधु व परमामृत या ग्रंथांशिवाय पवनविजय व मूलस्तंभ हे दोन ग्रंथ त्यांनींच रचिले, असा समज आहे, परंतु पवनविजय* हा ग्रंथ संस्कृत स्वरोदयाचें भाषांतर

---

* हा ग्रंथ शेखमहमद कवीचा आहे, असें समजतें. पण त्याच्या आरंभीं व शेवटीं मुकुंदराजांचें नांव आढळतें, यावरून, तो ग्रंथ मुकुंदराज झारेकऱ्याचा नसेल, असेंहि ह्मणवत नाहीं.

असून तो उगाच मुकुंदराजांच्या नांवावर दडपून दिला आहे. मूलस्तंभांत तर मोगल बादशाहांचाही उल्लेख असल्यामुळें तो अगदींच अर्वाचीन ग्रंथ आहे असें ह्मटलें पाहिजे. स्वतः मुकुंदराज ह्मणतातः—

" मज श्वासोन्मेषाचा भ्रम ॥ तेथ काइसा ग्रंथाचा उद्यम ॥ "

मला श्वासोन्मेषाची फुरसत नाहीं, मग ग्रंथ करण्याच्या भानगडींत पडतो कोण ?

अलीकडे संस्कृत विवेकसिंधूची एक हस्तलिखित प्रत उपलब्ध झाली आहे, तिच्या संबंधानें लिहितांना सुधारकांतील ' भारद्वाज ' ह्मणतातः—' या प्रतीवरूनच डॉ. वेबर यांनीं मुकुंदराजाची संस्कृत कवींत गणना केली असावी. आतां विवेकसिंधु ग्रंथ जर संस्कृत आणि मराठी या दोन्ही भाषांत आहे, तर मराठी विवेकसिंधु संस्कृत विवेकसिंधूचें भाषांतर आहे, असा सकृद्दर्शनीं समज होणें साहजिक आहे. पण वास्तविक गोष्ट तशी नाहीं. वर सांगितलेली संस्कृत प्रत, पुण्याच्या आनंदाश्रमाचे अधिपति रा. रा. हरि नारायण आपटे यांनीं कृपा करून मला पाहण्यास दिली. ती मराठी प्रतीशीं ताडून पाहतां असें आढळून आलें कीं, संस्कृत विवेकसिंधु मराठी विवेकसिंधूची प्रतिकृति असून ती अनंतमुनींनें केलेली आहे. ज्ञानेश्वरकृत अमृतानुभवाची जशी प्रल्हाद बडवे यांनीं प्रतिकृति केली, तशीच त्यांचा नातू हा अनंत, यानें आपल्या आजोबाचें अनुकरण करून मुकुंदराजकृत मराठी विवेकसिंधु संस्कृतांत ग्रथित केला. संस्कृत प्रतींतील शेवटले दोन श्लोक खालीं देतोंः—

श्रीमन्मुनींद्रेण मुकुंदनाम्ना विनिर्मितोऽनंतमुनेः सुखाय ॥
विवेकसिंधुर्यमनुप्रविश्य सद्यः पुमानेति हरिस्वरूपम् ॥ १ ॥
एवं विज्ञापितः सन्नवनत शिरसा ज्ञानदेवेन धीमान्
सद्यःकृत्वा विनास्मै सकरुणहृदयः श्रीमुनींद्रो मुकुंदः ।

वरील संस्कृत उताऱ्यांत मुकुंदराजांच्या नांवास ' श्रीमुनींद्र ' हें पद जोडलें आहे. मुकुंदराज स्वतः आपणांस ही बहुमानाची पदवी घेईल, हें संभवत नाहीं. विवेकसिंधूंत त्यानें आपला नामनिर्देश मात्र केलेला आहेः—

' म्हणोनि विवेकसिंधू येणें नांवें । ग्रंथ कीजेल शुद्ध भावें ॥
तरी आतां अवधान द्यावें । ह्मणे मुकुंदराजु ॥ १ ॥ '

शेवटच्या संस्कृत श्लोकांत ज्ञानदेवाचा उल्लेख आहे—मराठी प्रतींत ज्ञानदेवाचा नामनिर्देश नाहीं. ज्ञानदेवांच्या विनंतीवरून मुकुंदराजानें विवेकसिंधु ग्रंथ केला व तो संपण्याच्या अगोदरच ज्ञानदेव समाधिस्थ झाला, हें पाहून मुकुंदराजांस गहिंवर आला, असा वरील श्लोकांतील आशय आहे. लोकांत प्रचलित असलेल्या दंत-कथेच्या धोरणानें वरील श्लोकाची रचना केलेली आहे, हें वाचकांच्या ध्यानांत येईलच. मूळ ग्रंथ मराठींतच झाला, हें सिद्ध करण्यास दुसरें एक प्रमाण आहे. संस्कृत प्रतींत जैतपाळाचा उल्लेख मुळींच नाहीं. देशी भाषेंत ग्रंथ करण्यास कांहीं हरकत नाहीं, असा मुकुंदराजानें ठिकठिकाणीं उल्लेख केला आहे. पुढील दोन ओव्या पहाः—

“ वेदशास्त्राचा मथितार्थ । मऱ्हाटिया होय फलितार्थ ॥
तरी चतुरीं परमार्थ । कां न घ्यावा ? ॥ १ ॥
देशी हो कां मऱ्हाठी । परी उपनिषदाचीच राहाटी ॥
तरी हा अर्थु जिवाच्यिया गांठीं । कां न बांधावा ? ॥ २ ॥

मूळ ग्रंथ मराठींतच झाला, हें दाखविण्यास वरील प्रमाणें पुरे आहेत. अनंत-सुवानें शके १६७५ च्या सुमारास तो संस्कृतांत ग्रथित केला. रा. पांगारकर[२] यांनीही मत असेंच आहे, पण यास कांहीं तरी सबळ प्रमाण असलें पाहिजे. कित्ये-कांचें मत असें आहे कीं ‘मुकुंदराज हे संस्कृत कवि होते, त्यांनीं प्राकृत ग्रंथ मुळींच लिहिला नाहीं. हल्लींचा विवेकसिंधु हा मुकुंदराजकृत मूळ संस्कृत विवेक-सिंधूच्या आधारें कोणीतरी मराठींत लिहिला आहे. संस्कृतांत मुकुंदमुनि नामक जो कवि आढळतो, तेच हे मुकुंदराज होत. मुकुंदमुनीनें पुढील संस्कृत ग्रंथ लिहिल्याचा आउफ्रेख्ट साहेबांच्या यादींत उल्लेख आहेः—१ अद्वैतज्ञानसर्वस्व, २ अष्टावक्रगीता-भाष्य, ३ आत्मबोध, ४ पंचीकरण, ५ विवेकसारसिंधु, ६ विवेकसिंधु, ७ परमामृत.

परंतु माझ्यामतें हें मत बरोबर नाहीं; याचीं कारणें अनेक आहेत, तीं अशीं:— मराठी विवेकसिंधूची भाषा वरीच जुनी आहे; त्यांत ज्या पुरुषांच्या नांवाचा व स्थळांचा प्रसंगावशात् उल्लेख आला आहे, तीं नांवें व स्थळें संस्कृत विवेकसिंधूंत आढळत नाहींत. तसेंच, कृष्णदयार्णवांनीं मुकुंदराजांस ‘ प्रमुख देश भाषाकार ’ म्हटलें असून, खुद्द विवेकसिंधूंत पुढील ओंवी आहे:—

‘ शंकरोक्तीवरी । मी बोलिलों मराठी वैखरी । ’

तसेंच, मराठी विवेकसिंधु ही जर मूळ संस्कृत विवेकसिंधूची प्रतिकृति असती,

तर तिच्या कर्त्यानें तींत संस्कृत विवेकसिंधूचा व आपला स्वतःचा उल्लेख केला असता. पण तसें कांहीं आढळत नाहीं. एकंदरींत हा प्रश्न फार वादग्रस्त आहे, यांत शंका नाहीं. कदाचित् मुकुंदमुनि हा संस्कृत कवि व मुकुंदराज हे प्राकृत कवि, एकच व्यक्ति असेल व त्यांनीं, पहिल्यानें संस्कृतांत लिहिलेला विवेकसिंधू जयत्पाळ राजासाठीं पुनः मराठींत लिहिला असेल. अस्तु.

शेवटीं प्रख्यात हरिवरदाकार श्रीमत्कृष्णदयार्णवस्वामीकृत मुकुंदराजांची आरती वाचकांस सादर करून हा चरित्रलेख पुरा करितों.

आरति ( अवतार गोकुळीं हो या चा० )

जय जया मुकुंदराजा ॥ वेदवेदांतबीजा ॥
वेदोत्तमांग बोधें ॥ जडां तारिलें पैजा ॥ ध्रु० ॥
जैतपाल भूपतीनें ॥ केला दर्शना कोंड ॥
अपरोक्ष बोध बाहे ॥ त्यासी घातिलें कोड ॥
प्रबोधशक्तिहीनें ॥ बहिर्मुख पाखंड ॥
वेदांतज्ञानतेजें ॥ उदेलासी मार्तंड ॥ १ ॥
दर्शनें सोडविलीं ॥ भूप चिन्मात्र केला ॥
वेदांत सांख्ययोगें ॥ सांप्रदाय शिक्षीला ॥
तो मार्ग कलिमाजी ॥ सुगम सर्वांसि झाला ॥
विवेकसिंधुबोधें ॥ दयार्णव निवाला ॥ २ ॥

# दासोपंत

दासोपंतीं केला गीतार्णव मानवा सवा लाख ।
ग्रंथ परम दुस्तर तो न तयाचि, जसें न वासवाला ख ॥ १ ॥

सन्मणिमाला, मोरोपंत.

केवळ ग्रंथसंख्येच्या दृष्टीनें पाहिल्यास, दासोपंत हे सगळ्या मराठी कवींत, किंबहुना सगळ्या जगांतील कवींत श्रेष्ठ होत. यांची एकंदर कविता सुमारें तीन लक्ष होईल. ह्यांच्या एकट्या गीतार्णवाचीच ओंवीसंख्या सवालाख आहे व त्यासंबंधानें पंतांनीं, शिरोभागीं दिलेल्या आर्येत मोठें आश्चर्य प्रदर्शित केलें आहे. दासोपंतांचे सगळे ग्रंथ वेदांतपर आहेत; व आमचा देश तर वेदांताचा मोठा भक्त, असें असतां, आज तीनशें वर्षें, दासोपंतांचे हे ग्रंथ अप्रसिद्ध कसे राहिले, हें समजत नाहीं. कदाचित् त्यांचा विस्तार हेंच त्यांच्या अप्रसिद्धीचें कारण असेल.

दासोपंतांचे वंशज सध्यां आंबे जोगाई येथें आहेत, त्यांजकडून मिळालेली माहिती रा. भावे व रा. राजवाडे यांनीं अनुक्रमें 'महाराष्ट्र कवि' व 'ग्रंथमाला' या मासिक पुस्तकांत, प्रसिद्ध केली आहे, तिच्या व महाराष्ट्रकवींतील श्रीधरस्वामी नाझरेकरकृत[१] अपूर्ण ओंवीबद्ध दासोपंतचरित्राच्या आधारानें, पुढील चरित्रलेख लिहिला आहे.

दासोपंतांचें जन्म, शा० शके १४७२ या वर्षीं नारायणपेठ[२] येथें झालें. त्यांच्या तीर्थरूपांचें नांव दिगंबर व आईचें नांव पार्वती. दिगंबरपंत हे नारायणपेठ येथील देशपांडे होते. दासोपंतांचें शिक्षण त्यांच्या तीर्थरूपांच्याच देखरेखीखालीं झालें. पंत रूपानें फार सुंदर होते. त्यांच्या आईबापांनीं त्यांचा व्रतबंध व विवाह, त्यांच्या बालपणींच करविला. दिगंबरपंत चांगले विद्वान्, सत्वस्थ व द्रव्यसंपन्न असल्यामुळें दासोपंतांवर त्यांच्या समागमाचा चांगलाच परिणाम झाला असला पाहिजे हें

१. भाषा व गुरुनामोल्लेख यांवरून पाहतां, हा ग्रंथ श्रीधरस्वामी नाझरेकरांचा खात्रीनें नव्हे, असें मला वाटतें. ग्रंथकर्ता.

२. हें गांव निजामाच्या राज्यांत आहे.

उघड आहे. नारायणपेंठ हा महाल त्या वेळीं, बेदर येथील बहामनी राजांच्या ताब्यांत होता. दिगंबरपंत हे तेथील देशपांडे असल्यामुळें, त्या महालाची जमाबंदी करून, वसूल झालेले सगळे रुपये प्रतिवर्षी ते बेदर येथें पाठवीत असत. याप्रमाणें क्रम चालू असतां, एके वर्षी त्या प्रांतीं मोठा दुष्काळ पडला, व त्यामुळें कराचे पैसे मुळींच वसूल झाले नाहींत. इकडे बेदरास, दिगंबरपंतांकडून वेळेवर रकम न आल्यामुळें, बादशहानें त्यांस एकदम पकडून आणण्याचा हुकूम केला. त्याप्रमाणें दिगंबरपंत बेदरास गेल्यावर बादशहानें त्यांस पैशासंबंधानें प्रश्न केला. 'नारायणपेंठ महालांत भयंकर दुष्काळ पडला आहे. कराचे पैसे वसूल झाले नाहींत' असें दिगंबरपंतांनीं सांगितलें. परंतु बादशहा ह्मणाला कीं, पैसे दिल्याशिवाय तुमची सुटका येथून होणार नाहीं. त्यावर दिगंबरपंतांनीं, बादशहास विनंति केली कीं, कृपा करून मला नारायणपेठेस जाऊं द्यावें; तेथें जाऊन हरतऱ्हेनें सरकारचा पैसा वसूल करून आणितों. यावर, तितक्या रकमेचा जामीन देऊन किंवा मुलास बेदर येथें ठेवून आपल्या गांवीं जा व पैसे घेऊन या,' असा बादशहानें हुकूम केला. वास्तविक पाहतां, दासोपंतांचें सौंदर्य पाहून त्याचे संबंधानें बादशहाच्या मनांत लोभ उत्पन्न झाला होता; कारण त्यास पुत्रसंतति नव्हती. दिगंबरपंत दोन लक्ष रुपये कोठून आणणार ? अर्थात् मुदत भरतांच आपण दासोपंतास मुसलमानी धर्माची दीक्षा द्यावी व आपल्यामागें त्यास राज्याचा अधिकारी करावें, या हेतूनेंच वरील अट, बादशहानें पुढें आणिली होती. ही अट ऐकतांच बिचारे दिगंबरपंत मोठ्या काळजींत पडले; पण करतात काय ? निमूटपणें, 'एक महिन्याचे आंत कराचे पैसे आणून देईन. तोंपर्यंत माझा पुत्र बेदर येथें राहील. मुदतीचे आंत पैसे न दिल्यास, माझ्या पुत्रास मुसलमान करावें.' असा करार लिहून देणें त्यांस भाग पडलें. पण पुत्रास सोडून जातांना त्यांस अत्यंत वाईट वाटलें. त्यांनीं आपल्या दैवास दोष दिला, व ते फार कष्टी झाले. आपल्या पित्याची ही संकटावस्था पाहून, दासोपंतांनीं त्यांस धीर दिला. ते ह्मणाले, श्रीदत्तात्रय समर्थ आहे; तो या संकटांतून आह्मांस खातरीनें सोडवील. आपण कांहीं काळजी न करितां गांवीं निघून जावें. परमेश्वर कृपेनें आपली माझी भेट लवकरच होईल. यावर, दासोपंतांचा मोठ्या दुःखानें निरोप घेऊन, दिगंबरपंत आपल्या गांवीं येण्यास निघाले.

दासोपंत बेदरास असतां, नजीकच्या 'झरणीनृसिंह' नामक नृसिंहक्षेत्रावर ते

नित्य स्नानास येत असत. त्यांच्या नित्य भोजनखर्चीसाठीं बादशाही खजिन्यांतून एक रुपया देण्यांत येत असे. परंतु दासोपंतांनीं तो रुपया ब्राह्मणांस देऊन टाकावा, व आपण ईश्वरचिंतन करीत उपाशीं राहावें. तथापि, ईश्वरी कृपेचें तेज विलक्षण असल्यामुळें, त्यांच्या शरीरावर क्षुधेचा बिलकुल परिणाम झाला नाहीं, इतकेंच नव्हे, तर उलट, पूर्वींच्या पेक्षां ते अधिक तेजस्वी व पुष्ट दिसूं लागले. ह्या गोष्टीचें ब्राह्मणांस मोठें आश्चर्य वाटलें. 'अन्नमय प्राण' हा सिद्धांत असतां, अन्नास स्पर्शही न करितां, हा मुलगा इतका तेजस्वी दिसतो, यावरून, पूर्वजन्मींचा हा कोणी तरी योगभ्रष्ट पुरुष असावा, असा त्यांनीं तर्क केला.

इकडे बादशाहास मुदतीचे दिवस कधीं संपतात, व दासो दिगंबरास आपण मुसलमान कधीं करतों, असें झालें होतें. तो सारखा दिवस मोजीत असला होता. तिकडे, नारायणपेठेस, बिचारे दिगंबरपंत व त्यांची पत्नी, पैसे तर मिळत नाहींत, आतां पुत्राचें काय होतें, या काळजींत दिवस कंठीत होतीं. अशा प्रकारें मुदत अगदीं भरत आली; तेव्हां दासोपंतांसही मोठी काळजी उत्पन्न झाली. ते आपल्याशींच ह्मणाले 'माझें जन्म दुर्लभ ब्राह्मकुलांत झालें, याबद्दल मी आनंद मानीत होतों. चौऱ्यांशीं लक्ष योनि फिरल्यावर मोठ्या भाग्यानें हा नरदेह प्राप्त होतो; त्यांतही ब्राह्मण कुल्यांत जन्म होणें तर मोठेंच भाग्य. अशा स्थितींतही, माझ्या पूर्व सुकृतानें, हें महद्भाग्य माझ्या वांट्यास आलें व आतां या जन्मीं तरी ईश्वरभक्ति करून मुक्ति मिळवावी, अशा विचारांत होतों, तोंच दुर्दैवानें हें संकट येऊन उभें राहिलें ! आतां मुदतीचा शेवटचा दिवस जातांच, बादशाहा मला खातरीनें मुसलमान करणार ! बरें द्रव्य देऊन सुटून जावें; तर दोन लाख रुपये कोठून आणावे ?' या विचारानें दासोपंत फार उद्विग्न झाले असतां, शेवटीं अखेरचा दिवस येऊन ठेपला. त्या दिवशीं संध्याकाळीं, बादशाहानें दासोपंतांस सांगितलें कीं, आज रात्रीं वसुलाचे पैसे न आल्यास उद्यां तुह्मांस मुसलमान केलें जाईल. हें बादशाहाचें कठोर भाषण ऐकून दासोपंतांस मोठें भय वाटलें. त्यांचें तोंड वाळून गेलें, चित्त व्यग्र झालें व डोळ्यांतून सारख्या अश्रुधारा चालल्या. शेवटीं, आतां काय होईल तें होवो, आपण श्रीदत्तावर भार टाकून स्वस्थ राहावें, असा निश्चय करून त्यांनीं देवाचा धांवा केला:—

ओंव्या.

सर्वांचा तूं असशी ईश । यास्तव तुझें नाम जगदीश ॥
जग ह्मणायाचें ही भ्रांति निःशेष । तुझें ठायीं दिसेना ॥ १ ॥

तुज ऐसा नसे दयाळू । तुज ऐसा नसे कृपाळू ।
तुलाच असे माझा कळवळू । कवल्यकंदा ! करुणार्णवा ! ॥ २ ॥
तूं तो केवळ अद्वय सच्चिदानंद । भक्तवत्सल स्वानंदकंद ।
भक्तप्रतिपाळक हें ब्रीद । तुझें असे रे दिगंबरा ॥ ३ ॥
मी जन्मलों ज्यांचे उदरीं । ते बाप राहिले देशांतरीं ।
तूं बाप अससी हृदयांतरीं । यास्तव बाहतों तुजलागीं ॥ ४ ॥
हा तो यवनरूप व्याघ्र । मज गिळूं पाहे समग्र ।
तरी कृपाशस्त्रें वधून शीघ्र । रक्षीं मातें दयाळा ! ॥ ५ ॥
आज अस्तास जातां दिनमणी । माझे ब्रह्मत्वास असे हानि ।
हें तो जाणतोस कीं दंडपाणी । दयार्णवा दयाळा ! ॥ ६ ॥

या प्रमाणें दासोपंत भगवंताचा धांवा करीत असतां मुदतीचा शेवचा दिवस संपला. त्यावेळीं बादशाहाचा आनंद तर त्रैलोक्यांत माईना ! त्यानें काजीस बोलावून आणिलें व कित्येक यवन व ब्राह्मण पंच आणवून, दिगंबरपंतांनीं लिहून दिलेलें करारपत्र त्यांस दाखविलें. करारपत्र वाचून पाहिल्यावर बादशाहा त्यांस ह्मणाला, मुदतीचा आजचा शेवटचा दिवस; अद्याप दिगंबरपंतानें पैसे आणून भरले नाहींत. तरी कराराप्रमाणें त्याच्या मुलास मी आतां मुसलमानी धर्माची दीक्षा देणार ! मागाहून मजवर आरोप येऊं नये ह्मणून, आगाऊ ही गोष्ट तुह्मांस कळविली आहे. हे बादशाहाचे शब्द कानीं पडतांच सगळ्या ब्राह्मणांस फार वाईट वाटलें; व दासोपंतांवरील संकट टाळण्याविषयीं त्यांनीं परमेश्वराची भक्तिपूर्वक करुणा भाकिली. इकडे, बादशाहाच्या हुकूमावरून, दासोपंतांस दरबारांत आणून उभें केलें. पण ते त्यावेळीं देहभानावर नव्हते, त्यांचें सगळें लक्ष भगवंताकडे लागलें होतें. समाधि लागल्यासारखी त्यांची स्थिति झाली होती. अशा स्थितींत, भगवंतास मोठी काळजी पडली. त्यानें पाडेवाराचें स्वरूप धारण केलें व खांद्यावर कांबळी व हातांत काठी, अशा थाटानें, पैशांच्या हुंड्यांसह दरबारांत हजर होऊन, बादशाहास सलाम केला. व दिगंबरपंतांकडील पैशाची भरपाई करून घ्या ह्मणून सांगितलें. पण पहिल्यानें, कोणाही दरबारी माणसाचें त्याजकडे लक्ष गेलें नाहीं. आणखी एकदां पैसे घेण्याविषयीं ओरडून सांगितल्यावर कांहीं शिपायांनीं त्याची चौकशी केली. तो ह्मणाला, ' मी नारायणपेठेहून दिगंबरपंतांकडून आलों आहें. दोन लक्ष रुपयांच्या ह्या हुंड्या

त्यांनीं पाठविल्या आहेत, ह्या घेऊन मला पावती द्या.' पाडेवाराचे हे शब्द ऐकतांच ब्रह्मवृंदांत मोठा आनंदीआनंद होऊन गेला. दासोपंतांनींही नेत्र उघडून पाहिलें तों एक महार तेथें उभा आहे व तो 'दिगंबरपंतांकडून पैसे घेऊन आलों आहें' असें ह्मणत असल्याचें त्यांच्या दृष्टोत्पत्तीस आलें. ह्या गोष्टीचें त्यांस मोठें आश्चर्य वाटलें व त्याबद्दल त्यांनीं भगवंताचे आभार मानिले. इकडेः—

त्या काळीं पादशा आपण । पुसतसे त्या मनुष्यालागून ॥
'अरे तूं कोठील ? कोण ? । कोणीं तुजला धाडिलें ?' ॥ १ ॥
येरू ह्मणे 'दिगंबराचे सेवक । जाणून आह्मास फार विश्वासुक ॥
हुंड्या देऊन आमुचे हस्तक । पाठविला असे सर्वस्व.' ॥ २ ॥
पादशा ह्मणे, 'तूं चाकर । किती दिवसांचा निर्धार ॥
आणि नामही सत्वर । सांग आतां या काळीं.' ॥ ३ ॥
'नाम तों दत्ताजी जाण । चाकर सप्त पिढ्यांपासून' ।
मुशारा पुसतां पूर्ण । बोले, 'अन्नार्थी मी असें.' ॥ ४ ॥
त्यांनीं मजला टाकून । कदापि न राहती एक क्षण ॥
जागृती, सुषुप्ती आणि स्वप्न । त्यांचे सन्निध मी असें. ॥ ५ ॥

* * * *

आपुला जो बाकी पैका । त्याच्या हुंड्या असे देखा ॥
हे दर्शनी हुंड्या अति चोखा । यांस उधार नसेची. ॥ ६ ॥
हुंड्यांचा विश्वास नसे तुह्मासी । तरी द्रव्य रोकडें असे मजपाशीं ॥
तें देईन संपूर्ण निश्चयेंसी । घ्यावें आतां या काळीं' ॥ ७ ॥

इतकें बोलून त्या महारानें, द्रव्याची पिशवी भर दरबारांत रिकामी केली! दरबारी लोक पाहतात तों पैशाची मोठी रास पडलेली ! कारकूनांनीं द्रव्य मोजून घेतांच, तो महार तेथल्या तेथेंच गुप्त झालेला पाहून बादशहांस सर्व लोकांस मोठें आश्चर्य वाटलें. बादशहाची स्थिति तर वेड लागल्यासारखी झाली! तोः—

ह्मणतसे, दावा दावा रे तो पाडेवार । यास्तव फुटतात कीं माझे नेत्र ।
नेत्रांचें तेज साचार । तो मजला ऐसा पैं गमतो. ॥ १ ॥

जळो जळो हे द्रव्यराशी । यास्तव संभाषण त्यासी ॥
नाहीं केलें कीं, मी पापराशी । तो कैसा मजला भेटेल ? ॥ २ ॥
तो काय या सभास्थानीं । गेला कीं मोह घालुनी ? ।
सर्वत्रांची दृष्टि चोरुनी । गेला कोठें कळेना. ॥ ३ ॥
त्यासी देऊनि फार इनाम । करूं त्यासी अति संभ्रम ।
या बाळासी पाठवूं त्या समागम । ऐशी इच्छा पैं होती. ॥ ४ ॥
हुडका, हुडका रे! चहूंकडे । गेला गेला तो कोणीकडे ? ।
सत्वर आणा रे! दृष्टीपुढें । माझ्या आतां अविलंबें. ॥ ५ ॥

याप्रमाणें बादशहाची बडबड संपल्यावर सेवकांनीं त्यास सांगितलें कीं, तो महार आतांच येथल्या येथें गुप्त झाला. अर्थात् त्यास शोधून कसा आणितां येईल ? ही गोष्ट आमच्या सामर्थ्याबाहेरची आहे. यावर, बादशहा दासोपंतांकडे वळून म्हणाला, 'या बाळाचें दैव मोठें म्हणून त्याच्यासाठीं हा देवच महाराच्या वेषानें आला होता. तरी आतां ह्यास मी त्याच्या बापाकडे पाठवून देतों.' नंतर, तेथें जमलेल्या सर्व ब्राह्मणांनीं, 'तो मुलगा कसा उपाशीं राहात असे, व केवळ ईश्वरी कृपेनेंच तो अद्याप कसा सतेज दिसत आहे; इत्यादि हकीकत बादशहास निवेदन केली; ती ऐकून त्यास परम आश्चर्य वाटलें. त्यानें दासोपंतांस आलिंगिलें व त्यांस अनेक रत्नालंकार व वस्त्रोपवस्त्रें देऊन व प्रतिवर्षीं आपली भेट घेण्यास सांगून, त्यांच्या गांवीं पाठविलें.

इकडे नारायणपेठेस, दासोपंतांची आई व बाप, मुलाची काय अवस्था झाली असेल, बादशहानें त्यास मुसलमान तर केलें नसेल, अशा चिंतेंत दिवस काढीत असतां, लोकांनीं त्यांस दासोपंत आल्याची बातमी कळविली. पहिल्यानें, ही बातमी त्यांस खरी वाटेना; परंतु जेव्हां प्रत्यक्ष दासोपंतच त्या ठिकाणीं प्राप्त होऊन त्यांनीं त्यांस नमस्कार केला, तेव्हां त्यांच्या आनंदास पारावार राहिला नाहीं. तिघांच्याहि डोळ्यांतून सारख्या अश्रुधारा चालल्या ! पुढें तीर्थरूपांनीं प्रश्न केल्यावरून, पंतांनीं आपली सुटका कशी झाली, इत्यादि सविस्तर हकीकत त्यांस सांगितली. देवानें, आपल्यासाठीं महाराचें रूप धारण करून, आपल्यावरील संकट टाळिलें, ही गोष्ट ऐकतांच दिगंबरपंत फार सद्गदित झाले व त्यांनीं परमेश्वराची मनोभावें करून स्तुति केली. दासोपंतांच्या मनावर, ह्या गोष्टीचा इतका विलक्षण परिणाम झाला कीं, संसारांतून त्याचें लक्ष अगदीं निघालें, व आईबापांस न कळवितां सह्याद्रि पर्वतावरील

मातापुर नामक दत्तस्थानीं ते निघून गेले. त्यांची वृत्ति अगदीं ब्रह्माकार झाली होती; अशा स्थितींत, घरच्या गजांतलक्ष्मीचा किंवा तज्जन्य संसारसुखाचा त्यांस लवमात्र मोह उत्पन्न झाला नाहीं, यांत नवल तें काय ?

दासोपंत निघून गेल्यावर, त्यांचे आईबाप पुनः पुत्रवियोगानें दुःखी झाले, परंतु दासोपंत हे ईश्वरी पुरुष आहेत, त्यांस कळिकाळाचें भय नाहीं असें सांगून गांवांतील लोकांनीं त्यांचें शांतवन केलें.

दासोपंत, नारायण पेठेहून मातापुरास जात असतां, वाटेंत हिलालपुर आणि डोको-ल्गी या गांवचे कुळकर्णी कृष्णाजीपंत हे परम भगवद्भक्त होते; ते दासोपंतांची भेट घ्यावी ह्या हेतूनें, वाटेवरील शेतांत, एका वृक्षाखालीं बसले होते. पुढें, दासोपंत त्या स्थळीं आल्यावर, कुळकर्ण्यांनीं आपल्या घरीं पायधूळ झाडण्याची त्यांस विनंति केली. परंतु 'आज मी एका महत्वाच्या कार्यासाठीं बाहेर पडलों आहें, तस्मात् आजच आपल्या घरीं येण्यास मला सवड नाहीं. तथापि येते वेळीं आपल्या घरीं मी अवश्य येईन;' असें सांगून पंतांनीं त्यांचा निरोप घेतला व ते जेजुरीस आले. तेथें लक्ष्मीतीर्थांत स्नान करून, त्यांनीं देवाची यथासांग पूजा केली व स्तुतिपूर्वक प्रसाद ग्रहण करून, पुढें ते नंदिग्राम ( नांदेड ) येथें आले. तेथें, नित्य गोदावरीचें स्नान व वाळवंटांत अनुष्ठान करावें, अशा रीतीनें त्यांनीं कांहीं दिवस घालविले. कोणी भोजन दिलें, तर तें ग्रहण करावें, नाहींतर उपाशीं राहावें, हा त्यांचा क्रम असे. त्यांची परमार्थवृत्ति व तेजस्विता हीं अवलोकन करून, तेथील लोकांस मोठें आश्चर्य वाटे. 'हा कोणी तरी पूर्व जन्मींचा योगभ्रष्ट पुरुष, या जन्मीं योगसाधन पूर्ण करावयास अवतरला आहे अशी त्यांची समजूत झाली होती.

पुढें, कांहीं दिवसांनीं पंत मातापुरास आले. पर्वतशिखरावर जाऊन, त्रिपुरसुंदरीचें त्यांनीं षोडशोपचारें पूजन व स्तवन केलें. याप्रमाणें पांच दिवस गेल्यावर, त्यांस श्रीजगदंबेचा साक्षात्कार झाला. पुढें, ते सह्याद्रिपर्वतावर गेले. तेथें, प्रथम अनसूयेचें

---

१ मूळ ग्रंथांत कवीनें केलेलें सह्याद्रिवर्णन कवित्वाचा उत्कृष्ट नमुना आहे, म्हणून तो येथें देतों:—

ते पर्वतच आनंदवन । सलोकतादि तेथील वृक्ष जाण ।
त्यांचे साउलीं योगीजन । विश्रामती योगबळें. ॥ १ ॥

दर्शन घेऊन, पुढें दासोपंतांनीं उग्र तप आरंभिलें. याप्रमाणें बारा वर्षें तप केल्यावर त्यांस श्रीदत्तात्रेयांनीं स्वप्नांत दर्शन देऊन आज्ञा केली कीं, तुह्मी गोदातीरीं राक्षसभुवन येथें जाऊन तेथें वाळवंटांत माझ्या पादुका आहेत, त्यांचें पूजन करावें, ह्मणजे तुह्मांस साक्षात्कार होईल.

श्रीदत्तात्रयांच्या आज्ञेप्रमाणें, पंत मातापुराहून, गोदातीरीं राक्षसभुवन येथें आले व तेथील वाळवंटांतील श्रींच्या पादुकांपाशीं त्यांनीं बारा वर्षें तप केलें. पुढें दत्तात्रयांनीं साकार रूपानें त्यांस दर्शन देऊन, नाथसंप्रदायाप्रमाणें उपदेश केला. यापुढें दासोपंतांनीं, जगदुद्धारार्थ ग्रंथ लिहिण्यास प्रारंभ केला. असें सांगतात कीं, त्यांस ग्रंथ लिहिण्यास दररोज ढबू पैशाची शाई लागत असे; व त्यांचें जाड व ढोबळ

---

( मागील पानावरून चालू. )

सद्भक्तीच्या अनेक लता । श्रद्धेचीं पुष्पें सुगंधता ।
बोधवारा सुटतां । निर्विकार आमोद दुमदुमी. ॥ २ ॥

तेथील माळी तो विवेक । आळें बांधून वृत्ति अनेक ।
त्यामाजी फिरवितां निर्मलोदक । मोड फुटती विचारांचे. ॥ ३ ॥

स्थळोस्थळीं वैराग्य कारंजा मनोहर । शांतिजळ उडतसे इंद्रियद्वारा ।
सद्वासना दुर्वांकुर । शोभती त्याच्या समंतात. ॥ ४ ॥

अक्रोधकूपीं सोज्वळ । पूर्ण भरलें अलोभ जळ ।
त्यांत शोभती सद्भावकमळ । अर्पणास्तव श्रीदेशिका. ॥ ५ ॥

तेथील स्वानंद वृक्षांवरी । मुमुक्षुपक्षी निरंतरीं ।
सुशब्द करिती अद्वयस्वरीं । आल्हादेंसी सर्वस्व. ॥ ६ ॥

त्या वनींचें ब्रह्मफळ । इंद्रियांस करून वेगळ ।
सेवून गुरुभक्त केवळ । अजरामर पैं होती. ॥ ७ ॥

ह्या ठिकाणीं, मुक्तेश्वरी रूपकचमत्काराची वरीच झांक मारते, नाहीं बरें ? हा ग्रंथ श्रीधरांचा नव्हेच, परंतु ज्या कोणाचा असेल, त्यानें मुक्तेश्वरी कविता मननपूर्वक वाचिली असावी, असें त्याच्या एकंदर रचनेवरून दिसतें.

ग्रंथकर्ता.

असें हस्ताक्षर व त्यांनीं लिहिलेले अनेक ग्रंथ पाहिले ह्मणजे या आख्यायिकेची सत्यता सहज लक्षांत येते.

दासोपंताचे विद्यमान वंशज, रा. श्रीधरपंत देशपांडे हे जोगाईच्या आंब्यास राहतात, त्यांजपाशीं दासोपंतांचे पुढील ग्रंथ आहेत.

१ गीतार्णव ( अध्याय १८ )
२ गीतार्थबोध ( ,, ,, )
३ अवधूतराज ( ,, २२ )
४ ग्रंथराज ( ,, १८ )
५ प्रबोधोदय ( पूर्वार्ध )
६ ,, ( उत्तरार्ध अ. २१ )
७ स्थूलगीता
८ वाक्यवृत्ति ( गद्य )
९ पंचीकरण ( पासोडीवर लिहिलेलें )
१० पदार्णव ( सव्वा लाख आहे ह्मणतात )
११ दत्तात्रयमाहात्म्य ( अ. ५५ )
१२ गीताभाष्य ( अ. १८ )
१३ सार्थगीता ( अ. १८ )
१४ अवधूतगीता
१५ अनुगीता
१६ दत्तात्रेय सहस्रनाम स्तोत्र
१७ ,, दशनामस्तोत्र
१८ ,, द्वादशनामस्तोत्र
१९ ,, षोडशनामस्तोत्र
२० ,, शतनामस्तोत्र
२१ नामामृतस्तोत्र
२२ गीतस्तोत्र
२३ प्रबंधस्तोत्र
२४ गीतप्रबंधस्तोत्र
२५ सिद्ध दत्तात्रयस्तोत्र
२६ शिवस्तोत्र
२७ गुरुस्तोत्र
२८ षोडशस्तोत्र
२९ शीतज्वरनिवारणस्तोत्र
३० भक्तिराजकवच
३१ वज्रपंजरकवच
३२ सहस्रनामटीका
३३ दत्तात्रयनामावळी
३४ दश, द्वादश व शतनामावळी
३५ मंगलमूर्तिपूजा
३६ वाचकीपूजा
३७ महापूजा
३८ मानसिकपूजा
३९ वेदोक्तपूजा
४० वैदिकपूजा
४१ यंत्रपूजा
४२ सिद्धमाला मंत्रस्तोत्र
४३ उपकालस्तोत्र
४४ षोडशअवतारस्तोत्र
४५ वेदपादाख्यस्तोत्र
४६ षड्गुरुयंत्र
४७ षोडशदलयंत्र
४८ अत्रिपंचकप्रधानयंत्र

ह्यांपैकीं कांहीं ग्रंथ प्राकृत आहेत व कांहीं संस्कृत आहेत. एकट्या गीतार्णवाची ओवीसंख्या सव्वा लाख आहे; पदें सव्वा लाख होतीं, असें सांगतात व अवधूतराजाची ओवीसंख्या ५००० आहे! वरील ४८ ग्रंथांशिवाय 'आगमनिगम' नामक दत्तसंप्रदायासंबंधीं एक ग्रंथ आहे, तो भागवताएवढा आहे! ह्या आंबेजोगाईच्या ग्रंथांशिवाय, नागपुराजवळ चंद्रपुर नामक गांवीं दासोपंतांचे कांहीं वंशज राहतात, त्यांजपाशीं आणखी असेच ग्रंथ असावे असें जोगाईकरांचें ह्मणणें आहे.* वरील ग्रंथांत, एकट्या भगवद्गीतेवरच दासोपंतांचे पांच ग्रंथ आहेत. ह्या एवढ्या प्रचंड लेखनशक्तीकडे पाहिलें ह्मणजे लेखकांच्या अलौकिकपणाबद्दल शंका राहत नाहीं.

दासोपंत हे नाथसंप्रदायी होते, हें वर सांगितलेंच आहे; एकनाथ[१], नृसिंहसरस्वती[२], सरस्वतीगंगाधर[३], माधवस्वामी, कृष्णयाज्ञवल्कि[४], मधुकर, त्र्यंबक, रंगनाथस्वामी पैठणकर, महालिंगदास, शिवकल्याण व कृष्णदासमुद्गल हे कवि व साधु दासोपंतांचे समकालीन होत. ह्यांपैकीं एकनाथ व दासोपंत यांचा परिचय विशेष असे. ह्या दोघांसंबंधीं अनेक आख्यायिका प्रसिद्ध आहेत.

दासोपंत हे आपल्या वयाचे ६५ वे वर्षी ह्मणजे, शके १५३७ माघ वद्य ६ स समाधिस्थ झाले.

दासोपंतांच्या इतक्या ग्रंथांपैकीं, फक्त त्यांचा गीतार्णव महाराष्ट्रकवि मासिकपुस्तकांतून प्रसिद्ध होत आहे. पण मासिकपुस्तकाच्या आकाराकडे पाहिलें ह्मणजे, हा सव्वा लाख ओव्यांचा ग्रंथ साग्र छापून निघावयास आणखी १०।१२ वर्षे तरी

---

* ही सर्व माहिती महाराष्ट्रकवि मासिकपुस्तकांतून घेतली आहे.

ग्रंथकर्ता.

१ यांची कथा गुरुचरित्रांत आहे, २ नृसिंहसरस्वतींचे शिष्य, गुरुचरित्राचे कर्ते. ३ ह्यांचे रामायण, महाभारत व योगवासिष्ठ हे ओंवीबद्ध ग्रंथ आहेत. ४ कथाकल्पतरुकर्ते. ५ कथाकल्पतरूचे एक कर्ते. ६ बालबोध ग्रंथकर्ते, ७ योगवासिष्ठ, चित्सदानंदलहरी, पंचरत्न हे ग्रंथ यांनीं लिहिले. ८ यांचा विक्रमबत्तिशी नामक एक ग्रंथ आहे. ९ यांचे दशमस्कंध भागवत, भारत व अमृतानुभवावरील 'नित्यानंदैकदीपिका' नामक टीका हे ग्रंथ आहेत. १० यांचें रामायणाचें युद्धकांड प्रसिद्ध आहे. शिवाय भारतही आहे असें ह्मणतात.

सहज लागतील असें वाटतें. अशा प्रकारें, दासोपंतांचे सगळे ग्रंथ कधीं छापून निघतील कीं नाहीं याची शंका वाटते. निदान ते आहेत त्याच स्थितींत सुरक्षित ठेवण्याची किंवा त्यांच्या हस्तलिखित प्रति करून घेण्याची व्यवस्था होईल, तरी मोठें भाषाकार्य केल्यासारखें होईल. रा. राजवाडे यांनीं एक दोन वर्षांपूर्वीं 'महाराष्ट्र सारस्वत' नामक एक मासिकपुस्तक सुरू केलें होतें, त्यांतून दासोपंतांचीं बरींच पदें प्रसिद्ध झालीं आहेत. हें मासिकपुस्तक १०० पृष्ठांचें होतें व तें चालू राहिलें असतें तर दासोपंतांच्या व इतर अप्रसिद्ध कवींच्या पुष्कळ ग्रंथांचा उद्धार झाला असता, पण दुर्दैवानें, भरपूर लोकाश्रयाच्या अभावीं तें मासिकपुस्तक बंद पडलें!

गीतार्णव हा ग्रंथ दासोपंतांनीं 'बुटेदरडी' नामक गुहेंत बसून लिहिला असें सांगतात. ही गुहा कुठें आहे, कांहीं ठाऊक नाहीं. दासोपंतांस अष्टसिद्धि अनुकूल होत्या, असें सांगतात. तसेंच त्यांस आपल्या कवित्वाचा मोठा गर्व असे, अशीही दंतकथा आहे. ज्ञानेश्वरीस लोक मोठा मान देतात तसा आपल्या गीतार्णवास देत नाहींत यांचें त्यांस आश्चर्य वाटलें असतां, ते दोन्ही ग्रंथ गोदावरींत सोडण्याची देवानें त्यांस आज्ञा केली; त्याप्रमाणें आपला गीतार्णव व ज्ञानेश्वरी हे दोन्ही ग्रंथ पंतांनीं गोदेंत सोडिले असतां, चमत्कार असा झाला कीं, ज्ञानेश्वरी पाण्यावर तरंगत राहिली व गीतार्णव तळाशीं गेला, अशीही एक आख्यायिका आहे.

दासोपंतांच्या कवितेंत कवित्व फारसें नाहीं व त्यांच्या कवितेचा मुख्य विषय अध्यात्म हा असल्यामुळें तींत कवित्वाची विशेष अपेक्षा करणेंही बरोबर होणार नाहीं. तथापि त्यांच्या कवितेंत प्रसाद असून, शिवाय एक प्रकारचा अधिकारीपणाही दिसून येतो. त्यांची विद्वत्ता फार मोठी होती, हें त्यांचा गीतार्णव हा ग्रंथ पाहिला असतां, कोणाच्याही लक्षांत येईल. पुढील ओंव्या पहाः—

अर्जुन भगवंतास ह्मणतोः—

पृथ्वीचें राज्य तें किती । सार्वभौम गा श्रीपती ।
तें मातें तारक अंतीं । ऐसें नव्हे ॥ २२४२ ॥

आतां तेचि विवंचना । सांगेन हृदयस्थ कल्पना ।
राज्यें येणें, श्रीकृष्णा । होईल दुःख ॥ ४२ ॥

छेदूनि स्वजन ह्यातियेरीं । पुरत्रयींचें राज्य जऱ्ही ।
म्या केलें श्रीहरि । एकलेन ॥ ४३ ॥
तऱ्ही तयाचें मज कारण । सांग पां श्रीकृष्णा कवण ? ।
जेणें भोगावें तें जन । रणीं हरपलें ॥ ४४ ॥
मी कवणाचा मग काई । माझें तें कोठें कव्हणी नाहीं ।
मागें पुढें देहीं । एकलाची मी ॥ ४५ ॥
येका शरीररक्षणातें । भिक्षेनें काय अपुरतें ।
मा त्रैलोक्यराज्य स्वार्थें । भ्रांत होआवें ॥ ४६ ॥
मरावें तें चुके मरण । भोगावें तें खरें प्राचीन ।
वाढवावें दुष्ट क्रियमाण । वाउगेंचि ॥ ४७ ॥
दैवाधीनता चुकली । कीं आधिव्याधि निमली ।
येणें राज्यें सिद्धि जाली । ते पैं कवण ? ॥ ४८ ॥
राज्यें चुकलें पतन । कीं राज्य हें ज्ञानधन ,
मोक्षस्वरूप निधान । आंगणींचें हें ? ॥ ४९ ॥
येणें देहबुद्धि चुकली । ज्ञानकळा उदैजली ।
यातायाति चुकली । संसारयात्रा ? ॥ ५० ॥
ईश्वरू ह्मणतील मातें । मोक्षु देईन मी भूतांतें ।
उत्पत्तिस्थितिप्रळयांतें । करीन सामर्थ्यें ? ॥ ५१ ॥
होईन काये जगद्गुरु ? । मागुता नरु तो नरु ।
आपुलाचि घालीन भारु । दुसरेयावरी ॥ ५२ ॥
देवा ! कैसा रक्षिसील । देवा ! काये देशील ।
देवा ! अरिष्ट निरसिसील । कवणे परी ? ॥ ५३ ॥
देवा देवा, ह्मणतां । न चुके माझी पराधीनता ।
येणें राज्यें मी आतां । करूं काये ? ॥ ५४ ॥
प्राचीन तेंचि भोगणें । तैं राज्यें हित काये येणें ? ।
कांहीं आत्महित करणें । तें येक वांचूनि ॥ २५ ॥

आणिक येक अनंता, । पुरत्रयींचें राज्य करितां ।
गेला द्रोणु तो मागुता । देखेन कैं ? ॥ ५६ ॥
पडिला जो भीष्मु रणीं । नसंपडे तो मागुतेनि ।
तैं मी ऐसा ह्मणौनि । कवणु पाहिल ? ॥ ५७ ॥
दुर्योधना सादु देईं । तंव तो कवणे ठाईं ? ।
पडलेया बंधूंची नाहीं । भेटी पुनः ॥ ५८ ॥
अवघेन राज्यें जोडती । पुत्रपौत्र तेचि येती ।
नाना भलयति येकि प्राप्ति । सांग तेणें ? ॥ ५९ ॥
अवघे स्वजन मारावे । मग तें कोणाकारणें करावें ? ।
पुरत्रयींचें अघवें । भौपत्य जें कां ॥ ६० ॥
समूळ कर्ण छेदूनि । कुंडलें घालावीं कवणे स्थानीं ? ।
जडितें मोलाचीं पाहोनि । काये काज ? ॥ ६१ ॥
अंगुलिका छेदूनि सकळा । मुद्रिका घेतलिया गोपाळा ।
आतां ते माळ गळां । करूनि घालावी ? ॥ ६२ ॥
नाशिकेवीण मुक्ताफळ । कामिणी घालिती केवळ ।
तैसें माझें राज्य विकळ । स्वजनेंवीण ॥ ६३ ॥
न्नोंडकें डाकें शिरीं खोपा । तैसें मज झालें व्रापा ! ।
शिरेंवीण पाहें पां । भारणाचि नये ॥ ६४ ॥
दृष्टीवीण सुलोचन । प्राणहीनाचें भूषण ।
तैसें कौरवहीन जाण । माझें राज्य ॥ ६५ ॥
थोरीं घातलिया वेळा । मरोनि भोगणें सोहोळा ।
असो तें राज्यचि गोपाळा । काये करावें ? ॥ २२६५ ॥

गीतार्णव अध्याय १.

दासोपंतांस संस्कृत भाषेचें ज्ञान उत्तम होतें, हें त्यांच्या संस्कृत ग्रंथांवरून सहज लक्षांत येतें; तथापि मराठी भाषेवरही त्यांचे मोठें प्रभुत्व होतें. त्यांच्या ग्रंथांत जुने शब्द बरेच आहेत, व ते जरी एकनाथांशीं समकालीन होते तरी, एकनाथांची भाषा पंतांच्या भाषेपेक्षां बरीच सुलभ आहे. वामनांच्या यथार्थदीपिके-

प्रमाणेंच दासोपंतांच्या गीतार्णवांतही पांडित्याची चांगलीच ओळख पटते; उपमाही पुष्कळ आढळतात; परंतु विस्तार मोठा ! त्यामुळें अर्थाचें आकलन करणें सामान्य जनास कठीण वाटतें. मोरोपंतांनींही या बाबतींत असाच अभिप्राय दाखल केला आहे; ते ह्मणतात:—

ग्रंथ परम दुस्तर तो ( गीतार्णव ), न तयाचि ( दासोपंतांस )
जसें न वासवाला ( इंद्राला ) ख ( आकाश ) !

दासोपंतांनीं गीतेवर पांच ग्रंथ लिहिले आहेत, ह्यावरून त्या ग्रंथावर त्यांचा व्यासंग फार मोठा असला पाहिजे, यांत शंका नाहीं, तथापि ज्ञानेश्वरीपुढें त्यांच्या ग्रंथांचें चांगलेसें तेज पडत नाहीं ! एकंदरींत, भगवद्गीतेवर मराठींत ज्या लहान मोठ्या वीस पंचवीस टीका झाल्या आहेत. त्यांत, ज्ञानेश्वरीच्या तोलाची व योग्यतेची दुसरी टीका नाहीं, असें ह्मटल्यास कोणी दोष देईल असें वाटत नाहीं. सिद्धीच्या जोरावर आपली टीका प्रसिद्ध केल्याचा जो आरोप, वामनांनीं यथार्थदीपिकेंत कित्येक टीकाकारांवर केला आहे, त्यांत दासोपंतांचाही समावेश होतो कीं काय, सांगतां येत नाहीं; कारण दासोपंतांस सिद्धि जरी अनुकूल होत्या, तरी त्यांचे ग्रंथ फारसे प्रसिद्ध होते, असें दिसत नाहीं. दासोपंतांचा काल हा महाराष्ट्र वाङ्मयांतील अध्यात्म ग्रंथांच्या भरभराटीचा काल होय. या कालीं, जे साधु व कवि होऊन गेले, त्यांचा सगळा भर अध्यात्मावर. एकनाथी भागवत; गीतार्णव; हस्तामलक; माधवकृत योगवासिष्ठ; रंगनाथ पैठणकरकृत चित्सदानंदालहरी, पंचरत्न, योगवासिष्ठ; बालबोध; शिवकल्याणकृत अमृतानुभवावरील टीका, दशमस्कंध; दासोपंतांचे इतर ग्रंथ, हे सगळे अध्यात्मग्रंथ याच कालांत निर्माण झाले. एकनाथांनीं ज्ञानेश्वरीचा जीर्णोद्धारही याच कालांत केला. तथापि संस्कृत पुराणग्रंथांचीं मराठी भाषांतरें होण्यास ही याच कालीं प्रारंभ झाला. रुक्मिणीस्वयंवर, भावार्थ रामायण, कथाकल्पतरु, कृष्णदासमुद्गलकृत रामायण ( युद्धकांड ), माधवकृत महाभारत व समश्लोकी रामायण हे पुराण ग्रंथही याच कालीं निर्माण झाले. एकंदरींत, ज्ञानदेवनामदेवांच्या कालानंतर, मध्यंतरीं, तीनशें वर्षें वाङ्मयाच्या बाबतींत महाराष्ट्रावर जो एकप्रकारचा अंधकार पसरून राहिला होता, तो एकनाथादि तारे वाङ्मयाकाशांत उदय पावल्यामुळें नाहींसा झाला; व ही स्थिति, एकनाथांपासून हा कालपावेतों सारखी कायम आहे, ही आनंदाची गोष्ट ह्मटली पाहिजे.

गीतार्णवांतील आणखी कांहीं ओंव्या व दासोपंतांचीं एकदोन पदें येथें देऊ हा भाग आतां पुरा करूं.

गोत्रवधाच्या पातकास प्रवृत्त होण्यास तयार नसलेला अर्जुन भगवंतास ह्मणतोः-

तें कैसें पां आमुतें नकळे । आह्मीं तंव नहों आंधळे ।
अविवेक, मदें मातले । आततायी ॥ २५८३ ॥
व्याघ्र देखोनी पळावें । हें काये लागेल सिकवावें ? ।
पश्वादिकांहीं बरवें । ठावेंचि असे ॥ ८४ ॥
परीक्षा न पाहिजे विषाची । माळा न लेइजे भुजंगाची ।
संगति तया चोराची । धरूंचि नये ॥ ८५ ॥
न कीजे वैरियेसीं येकांतु । न संगिजे खळा आत्मस्वार्थु ।
पाहोनि येकु पुरुषार्थु । कर्म करावें. ॥ ८६ ॥
न कीजे साधूसीं मत्सरु । परबाधकाचा अंगीकारु ।
सत्यासत्या वेगळा विचारु । करूंचि नये ॥ ८७ ॥
न विश्वासावें दुर्मित्रा । वाउगी न करावी यात्रा ।
आपलें वित्त तस्करा । सांगोंचि नये ॥ ८८ ॥
इष्ट देखोनि प्रवर्तावें । अरिष्ट देखोनि परतावें ।
मा हें तंव ठावें । बाळकांहीं ॥ ८९ ॥
आइकोनि जाणों, देखोनि । विचारें मनामाजूनि ।
तरी कुळक्षया पापापासूनि । कैसें न परतावें ? ॥ ९० ॥
प्रळय काळींचा हा वणवा । परतें परतें वासुदेवा ॥
गोत्रवधु हा पांडवा । ग्रासूं आला ॥ ९१ ॥
हें सिंहवदन पसरलें । आंग चुकवावें आपुलें ।
पाप दारुण पावलें । नीघ वेगीं ॥ ९२ ॥
विषाचा हा सागरु । प्रळय काळींचा पूरु ।
कृष्णा तूं होसी तारूं । तरि नीघ वेगीं ॥ ९३ ॥
कल्पांतीं मेघ रचले । तैसें पाप येकुवटलें ।
येणें आकाश रुंधलें । बाह्यांतरींचें ॥ ९४ ॥

आतां मग हें गर्जेल । बाणधारा वर्षतील ।
प्रलयो पाप करील । गोत्रवधाचें ॥ ९५ ॥
पळे, तेणेंचि जिंकिलें । भिडे, तेणें हारविलें ।
मारी, तेणें मारिलें । आपणपयां ॥ ९६ ॥
कल्पांतींचेनि, बा वधणें, । उडालों मी पापें येणें ।
कृष्णा काये करिसी नेणें । ययावरी ॥ ९७ ॥
जंव हें आहे घडावें । तंवचि केशवें चुकवावें ।
घडल्या, जोगें नव्हे । तुह्मा आह्मा ॥ ९८ ॥
दहाहि दिशा सुनाटा । परि पळावें कवणा वाटा ? ।
आतां निर्गमाचा दारवंटा । हाचि येकु ॥ ९९ ॥
हातींचें शस्त्र सांडणें, उगेंचि मग पाठीं बैसणें ।
युद्ध कौरवांसीं न करणें । हेंचि मुख्य ॥ २६००

गीतार्णव अ० १ ला.

मग भगवान् अर्जुनास ह्मणतात—

देशोदेशींचे नृपाळ । असगे मीनले सकळ ।
महारथिये निर्मळ । क्षात्रधर्मी ॥ १५५७ ॥
वडिलु भीष्मु, गुरु द्रोणु । कौतुक जयाचें तो कर्णु ।
कौरवभारु आनु । मीनला असतां ॥ १५५८ ॥
युद्ध होईल दारुण । ऐसें स्वर्गी आइकोन ।
कौतुक पाहों सुरगण । अंतरिक्ष ठेले ॥ ५९ ॥
ते देखती तूतें रुदतां । मागें पुढें अवलोकितां ।
युद्ध सांडूनि पळतां । काये ह्मणतील ? ॥ ६० ॥
अर्जुनु गेला रे गेला । आपुला प्राण रक्षिला ।
थोरु पुरुषार्थु केला । पळोनि येणें ॥ ६१ ॥
देखोनि भीष्माचें बळ । अर्जुनें सांडिली चळवळ ।
मायिक आणिली कळवळ । मोहाची येणें ॥ ६२ ॥

सारथ्य तुझें केलें । तें लाजिरवाणें आह्मां झालें ।
साचचि भय घेतलें । काय पां तुवां ? ॥ ६३ ॥
पळोनि जेथें जाणें । तेथिंचे राये राणे ।
मीनले संग्रामें येणें । देखिलें तिहीं ॥ ६४ ॥
मग तेथिंचे ते तूतें । निभ्रंसितील निरुतें ।
मग काय करिसील ? मागुतें । गेलें तें युद्ध ॥ ६५ ॥
मग लज्जा प्राणु देइजे । कां निर्लज्ज होऊनि जीजे ।
थोरांचिये न यांचजे । सभेप्रति ॥ ६६ ॥
दानीं स्वधर्मी समरंगणीं । कां सभेमाजी सिंहासनीं ।
वर्णितां ख्याति वचनीं । ययां माजी ॥ ६७ ॥
तूं एकु उदारु । तूं स्वधर्मी निष्ठापरु ।
तुजसीं नाथी झुंजारु । ययें पुरत्रयीं ॥ ६८ ॥
सभेमाजी तूं श्रेष्ठु । रणसंग्रामीं धीटु ।
न साहे त्रिनयना लोटु । तुझा पार्था ! ॥ ६९ ॥
मागें अथवा मुखावरी । तूतें जे वर्णिती क्षेत्री ।
तयां समस्तां माझारी । श्रेष्ठ असतां ॥ ७० ॥
अति लघुत्व पावसील । मग ते स्तुतिही निंदा मानैल ।
आणि निंदा ते येईल । सहज वांटया ॥ ७१ ॥
परस्परांही अपहास । करिती जन एकमेकांस ।
ते तूं मानिसी उपहास । माझेचि ह्मणौनि ॥ ७२ ॥
तेथें दुणावैल कोपु । नरवयाचाही संतापु ।
तंव तंव तो आरोपु । खराचि होईल ॥ ७३ ॥
असो, बहु जनें विटंबितां । कवणासि परजिजे पार्था ? ।
अगा पुढील चुकवाव आतां । तरि शहाणेपण ॥ ७४ ॥
तें असो, गा पांडुनंदना । जयांची करितासि तूं करुणा ।
ते तुज पळालया अर्जुना । काय ह्मणतील ? ॥ ७५ ॥
तुझेनि अहित जयां हितें । हित तुझेनि अहितें ।
आणि तूं मूर्ख जो ययांतें । बंधु ह्मणतासी ॥ ७६ ॥

जन्मांतरीं वैरी असती । ते देहसंबंधी होऊनि साधिती ।
ते मयांचि कळों येंती । प्रीतियोगें ॥ ७७ ॥
कवणें कपटफांस केले ? । द्यूतकर्मीं धर्मा जिंकिलें ? ।
राज्य कवणें हरिलें ? । सांग पां, गा ॥ ७८ ॥
कबरीं धरूनि द्रुपदीतें । सभे आणिलें सतीतें ।
वस्त्रहरणीं मातें । स्मरली पांचाळी ॥ ७९ ॥
तत्काळेंचि मी अर्जुना । नाशु करितों तुझ्या स्वजना ।
परि अनृत्यता धर्मवचना । येईल ह्मणौनि ॥ ८० ॥
दुःखाची उकळी साहिली । क्रोधाची कळा प्रकाशिली ।
वस्त्रेंचि तियेतें पुरविलीं । तये सभे ॥ ८१ ॥
तें तूं विसरलासी काये ? । माझां हृदयीं कालविताहे ।
आतां मग उलंडोनि जाये । ऐसें वाटे ॥ ८२ ॥
लाखागृह कवणें केलें ? । भीमसेना विष दिधलें ? ।
गिरिकंदरीं लाविलें । कवणें तुम्हां ? ॥ ८३ ॥
ते ह्मणतासि तूं स्वजन । तरी मिथ्या तुझें ममत्व मौन ।
असो. अहित हें देखोन । काय ह्मणती ? ॥ ८४ ॥

गीतार्णव, अध्याय २

या भगवद्भाषणांत, वक्तृत्व सारखें भरून राहिलें आहे. ‘ युद्ध न करितां पळून गेल्यानें लोकांत तुझें हंसें होईल ’ हें अर्जुनास स्पष्ट शब्दांनीं सांगावयाचें होतें, तें वरील उताऱ्यांत उत्कृष्ट रीतीनें सांगितलें गेलें आहे, यांत शंका नाहीं.

वरील तीन्ही उतारे कथाभागासंबंधानें दिले. आतां इतर विषयांसंबंधानें कांहीं उतारे देतों. दासोपंतांस मराठी भाषेचा केवढा अभिमान होता व तीवर त्यांची केवढी सत्ता होती, हें पुढील ओंव्यांवरून लक्षांत येईल. पंत ह्मणतातः—

‘ शब्दाचें असे कारण । शब्दु तयाचें साधन ।
तथापि भाषे येकीचें प्रमाण । काये तेथें ? ॥ २६५५ ॥
जिया भाषा जें अभिधान । तियाचि भाषा त्याचें ज्ञान ।
येर शब्द अप्रमाण । तये अर्थीं ॥ ५६ ॥

जिया भाषा कळे क्रिया । तेचि कारण तेथ कर्तया ।
येरीं अपारा जालिया । व्यर्था होती ॥ ५७ ॥
पसाराचें कांहीं घेणें । तें कळे शब्दें जेणें ।
तोचि शब्दु बोलणें । तये ठायीं ॥ ५८ ॥
वस्तु आलिया हातां । मग नाना भाषीं ते बदतां ।
कांहीं प्रयोजनु ? कीं वक्ता । श्रमातें पावे ? ॥ ५९ ॥
संस्कृत असती ग्रंथ । तयांचें जाणावें मत ।
ऐसें जैं आर्त । उपजे जिवा ॥ ६० ॥
तरीचि तें अभ्यासावें । अभ्यासूनि तत्व जाणावें ।
मग शब्द अवघे सांडावे । न व्हावें आसक्त ॥ ६१ ॥
कणु घेऊनि भूस । देईजे जैसें पश्वादिकांस ।
तत्त्व जाणौनि, शब्दास । तैसें सांडावें ॥ ६२ ॥
अथवा उदरपूर्ती कारणें । योग्यतेचेनि गुणें ।
मूर्खां लोकां ठकणें । ऐसें जैं ॥ ६७ ॥
तैं शास्त्रें समग्रें शिकावीं । अपार वटवट करावी ।
नाना उपायीं आणावी । आपणा योग्यता ॥ ६४ ॥
नाना विद्या जाणोनी । नाना मतें शिकोनि ।
नानाविध जिंकोनि । वादीं लोक ॥ ६५ ॥
आंगीं योग्यता आणावी । मग ते अभिमानें पोषावी ।
संसारिकांप्रति दावावी । साधावा रुका ॥ ६६ ॥
अर्थप्रयोजनु जया असे । तया क्रियेची चाडचि नसे ।
स्वहित स्वप्नीं न दिसे । तेणें शास्त्रें ॥ ६७ ॥
अर्थार्थी जनु पंडितु । तोहि अर्थु साधतां पाहतु ।
मग प्रसंगींचि आणितु । आपलें संस्कृत ॥ ६८ ॥
आतां आला रुका पुरे । मग सांडी संस्कृतें उत्तरें ।
प्राकृता याणी विचरे । संसारमार्गीं ॥ ६९ ॥
परंतु ते भाषाचि परम । ऐसें नमनी कव्हणी वर्म ।
प्रयोजनु मात्रचि काम । आपुलें संपादिती ॥ ७० ॥

संसार नगरपेठे । नाना भाषांचें नाणवटें ।
येका खरें, तें खोटें । आना येकां ॥ ७१ ॥
येथें संस्कृतचि केवळ । न सरे नाणें सकळ ।
कोण्ही एक स्थळ । ऐसें आहे ॥ ७२ ॥
संस्कृतें घट्ट ह्मणती । आतां तयाचे भेद किती ? ।
कवणा घटाची प्राप्ति । पावावी तेणें ? ॥ ७३ ॥
हारा, डेरा, रांजणु । मुढा, पडगा, आनु ।
सुगड, तौली, सुजाणु । कैसी बोलैल ? ॥ ७४ ॥
घडी, घागरी, घडौली, । अलंदें, बाचिकें, वौळी ।
चिटकी, मोरवा, पातली । सांजवणें तें ॥ ७५ ॥
ऐसे प्रतिभाषे वेगळाले । घट असतो नामार्थिले ।
एके संस्कृतें सर्व कळे । ऐसें कैसेन ? ॥ ७६ ॥
सनवट, चोपण, गव्हाळी । चिकणी, पन्हवट, मळी ।
चुनवट, माळवट, खळी । खळगा, खात, ॥ ७७ ॥
उतें, गोटल, खडाळ । पांढरी, सेडू, मुरुबाळ ।
तांबट, काळी, करळ, । भेद मृत्तिकेचे ॥ ७८ ॥
नदु, नदी, ओहळ, । झोती, झिरपें, खळाळ ।
धार, घाळणी, पीळ । भवंरा, धोधें. ॥ ७९ ॥
टांकें, बावी, पोखरणी, । बारव, विहिरी, अडु, धरणी, ।
चिहिरा, तळें, रानी, । हळता (,) धुमें ॥ ८० ॥
ऐसे भेद जळस्थानांचे । एक एक बहुतां नामाचे ।
सारी प्रयोजन तयांचें । संस्कृत कैसें ? ॥ ८१ ॥

**गीतार्णव, अध्याय २.**

प्रस्तुत, इंग्रजी भाषेंतच सगळा व्यवहार करूं इच्छिणाऱ्या लोकांनीं वरील ओंव्यांतील व्याख्यानाचा अवश्य विचार करावा; विशेषतः मोठ्या टायपांत दिलेल्या ओंव्यावर विशेष लक्ष जाणें अवश्य आहे.

रामदासांप्रमाणें दासोपंतांस व्यवहाराचें व व्यावहारिक शब्दसमुच्चयाचें उत्कृष्ट

ज्ञान होतें. त्यांचा गीतार्णव ग्रंथ तर अध्यात्माप्रमाणेंच व्यवहारज्ञानानेंही भरलेला आहे. गीतेच्या द्वितीयाध्यायांतील ४२, ४३ व ४४ या श्लोकांवर त्यांनीं जें व्याख्यान केलें आहे, त्याच्या १७६४ ओंव्या असून, त्यांत अनेक वेदवचनाच्या आधारानें त्या श्लोकांचें फार उत्कृष्ट विवरण केलें आहे; तें पाहिलें ह्मणजे दासोपंतांची विद्वत्ता, भाषाप्रभुत्व व सहज वाणी, यांसंबंधानें फार पूज्यबुद्धि उत्पन्न होते.

गीतार्णव हा ग्रंथ पंतांनीं, कोणत्याही भाष्याधारें लिहिलेला नाहीं, तर केवळ स्वानुभवानें लिहिला आहे; यासंबंधानें ते ह्मणतातः—

'न पाहें श्रोतयांचें वदन । न करीं भाष्याधारें विवरण ।
स्वस्वानुभवें हें मनन । ह्मणौनि संपादीं ॥ १९ ॥
आइकैल तेणें आयिकावें । मानैल तेणें घ्यावें ।
नावडे तेणें नेघावें । दोहीं श्रवणीं ॥ २० ॥
स्वसंप्रदायिक जे योगी । यया मननाचे विभागी ।
टीका हे तयांचि जोगी । तेहीं आइकावी ॥ २१ ॥
स्वानुभवाचि येथींचें प्रमाण । स्वानुभव हेंचि साधन ।
अन्यत्र शास्त्रश्रवण । तैसें हें नव्हे ॥ २२ ॥
प्राकृत ह्मणौनि दूषिती । तेचि यया ज्ञाना वंचती ।
भाषाचि केवळ भजती । ते मूर्ख कीं ना ? ॥ २३ ॥
हातीं देतां नवरत्नें । मल्हाटेन बोलें ने घेणें ।
आतां हानि तया कारणें । ते दूरि नसे ॥ २४ ॥
संस्कृतें बोलिलें सेवणें । तेंचि सांडावें प्राकृत वचनें ।
ऐसिया मूर्खा मुंडणें । किती आतां ? ॥२५ ॥

आतां पंतांच्या पदांचा नमुना पहाः—

पद (दादरा).

खेर-खादिर-सर्प-संगति घडलीसे, चंदना ! रे ! ॥
पापीं व्यसनराशि, के गुणें उरसी चंदना ! रे ! ॥
हृदय कठिण करीं, परगुण न धरीं, चंदना ! रे ! ॥
गुणा भुलसी तरी पडसील बोहरि, चंदना ! रे ! ॥ १ ॥

ध्रु० ॥ अरे रे रे रे रे रे ! परिस तूं, सज्जना रे ! ॥
खळसंगु असतां साधुत्व काय उरे ? सज्जना रे ! ॥
शिला पानीय वरी घसणी पडतीसे, चंदना रे ! ॥
करवत कुठार, तुजचि लागि पैल चंदना रे ! ॥
घालुनि दननावीर पाहों पाहाती थोरी, चंदना रे ! ॥
दिगंबरावांचून न धरीं आन साधु, चंदना ! रे ॥ २ ॥

दासोपंतांनीं आपल्या कवितेंत आपला उल्लेख ' दिगंबर ' किंवा ' दिगंबरानुचरु ' या नांवांनीं केला आहे. दिगंबर ह्मणजे दत्तात्रय हे त्यांचे गुरु, अर्थात् त्यांचे अनुचर ( शिष्य ) ते ' दिगंबरानुचर ' हा अर्थ उघड आहे.

# मुक्तेश्वर.

श्रीमुक्तेश्वर कविवर यातें कोण न शुभेच्छु वंदील ? ।
वंदी लक्ष जयाचे, यश ज्याचें भव्य जेंवि मंदील ॥ १ ॥

सन्मणिमाला—मोरोपंत.

महाराष्ट्र देशांत आजपर्यंत पुष्कळ कवि होऊन गेले, परंतु खऱ्या कवित्वाच्या दृष्टीनें पाहिल्यास, त्या सर्वांत मुक्तेश्वरांची योजना प्रमुखस्थानीं करणें अगदीं बरोबर आहे, असें, त्यांचीं काव्यें ज्या भाग्यवान् व रसिक पुरुषांनीं मननपूर्वक वाचून पाहिलीं असतील, त्यांस खचित वाटल्याशिवाय रहाणार नाहीं. शिरोभागीं दिलेल्या आर्येंत, पंतांनीं मुक्तेश्वरांस कविवर ह्मटलें आहे. ही पदवी त्यांनीं दुसऱ्या कोणत्याही महाराष्ट्र कवीस दिलेली नाहीं. मुक्तेश्वरांची आज उपलब्ध असलेली कविता फार थोडी आहे, तथापि ती इतकी चांगली आहे कीं, मराठी भाषेंतील उत्तम कवितेचा नमुना जर कोणास पहावयाचा असेल, तर त्याला मुक्तेश्वरांचें महाभारत पहिल्यानें वाचावयास यावें. ओंवीसारख्या सुलभ वृत्तांत व अगदीं साध्या भाषेंत, जर अंगीं खरी कविताशक्ति असेल तर, पाहिजे तो रस कसा खुलवून देतां येतो, हें मुक्तेश्वरी भारतावरून वाचकांच्या ध्यानांत येईल. या भारतासंबंधानें, आर्यापति मोरोपंत यांनीं ह्मटलें आहे:—'मुक्तेश्वरी भारत वाचून कवींच्या सर्व आशा व गर्व हीं लयाला जातात.'

आतां या शिफारसपत्रापेक्षां, मुक्तेश्वरांस दुसऱ्या कोणत्या योग्य परीक्षकांचें शिफारसपत्र पाहिजे ? मुक्तेश्वरी भारताची महाराष्ट्रांत केवढी प्रसिद्धि आहे व तें किती लोकप्रिय आहे, हें येथें सांगण्याची आवश्यकता आहे असें नाहीं. प्रख्यात महाराष्ट्र पंडित कै० कृष्णशास्त्री चिपळूणकर यांचें मुक्तेश्वरी कवितेसंबंधाचें मत तर सर्वप्रसिद्ध आहे. ते मुक्तेश्वरांच्या कवितेला फार मान देत व प्राकृत भाषेंत एका मुक्तेश्वरांत मात्र खरें कवित्व सांपडेल असें ह्मणत असत. माझे विद्वान् मित्र व सुप्रसिद्ध महाराष्ट्र काव्यसंशोधक रा. रा. लक्ष्मण रामचंद्र पांगारकर बी. ए. यांनीं,

आपल्या ' महाभारताचे मराठी अवतार, ' या निबंधांत ह्मटलें आहे, "राष्ट्रीयत्वाची कल्पना आमच्या इकडील सर्व साधुकवींस होती, पण मुक्तेश्वराच्या सर्व भारतांत ती जशी चमकते, तशी दुसऱ्या कोणत्याही मराठी काव्यांत चमकत नाहीं. मुक्तेश्वराच्या वार्णीत जें अद्भुत ओज व जी वीररसाची दीप्ति इतक्या उत्तमत्वानें चमकते, त्याचें कारण तरी हेंच कीं, त्याची कल्पना अति विशाल होती. कवीला लागणारे प्रतिभादि लोकोत्तर गुण त्यांत होते. सभोंवारच्या परिस्थितीकडे व समाजघटनेकडे राष्ट्रीय अभिमानानें पाहण्याचें सामर्थ्य त्यांत होतें. एकनाथांचें रक्त त्यांच्या अंगांत खेळत असल्यामुळें जाज्वल्य नीतिमत्ता व ईश्वरभक्ति हे गुण निसर्गतः त्यांला प्राप्त झाले होते; अशा सर्वांगसुंदर कविश्रेष्ठ मुक्तेश्वराच्या तोलाचा दुसरा मराठी कवि नाहीं. मुक्तेश्वराची ओवी खोडून दूर करणारा समर्थ व रसिक कोणी आढळेल, असें मला वाटत नाहीं. साऱ्या मराठी वाङ्मयांत ओवी अशी ज्ञानोबाची किंवा मुक्तेश्वराची. साऱ्या मराठी कवींत वर्णन करण्याची हातोटी मुक्तेश्वरासारखी कोणालाही साधली नाहीं. मराठींत वर्णनात्मक काव्यें नाहींत अशी कांहीं आंग्लकाव्यलोलुप जनांची ओरड अनेक वर्षांपासून आहे; त्यांनीं मुक्तेश्वरांनें भारत वाचावें, अशी मी शिफारस करितों. मुक्तेश्वराचीं पहिलीं चार व शेवटपैकीं सौप्तिक हीं पांच पर्वें वाचूनें त्यांचीं सर्व पर्वें वाचण्याची मला इतकी उत्कंठा झाली आहे कीं, मुक्तेश्वरी भारताचीं अठराही पर्वें ज्या दिवशीं हातांत पडतील, तो दिवस माझ्या आयुष्यांतला परम धन्य असें मी मानीन ! ! "

मुक्तेश्वरांचा जन्मकाल व जीवनवृत्तांत यासंबंधानें ह्मणण्यासारखी माहिती अद्याप मिळत नाहीं. तथापि जी कांहीं थोडीशी माहिती शोधकांच्या परिश्रमानें संग्रहित झाली आहे, तिच्या आधारानें या सत्कवीचें हें अल्पचरित्र लिहिण्याचा मी प्रयत्न करितों.

मुक्तेश्वरांच्या कवितेवर आजपर्यंत चार गृहस्थांचे लेख प्रसिद्ध झाले आहेत. पहिला लेख निबंधचंद्रिका मासिक पुस्तकांत आलेला आहे; दुसरा रा. राजवाडे यांचा ग्रंथमालेंतील लेख; तिसरा सरस्वतीमंदिरांतील रा. पांगारकर यांचा लेख व चौथा रा. भिडे यांचा सरस्वतीमंदिरांत प्रसिद्ध झालेला लेख. यांशिवाय नवनीतांतही मुक्तेश्वरांचें लहानसें चरित्र दिलें आहे तें कविचरित्रांतून उतरून घेतलें आहे. या पांचही निबंधांत मुक्तेश्वरांच्या चरित्रासंबंधानें जी माहिती दिली आहे, ती अगदीं अपुरी आहे. रा. भिडे यांच्या निबंधांत, मुक्तेश्वरी कवितेसंबंधानें फार

मार्मिक विवेचन केलें आहे, परंतु त्यांतील चरित्रविषयक भाग केवळ कल्पनामय आहे. तथापि हे सगळे निबंध,-विशेषत: रा. भिडे यांचा निबंध वाचनीय असून, ते एकवार आपल्या अवलोकनांत आणण्याची वाचकांस मी शिफारस करितों.

पैठणचे प्रख्यात सत्पुरुष व कवि एकनाथस्वामी यांचे मुक्तेश्वर हे नातु होत. त्यांची गोदूबाई या नावांची एक मुलगी होती; ती कुरुंदवाडाजवळ नाथांचा कोणी अत्रिगोत्री आप्त रहात असे, त्याच्या मुलास दिली होती. या मुलीचें सासरचें नांव गंगाबाई; व तिच्या पतीचें नांव चिंतामणी ऊर्फ विश्वंभरबुवा. गोदूबाईशिवाय गंगाबाई या नांवाची नाथांची दुसरी एक मुलगी होती, ती कर्नाटकांत दिली होती, व तिला 'पुंडोजी' नामक पुत्र होता, असें महीपति व केशवदास यांनीं नाथचरित्रांत लिहिलें आहे. परंतु मुक्तेश्वरांच्या वंशजांस कोल्हापुर सरकारांतून जी सनद मिळाली आहे तींत 'मुक्तेश्वर हे एकनाथांची कन्या गंगाबाई हिचे पुत्र' असें स्पष्ट लिहिलें आहे. तेव्हां, गंगाबाई हें मुक्तेश्वरांच्या आईचें सासरचें नांव कीं माहेरचें नांव ह्याचा उलगडा होत नाहीं. मुक्तेश्वरांनीं आपल्या तीर्थरूपांच्या नांवाचा आपल्या ग्रंथांत पुष्कळ ठिकाणीं उल्लेख केला आहे, परंतु आपल्या आईच्या नांवाचा स्पष्ट उल्लेख त्यांनीं मुळींच केलेला नाहीं. रा. राजवाडे, पांगारकर व कविचरित्रकार यांचें मत असें आहे कीं, मुक्तेश्वरांच्या आईचें माहेरचें नांव गोदूबाई, सासरचें नांव गंगाबाई व नाथ तिला कौतुकानें लीलाबाई असें ह्मणत असत; व 'लीलाविश्वंभर' या नांवाचा उल्लेख मुक्तेश्वरानीं पुष्कळ ठिकाणीं केलेला आहे, त्यांतील 'लीला' या शब्दानें त्यांनीं आपल्या मातेच्या नांवाचा उल्लेख केलेला आहे. परंतु 'लीलाविश्वंभर' हें मुक्तेश्वरांच्या गुरूचें नांव असावें, असा रा. भिडे यांचा तर्क आहे. एकनाथांच्या दुसऱ्या मुलीचें नांव गंगाबाई होतें, असें केशवदास व महीपति ह्मणतात. एकंदरींत मुक्तेश्वरांच्या आईच्या नांवासंबंधानें मोठा घोटाळा झालेला असून,त्याचा निर्णय करणें कठीण आहे, तथापि मुक्तेश्वरांच्या मातेचें एक नांव गंगाबाई होतें, असें कोल्हापुरकरांच्या सनदेवरून स्पष्ट आहे, यांत संशय नाहीं.

आतां 'लीलाविश्वंभर' या नांवासंबंधानें विचार करूं. रा. भिडे ह्मणतात कीं, हें मुक्तेश्वरांच्या गुरूचें नांव असावें; व मलाही प्रथमत: असेंच वाटलें. परंतु येथें एक अडचण अशी उपस्थित झाली कीं, मुक्तेश्वरांच्या वंशजांपाशीं त्यांच्या घराण्याचा जो वंशवृक्ष आहे, त्यांत मुक्तेश्वरांच्या तीर्थरूपांचें नांव 'चिंतामणि ऊर्फ

विश्वंभरगोसावी ' असें दिलेलें आहे. तेव्हां अर्थातच रा. भिडे यांचा तर्क खोटा ठरतो. दुसरें असें कीं, मुक्तेश्वरांचे गुरु ' लीलाविश्वंभर ' हे एखादे प्रसिद्ध साधु असते तर महिपतींच्या संतचरित्रविषयक ग्रंथांत त्यांचा उल्लेख खचीत झाला असता; परंतु त्या ग्रंथांत हें नांव मुळींच आढळत नाहीं. नाहीं ह्मणावयास, पंतांच्या सन्मणिमालेंत व जयरामसुतकृत संतमालिकेंत ' लीलाविश्वंभर ' हें नांव आढळतें, परंतु पंतांनीं व जयरामसुतांनीं मुक्तेश्वरांच्या काव्यांतूनच तें नांव घेतलें असावें, असें मानण्यास कांहीं हरकत दिसत नाहीं. आपल्या रामायणाच्या शेवटच्या श्लोकांत, मुक्तेश्वरांनीं आपल्या गुरूचा उल्लेख नुसत्या ' विश्वंभर ' पदानेंच केला आहे, तेथें लीलाविश्वंभर हें नांव नाहीं. अर्थात् लीला हें त्यांच्या आईचें नांव व विश्वंभर हें बापाचें नांव, हें अगदीं स्पष्ट होतें. पुढील ओवी पहाः—

' तो मुद्गल चिंतामणीसुत । लीलाविश्वंभर जगविख्यात ।
यानें व्यास भारतींचा अर्थ । महाराष्ट्रं बोलिला ॥ '

या ओवींत, ' जगविख्यात लीलाविश्वंभर ' जो चिंतामणि मुद्गल त्याचा मुलगा ( मुक्तेश्वर ) यानें भारत लिहिलें ' असें स्वतःच मुक्तेश्वरांनीं सांगितलें आहे. शुभानंद नामक दुसऱ्या एका कवीनें ' विश्वंभर ' या नांवाचा आपल्या ग्रंथांत उल्लेख केलेला आढळतो; यावरून हा कवि मुक्तेश्वरांचा कदाचित् गुरुबंधु असण्याचा संभव आहे. परंतु हा कवि कोंकणचा राहणारा असल्यामुळें, त्याचा गुरु ' विश्वंभर ' हाही कदाचित् तिकडचाच एखादा साधु नसेल असें ह्मणतां येत नाहीं. एकंदरींत, ' लीलाविश्वंभर ' शब्दा संबंधानें रा. पांगारकर, राजवाडे, गोडबोले, व नवनीतकार यांचाच तर्क सत्यास धरून आहे व रा. भिडे यांनीं या बाबतींत आपल्या निबंधाचीं जीं दहा बारा पृष्ठें अडविलीं आहेत त्यांत फारसा अर्थ नाहीं, असें माझ्या अल्पबुद्धीस वाटतें. कै. गोडबोले यांनीं ' गरुडारूढ मधुसूदन, हृदयीं धरिला आपण ' इत्यादि उतारा दिला आहे तो, मुक्तेश्वरांच्या अप्रसिद्ध ' वत्सलाहरण ' काव्यांतील असावा असा रा. भिडे यांनीं, खऱ्या माहितीच्या अभावीं, तर्क केला आहे, परंतु तो बरोबर नाहीं. कारण वरील उतारा हा मुक्तेश्वरांच्या एका स्वतंत्र पदाचा कांहीं भाग असून, हें पद या लेखांत मी पुढें उतरून घेतलें आहे.

मुक्तेश्वरांचें आडनांव नांव मुद्गल असतां तें त्यांचें स्वतःचें नांव होतें व पुढें आपल्या तीर्थरूपांच्या आज्ञेवरून त्यांनीं मुक्तेश्वर हें नांव धारण केलें असावें, असें जें रा. भिडे

ह्मणतात, तें मुळींच खरें नाहीं. कारण देशस्थ ब्राह्मणांत मुद्गल या आडनांवाचे ब्राह्मण पुष्कळ आहेत; पण रा. भिडे यांनीं या बाबतींत मुळीं चौकशीच केली नाहीं. मुक्तेश्वरी रामायणाच्या आरंभीं जे संस्कृत श्लोक आहेत, त्यांतील ' मुक्तेशस्य विराजते सुरुचिार वाणी ' हा श्लोक क्षेपक असावा, हें मत मला मान्य नाहीं. कारण, सदर रामायणाच्या आजपर्यंत जितक्या प्रती उपलब्ध झाल्या आहेत, त्या सर्वांत हे श्लोक आढळतात. शिवाय महिपतींनीं—

' मुक्तेश्वर मुद्गल यांनी । भारतीं आळविला चक्रपाणी '

या ओवींत ' मुक्तेश्वर मुद्गल ' या शब्दांनीं मुक्तेश्वरांच्या आडनांवाचा स्पष्ट उल्लेख केला आहे. कदाचित् वरील संस्कृत श्लोक, खुद्द मुक्तेश्वरांनींच मागाहून आपल्या रामायणांत घातले असतील.

मुक्तेश्वरांचे तीर्थरूप चिंतामणि ऊर्फ विश्वंभरबुवा हे मूळचे राहणारे कर्नाटकांतले, परंतु ते नाथांचे घरींच पैठणास रहात असत. पैठण येथील नाथांच्या वंशजांकडून रा. पांगारकर यांस अशीच माहिती मिळाली असून, ती विश्वसनीय नाहीं, असें मानण्यास कांहीं कारण नाहीं. असें सांगतात कीं चिंतामणिबुवा हे मोठे विद्वान् होते; परंतु त्यांस बाहेरख्यालीचें व्यसन लागल्यामुळें, गंगाबाईकडे त्यांचें दुर्लक्ष्य होत असे. गंगाबाई चांगली सुशिक्षित होती, तिनें आपल्या पतीस ह्या भयंकर दुर्व्यसनापासून परावृत्त करण्याकरितां शक्य तेवढा प्रयत्न करून पाहिला, परंतु कांहीं उपयोग झाला नाहीं. शेवटीं तिनें ती गोष्ट नाथांस कळविली. नाथांचें प्रपंचाकडे फारसें लक्ष नसल्यामुळें असल्या लौकिक गोष्टी कोणीतरी मुद्दाम सांगाव्या तेव्हांच त्यांस त्या कळत असत. आपली मुलगी इतकी सुंदर व सुशील असतां तिच्या नवऱ्याचें तिजवर प्रेम नाहीं हें पाहून नाथांस सखेदाश्चर्य वाटलें. चिंतामणीबुवा इतरत्र कसेहि वागत असले तरी नाथांपुढें त्यांचें कांहीं चालत नसे. दुसरे दिवशीं रात्रौ जेवण झाल्यावर चिंतामणीबुवा बाहेर जाणार तोंच नाथांनीं त्यांस जवळ बोलविलें व " भगवद्गीतेचा पहिला अध्याय आज तुमच्या मुखानें श्रवण करावा अशी आमची इच्छा आहे " असें सांगून लागलीच भगवद्गीतेची पोथी आणवून बुवांच्या पुढ्यांत ठेवून दिली. हें नाथांचें कृत्य पाहून बुवांची त्रेधा उडण्या-

१ रा. भिडे यांस ही माहिती अविश्वसनीय वाटते.

चा प्रसंग आला, परंतु करतात काय ? नाथाज्ञेप्रमाणें गीता सांगणें त्यांस भाग पडलें. बुवानीं अर्थ सांगावा, नाथांनीं शंका घ्यावी, तिचें निरसन बुवांनीं करावें अशा प्रकारें पहिला अध्याय संपावयास सहजच मध्यरात्र झाली. अशा रीतीनें अठरा दिवस, गीतेचे अठराही अध्याय, नाथांनीं त्यांजकडून वाचविले व तेवढ्या दिवसांच्या सत्समागमानें बुवांची चित्तवृत्ति एकदम पालटून ते परमार्थसाधनाच्या मार्गास लागले व गंगाबाईवर मनापासून प्रीति करूं लागले. यानंतर एकदोन वर्षांनीं मुक्तेश्वर महाराजांचें जन्म झालें. तें अमक्याच वर्षीं झालें हें सांगतां येणें कठीण आहे, तथापि एकनाथ समाधिस्थ झाले त्यावेळीं मुक्तेश्वर ७–८ वर्षांचे असावेत, असा शोधकांचा तर्क आहे. कविचरित्रांत मुक्तेश्वरांचा जन्मकाल १५३१ हा दिला आहे. त्याच पुस्तकांत मुक्तेश्वर शिवाजी राजाचे वेळीं होते असें लिहिलें आहे. असें सांगतात कीं मुक्तेश्वरांस वाचा नव्हती ती एकनाथस्वामींच्या कृपाप्रसादानें फुटली. ही आख्यायिका जर खरी असेल तर नाथांनीं मराठी भाषेवर व महाराष्ट्र जनांवर हे मोठेच उपकार केले असें ह्मटलें पाहिजे. आईबाप सुशिक्षित असल्यामुळें मुक्तेश्वरांस बालपणीं चांगलें शिक्षण मिळालें व संस्कृत भाषेंतील भारत रामायणासारखे ऐतिहासिक ग्रंथ वाचण्याचा त्यांस नाद लागला.

याच वेळेच्या सुमारास रामीरामदास व रामदास हे जन्म पावले होते असें हनुमंतस्वामीकृत रामदासचरित्रांत लिहिलें आहे. हनुमंतस्वामी ह्मणतात, ‘ रामीरामदास व समर्थ हीं दोन मुलें अनुक्रमें ३ व १ वर्षांचीं झालीं तेव्हां त्यांच्या आईबापानीं त्यांस नाथांच्या दर्शनार्थ पैठणास नेलें. त्यावेळीं, प्रेमानें दोन्ही मुलांचें चुंबन करून नाथ ह्मणाले कीं हीं दोन्ही मुलें ईश्वरांश आहेत. भागवतधर्म वाढवून, महाराष्ट्रांतील लोकांचें लक्ष्य भक्तिमार्गाकडे वळविण्याचें काम जें आजपर्यंत इतर संतांनीं केलें तेंच काम पुढें चालविण्याकरितां हीं बालकें निर्माण झालीं आहेत. आतां आह्मांस आपली संसारयात्रा आटोपण्यास कांहीं हरकत दिसत नाहीं. ’

परंतु ही आख्यायिका खरी नसावी असें वाटतें. कारण रामदासांचा जन्मकाल इ. स. १६०९ (शके १५३१) असून एकनाथांचा निधनकाल इ. स १५९९ (शके १५२१) आहे. अर्थात्, त्या दोन सालांतील अंतर १० वर्षांचें असल्यामुळें वरील आख्यायिका खोटी ठरते. मुक्तेश्वरांचाही जन्मकाल इ. स. १६०९ हाच होता असें रा. भिडे व नवनीतकार ह्मणतात, परंतु त्यास कांहीं आधार नाहीं. मुक्तेश्वरी

ग्रंथांची भाषा रामदासादिकांच्या भाषेपेक्षां किंचित् जुनी दिसते व यावरून रामदासांपेक्षां ते बरेच वडील होते, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. तथापि रामदास शिवाजी व तुकाराम यांशीं मुक्तेश्वर समकालीन होते, ही गोष्ट खरी आहे. आतां मुक्तेश्वर हे पैठणास राहात असल्यामुळें व तत्कालीन इतर संतांच्या गांठी पडण्याचें केंद्रस्थान जें पंढरपूर तें पैठणापासून बरेंच दूर असल्यामुळें मुक्तेश्वरांचा व रामदासादि इतर संतांचा परिचय होता असें निश्चयात्मक लिहितां येणार नाहीं. तथापि मुक्तेश्वरांस तुकाराम व रामदास शिवाजी यांची नावें ऐकूनसुद्धां ठाऊक नव्हतीं, असें ह्मणणें अविचाराचें होईल. शिवाय मुक्तेश्वरांचें बाल्य व तारुण्य जरी पैठणांत गेलें तरी वृद्धापकाळीं ते आपल्या तेरवाड गांवी येऊन राहिले होते व तेथें त्यांचें वृंदावनही आहे. तेरवाडापासून सातारा, चांफळ व पंढरपूर हीं ठिकाणें ५० पासून ६० मैलांच्या अंतरावर आहेत. इतक्या जवळच्या प्रदेशांत राहणाऱ्या रामदास, तुकाराम व शिवाजी यांसारख्या सुप्रसिद्ध पुरुषांची वार्ताही मुक्तेश्वरांच्या कानीं गेली नव्हती, असें घडणें शक्य आहे काय ?

हे विचार सुचावयास कारण, १९०२ सालांतील ग्रंथमालेच्या एका अंकांत, रा. रा. वि. का. राजवाडे यांचा मुक्तेश्वरांवर जो एक लेख प्रसिद्ध झाला आहे त्यांत त्यांनीं " मुक्तेश्वरांस तुकाराम, रामदास व शिवाजी यांच्या संबंधानें कांहींच माहिती नव्हती व त्यावेळीं वरील त्रयीचीं नांवेंही कोणांस फारशीं माहित नसून त्यांची कीर्ति ते परलोकवासी झाल्यावर महाराष्ट्रांत सर्वत्र पसरली " असें जें एक विधान केलें आहे तें होय. हें विधान रा. राजवाडे यांनीं एखाद्या ऐतिहासिक पुराव्याच्या आधारानें मुळींच केलेलें नसून त्यांच्या ती तर्कशक्तीची एक भरारी आहे. ते ह्मणतात " मुक्तेश्वरांस जर रामदासादिकांची माहिती असती तर त्यांनीं आपल्या कवितेंत कोठें तरी त्यांच्या नांवांचा उल्लेख करावयास पाहिजे होता, परंतु तो ज्या अर्थी केलेला नाहीं त्या अर्थी त्यांस त्यांची माहितीच नव्हती असें स्पष्ट लिहिण्यास कांहींच हरकत नाहीं. " वाहवा ! हें तर्कशास्त्र वाखाणण्यासारखें खरें ! वामन पंडितांच्या ग्रंथांत रामदास व शिवाजी यांचीं नावें कोठेंही नाहींत, यावरून पंडित त्या दोघांनां ओळखीतच नव्हते असें जर मीं अनुमान काढिलें तर रा. राजवाडे मला काय ह्मणतील ? समर्थांच्या ग्रंथांत तुकारामाच्या नांवाचा उल्लेख कोठेंही नाहीं एवढ्यावरून त्या दोघांस परस्परांची माहितीही नव्हती असें विधान करणें शहाणपणाचें होईल

काय ? वास्तविक पाहिलें असतां मुक्तेश्वरांस रामदासादिकांची माहिती असलीच पाहिजे एवढेंच नव्हे तर मुक्तेश्वरांनीं आपल्या भारताची रचना शिवाजी महाराजांचा उदयकाल ध्यानांत आणून केलेली असून, त्यावेळीं कोणीतरी राजा आपल्या पराक्रमानें पुढें येत होता, हें, तो ग्रंथ वाचणारांच्या अप्रत्यक्षपणें ध्यानांत आल्यावांचून राहणार नाहीं. एकंदरींत रा. राजवाड्यांचें विधान चुकीचें असावें असें माझ्या अल्पबुद्धीस वाटतें. शिवाय आणखी थोडें राहिलें. रा. राजवाड्यांनीं त्याच लेखांत "मुक्तेश्वरानें सर्व भरतखंडभर प्रवास केला होता, सुप्रसिद्ध पुरुषांच्या भेटी घेतल्या होत्या, व निरनिराळ्या प्रकारचे लोक व त्यांच्या चालीरीति यांची माहिती करून घेतली होती, व त्यांच्या ग्रंथांत इंग्रज, पोर्तुगीज, बर्बर वगैरे परदेशस्थ लोकांचें जें वर्णन आलें आहे तें त्यांच्या वरील प्रवासाचेंच फळ होय" असें ह्मटलें आहे; आतां या विधानाचा आणि पूर्वीच्या विधानाचा मेळ कसा काय घालावयाचा ? ज्यानें सर्व हिंदुस्थानभर फिरून, त्यापासून प्राप्त झालेल्या ज्ञानाचा उपयोग काव्यरचनेकडे केला त्या मुक्तेश्वरास आपल्या शेजारच्या रामदासशिवाजी सारख्या प्रसिद्ध पुरुषांची मुळींच माहिती नव्हती, या कोड्याचा उलगडा करायास फारसा विचार करण्याची आवश्यकता नाहीं. आपण जें काय वर लिहिलें त्यास खालच्या लिहिण्यानें हरताळ लागतो कीं काय, याचा विचार लेखकांनीं विशेषतः रा. राजवाड्यांसारख्या विद्वान् व शोधक लेखकांनीं अवश्य करावयास पाहिजे.

रा. पांगारकर यांनींही, या बाबतींत, रा. राजवाडे यांच्या मताचा अनुवाद केला आहे व यासाठीं, या मुद्द्याचें येथें यथाशक्ति विवेचन करणें भाग आहे. केसरी पत्रांत यासंबंधानें मी एक लेख प्रसिद्ध केला होता, परंतु रा. रा. पांगारकर किंवा रा. राजवाडे यांनीं त्यावर ह्या कालपावेतों, आपलें उत्तर प्रसिद्ध केलेलें नाहीं. अर्थात् माझा लेख त्यांस पसंत पडला असें गृहीत धरून, तो संक्षेपरूपानें येथें उतरून घेतों.

मुक्तेश्वरांचे वंशज हल्लीं तेरवाड गांवीं राहतात, त्यांस या आपल्या पूज्य पूर्वजासंबंधानें कांहींच माहिती नाहीं, यामुळें या विषयासंबंधानें विश्वसनीय माहिती मिळण्याचा मुख्य मार्ग खुंटला. अर्थात्, जुन्या महाराष्ट्र कवींची कविता व अर्वाचीन विद्वानांचे लेख यांच्याच आधारानें पुढील मार्ग आक्रमण करणें भाग आहे. रा. राजवाडे यांनीं ग्रंथमालेंतील आपल्या लेखांत जे चार मुद्दे दिले आहेत, त्यांपैकीं पहिले तीन मुद्दे हे त्यांच्या कल्पनाशक्तीचे खेळ असून,

चाथा मुद्दा मात्र महत्वाचा आहे व तो खोडून काढिल्याशिवाय, या विषयाची दुसरी बाजू पुढें आणितां येत नाहीं. हा मुद्दा असा आहे कीं, रामदासाच्या पुढच्यांतल्या कवींचीं नांवें मुक्तेश्वरी भारतांत नाहींत. तुकारामाचाही नामोल्लेख नाहीं. फक्त ज्ञानेश्वर, एकनाथ व त्यांचे गुरु जनार्दनस्वामी यांचेच केवळ उल्लेख आहेत. तुकोबा, इ. स. १६४९ सालीं स्वर्गस्थ झाले व त्यांची कीर्ति पैठणपर्यंत जाण्या पूर्वीच मुक्तेश्वर आटोपले होते.

वरील मुद्द्यांतील पहिलें विधान खरें आहे. तथापि तेवढ्यावरून मुक्तेश्वरांस रामदास तुकारामाची बिलकूल माहिती नव्हती, असें ह्मणतां येणार नाहीं. कारण मुक्तेश्वरापूर्वी, ज्ञानदेव, मुकुंदराज, नामदेव, शिवकल्याण, माधव, दासोपंत, कृष्ण-याज्ञवल्कि, मधुकर, एकनाथ, रंगनाथ पैठणकर व कृष्णदास मुद्गल हे अकरा महाराष्ट्र कवि चांगले प्रसिद्ध होते. परंतु, त्यापैकीं ज्ञानेश्वर व एकनाथस्वामी यांचाच उल्लेख मुक्तेश्वरानीं आपल्या भारतांत केला असून, इतरांसंबंधानें मौनव्रत धारण केलें आहे. तथापि यावरून, या इतर कवींची मुक्तेश्वरांस माहिती नव्हती, किंवा ते मुक्तेश्वरांपूर्वी होऊन गेलेले नाहींत, असें, रा. राजवाडे किंवा रा. पांगारकर सिद्ध करूं शकतील काय? मला तर असें वाटतें कीं, आपल्यापूर्वी होऊन गेलेल्या सर्व महाराष्ट्रकवींचे ग्रंथ मुक्तेश्वरानें लक्ष्यपूर्वक वाचिले होते व ह्मणूनच, आपल्या भारतांत, द्रौपदीस्वयंवरवर्णनप्रसंगीं, आपल्यापूर्वी भारतावर मराठी ग्रंथ लिहिणाऱ्या कवींवर त्यानें पुढील ताशेरा झाडिला आहे:—

प्राकृत कवींचा वाग्जल्प । तैलकढईंत पाहूनियां रूप ।
फिरतां मत्स्य सकंप । वामनेत्रीं विंधिला ।। ७२ ।।
परी तें मूळ भारतीं नाहीं । ह्मणोनि असो, न बोलों कांहीं ।
नाळिकाछिद्रांतून पाहीं । यंत्र भेदोनि पाडिलें ।। ७३ ।।

आदिपर्व, अध्याय ४१

वरील ओंव्यांतील 'प्राकृत कवींचा वाग्जल्प' या वाक्यावरून, मुक्तेश्वरांपूर्वी ज्यांनीं भारतावर प्राकृत ग्रंथ लिहिले होते असे कोणी तरी कवि होऊन गेले असले पाहिजेत, हें उघड होतें. परंतु हे कवि कोण होते याचा उलगडा कै. ओक व रा. पांगारकर यांस झालेला नाहीं. आतां माधवकृत महाभारत हा ग्रंथ मुक्तेश्वरापूर्वी

लिहिला गेला होता; तसेंच शिवकल्याणाचेंही एक मराठी भारत उपलब्ध आहे व तेंही मुक्तेश्वरी भारतापूर्वी लिहिलेलें आहे. तसेंच कृष्णयाज्ञवल्की व मधुकर यांच्या कथाकल्पतरु ग्रंथांतही पांडवांच्या कथांवर लिहिलेले कांहीं अध्याय आहेत. मुक्तेश्वरापूर्वी महाराष्ट्रांत एकवेळ गाजलेला कवि कृष्णदास मुद्गल याचाही भारतावर एक ग्रंथ असल्याची माहिती मिळते. याशिवाय आणखी कोणी कवि प्रसिद्ध नाहींत. परंतु वरील चारी भारतकवींसंबंधानें मुक्तेश्वरानें आपल्या भारतांत मुळींच उल्लेख केलेला नाहीं. तथापि, एवढ्यावरूनच त्या कवींची त्यास माहिती नव्हती, असें ह्मणणें मूर्खपणाचें होईल. रा. राजवाडे यांचें ह्मणणें असें कीं, तुकाराम इ० १६४९ या सालीं वारला व त्याची कीर्ति पैठणास जाण्यापूर्वींच मुक्तेश्वर आटोपले होते. आतां या विधानाचा विचार करण्यापूर्वी, एक गोष्ट येथें नमूद केली पाहिजे ती ही कीं मुक्तेश्वरी भारताचा रचनाकाल इ. स. १६५० हा होता, असें रा. राजवाडे यांनीं लिहिलें आहे व रा. पांगारकर यांनींही त्यास दुजोरा दिला आहे. मुक्तेश्वरानें आपलें भारत जर इ. स. १६५० या वर्षीं रचिलें तर त्यावेळीं रामदासांचें वय ४५ वर्षांचें होतें व तुकारामबुवांस, स्वर्गस्थ होऊन त्या वेळीं एक वर्ष झालें होतें, अशा स्थितींत, तुकाराम रामदासांसारख्यां महासाधूंची कीर्ति पैठणापर्यंत जाण्यास कित्येक वर्षे लागलीं असतील, असें ह्मणणें ह्मणजे वस्तुस्थितीचा केवळ विपर्यास करणेंच नव्हे तर, रामदास तुकारामाच्या साधुत्वकीर्तीस निष्कारण आकुंचित करण्यासारखें होय. तुकाराम बोवा इ. स. १६४९ या वर्षीं परलोकवासी झाले. व मुक्तेश्वरानें आपलें भारत इ. स. १६५० या वर्षीं लिहिलें, अर्थात् या वर्षापुढें मुक्तेश्वर हयात होता; व इतक्या वर्षांत, रामदास व तुकाराम यांच्या साधुत्वाची कीर्ति, पैठणापर्यंतच्च काय, पण सगळ्या दक्षिणेंत पसरली असली पाहिजे, हें उघड आहे. अस्तु.

मुक्तेश्वरांचें संस्कृत भाषेचें अध्ययन उत्तम प्रकारें झालें होतें व रघुकिरातादि काव्यें व शाकुंतलादि नाटकें यांशींही त्यांचा चांगला परिचय होता असें त्यांच्या ग्रंथांवरून दिसतें. पुढें त्यांस भारत, रामायण व इतर पौराणिक ग्रंथांतील कथाभाग मराठींत आणावा, असें वाटूं लागलें. मुक्तेश्वरांच्या अंगीं कवित्वशक्ति चांगलीच्च होती व तिचा उपयोग त्यांनीं वरील ग्रंथांची मराठी भाषेंत असलेली वाण भरून काढण्याकडे केला. पहिल्यानें त्यांनीं 'नाटक रामायण उर्फ कौतूहल रामायण' हा ग्रंथ

---

मुक्तेश्वरांप्रमाणें या कवीचेंही आडनांव मुद्गल होतें.

लिहिला. हें मुक्तेश्वरांचें पहिलेंच काव्य असल्यामुळें, त्यांत ह्मणण्यासारखी सरसता आलेली नाहीं. तरी पण त्यांतील कांहीं स्थळें फार रमणीय असून केवळ भक्तिरसप्रधान काव्य या दृष्टीनें पाहिल्यास, त्याची योग्यता मोठी आहे, यांत संशय नाहीं. हें काव्य कधीं पूर्ण झालें, याचा उल्लेख मुक्तेश्वरांनीं केलेला नाहीं. या काव्याचे पहिले तीन श्लोक येथें उतरून घेतों.

' श्रीमद्रामपदांबुजे हृदि सदा ध्यातुर्भवाब्धेर्भिया ।
मुक्तेशस्य विराजते सुरुचिरा वाणी गुणग्राहिणी ॥
नाना-नाटक-भाव-पद्यरचना-संदोह सांद्रीकृता ।
सुश्राव्या सुजनैर्मनोहरतरा संसारदुःखापहा ॥ १ ॥

या श्लोकांत मुक्तेश्वरांनीं आपल्या वाणीला जीं विशेषणें दिलीं आहेत, तीं तिला शोभत नाहींत, असें कोण ह्मणेल ?

आपलें लक्ष्य हरिगुणगणवर्णनाकडे कां लागलें हे मुक्तेश्वर खालील श्लोकांत सांगतात.

" संसारार्णविं दुस्तरीं बहु बहू कामादिकीं मोहिलें ॥
दंभोपाधिकनेममायिकसुखा दारा धनें गोंविलें ॥
विद्या-वाद-वितंड-जाल-कलनीं सर्वांस गर्वांथिलें ॥
पद्मावल्लभपाद सूलभ जगीं निर्धारितां मानले ॥ ॥ १ ॥

यावरून, रामायणरचनेच्यावेळीं मुक्तेश्वरांचें वय बरेंच असावें असें वाटतें या नंतर त्यांनीं प्रापंचिकांस खालील उपदेश केला आहे.

" रघुकुळटिळकाचें नाम वाचे वसोंदे ॥
विषय रतिसुखाचा काम जीवीं नसोंदे ॥
मग तुज नलगे ती मुक्तिचिंता कराया ॥
परम गति विमुक्ती आप लागे वराया ॥ १ ॥

या काव्यांत अलंकार व वृत्तवैचित्र्य वगैरे फारशीं नाहींत. फक्त मालिनी व भुजंगप्रयात या दोन वृत्तांचा पहिल्या सहा कांडांत व अनुष्टुब् छंदाचा शेवटच्या उत्तर कांडांत विशेषेंकरून उपयोग केला आहे. क्वचित् स्थळीं शार्दूलविक्रीडित व

स्रग्धरा या वृत्ताचा उपयोग केला आहे. यांतील सीतास्वयंवर, अहल्योद्धार वगैरे कांहीं स्थळें फार चांगली उतरलीं आहेत. परंतु त्यांतील कांहीं वेंचे येथें उतरून घेण्यास स्थलावकाश नाहीं. मुक्तेश्वरांचें आडनांव मुद्गल होतें असें या रामायणांतील एका श्लोकावरून ही दिसतें:—

" सुचिर सहज वासें गौतमीच्या तटाकीं ॥
अतुट भजनपंथें पंथ टाकीत टांकी ॥
द्विजवर कविनामा मुद्गल अतिगोत्री ॥
विमळ वचनमुक्तें लेववी संतश्रोत्रीं ॥ १ ॥

मुक्तेश्वरांचे महाराष्ट्रासंबंधानें खालील उद्गार पहा:—

" महाराष्ट्र जे सर्व राष्ट्रांसि राजे ॥
जयाच्या भयें व्यापिले देव लाजे ॥
सदाचार भंगे पळाली प्रतिष्ठा ॥
प्रतिष्ठान त्या नाभिकारींत श्रेष्ठा ॥ १ ॥

ग्रंथाच्या शेवटीं मुक्तेश्वर विनयपूर्वक ह्मणतात:—

" संकरुण गुरुदर्पी ग्रंथ संपूर्ण झाला ॥
अगणसहित संतीं पाहिजे गोड केला ॥
सुजन समुह शंभू कोटि लिंगें न मौला ॥
परम भणग दीनें वाहिला बेलपाला ॥ १ ॥

खालील श्लोक ग्रंथांतील अगदीं शेवटचा श्लोक असून त्यांत मुक्तेश्वरांनीं आपल्या तीर्थरूपांच्या व आपल्या नांवाचा उल्लेख केला आहे:—

" विश्वंभर श्रीगुरुच्या प्रसादें ॥
आनंद वाचा वदलों विनोदें ॥
भक्तीन मुक्तेश्वर सार बोले ॥
आकर्णितां सज्जन चित्त डोले ॥ १ ॥

मुक्तेश्वरांनीं आपल्या तीर्थरूपांचा आपल्या भारताच्या प्रत्येक अध्यायाचे शेवटीं उल्लेख केला आहे. महाराष्ट्रकवितिलक मोरोपंत यांनीं आपल्या सन्मणीमालेंत या लीलाविश्वंभरांवर पुढील आर्या लिहिली आहे:—

" श्रीलीलाविश्वंभर पदनतिहेतुध्रुवाचि यागाला ॥
स्पर्शे शिष्या यत्कर जेविं हरिहर ध्रुवाचिया गाला ॥ १ ॥

मुक्तेश्वरांनीं, प्रख्यात सत्पुरुष ज्ञानदेव यांजसंबंधानें आपली पूज्यबुद्धि, ताच्या आरंभींच्या खालील ओवींत व्यक्त केली आहे:—

" प्राकृत कवीश्वराचार्य ॥ ज्ञानदेव ज्ञानैकवर्य ॥
जयाचे बुद्धीचें गांभीर्य ॥ अगाध सिंधूसारिखें ॥

या शिवाय ज्ञानदेवांवर त्यांनीं एक आरति लिहिली आहे ती अशी:—

" इंद्रायणिचे तटीं धरिला रहिवास ॥
विश्व तारावया लक्ष्मीनिवास ॥
ज्ञानेश्वररूपें धरिला निजवेष ॥
वर्म जाणे तया सद्गुरु उपदेश ॥ १ ॥

जयदेव जयदेव जय ज्ञानदेवा ॥
जीवा शिवा आदि परब्रह्मठेवा ॥ ध्रु० ॥

कृष्ण एकादशी कार्तिक मासीं ॥
आपण पंढरिनाथ सनकादिकांसीं ॥
यात्रेलागीं येती स्वानंदराशी ॥
दर्शन घडे तयां निजमुक्ति देशीं ॥ २ ॥

महिषीपुत्र केला वाचक वेदांचा ॥
प्रतिष्ठानीं गर्व हरिला विप्रांचा ॥
विशेष अर्थ केला भगवद्गीतेचा ॥
अजान वृक्ष पिंपळ शोभे कनकाचा ॥ ३ ॥

सकळ सिद्धगणांमाजी तूं श्रेष्ठ ॥
ज्ञानदेवीं अनुभव ज्ञान वरिष्ठ ॥
अनुताप ज्याचा विश्व घनदाट ॥
मुक्तेश्वरीं न धरवे प्रेमाचा लोट ॥ ४ ॥

एकनाथस्वामी हे तर त्यांचे आजोबाच होते. त्यांचा उल्लेख त्यांनीं आपल्या महाभारतांत कांहीं ठिकाणीं केला आहे. मुक्तेश्वरांचें एकनाथस्वामीवर एक सुरस पद एका जुन्या दप्तरांत मिळालें. तें अद्याप कोणीही छापिलें नसल्यामुळें त्याचा येथें समावेश करितों:—

पद.

भजा भजा हो माझ्या एकनाथासी ॥
त्रिकाळीं श्रीदत्तात्रय दर्शन ज्यासी ॥ ध्रु० ॥
एकनाथा शरण जातां चुके भवभय ॥
एका वांचुनि न दिसे कांहीं अवघें अद्वय ॥
एका भावें भजतां त्यासी लाधे निजसोय ॥
एवढा महिमा ज्याचा वाचे वर्णितां नये ॥ १ ॥
करुणेचा अवतार तोहा विश्वतारक ॥
कळेना स्वामींचें सहजीं सहज कौतुक ॥
कर्ज फेडी त्याचे घरिंचें कमळानायक ॥
करी देव दास्य ज्याचें आज्ञाधारक ॥ २ ॥
नाम एकोबाचें गोड आवडे मना ॥
नामामृत सेवितां भेटी झाली चिद्धना ॥
नावडे आणिक कांहीं मज त्याविना ॥
नाठवे देहभान प्रेमें करितां कीर्तना ॥ ३ ॥
थर थर कांपे काळ स्वामी स्मरतां समर्थ ॥
थक्कित होऊनि जन बहु हर्षें पाहति परमार्थ ॥
थकलें चित्त माझें पुरले मनिंचे मनोरथ ॥
थै थै नाचत मुक्तेश्वर ह्मणे झालों कृतार्थ ॥ ४ ॥

हें पद फार भक्तिपूर्वक लिहिलेलें असून त्यांत एकनाथ या नांवावर यमक साधिलें आहे. प्रत्येक चरणाचीं आद्याक्षरें व अंत्याक्षरें वाचिल्यास “ एकनाथ ” हें नांव येतें. पदाच्या शेवटच्या चरणावरून मुक्तेश्वर हे प्रेमळ भक्त होते असें वाटतें. एकनाथांच्या स्तुतीनें आपण कृतार्थ झालों असें मुक्तेश्वरांस वाटलें हें योग्यच होय, कारण सत्पुरुषांच्या नामस्मरणानें कोण कृतार्थ होणार नाहीं ?

आणखी असेंच एक सुरस पद शंकरावर असून तेंही अद्याप अप्रसिद्ध आहे. पद लहानच परंतु अर्थगांभिर्यानें युक्त व प्रासादिक असल्यामुळें तें वाचकांकरितां येथें देतों:—

पद.

पवित्र शीतळ जळ माथां मंदाकिनी ।
कंठीं धरियला वन्ही नवल काय ? ॥ ध्रु० ॥

गरुडारूढ मधुसूदन । हृदयीं वसिजे पूर्ण ।
कंठीं सर्पाभरण । नवल काय ? ॥ १ ॥

सिंहावरी ओळंगत । अंकीं गिरिजा स्वस्थ ।
मारिला कुंजर दैत्य । नवल काय ? ॥ २ ॥

अहो लीलाविश्वंभरा । कृपामूर्ति जगदोद्धारा ।
तारिसी मुक्तेश्वरा । नवल काय ? ॥ ३ ॥

मुक्तेश्वरांनीं रामायणानंतर, महाभारत, भागवत व अग्निपुराणांतील हरिश्चंद्राख्यान हे तीन ओंविबद्ध ग्रंथ रचिले. त्यांपैकीं महाभारताचीं आदि, सभा, वन, विराट, सौप्तिक व शांति हीं सहा पर्वें मात्र आज उपलब्ध आहेत. पहिलीं चार सर्वत्र सुप्रसिद्ध असून तीं व सौप्तिकपर्व छापून प्रसिद्ध झालेलीं आहेत. शांतिपर्व अद्याप अप्रसिद्ध आहे. बाकी १२ पर्वें अद्याप अनुपलब्ध आहेत, परंतु तीं शोधकांच्या प्रयत्नांनीं लवकरच उपलब्ध होतील अशी आशा आहे. हाकालपर्यंत, मुक्तेश्वरांनीं फक्त भारताचीं पहिलीं चार पर्वें लिहिलीं असावीं व नंतर ते समाधिस्थ झाले असावे असा जो निबंधमालाकारांचा तर्क व इतर जनांचा समज होता तो खोटा होता, असें स्पष्टपणें लिहिण्यास आतां पुष्कळच बळकट पुरावा आहे. मुक्तेश्वरांचा " शतमुखरावणाख्यान " या नांवाचा जो एक ग्रंथ असल्याविषयीं नवनीतांत व कविचरित्रांत लिहिलें आहे तो स्वतंत्र ग्रंथ नसून भारताच्या शांतिपर्वाचाच एक भाग आहे असें समजतें.* याशिवाय मुक्तेश्वरी समश्लोकी भगवद्गीता व अलीकडे उपलब्ध झालेलीं " मूर्खांचीं लक्षणें " व " शुकरंभाचरित्र " हीं तीन्ही प्रकरणें स्वतंत्र नसून मुक्तेश्वरांच्या महाभारतांतील भीष्म, उद्योग व शांति या पर्वांचे ते भाग

आहेत. एकंदरींत मुक्तेश्वरांचें संपूर्ण महाभारत मराठींत आहे, या संबंधानें आतां वाद असण्याचें कांहीं कारण उरलें नाहीं.

मुक्तेश्वरांनीं नुसतें भारतच लिहिलें होतें असें नाहीं, तर हरिवंशसुद्धां लिहिला होता, किंवा निदान तो लिहिण्याचा त्यांचा इरादा तरी होता, यास त्यांच्याच ओंदि-पर्वांत थोडासा पुरावा आहे. आपण लिहीत असलेल्या भारतांत पुढें काय काय येणार या विषयीं लिहितांना, पहिल्यानें भारताच्या अठराही पर्वांचीं नांवें देऊन, नंतर मुक्तेश्वर ह्मणतात:—

" तेंही हरिवंशासहित । सपादलक्ष महाभारत ॥
माजी आख्यानें अतिअद्भुत ॥ सनत्सुजात गीतादि ॥ ११९ ॥

मुक्तेश्वरी महाभारत,
आदिपर्व अ० १.

या एकाच ओंवीवरून मुक्तेश्वरांनीं हरिवंश रचिला असून हल्लीं मिळालेलें " गरुडगर्वपरिहाराख्यान " हें या हरिवंशांतील एखादें फुटकळ प्रकरण असावें असा बळकट संशय येतो. मुक्तेश्वरांनीं भागवतही लिहिलें आहे, तेव्हां कदाचित् " गरुडगर्वपरिहाराख्यान " भागवतांतही असूं शकेल. मुक्तेश्वरांनीं ज्या मूळ संस्कृत भारतावरून आपलें मराठी भारत लिहिलें, त्यांत आणि सांप्रत प्रसिद्ध असलेल्या संस्कृत महाभारतांत कथाभागासंबंधानें बऱ्याच ठिकाणीं भिन्नत्व आहे.

मुक्तेश्वरी भागवत आज उपलब्ध नाहीं. नवनीतांत व कविचरित्रांत मुक्तेश्वरी ग्रंथांच्या यादींत " भागवत " दिलें आहे, परंतु तें त्या दोन्ही ग्रंथांच्या कर्त्यांनीं पाहिलें होतें कीं काय, हें समजत नाहीं. कविचरित्रकार ह्मणतात:—" तसाच भागवतावर मराठी भाषेंत ओंवीबद्ध त्यांचा एक फार सुंदर आणि रसभरित असा मोठा ग्रंथ आहे. " यावरून कविचरित्रकारांनीं तो ग्रंथ पाहिला होता, असें दिसतें.

*मुक्तेश्वरांच्या संस्थानचे कारकून रा. रा. गणेश बाबाजी माळगांवकर यांस या शांतिपर्वाची एक प्रत मिळाली आहे. हें पर्व बरेंच मोठें असून त्यांत हें ' शतमुखरावणाख्यान ' आहे. रा. माळगांवकर हे मुक्तेश्वरांचें विस्तृत चरित्र लिहिणार आहेत, असें समजतें.

कै. ओकांनीं हा ग्रंथ मिळविण्याविषयीं बहुत खटपट केली, परंतु यश आलें नाहीं. फक्त पंढरपुराजवळ एका गृहस्थापाशीं हा ग्रंथ असल्याचें समजतें. हा ग्रंथ उपलब्ध झाल्यास महाराष्ट्रवाङ्मयभांडागारांत कोहिनुरासारख्या एका हिऱ्याची भर पडली असें होईल, यांत संशय नाहीं.

हरिश्चंद्राख्यान हा ग्रंथ काव्येतिहाससंग्रहांतून प्रसिद्ध झालेला असून शिवाय त्यांतील बराच भाग नवनीतांतही दिलेला आहे. एकंदरींत भारत, रामायण, भागवत, हरिश्चंद्राख्यान व कांहीं फुटकळ पदें व आरत्या एवढी कविता मुक्तेश्वरांनीं लिहिली आहे. याशिवाय ' भविष्योत्तर पुराणावर त्यांचा एक ओंवीबद्ध ग्रंथ आहे, ' अशी माहिती अलीकडे बाहेर आली आहे ( केसरी, वर्ष २४ अंक २१ पहा. ). याशिवाय त्यांनीं दुसरे कांहीं ग्रंथ लिहिले असल्यास निदान आज तरी त्यांच्यासंबंधानें येथें कांहीं माहिती देतां येणें अशक्य आहे. एकंदरींत मुक्तेश्वरांनीं आपल्या रसाळ व प्रासादिक वाणीचा मराठी वाङ्मयाच्या वृद्धीकडे चांगलाच उपयोग केला, यांत संशय नाहीं.

मुक्तेश्वरांची कविता प्रासादिक, प्रौढ, रसाळ व सृष्टिसौंदर्यवर्णनयुक्त असून नाना प्रकारचे अलंकार व रस तींत ठिकठिकाणीं आहेत. कविचरित्रकारांनीं मुक्तेश्वरांच्या कवितेवर दिलेला अभिप्राय येथें नमूद करितों:—" मुक्तेश्वराप्रमाणें रसाळ ओंव्या कोणत्याही कवीच्या नाहींत. त्यानें आपल्या कवितेमध्यें शृंगार, वीर आणि करुणा हे रस चांगले साधले आहेत. उपमा, उत्प्रेक्षा, दृष्टांत इत्यादि अर्थालंकार हे त्याच्या कवितेंत फार सांपडतात. त्याचें वर्णन प्रौढ असून चमत्कारिक आहे, त्याच्या वाणींत मार्दव आणि माधुर्य हे गुण विशेष असून ती प्रासादिक आहे, असें लोक मानतात." मुक्तेश्वरी कवितेसंबंधानें लिहितांना कै. वामन दाजी ओक या विद्वान व रसिक गृहस्थांनीं काव्यसंग्रहांत ह्मटलें आहे " नूतन व उदात्त विचारांमुळें मुक्तेश्वराच्या काव्याला विशेष शोभा आली आहे; व शब्दचमत्कारापेक्षां अर्थमाधुर्याकडे लक्ष्य देणाऱ्या सर्व विद्वानांना मुक्तेश्वराचीं काव्यें विशेष आवडतील यांत संशय नाहीं. कविला आवश्यक जें पूर्ण व्यवहारावलोकन त्यांत इतरांपेक्षां मुक्तेश्वर श्रेष्ठ होता, असें ह्मणावें लागतें. "

महाराष्ट्र वाङ्मयांत सगळ्यांत श्रेष्ठ कवि कोण हा एक वाद आज बरेच दिवस महाराष्ट्र कवींच्या अभिमानी वाचकांत प्रचलित आहे. वस्तुतः पहातां हा वाद करणें एका दृष्टीनें निरर्थक होय. कोणत्याही लेखास ' काव्य ' हें अभिधान देण्यास

त्या लेखांत कोणकोणचे गुण अवश्य आहेत, याबद्दल एकवाक्यता अद्यापि झालेली नाहीं आणि पुढें कधीं होईल हेंही संभवनीय नाहीं. वाचकांच्या अभिरुचीवर कोण्याही कवीचें काव्य 'हृदयाल्हादक' आहे कीं नाहीं हें अवलंबून असावयाचें; आणि वाचकांची अभिरुचि ही त्यांच्या शिक्षणावर व परिस्थितीवर अवलंबून असावयाची. ज्याप्रमाणें उत्कृष्ट अन्नाच्या परिपोषक षड्सांपैकीं कोणचा रस श्रेष्ठ हें ठरविणें अशक्य, त्याचप्रमाणें उत्कृष्ट काव्याच्या परिपोषक नवरसांपैकीं अमुक एक रस श्रेष्ठ हें ठरविणेंही अशक्य आहे. तथापि एवढी गोष्ट खरी कीं ह्या रसांचें सुद्धां मिश्रण बनून तें रसिकांपुढें आलें असतां त्यांच्या आत्म्यास एकदम आल्हाद होतो. हा आल्हाद होण्यास विशेष कारण काय ह्मणून शोध करतां तें मात्र सांगतां येत नाहीं, साधारण कारणें सांगतां येतात; तशीच गोष्ट काव्यांची आहे. कोणत्याही प्रतिभावान् कवीचें काव्य वाचलें असतां सर्व रसिकांस आनंद होतो. परंतु अमुक एक विवक्षित कवि इतर सर्वांहून श्रेष्ठ हें ठरविण्यांत ज्याची त्याची विशेष रुचीच कारण होय. मराठी कवींत श्रेष्ठ कोण, या प्रश्नाचा खल करितां करितां मुक्तेश्वर श्रेष्ठ कीं मोरोपंत श्रेष्ठ हा प्रश्न अखेर उत्पन्न होतो, या दोहोंपैकीं एक कोणी तरी श्रेष्ठ आहे अशा बद्दल जणूं काय सर्वांची एकवाक्यता झालेलीच आहे, आणि ती तशी झालेली आहे, असें धरून चालावयाचें तर या वादाचा निकाल, माझ्या मतें मुक्तेश्वराला श्रेष्ठता देऊनच होणार. आपण सहज बागेंत हिंडावयास गेलों असतां एकदम दोन फुलें आपल्या नजरेस पडलीं. एक आपल्या सुंदर रंगानें आपल्या दृष्टीला वेधून घेणारें आणि दुसरें आपल्या घ्राणेंद्रियास आनंद देणारें. या दोन फुलांपैकीं श्रेष्ठ कोणचें असें ह्मटलें तर सुगंधपूर्ण तेंच श्रेष्ठ, असें उत्तर चटकन् जिभेवर उभें राहील; असें होण्याचें जें कारण तेंच मोरोपंताच्या काव्यापेक्षां मुक्तेश्वराचें काव्य श्रेष्ठ असें ह्मणण्यास कारण होय. पदलालित्यादि गुण काव्यास आल्हादक करण्यास साधन होत, परंतु काव्यसर्वस्व त्यांत नाहीं. ज्याप्रमाणें सुंदर रंग, सुंदर आकृति, इत्यादि गुण अप्रत्यक्ष रीतीनें मनास आल्हाद देतात, सुगंधाप्रमाणें एकदम अंतःकरणाला भिडत नाहींत, त्याचप्रमाणें पदलालित्य, अनुप्रास, यमक, अलंकार हे अप्रत्यक्ष रीतीनें आल्हाद देणारे होत. सुवर्णस्थालींत वाढलेलें अन्न उत्तम रीतीनें बनलेलें नसलें तर मनास आल्हाद काय होणार ! तीच स्थिति मोरोपंतांच्या काव्याची होय. त्यांच्या कवितेचा बाहेरचा उठाव फार उत्तम. परंतु जो कांहीं अंतस्थ रसपरिपाक, तो मुक्तेश्वराच्या रसपीरपाकाइतका आल्हादकारक नाहीं. या ह्मणण्याचा अर्थ मोरोपंतांचा रसपरि-

नाक गचाळ, असें मात्र कोणीं समजूं नये. दोन उत्तम पाकनिष्पादकांच्या रस-परिपाकांत श्रेष्ठता ठरवितांना एकास श्रेष्ठ ठरविल्यानें दुसऱ्यास विशेष प्रकारें न्यूनत्व येतें, असें नाहीं, त्याचप्रमाणें हेंही आहे. मुक्तेश्वर व मोरोपंत दोघेही उत्तम कवि, परंतु त्या दोघांत श्रेष्ठता कोणाकडे येते हें ठरविणें झाल्यास ती मुक्तेश्वराकडेच येते, एवढेंच माझें म्हणणें आहे.

आतां, ज्या कित्येक विद्वानांनीं या दोन कवींची तुलना करून मुक्तेश्वरांस कनिष्ठ ठरविण्याचा प्रयत्न केला आहे; त्यांच्या मुद्द्यांचा विचार करूं.

मुक्तेश्वराची इतर महाराष्ट्र कवींशीं तुलना करावयाची झाल्यास, वामनपंडित व मोरोपंत हे दोन कवि शिवायकरून, बाकी कोणताही कवि त्याच्याशीं कोणत्याही बाबतींत आपली बरोबरी करण्यास केवळ असमर्थ आहे. ज्ञानदेव, मुकुंदराज, नाम-देव, एकनाथ, तुकाराम, रामदास, मोहिरोबा, जयराम व रंगनाथ हे प्रमुख मराठी कवि मोठे भगवद्भक्त व साधु असल्यामुळें, मुक्तेश्वराची त्यांच्याशीं तुलना करणें मुळींच योग्य होणार नाहीं. तथापि वामन, मोरोपंत, रघुनाथपंडित, आनंदतनय, विठ्ठल, कृष्णदासमुद्गल, अनंत, काशीकवि, श्रीधर व रामजोशी या कवींशीं मात्र त्याची तुलना करून पाहणें अप्रशस्त होणार नाहीं. व कोणत्याही निःपक्षपाती मनुष्यानें अशी तुलना करून पाहिल्यास, मुक्तेश्वर हा इतर सर्व कवींपेक्षां सर्व गुणांनीं श्रेष्ठ आहे, हें त्यास प्रांजळपणें कबूल करावें लागेल. प्रो. श्रीधर विष्णु परांजपे बी. ए. यांनीं, केकावलीवरील आपल्या टीकाग्रंथांत, जें मोरोपंतांचें संक्षिप्त चरित्र दिलें आहे, त्यांत त्यांनीं मुक्तेश्वर व मोरोपंत यांची तुलना करण्याचा प्रयत्न केला आहे. रा. परांजपे म्हणतातः 'मुक्तेश्वराची वाणी मोरोपंताच्या वाणीपेक्षां अधिक प्रासादिक आहे. काव्यास अत्यावश्यक जी सहृदयता ती पंतांपेक्षां मुक्तेश्वरांत जास्त होती. म्हणूनच माधुर्य व प्रसाद या गुणांत मुक्तेश्वर दोघांत श्रेष्ठ ठरतो. त्यास शृंगारादि सर्व रस उत्कृष्ट साधले असून त्याच्या वाणींत मार्दव फार आहे. त्याची वर्णन करण्याची हातोटी इतकी खुबीदार व मनमोहक आहे कीं, वाचकां-पुढें ते ते प्रसंग प्रत्यक्ष दिसून ते कांहींवेळ पर्यंत आपलें स्वत्व विसरतात. अति-शयोक्ति व सृष्टिसौंदर्यवर्णन ह्या गोष्टींत त्याचा हात धरणारा महाराष्ट्र

कवींत ( दुसरा ) क्वचित् सांपडेल. त्यांनीं महाभारताचीं पहिलीं चार *पर्वें केलीं असून पंतांच्या अठराही पर्वांवर आर्या आहेत. या दोघां कवींच्या पहिल्या चार पर्वांपुरती तुलना केल्यास मोरोपंतापेक्षां मुक्तेश्वराच्या काव्यांत ईश्वरी प्रसाद जास्त दृष्टीस पडून त्यांची काव्यप्रतिभा तप्तसुवर्णप्रतिभेप्रमाणें सर्वत्र उज्ज्वल दिसते. मुक्तेश्वरांचीं भारताचीं चार पर्वें उत्कृष्ट साधलीं असून आदिपर्व तर सर्वोत्कृष्ट आहे. भारतांत पुष्कळ ठिकाणीं त्यांनीं आपल्या पदरच्या कल्पना व मूळांत ज्यांचा मागमूसही नाहीं अशीं अपूर्व वर्णनें रचिलीं आहेत, तीं फारच गोड अतएव रसिकांस तल्लीन करून टाकणारीं आहेत. ह्मणूनच पंतांनीं सन्मणिमालेंत मुक्तेश्वराविषयीं लिहितांना पुढीलप्रमाणें आनंदोद्गार काढिले आहेत:—

श्री मुक्तेश्वर कविवर यातें कोण न शुभेच्छु वंदील ? ।
वंदी लक्ष जयाचे, ज्याचें यश भव्य जेविं मंदील ॥ ३२ ॥

मुक्तेश्वराची भाषा साधी, गोड व सरळ आहे. पंतांची ऐटदार, पांचांपेंचांनीं भरलेली व खुबीदार अशी आहे. पंतांपेक्षां मुक्तेश्वर अधिक सात्विक व भावार्थी दिसतो. प्रास, यमक, श्लेष इत्यादि शब्दालंकार मुक्तेश्वराच्या काव्यापेक्षां पंताच्या काव्यांत पुष्कळच अधिक आहेत, ह्मणून त्याचें काव्य समजावयास साधारणपणें कठिण आहे. मुक्तेश्वराची भाषा साधी व सोपी असल्यामुळें त्याचें काव्य वाचकांस समजण्यास सुलभ जातें; व ह्मणूनच तें लोकादरास जास्त पात्र झालें आहे. जरा निराळ्या तऱ्हेनें ह्मणावयाचें ह्मणजे मुक्तेश्वराचें काव्य द्राक्षापाकाच्या वर्गांत मोडणारें असून पंताचें काव्य नारिकेलपाकाच्या वर्गांत मोडेल. दोघांचींही काव्यें रुचिपरत्वें लोकांस कमीजास्ती आवडतील, तरी मुक्तेश्वराच्या काव्याचा रसास्वाद सुलभ रीतीनें मिळण्याजोगा असल्यामुळें तिकडेच बहुजनसमूहाची प्रवृत्ति झाल्यास त्यांत नवल नाहीं. परंतु मांडवावर पक्व व मधुर द्राक्षांचे घड लोंबत असले तरी माडावर चढून नारळ काढण्याचे परिश्रम ज्यास करतां येत असतील असे लोक जसे ते नारळ सोलून फोडण्याचे श्रम पत्करून नारळांतलि पाणी व खोबरें खाण्यांत आनंद मान-

* हल्लीं मुक्तेश्वराचीं सौप्तिक व शांति, हीं दोन पर्वें उपलब्ध झालीं असून, तीं ही फार उत्कृष्ट व हृदयंगम आहेत.

तात तद्वत् संस्कृत शब्दांचा ज्यांस परिचय असून समासांची मोडणी व मोरोपंताची पद्धति थोडीशी तरी ठाऊक असेल, अशा लोकांस पंताच्या काव्यवाचनापासून निःसंशय मोठा आनंद होईल. खेड्यांतल्या श्रीमंत पाटलाची शहाणी आणि भावार्थी बायको, आणि शहरांतल्या साधारण कारकुनाची हुशार आणि पक्की वस्ताद बायको ह्यांच्या मध्यें जें अंतर असतें, तें मुक्तेश्वर आणि मोरोपंत ह्यांच्या काव्यांत दिसून येतें.' असा एका मार्मिक टीकाकारांनीं अभिप्राय दिला आहे, त्यांत पुष्कळ तथ्य आहे. ओवी छंदांत जशी मुक्तेश्वराला उत्कृष्ट कविता करितां येत होती, तशी श्लोक वृत्तांत करितां येत नसे. मुक्तेश्वरानें श्लोकवृत्तांत रामायण रचिलें आहे. त्यांत ओवी छंदांत प्रसन्न व प्रफुल्लित दिसणारी त्यांची कवित्वस्फूर्ति या बिकट छंदोबंधनांत सांपडल्यामुळें कीं काय अत्यंत म्लान झालेली दिसते. त्यांत ऱ्हस्व दीर्घादि चुक्या, यमकास्तव शब्दांची ओढाताण, यतिभंगादि इतर छंदःशास्त्रीय व व्याकरणांतील दोष बरेच आढळत असून तें बऱ्याच ठिकाणीं दुर्बोधही झालें आहे. याच कारणास्तव हें काव्य बरेंच नीरस वाटतें. मोरोपंताचा असा प्रकार नाहीं. त्यांना आर्या जशा उत्कृष्ट रचितां येत असत, जवळ जवळ तितक्याच चांगल्या तऱ्हेनें त्यांना भिन्न भिन्न वृत्तांतील श्लोक, अभंग व ओव्या रचितां येत असत. पंतांच्या वाग्देवीला अनेक वृत्तरूपानें व अनेक बंधनें संभाळून प्रगट होण्याची विलक्षण कसरत साध्य झाली असल्यामुळें व लांब लांब संस्कृत समासाच्या बळावर वाटेल तसें आपलें अंग चोरावयास सांपडत असल्यामुळें कोणत्याही विषयावर कोणत्याही वृत्तांत काव्य रचणें हें त्यांना हत्तीला आपल्या शुंडादंडावर माळ झेलण्याप्रमाणेंच सोपें वाटत असे. अशा रीतीनें अनेक वृत्तांत पंतांनीं प्रौढ, सुरस व विस्तृत काव्यरचना केली असल्यामुळें मुक्तेश्वरांतील व त्यांच्यांतील कवित्वासंबंधीं अंतर अगदीं कमी होऊन बरोबरी होते; व महाराष्ट्र काव्यवधू आमच्या कविकुलगुरूचे अनेक गुण पाहून त्यांना माळ घालण्यास सज्ज होते." प्रो. परांजपे यांनीं ही तुलना बऱ्याच मार्मिकपणानें व निःपक्षपातित्वानें केली आहे, यांत संदेह नाहीं. परंतु त्यांनीं पतकरिलेल्या वकिली बाण्यामुळें त्यांच्या तुलनायंत्राचा कांटा मोरोपंतांच्या बाजूकडे बराच झुकलेला दिसतो. वरील उताऱ्यांतील 'श्रीमुक्तेश्वर कविवर' या आर्येपर्यंत, रा. परांजपे यांनीं मुक्तेश्वरासंबंधानें जे उद्गार काढिले आहेत ते त्यांचे सहज अतएव वास्तविक उद्गार असून, त्यावरून, मुक्तेश्वर हा मोरोपंतापेक्षांच काय, पण सर्व मराठी कवींपेक्षां, कवित्व गुणांनीं सर्व प्रकारें श्रेष्ठ ठरतो. परंतु पुढें पंतांशीं संबंध येतांच रा० परांजपे त्यास एकीकडे ठेवून, महाराष्ट्र

काव्यवधूची माळ निःशंकपणें मोरोपंतांच्या गळयांत अडकवितात ! रा० परांजप्यांचा हा अतिप्रसंग पाहून, बिचाऱ्या मोरोपंतांस, स्वर्गलोकींसुद्धां लाज वाटण्याचा संभव आहे. कारण त्यांनीं मुक्तेश्वरास 'कविवर' ही जी पदवी दिली आहे, ती, आज रा. परांजप्यांनीं, त्यांच्या अपरोक्ष व इच्छेविरुद्ध, मुक्तेश्वराकडून हिसकून घेऊन, पुनः पंतांवर लादण्याचा प्रयत्न केला आहे. मुक्तेश्वराचें काव्य द्राक्षापाकाच्या वर्गांत मोडेल व पंतांचें काव्य नारिकेलपाकाच्या वर्गांत मोडेल, असें रा० परांजपे यांनीं जें म्हटलें आहे तें खरें आहे. परंतु, 'संस्कृत शब्दांचा ज्यांस परिचय असून समासांची मांडणी थोडीशी तरी ठाऊक असेल अशा लोकांस पंतांच्या काव्यवाचनापासून निःसंशय मोठा आनंद होईल' हें त्यांचें विधान मात्र माझ्या अल्पबुध्दीस विसंगतपणाचें वाटतें. कारण, कै० कृष्णशास्त्री चिपळूणकरांसारख्या प्रतिबृहस्पतीस पंतांचें काव्य कितपत प्रिय होतें, हें सर्वांस माहित आहे. इतकेंच नव्हे, तर निबंधमालाकारांसारख्या कडव्या लेखकानें जर मोरोपंतांची वकिली पतकरून त्यांच्या कवित्वाची तरफदारी करण्याचा प्रयत्न केला नसता, तर आजसुद्धां, मोरोपंतांस 'चित्रकवि' यापेक्षां अधिक योग्यतेचें स्थान प्राप्त झालें असतें कीं नाहीं याचाच संशय आहे. मोरोपंतांच्या आर्या लोकप्रिय व्हाव्या, एतदर्थ रामजोशीबुवांस कीर्तनांतून त्यांचा उपयोग करावा लागला व मोरोपंतांच्या कवित्वगुणाची प्रसिद्धी करण्याकरितां कै. विष्णुशास्त्र्यांस आपल्या मालेचीं शंभरांपेक्षां अधिक पृष्ठें अडवावीं लागलीं परंतु मुक्तेश्वरी काव्याची अशी स्थिति नाहीं. तें अस्तित्वांत आलें त्या वेळीं तें जितकें लोकप्रिय होतें, तितकेंच, किंबहुना त्याहून जास्त, तें आजही लोकप्रिय आहे. 'ओंवी छंदांत जशी मुक्तेश्वराला उत्कृष्ट कविता करितां येत होती, तशी श्लोकवृत्तांत करितां येत नसे. मोरोपंतांचा असा प्रकार नाहीं. त्यांना आर्या जशा उत्कृष्ट रचितां येत असत, जवळ जवळ तितक्याच चांगल्या रीतीनें त्यांना इतर वृत्तेंही रचितां येत असत.' असें रा. परांजपे ह्मणतात, व तें कांहीं अशीं खरें आहे. परंतु तेवढ्यावरून फार तर इतकेंच ह्मणतां येईल कीं वृत्त व साहित्यशास्त्रांत मोरोपंत जितका निपुण होता, तितका मुक्तेश्वर नव्हता. परंतु येथें एका गोष्टीचा विचार होणें अवश्य आहे, ती गोष्ट ही कीं, मुक्तेश्वराच्या वेळची मराठी भाषेची परिस्थिति काव्यरचनेस जितकी अनुकूल असावयास पाहिजे होती, तितकी नव्हती. उलटपक्षीं मोरोपंतास ही भाषापरिस्थिति उत्तम प्रकारें अनुकूल असतांही, चित्रकाव्यरचनेच्या नादीं लागून, वाजवीपेक्षां अधिक संस्कृत शब्दांचा उपयोग करून, त्यानें आपल्या काव्यास जें क्लिष्टत्व आणिलें आहे,

त्याबद्दल तो एकप्रकारें दोषपात्र ठरतो. तसेंच मोरोपंतांच्या आर्यांत, विशेषतः त्यांच्या कर्णपर्वांतील आर्यांत जें माधुर्य आणि सरसत्व आहे, तें त्यांच्या इतर कवितेंत नाहीं. मोरोपंतानें श्लोकबद्ध, अभंगबद्ध व ओंवीबद्ध ग्रंथरचना केली आहे, परंतु वामनाच्या श्लोकापुढें त्याचे श्लोक, रामदासतुकारामाच्या अभंगांपुढें त्याचे अभंग व मुक्तेश्वराच्या ओंव्यांपुढें त्याच्या ओंव्या फारशा सुंदर दिसत नाहींत व यामुळेंच ‘सुश्लोक वामनाचा अभंग वाणी प्रसिद्ध तुकयाची। ओंवी मुक्तेशाची ( ज्ञानेशाची ) किंवा आर्या मयूरपंतांची ॥' ही सिद्धांतरूप आर्या मोरोपंतांचें स्तुतिस्तोत्र गाणाऱ्या रामचंद्र वहवे या रसिक गृहस्थांनीं रचून ठेविली आहे. वास्तविक पाहतां, खरी कविता म्हटली म्हणजे ती अभिसारिकेसारखी स्वैरसंचारी असली पाहिजे,* तरच तिचें खरें सौंदर्य दृग्गोचर होऊन रसिकांच्या चित्तवृत्ति वेधावून टाकणार. परंतु तिला जर चित्रकाव्यरूपी सुवर्णपंजरांत कोंडून ठेवून तिची वेळीं अवेळीं स्वतःच्या चैनीखातर हवी तशी ओढाताण केली, तर तिच्या स्वैरवृत्तींतील समागमसुखाच्या एक शतांशही प्राप्त होणें कठीण आहे, हें प्रत्येक कवीनें लक्ष्यांत ठेविलें पाहिजे. आंग्ल कवि मिल्टन याच्या जगत्प्रसिद्ध ‘प्यारडाईज लॉस्ट' या काव्यांत यमकचमत्कार नाहींत व पोपच्या ‘इलियड' मध्यें त्यांचें प्राचुर्य आहे, किंबहुना पोप कवीनेंच, इंग्रजी भाषेत यमकालंकार पहिल्यानें अस्तित्वांत आणिले, एवढ्या वरूनच मिल्टनपेक्षां पोप असा श्रेष्ठ ठरत नाहीं, तसा मुक्तेश्वरापेक्षां केवळ यमकचमत्कारामुळेंच मोरोपंतही श्रेष्ठ ठरत नाहीं. शिवाय दुसरें असें कीं, ईश्वरी प्रसाद, सहृदयता, स्वतंत्र विचार, सृष्टिसौंदर्यवर्णन, उत्कृष्ट रसपरिपाक, माधुर्य, मार्दव, सुर्वोदार व मनमोहक वर्णनाची हातोटी, ते ते प्रसंग प्रत्यक्ष दाखविणारी वर्णनचातुरता व तप्तसुवर्णप्रतिमेप्रमाणें काव्यप्रतिमेची सर्वांग उज्ज्वलता या सर्व गुणांत, मोरोपंतापेक्षां मुक्तेश्वर श्रेष्ठ आहे, असें जर रा. परांजपे हे प्रांजलबुद्धीनें कबूल करतात, तर एका शब्दचमत्कारावरच लुब्ध होऊन, त्यांनीं महाराष्ट्रकाव्यवधूची माळ मोरोपंतास अर्पण करावी, हें अंमळ चमत्कारिक दिसतें. अस्तु.

येथपर्यंत केलेल्या अल्प विवेचनावरून, मुक्तेश्वर हा कवित्व गुणांत मोरोपंतापेक्षां तर काय, पण सर्व महाराष्ट्र कवींपेक्षां श्रेष्ठ आहे, हें रसिक वाचकांच्या ध्यानांत येईल

* Poetry is a spontanious overflow of powerful feelings. कविता ही, कवीच्या प्रबल विकारांचा स्वयंप्रेरित प्रवाह आहे. Palgrave

अशी माझी नम्र भावना आहे. तथापि याची कोणास प्रत्यक्ष प्रतीति पहावयाची असेल, तर त्यांनीं मुक्तेश्वरी भारताचीं उपलब्ध झालेलीं सहा पर्वे, मोरोपंती भारताच्या त्या त्या पर्वांशीं ताडून पहावीं. शिवाय प्रसिद्ध विद्वान्, मराठी कवितेचे उत्तम मर्मज्ञ, व पंतभक्त रा. लक्ष्मणराव पांगारकर यांनींहीं मुक्तेश्वराची सर्वमहाराष्ट्रकविश्रेष्ठता कबूल केली आहे, हें त्यांच्या महाभारताचे मराठी अवतार या लेखांतील पुढील उताऱ्यावरून कळून येईल.

'सर्व भारतग्रंथांत उत्कृष्टत्वामुळें श्रेष्ठ असें मुक्तेश्वरी भारतच होय. शोधांतीं मुक्तेश्वराचें संबंध भारत सांपडल्यास सारीं भारतें लोपून जातील यांत तिळमात्र शंका नाहीं. राष्ट्रीयत्वाची कल्पना आमच्याइकडील सर्व साधुकवींस होती, पण मुक्तेश्वराच्या सर्व भारतांत ती जशी चमकते, तशी दुसऱ्या कोणत्याही मराठी काव्यांत चमकत नाहीं. मुक्तेश्वराच्या काव्यांत तें अद्भुत ओज व जी वीररसाची दीप्ति इतक्या उत्तमत्वानें चमकते, त्याचें कारण तरी हेंच कीं, त्याची कल्पना अति विशाल होती. कवीला लागणारे प्रतिभादि लोकोत्तर गुण त्यांत होते. सभोंवारच्या परिस्थितीकडे व समाजघटनेकडे राष्ट्रीय अभिमानानें पाहण्याचें सामर्थ्य त्यांत होतें. एकनाथांचें रक्त त्याच्या अंगांत खेळत असल्यामुळें जाज्वल्य नीतिमत्ता व ईश्वरभक्ति हे गुण निसर्गतः त्याला प्राप्त झाले होते; अशा सर्वांगसुंदर **कविश्रेष्ठ मुक्तेश्वराच्या तोलाचा दुसरा मराठी कवि नाहीं !**

या शिवाय कै. कृष्णशास्त्री चिपळूणकरांचें या बाबतींत काय मत होतें, हें या लेखाच्या आरंभीं सांगितलेंच आहे; तेव्हां आतां, कै० चिपळूणकर व रा. पांगारकर या विद्वद्वयाच्या मतापेक्षां, माझ्या मतास विशेष महत्व नाहीं हें उघडच आहे.

आतां मुक्तेश्वरी काव्यांतील दोषांकडे वळतों. हे दोष, त्याच्या भारतापेक्षां रामायणांत अधिक आढळतात. कारण तें श्लोकबद्ध असल्यामुळें, वृत्तसुखार्थ शब्दांची ओढाताण केलेली पुष्कळ ठिकाणीं दृष्टीस पडते. कालविपर्यास, वाजवीपेक्षां अधिक शृंगारवर्णन व भाषाशुद्धीकडे दुर्लक्ष्य, हे मुक्तेश्वरी काव्यांतील प्रमुख दोष होत. यांपैकीं कालविपर्यास दोषासंबंधानें रा. पांगारकर यांनीं आपल्या 'महाभारताचे मराठी अवतार' या निबंधांत, प्रसिद्ध आंग्ल कवि शेक्सपीयर याचें उदाहरण घेऊन उत्कृष्ट विवेचन केलें आहे, त्यांत हा दोष नसून, काव्यरचनाप्रसंगीं मुक्तेश्वरासारख्या सहृदय व रसिक कवीचें तत्कालिन परिस्थितीशीं एकप्रकारचें तादात्म्य होऊन जातें, त्याचा हा

सगळा प्रभाव होय, असें त्यांनीं सिद्ध केलें आहे. दुसऱ्या दोषासंबंधानेंही मुक्तेश्वरास नांव ठेवण्यापूर्वीं, त्याच्या रसिकतेकडे पूर्ण लक्ष्य देणें जरूर आहे. शिवाय मुक्तेश्वराचीं शृंगारवर्णनें वाचतांना वाचकाच्या अंतःकरणांत आनंदाच्या ज्या लहरी उत्पन्न होतात, त्यांत हा दोष कोणीकडे वाहून जातो, त्याचा पत्तासुद्धां लागत नाहीं ! आतां काव्यसंग्रहाच्या एका माजी संपादकांसारख्या फाजील सोंवळ्या अरसिकांस, असलीं हृदयंगम वर्णनें वाचतांना केवळ भूकंपाचे भयंकर धक्के बसल्याचा किंवा आपल्या मस्तकीं विद्युत्पात झाल्याचा भास व्हावा, हें त्यांच्या अरसिकतेस अनुरूपच होय, व असल्या लोकांचें समाधान करणें किती कठिण आहे, हें 'अरसिकेषु कवित्वनिवेदनं । शिरसि मा लिख मा लिख मा लिख ।' या एका संस्कृत कवीच्या विनंतीवरून सर्वांच्या ध्यानांत येण्यासारखें आहे. मुक्तेश्वरी काव्यांतील दुसरा प्रमुख दोष म्हटला म्हणजे भाषाशुद्धीकडे क्वचित् स्थलीं झालेलें दुर्लक्ष्य, हा होय. परंतु, 'निरंकुशाः कवयः' या न्यायानें पाहतां व मुक्तेश्वराच्या काळची मराठी भाषेची स्थिति लक्षांत घेतां, ह्या दोषाबद्दल मुक्तेश्वरास सर्वस्वी जबाबदार धरितां येणें शक्य नाहीं, एवढेंच नव्हे तर, अशा विरुद्ध भाषा-परिस्थितींत, मुक्तेश्वरानें इतकी चांगली काव्यरचना करून, मराठी भाषेस संस्कृताच्या थाटावर नटविण्याचा प्रयत्न केला आहे, याबद्दल त्याचें अभिनंदन करणें जरूर आहे, असें म्हणावें लागतें; व यावरून मोरोपंत ज्या कालीं होऊन गेला त्या कालीं जर मुक्तेश्वर अवतीर्ण झाला असता, तर त्यानें त्या कालापूर्वीं होऊन गेलेल्या शेंकडों महाराष्ट्र कवींनीं जमविलेल्या भाषासामुग्रीचा उपयोग मोरोपंतापेक्षां कितीतरी पटीनें चांगला केला असता, असेंही म्हणणें भाग पडतें. मोरोपंताची तरफदारी करून त्यास सर्व महाराष्ट्रकवींचें कुलगुरुत्व अर्पण करणाऱ्या गृहस्थांनीं, या गोष्टीचा अवश्य विचार करावा, अशी माझी नम्र सूचना आहे. तसेंच भाषाप्रभुत्व म्हणजे कांहीं कवित्व नव्हे, हेंही लक्ष्यांत ठेविलें पाहिजे. रा० भिडे यांनीं मुक्तेश्वरी कवितेस अरण्याची व मोरोपंती कवितेस उपवनाची

---

१ या संपादकांनीं, काव्यसंग्रहांतील मुक्तेश्वरी विराटपर्वांत, कीचकाच्या शृंगारचेष्टावर्णनांतील एक ओंवी गाळून, टीपेंत आपल्या फाजील सोंवळेपणाचें जें प्रदर्शन केलें आहे, तें आमच्या प्रिय वाचकांनीं अवश्य पहावें, म्हणजे आमच्या विधानाची सत्यता त्यांच्या अनुभवास येईल.

उपमा देऊन पंतांचें श्रेष्ठत्व प्रस्थापित केलें आहे, परंतु अरण्य व उपवन यांत निसर्गसुंदर कोणतें, हें वाचकांस सांगितलें पाहिजे असें नाहीं.

प्रसिद्ध विद्वान् व रसिक गृहस्थ रा. रा. हरिभाऊ आपटे, यांनीं आपल्या 'मराठी वाङ्मयाचा अभ्यास' या विषयावर दिलेल्या व्याख्यानांत, या वादासंबंधानें जे मार्मिक उद्गार काढिले आहेत, ते अवश्य वाचण्याजोगे आहेत. रा. हरिभाऊ ह्मणतातः–' ज्यांस विद्वत्त्व आणि कवित्व यांचें मिश्रण पाहावयाचें असेल, त्यांनीं वामनपंडित व मोरोपंत यांचे ग्रंथ पहावे. रसपरिपाक, वर्णनसौंदर्य व भाषेची अव्याजमनोहरता ज्यांस हवी असेल, त्यांचें मन रंजविण्यास मुक्तेश्वर तयार आहेत. मुक्तेश्वरांचें महाभारत वाचतांना त्यांच्या वर्णनशैलीमुळें ते ते देखावे व त्या त्या व्यक्ति आपल्या डोळ्यांपुढें दिसत आहेत असेंच वाटतें. त्यांच्या भाषेंत कृत्रिमता बिलकुल नाहीं. त्यांच्या उपमा अगदीं सहज. निसर्गमनोहर अशा युवतीच्या दर्शनानें जो आनंद होतो, तो आनंद मुक्तेश्वरांच्या काव्यापासून होतो. तसा शुद्धानंद पंडितांच्या किंवा पंतांच्या काव्यापासून होत नाहीं. पंडित व पंत हे कवि नव्हते, किंवा त्यांच्या काव्यांतून कवितेचा परिपोष नाहीं, असें माझें ह्मणणें नाहीं. आपला गैरसमज होऊं देऊं नका. पंतांच्या काव्याबद्दल माझा किती आदर आहे, हें मी वर सांगितलें आहे. त्यांचीं काव्यें आनंदकर आहेत, विविध रसांचीं पोषक आहेत. परंतु चित्रकाव्य जेथें साधेल, तेथें तें साधण्याकरितां रसहानि होते कीं काय इकडे लक्ष न दिल्याचीं उदाहरणें त्यांच्या काव्यांतून किती तरी सांपडतील. पुनः मी आपणास सांगतों कीं, आपला गैरसमज होऊं देऊं नका. मोरोपंत कवि नव्हते किंवा त्यांच्या ग्रंथांत काव्य नाहीं असें माझें ह्मणणें नाहीं—माझें ह्मणणें एवढेंच कीं, त्यांच्या काव्यांत व वामनपंडितांच्या काव्यांत कृत्रिमता विशेष. पंतांनीं आपल्या बसण्याच्या खोलीभर यमकें लिहून ठेविलीं होतीं व त्यांचा ते लागेल तसा उपयोग करीत, ही आख्यायिका आपण ऐकलीच असेल. यमकांचा त्यांनीं अभ्यास केल्या कारणानें तीं त्यांस पुढें अगदीं सहज होऊन गेलीं; परंतु त्यांचा भर यमकांवर व शब्दचमत्कारावरच फार. मुक्तेश्वरांचा भर शब्दचमत्कारावर मुळींच नाहीं, अर्थावर फार. यामुळें त्यांचीं महाभारतांतील आख्यानें पंतांच्या आख्यानांपेक्षां सहृदय वाचकास अधिक आल्हादकारक होतात.

मराठी वाङ्मयाचा अभ्यास, पृष्ठें ५८–६०

मोरोपंतांच्या कवितेंत, केवळ यमक साधण्यासाठीं जेथें भलत्याच उपमा योजिल्या आहेत व अर्थाची ओढताण झाली आहे, अशीं शेंकडो स्थळें दाखवितां येतील. उदाहरणार्थ—प्रस्तुत लेखाच्या आरंभीं दिलेली सन्मणिमालेंतील मुक्तेश्वरांवरील आर्या पहा. ‘ यश ज्याचें भव्य जेंवि मंदील ’ या चरणाचा अर्थ कितपत सरस लागतो, याचा वाचकांनींच विचार करावा. तशीच सन्मणिमालेंतील रंगनाथ स्वामींवरील आर्या पहा. तींतील ‘भक्तिज्ञानें ज्याची मति पोषी जेंवि अंगना थानें’ हा आर्यार्ध मोरोपंतांच्या अंधभक्तांस मोठा आनंददायक वाटतो काय? वास्तविक पाहतां, पहिल्या आर्येंत वर ‘ वंदील ’ शब्द घातला आहे म्हणून खालीं यमकपूर्तीसाठीं ‘मंदील’ शब्द घातला आहे व दुसऱ्या आर्येंत वर ‘रंगनाथानें’ हा शब्द घातल्यामुळें खालीं ‘अंगना थानें’ ह्या अप्रासंगिक शब्दांनीं यमकपूर्ति करावी लागली आहे; यापेक्षां त्यांत कांहीं अर्थ नाहीं. पंतांचें सर्वोत्कृष्ट काव्य ‘ केकावली ’ ह्यांतही केवळ यमकरचनेसाठीं जेथें अर्थाची ओढाताण केलेली आहे, अशीं स्थळें आढळतात. दुसरें असें कीं, पंतांची सगळींच काव्यें सारखींच रसभरित उतरलीं आहेत, असें नाहीं. त्यांच्या महाभारतांतील कांहीं आख्यानें फार सरस आहेत यांत शंका नाहीं; पण त्या मानानें त्यांचीं रामायणें कमी हृदयंगम आहेत; हें कोणासही नाकबूल करितां येणार नाहीं. एकंदरींत, प्रो० परांजपे ह्यांनीं मुक्तेश्वरी कवितेस जी पाटलाच्या बायकोची व पंतांच्या कवितेस शहरांतील कारकुनाच्या बायकोची उपमा दिली आहे, तेथें मुक्तेश्वरी कवितेस कण्वाश्रमांतील शकुंतलेची व पंतांच्या कवितेस भवभूतीच्या मालतीची उपमा देणें मला अधिक योग्य वाटतें. तथापि अशाप्रकारें मोरोपंती कवितेस मी कमी योग्यतेची ठरवितों किंवा तत्संबंधानें माझा अपूज्यभाव आहे, असा कोणी आपला गैरसमज करून घेऊं नये, अशी विनंति आहे. कारण, मोरोपंतांचा तर काय, पण सगळ्या लहान मोठ्या मराठी कवींचा मी भक्त आहे, व ह्या ज्या चार वेड्या वांकड्या ओळी लिहिण्यास मी समर्थ झालों, तें सगळें त्या सत्कवींच्या कृपाप्रसादाचें फळ होय, हें येथें सांगितल्यावांचून माझ्यानें राहवत नाहीं.

मुक्तेश्वरी कवितेवर रा. भिडे यांनीं जो मार्मिक अभिप्राय दिला आहे तो येथें उतरून घेतों:—“ मुक्तेश्वरांची रचना जशी प्रसंगविशेषीं कठोर व सणसणीत आहे,

तशीच प्रसंगानुरूप ती कोमल, प्रेमळ व नाजूकही आढळते. अक्षरगण वृत्तांचीं बंधनें सहन करण्यापुरता जरी त्यांच्या वाणीच्या अंगीं लवचीकपणा नाहीं; तरी ती उणीव रसभावांचा विचार करितांना नजरेस येत नाहीं. रसभेदाप्रमाणें त्यांच्या शब्दसरणींत तत्काळ भेद झालेला प्रत्ययास येतो. जो वाक्प्रवाह एका ठिकाणीं नायगाऱ्याच्या प्रचंड धवधब्याप्रमाणें भूमंडळ दणाणीत आवर्तशतानें खळबळत गंभीर गर्जनेनें अंतराळ धुमधुमवीत, प्रचंड आवेशानें भेडसावीत जातो; तोच दुसऱ्या ठिकाणीं लहानशा झऱ्याप्रमाणें मंजुळस्वरानें गात, लतातृणाशीं खेळत, सुमदलांना कवळीत, व पशुपक्षांना हंसवीत झुळझुळ वाहतांना पाहिला, ह्मणजे कोणास बरें कौतुक वाटणार नाहीं ? कालभैरवाचें आकांडतांडव व अप्सरेचा नाजूक नाच हीं दोन्हीं एकाच व्यक्तीला साधलेलीं पाहून मन चकित झालेंच पाहिजे. मुक्तेश्वरांची भाषा जितकी एके ठिकाणीं कर्कश, तितकीच दुसरे ठिकाणीं प्रेमळ; जितकी एके ठिकाणीं खणखणीत तितकीच दुसरे ठिकाणीं लुसलुशीत ! जितकी एके ठिकाणीं आवेशी तितकीच दुसरे ठिकाणीं संथ; अशी अनुभवास येते व याच गोष्टीनें त्यांचें वाक्प्रभुत्व सिद्ध होतें."

मुक्तेश्वरांचा संस्कृत काव्यनाटकादि ग्रंथांशीं फार परिचय होता व तो दाखविणारीं स्थळें त्यांच्या ग्रंथांत पुष्कळ आहेत. अशीं स्थळें, रा. भिडे यांनीं आपल्या निबंधांत दिलीं असल्यामुळें, तीं मी येथें देत नाहीं.

मुक्तेश्वरांची निधनतिथी समजली नाहीं. "' त्यांनीं वृद्धापकाळीं संन्यासदीक्षा घेतली होती व त्यांची समाधि तेरवाड येथें आहे ' असें रा. राजवाडे ह्मणतात, तें खोटें आहे. कारण तेरवाडास आहे ती मुक्तेश्वरांची समाधि नसून वृंदावन आहे; व कोल्हापुरकरांच्या सनदेंतही वृंदावनाचाच उल्लेख आहे, यावरून मुक्तेश्वरांनीं संन्यास घेतला नव्हता, हें उघड होतें. कारण संन्याशाच्या समाधीस वृंदावन ह्मणत नाहींत. तेथें मुक्तेश्वरांच्या निधनतिथींच्या दिवशीं प्रतिवर्षीं मोठा उत्सव होतो. तेथें मुक्तेश्वरांचे वंशज राहतात व तेरवाड हा गांव कोल्हापूर सरकारांतून त्यांस इनाम मिळाला आहे. त्यांस मुक्तेश्वरांसबंधानें कांहींच माहिती नाहीं व त्यांचा एकही ग्रंथ त्यांच्या संग्रहीं नाहीं.

मुक्तेश्वरांची वंशावळ येणेंप्रमाणें:—

१—मुद्गलपंत ( गोत्र अत्री )
|
२—चिंतोपंत ( चिंतामण गोसावी )—गोदा ( गंगा )
|
३—मुक्तेश्वर ( कवि व साधु )
|
४—निरंजन
|
५—अकाण्णा गोसावी
|
६—मुक्तेश्वर ( गवई व तेरवाड ग्रामसंपादक इ० स० १७२७ )
|
७—निरंजन ( बकुबाई कन्या )

यापुढें वंशांत औरस पुत्र नसल्यामुळें बकुबाईचा मुलगा दत्तक घेतला व त्यांचा वंश हा हल्लीचा आहे.

मुक्तेश्वरांपासून चवथे पुरुष मुक्तेश्वरबुवा यांस कोल्हापुरचे छत्रपति संभाजी महाराज यांनीं शके १६४९ त तेरवाड गांवची सनद दिली:—

" श्री

प्रतिपच्चंद्ररेखेव वर्धिष्णुर्विश्ववंदिता ।
शंभु छत्रपतेर्मुद्रा रामसूनोर्विराजते ॥

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ५४ प्लवंग नाम संवत्सरे श्रावण शुद्ध १३ सौम्य वासरे क्षत्रियकुलावतंस श्री राजा शंभु छत्रपति स्वामी यांणी राजश्री मुक्तेश्वर गोसावी बिन आकाण्णा गोसावी गोत्र अत्री वास्तव्य मौजे कुरुंदवाड यांस दिल्हें इनामपत्र

१ यांच्या कांहीं कविता पैठणच्या बाजूस असल्याचें समजतें.

२ यांचीं कांहीं कविता रा० राजवाडे यांस मिळाली आहे.

ऐसें जे–तुह्मी धाकूरचे मुकामीं स्वामी सन्निध येऊन विदित केलें कीं आपण कुटुंब-वत्सल आहों, योगक्षेमास कांहीं उपजीविका नाहीं. आपले पणजे राजश्री थोरले मुक्तेश्वर गोसावी हे श्रीएकनाथ स्वामींची कन्या गंगाबाईचे पुत्र यांचें वृंदावन मौजे तेरवाड प्रांत रायबाग येथें आहे, तेथील पूजा, उत्साह, ब्राह्मणसंतर्पणाची उपजीविका होये सारिखें करण्यासी महाराज धर्मपरायण आहेत ह्मणून तुह्मी विदित केलें त्यावरून मनास आणितां तुह्मी बहुत भले भगवद्भक्त, गायनादिविद्येमध्यें अति निपुण तुमचे कुटुंबाचा योगक्षेम चाले व थोरले मुक्तेश्वर गोसावी यांचा वृंदावनमहोत्सव होय ऐसें केल्यानें स्वामीस परमश्रेयस्कर पाहोन स्वामींनीं ग्राम मौजे तेरवाड प्रांत रायबाग सुभा प्रांत कोल्हापूर हा गांव पेशजीच्या मुकाशियाकडून दूर करून इनाम कुलबाब कुलकानु हालीपट्टी व पेस्तरपट्टी जलतरुतृणपाषाणनिधिनिक्षेपसहित खेरीज इनामदार व हक्कदार करून सर्वमान्य करून दिल्हा असे; येविशीं देशाधिकारी यांस व ग्रामाधिकारी यांस व वरकडांस अलाहिदा पत्रें सादर केलीं आहेत. तरी मौजे मजकूर पूर्वील यादीप्रमाणें स्वाधीन करून घेणें आणि इनाम तुह्मांस व तुमचे पुत्रपौत्रादिवंशपरंपरेनें अनुभवून आपला योगक्षेम व वृंदावनी महोत्सव ब्राह्मणसंतर्पणादिक सांग चालवून स्वामीचें व स्वामीच्या राज्याचें अभीष्ट चिंतून भगवद्भजन करून सुखरूप राहणें जाणिजे. निदेश समक्ष. मोर्तब रुजू. निरा सुद. बार ता। ११ जिल्हेज सुरुसन समान अशरीन मया व अलफ.

ह्याच मुक्तेश्वरांस ता० ३ मे १७५९ त कोल्हापूर सरकारांतून दुसरी एक सनद मिळालेली आहे, परंतु ती विशेष महत्वाची नसल्यामुळें, विस्तारभयास्तव येथें दिली नाहीं.

वरील सनदेवरून आह्मांस आज काय माहिती मिळते हें पाहूं. या सनदेंत कोल्हापूरच्या महाराजांनीं आपणांस "क्षत्रियकुलावतंस" ह्मणविलें आहे, व त्या पदास शोभेल असें कृत्यही त्यांजकडून घडलें आहे. पूर्वीच्या राजे लोकांची सत्पुरुषांच्या ठिकाणीं किती पूज्यबुद्धि असे, त्यांची गुणग्राहकता किती वर्णनीय होती व सत्पुरुषांच्या आशीर्वादाचे ते किती भुकेले असत, हें वरील सनदेंतील मजकुरावरून वाचकांच्या ध्यानांत येईल व पूर्वकालस्थितीशीं सांप्रतच्या स्थितीची तुलना करून पाहिल्यास कालाच्या अगम्य करणीबद्दल सहृदय मनुष्यास सखेदाश्चर्य वाटल्याशिवाय राहणार नाहीं.

मुक्तेश्वरांचें गोत्र अत्री व सूत्र आश्वलायन होतें. कोल्हापुरची श्रीमहालक्ष्मी व सोनारीचा बहिरोबा ( सुवर्णपुरी असें मुक्तेश्वरांनीं ह्मटलें आहे ) हीं त्यांचीं कुलदैवतें होत. ही सर्व माहिती मुक्तेश्वरांनीं स्वतः आपल्या भारताच्या आदि व सभा या दोन पर्वांच्या शेवटीं दिलेली आहे.

येथपर्यंत मुक्तेश्वरमहाराजांचें अल्पचरित्र वाचकांपुढें ठेविलें. आतां त्यांच्या भारतांतील थोडेसे सुरस वेंचे देऊन हें प्रकरण संपवितों. मुक्तेश्वरांची कविता ह्मणजे केवळ क्षीरसमुद्र आहे. परंतु देवांदैत्यांनीं मंथन केलेल्या क्षीरसमुद्रांतील चौदा रत्नांपेक्षां, या काव्यसमुद्रांतील रत्नें कितीतरी पटीनें अधिक असून शिवाय तीं अमूल्य आहेत. आतां एक एक रत्न रसिक वाचकांपुढें ठेवितों.

महाभारताच्या आरंभीं श्रीसरस्वतीचें:—

ओंव्या.

“ त्रैलोक्य लावण्यनगरी । शृंगारश्रीपर्वतभ्रमरी ॥
साहित्यबाणलिंगाचे शिखरीं ॥ विशाळ नदी नर्मदा ॥ १ ॥
प्रमेय पोतें, साची रंभा ॥ विद्यामूलपीठ जगदंबा ॥
चातुर्यसौभाग्याची शोभा ॥ कुलस्वामिनी कवींची ॥ २ ॥

ह्याप्रमाणें स्तवन केल्यावर देवी मुक्तेश्वरांस प्रसन्न होऊन ह्मणाली:—

“ आतां कथेचें अन्नसत्र ॥ घालीं विश्वामाजी पवित्र ॥
तेथें स्वामिनी मीं स्वतंत्र ॥ पाइकी मात्र त्वां कीजे ॥ १ ॥

असा सरस्वती देवीचा प्रसाद मिळाल्यावर:—

त्या कारुण्यवसंतवातें ॥ मूढमानसशुष्कलते ॥
स्फूर्तीचे पल्लव फुटले; तेथें ॥ कवित्व फळे फळभारें ॥ २ ॥

अशी स्थिति झाल्यास नवल तें काय ? “ नर करनी करे तो नरका नारायण होय ” असें गोस्वामी श्रीतुळसीदासांनीं ह्मटलें आहे. कोणत्या नरास नारायण ह्मणावें, हें कविराज मुक्तेश्वर सांगतात—

“ जो ऐश्वर्यें न चढे मदा ॥ दरिद्रें दीनत्वा न शिवे कदा ॥
निंदी त्याची न करी निंदा ॥ तो नारायण नररूपें ॥ १ ॥
कामक्रोधाच्या भूतसंचारीं ॥ न चळे सुविचारपंचाक्षरी ॥
परधनपरस्त्रीपासोनि दूरी ॥ तो नारायण नररूपें ॥ २ ॥

परोत्कर्षं निर्वैर मनीं ॥ समान बुद्धि मानापमानीं ॥
दंभाचार सांडिला मनीं ॥ तो नारायण नररूपें ॥ ३ ॥

स्वधर्मकर्पूरग्रहाआतौती ॥ जिव्हालिंग प्रदीप्त वाती ॥
रक्षुनी राहटे सावध मति ॥ तो नारायण नररूपें ॥ ४ ॥

सज्जन श्रोत्रियां देखोनि नेत्रीं ॥ जो गर्व स्वयेंचि दवडी दूरी ॥
शीर्षे वाट झाडी पुढारी ॥ तो नारायण नररूपें ॥ ५ ॥

हरिहरनामाचे जीवनीं ॥ जिव्हा तळपे होवोनि मीनी ॥
कुतर्क शिमग्यासमान मानी ॥ तो नारायण नररूपें ॥ ६ ॥

या वेंच्यांत कितीतरी उदात्त विचार भरलेले आहेत आणि ते मूळ भारतांतील नसून मुक्तेश्वरांचे आहेत. मुक्तेश्वरांनीं कुतर्काला शिमग्याची उपमा दिली आहे, यावरून शिमग्यांत घडणारे बीभत्स प्रकार त्यांस तिरस्करणीय वाटत असत, असें वाटतें. आपल्या ग्रंथाच्या श्रोत्यांना मुक्तेश्वर किती विनयपूर्वक विनंति करितात पहा:—

" येथील श्रोते हो परिसणें ॥ तुमचें अवधान स्पर्श तेणें ॥
माझें वक्तृत्व हें लोहगुणें ॥ अमूल्य होईल कांचन ॥ १ ॥

मग जयाच्या कर्णभूषणा ॥ योग्य होईल, निश्चय जाणा ॥
या लागीं तुह्मांतें पुन्हा पुन्हा ॥ प्रणिपात साष्टांगीं ॥ २ ॥

धरवेना तें धरिलें मनीं ॥ तें सिद्धी पाववा कृपा करुनी ॥
कीं वानरां सेतुबंधनीं ॥ सामर्थ्य देता रघुनाथ ॥ ३ ॥

अंजळी ओढवी सिंधूदका ॥ ब्रह्मांड उचलूं ह्मणे अलिका ॥
तुह्मीं कराल तरी होय निका ॥ तोच अगस्ती कीं शेष ॥ ४ ॥

या ओंव्यांतील उपमा व अर्थगौरव हीं किती बहारीचीं आहेत !

आमच्या जुन्या मराठी कवींच्या वेळीं संस्कृत भाषेचें फार प्राबल्य असल्यामुळें मराठी भाषेस व कवितेस फारसें कोणी महत्व देत नसत, एवढेंच नव्हे, तर प्रसंग विशेषीं त्यांचा तिरस्कारही केला जात असे. याकरितां तत्कालीन दुराग्रही लोकांची समजूत घालण्याकरितां बहुतेक मराठी कवींनीं आपापल्यापरी मराठी भाषेची तरफदारी केली आहे; परंतु त्यांतही मुक्तेश्वरांची पद्धति फारच वर्णनीय आहे. ते ह्मणतात:—

" वेद शास्त्र स्मृति पुराणें ॥ नाना इतिहास व्याकरणें ॥
गाळूनी विचाररसायणें ॥ द्वैपायनें कुशलत्वें ॥ १ ॥
सुरस सुंदरी पवित्र सृष्टी ॥ पकानें निपजवुनी पाठीं ॥
संस्कृतशब्द सुवर्णताटीं ॥ श्रेष्ठां श्रेष्ठां ओगारिलीं ॥ २ ॥
तेंचि रसायण दुर्बलपणीं ॥ महाराष्ट्रभाषारंभापणीं ॥
वाढिलें, तरी भुकाळू जनीं ॥ न सेविजे किमर्थ ? ॥ ३ ॥

या वेंच्यांतील शेवटच्या प्रश्नाचें उत्तर शब्दांनीं देण्यापेक्षां प्रत्यक्ष कृतीनेंच देणारी मंडळी पुष्कळ निघेल यांत संशय नाहीं.

आदिपर्वाच्या प्रथमाध्यायांतील धृतराष्ट्राचे उद्गार वाचनीय आहेत; परंतु ते विस्तारात्मक असल्यामुळें पुढें वळतों. " आपले शंभर पुत्र मरण पावले, अठरा अक्षौहिणी सैन्यांतून फक्त दहाच असामी जिवंत राहिले व शेवटीं पांडव विजयी झाले या बद्दल धृतराष्ट्र फार दुःखी होऊन शोक करूं लागला, त्या वेळीं संजयानें त्यास उपदेश केला:—

"संजय ह्मणे, " कौरवराया ॥ दुःख पाविजे धरितां माया ॥
हेंची विवेकें जाणोनियां ॥ सर्वत्याग निधावें ॥ १ ॥
दिसे तितकें पावे नाश ॥ हाचि जाणिवेमाजी सारांश ॥
ह्मणोनि, आत्मा नित्य, अविनाश ॥ जोडे तेंचि साधावें ॥ २ ॥
ब्रह्मसृष्टीमाजी निश्चिती ॥ असंख्य राजे चक्रवर्ती ॥
अवतारी पुरुषांच्या पंक्ति ॥ उठोनि गेल्या बहु वेळां ॥ ३ ॥
सूर्य सोम वंशाआंत ॥ कीर्तिघोष प्रतापवंत ॥
चित्रगुप्ताचे हात ॥ तेंहि लिहितां भागले ॥ ४ ॥
ज्यांच्या चरित्रांचीं लेणीं ॥ भूषणें झालीं जगाचे श्रवणीं ॥
स्वर्गी स्तुतीच्या तांबुलेंकरूनी ॥ मुखें रंगलीं देवांचीं ॥ ५ ॥
बहुयज्ञ बहुदक्षणा ॥ देतां बहुसाल ऋषिब्राह्मणां. ॥
नेतां उबगोनि सांडिलें धना ॥ नाम झालें कनकाद्रि ॥ ६ ॥
सत्य शौच दया आर्जव ॥ स्वधर्मकर्मी ईश्वरभाव
न्यायनीतीचें गौरव ॥ जींहीं बहुसाल वाढविलें ॥ ७ ॥

जींहीं दानोदकें प्रबळ ॥ जलमय केला ब्रह्मगोळ ॥
तेही पातला असतां काळ ॥ वश झाले मृत्यूतें ॥ ८ ॥
अभ्रें वितुळलीं निराळीं ॥ नाना बुद्बुद विराले जळीं ॥
तैसे अचुक काळानळीं ॥ भस्म झाले असख्य ॥ ९ ॥
तुझे पुत्र तंव दुरात्मे ॥ नाश पावले केलेनि कर्में ॥
त्यांचा शोक मनोधर्में ॥ करणें हाचि अविवेक ॥ १० ॥
देहेंसी विश्व मिथ्या सकळ ॥ जाणोनि ब्रह्म चिंतीं निर्मळ ॥
तेणें शमेल शोकजाळ ॥ स्वानंदसुख पावशी ॥ ११ ॥

मुक्तेश्वरांच्या कवितेंत ठिकठिकाणीं उदात्त विचार, सर्वमान्य सुभाषितें व तत्कालीन देशस्थितीसंबंधानें अनुकूल प्रतिकूल उद्गार येऊन गेले आहेत; एके ठिकाणीं म्हटलें आहे:—

" वनिता मनोरम एकांतीं ॥ आपण होऊनि पुरुषा प्रार्थी ॥
तेथें जो निर्विकल्प चित्तीं ॥ तोचि शंकर म्हणों ये ॥ १ ॥
विजनीं भरलीं कनकें पाहें ॥ देखिल्यावरी लोटी पायें ॥
ऐशी निर्लोभता लाहे ॥ तोचि शंकर म्हणों ये ॥ २ ॥
जया आधीन मन इंद्रियें ॥ न मनी सुखदुःखाचे घाय ॥
छळितांही परक्रोधा नये ॥ तोचि शंकर म्हणों ये ॥ ३ ॥ "

असत्य भाषण करणें हें पातक होय; परंतु योग्य प्रसंगीं त्याचा उपयोग केला असतां तें हितकर होऊं शकतें. कोणत्या वेळीं असत्य भाषण करणें पातक होणार नाहीं, हें मुक्तेश्वर सांगतातः—

" असत्य वदोन पुढिलाचें हित ॥ करितां, जोडे सर्व सुकृत ॥
सत्यें घडे पराचा घात ॥ त्याहूनि पाप असेना ॥ १ ॥
जेणें प्रकारें परोपकार ॥ घडे, तोचि गा पवित्राचार ॥
परातें पीडाकारक थोर ॥ तोचि अधर्म जाणिजे ॥ २ ॥
असत्यें चुकविजे मरणा ॥ असत्यें घडविजे अनाथलग्ना ॥
असत्यें संकटीं आत्मरक्षणा ॥ कीजे, हा तंव महाधर्म ॥ ३ ॥

परोपकारी पुरुषाचा महिमा केवढा मोठा आहे पहा:—

“ जिहीं आपल्या सर्व यत्नें ॥ पराचे क्लेश परिहरणें ॥
श्रमोनि पुढिल्या सुख दावणें ॥ तो एक धन्य संसारीं ॥ १ ॥
प्रेरणा न करितां संकटीं ॥ कृपेनें अनाथ घाली पोटीं ॥
केला उपकार न बोले ओंठीं ॥ तो एक धन्य पुरुष ॥ २ ॥
आपल्या समान पुढिल्या पाहे ॥ पराच्या संतोषें संतोष लाहे ॥
अन्य क्लेशें क्लेशत जाये ॥ तो एक धन्य संसारीं ॥ ३ ॥
परोपकारा वरिलें नसतां ॥ विधवा संतति नाशवंता ॥
जैसी नाकावीण वनिता ॥ श्लाघ्यता मानी सौंदर्यें ॥ ४ ॥ ”

कोणत्या मनुष्यांनीं आपली थट्टा केली असतां आपण त्यांची करूं नये हें या ओंवींत सांगितलें आहे:—

“ राजा, कोपी, तपस्वी, साधु ॥ बळी, प्रतिष्ठित, प्रसिध्दु ॥
इहीं करितां विनोदु ॥ परतोन शहाणे न करिती ॥ १ ॥ ”

परिक्षिती राजा शमीक ऋषीच्या गळ्यांत मृतसर्प घालून हस्तिनापुरीं आला असतां त्या ऋषीचा पुत्र शृंगी यानें राजास शाप दिला कीं—

“ आजीपासोनि सातवे दिवशीं ॥ तक्षकदंशें मरण त्यासी ॥
अन्यथा माझिया वचनासी ॥ करूं न शके हर ब्रह्मा ॥ १ ॥

आपल्या पुत्रानें राजास भयंकर शाप दिल्याची हकीकत जेव्हां शमीक ऋषीस समजली तेव्हां आपल्या मुनिवृत्तीस भूषणप्रद असे त्यानें काढिलेले उद्गार किती उपदेशपर आहेत पहा:—

“ बाणे ” अनुचित केलें कोपें ॥ राजहत्या जोडिली शापें ॥
राष्ट्रीपासोनि मनसंकल्पें ॥ काय न करी प्राणिया ? ॥ १ ॥
निंद्यानिंद्य कर्म जितुकें ॥ मनुष्यापासोनि घडे तितुकें ॥
यालागीं विचारी नरें सात्विकें ॥ भूतद्रोह न करावा ॥ २ ॥
विश्व हे अवयव आपुले ॥ यांहीं केल्या, आपण केलें ॥
ऐसें साचार जया कळलें ॥ तोचि निश्चयें जगदात्मा ॥ ३ ॥

पराचे अपराध करणें क्षमा ॥ हेंचि मांडवल तपियां आम्हां ॥
क्रोधें धरिल्या अक्षमा ॥ अक्षम होती साधनें ॥ ४ ॥
प्रजापाळक स्वधर्ममूर्ति ॥ ऐसा राजा विवेककीर्ति ॥
शापिला हा पुढत पुढती ॥ खेद वाटे मज पुत्रा ! ॥ ५ ॥

परंतु शृंगीनें दिलेला शाप केवळ अपरिहार्य आसल्यामुळें, उरलेल्या आयुष्याच्या सात दिवसांत राजानें कांहीं तरी परमार्थसाधन करावें, म्हणून झालेली हकीकत राजास कळविण्याकरितां शमीक ऋषीनें आपला गौरमुख या नांवाचा शिष्य हस्तिनापुरास पाठविला. त्यानें राजास शृंगीची शापोक्ति निवेदन केली त्यावेळीं, सामान्य मनुष्य असता तर आतां सात दिवसांनीं आपण मरणार, हा विचार मनांत येऊन भीतीनें केवळ वेडावून गेला असता; परंतु जितका शमीक ऋषी शांतवृत्ति होता तितकाच परिक्षिती राजा विचारी होता. त्यानें, गौरमुखाबरोबर शमीक ऋषीस कसा निरोप सांगून पाठविला पहाः—

" शमीकचरणीं माझें मौळ ॥ ठेविलें सांगा सहस्रवेळ ॥
माझिया अपराधाचें फळ ॥ याहूनि विशेष पाहिजे ॥ १ ॥
स्वकृतदोषें पावलों व्यसना ॥ तथापि दीनावरी करावी करुणा ॥
तेणें परलोकीं तरी गहना ॥ कल्याणातें पावेन ॥ २ ॥

शमीकाची व परिक्षितीची शांतवृत्ति व त्यांचे पुत्र—परिक्षीतीस शाप देणारा शृंगी व सर्पसत्रानें बापाच्या मृत्यूचा सूड उगविणारा जनमेजय—यांचा क्रोधावेश यांचा विचार केला असतां वृद्ध व तरुण यांच्या स्वभावाची चांगली कल्पना होते.

शृंगीच्या शापोक्तीप्रमाणें परिक्षिती राजा तक्षकदंशानें मृत्यु पावला वगैरे वर्णन करून, मुक्तेश्वर सांगतातः—

" बाप ब्रह्म शापाची थोरी ॥ राजा भस्मला सहशरीरीं ॥
जाणते पुरुष हो संसारीं ॥ ब्राह्मणक्षोभ न घ्यावा ॥ १ ॥
ब्रह्मशापें श्रीकृष्णासहित ॥ यादवकुळासी झाला अंत ॥
ब्रम्हशापें भस्मभूत ॥ कार्तवीर्यवंशासी ॥ २ ॥
ब्रम्हशापें शक्रसंपत्ती ॥ पडिली समुद्राआतौती ॥
ब्रम्हशापें दंडक नृपती ॥ परिवारेंसी भस्मला ॥ ३ ॥

भगांकित सहस्रनेत्र ॥ सलांच्छन रोहिणीमित्र ॥
ब्रम्हशापें दासीपुत्र ॥ यम झाला भूलोकीं ॥ ४ ॥
ब्रम्हशापें सर्पत्व नहुषा ॥ सरड देहो मृग नरेशा ॥
ब्रम्हशापें मुख्य महेशा ॥ लिंगपतन निर्धारें ॥ ५ ॥
श्रोतयांतें नमस्कार ॥ वक्ता करी वारंवार ॥
ब्राम्हण क्षोभे तो प्रकार ॥ नाचरावा कोणीही ॥ ६ ॥

या ओव्यांत ब्राम्हणाच्या शापापासून काय काय अनार्थापात घडले ते सांगून मुक्तेश्वर होईल तेवढें करून, ब्राम्हणाचें मन न दुखविण्याचा आपल्या श्रोत्यांस उपदेश करितात. हा उपदेश खऱ्या ब्राम्हणासंबंधानें प्रत्येकानें ग्रहण करण्यासारखा आहे परंतु सांप्रतकालीं ब्रम्हशापास भिण्याची कांहीं विशेष आवश्यकता आहेच असें वाटत नाहीं.

पुढें "दुष्यंतशकुंतलाख्यानांत, दुष्यंत राजाचें व त्याच्या राज्य चालविण्याच्या पद्धतीचें यथायोग्य वर्णन केल्यावर, राजा एके दिवशीं असंख्य सैन्यभार घेऊन शिकारीस निघाला त्या वेळच्या देखाव्याचें चित्र कवीनें कसें हुबेहूब वठविलें आहे पहा:—

" सप्त समुद्रींचे लोट ॥ धरा मंडळीं एकवट ॥
तैसे सेनेचे संघाट ॥ घेऊनि वना चालिला ॥ १ ॥
वाजी वारण रथ पदाती ॥ संख्या करितां न घरवे गणती ॥
सेनावसनें सर्व जगती ॥ पांघुरविली समर्थें ॥ २ ॥
अनेक शस्त्रधरांचीं वृंदें ॥ अनेक वाद्यें अनेक शब्दें ॥
गर्जती तेणें विचित्र नादें ॥ नादावलें अंबर ॥ ३ ॥
कनकरत्नीं निरवाळलीं ॥ गोपुरें गगन भेदीत गेलीं ॥
तेथें वळघोनी पाहों ठेलीं ॥ कामिनीवृंदें आवडी ॥ ४ ॥
चंद्रमंडळीं पिकली धरणी ॥ तैशा श्वेत छत्राच्या उभारणी ॥
रत्न कळसांचिया किरणीं ॥ कवि गुरु दोन्ही लोपले ॥ ५ ॥
क्षीरसमुद्रीं तरंग उठती ॥ तैसीं दिव्य चामरें झळकती ॥
वीरश्रीसीं राजनृपती ॥ नक्षत्रीं चंद्र अवगमे ॥ ६ ॥

सेनेसहित सेनानाथ ॥ नगरगर्भी जात मिरवत ॥
हें देखोनि नारी शतानुशत ॥ माडिया गोपुरीं वळघल्या ॥ ७ ॥
कनककुसुमें कनकताटीं ॥ आवडी धरूनि करसंपुटीं ॥
अवलोकूनी राजमुगुटीं ॥ पुष्पांजुळी सांडिती ॥ ८ ॥
एकीं अवलोकितां नयनें ॥ म्हणती निवालीं अंत:करणें ॥
एक म्हणती पंचबाणें ॥ चित्तकुरंग वेधिला ॥ ९ ॥
एकी भाविती निजमानसीं ॥ " समर्था घरीं होइजे दासी ॥
ग्राहिणी होवोनि दरिद्र्यासी ॥ राहटो करणें जळो तें ॥ १० ॥
एकी घरचारमाझारी ॥ म्हणती " पुजोनि शंकर गौरी ॥
ऐसा भ्रतार स्वकीय जन्मांतरीं ॥ पावोनि स्वेच्छा भोगावा ॥ ११ ॥
एक पवित्र पतीव्रता ॥ ईश्वर मानुनी स्वकीय भर्ता ॥
ऐश्वर्येंसी अमरनाथा ॥ भणंगप्राय अवगणिती ॥ १२ ॥

वरील उताऱ्यांतील ओंव्यांवरून, पुराणकालिक राजे लोकांचें ऐश्वर्य, त्यांचे मोठे मोठे सैन्यसमूह व प्रजाजनाचें राजाच्या ठायीं असणारें प्रेम यांची बरीच कल्पना होईल. स्त्रियांच्या चांचल्याविषयीं कवीनें काढिलेले उद्गार केवळ एकतर्फीच आहेत असेंही म्हणतां येणार नाहीं.

पुढें, प्राचीन प्रचंड अरण्याचें वर्णन पहा:—

देखे प्रचंड महागिरी ॥ विशाळ पर्वताचिया दरी ॥
जळें तुंबिलीं सरितासरीं ॥ समुद्रतुल्य अगाध ॥ १ ॥
तेथें आम्र निचोल बेल ॥ कवंट कदंब मधु पिंपळ ॥
शिरस पलाश विशाळ ॥ न्यग्रोध वृक्ष वाढिन्नले ॥ २ ॥
ताळ हिंताळ शाळ सरळ ॥ मंदार कांचन तमाळ निर्मळ ॥
पिचुमंद देवदार धवळ ॥ अर्जुन वृक्ष अपार ॥ ३ ॥
खदिर कंटकी हिंवरसादोडे ॥ हिरवे हिंगण व्याहाडे कुडे ॥
आंवळे पाचुडे कंकाकडे ॥ करंज पांगरे चौफेरी ॥ ४ ॥

वेणू कळंक चिंविया जाळी ॥ औदुंबर फळले सुगंध फळीं ॥
तोरणी लागली घोंसाळीं ॥ खिरणिया टेंबुरणी पिंपरी ॥ ५ ॥
अर्क निवडंग सदा मस्त ॥ मोडितां दिसे दुग्ध श्रवत ॥
जैसे प्रपंची विवेकरहित ॥ सुख बोलती विषयांतें ॥ ६ ॥
ऐसिया वृक्षांचीं अचाट ॥ डांगें लागलीं घनदाट ॥
माजी निर्झरोदकाचे पाट ॥ सैरावैरा धांवती ॥ ७ ॥
मस्तकें उचलोनी दिनकर ॥ छाये रक्षिला अंधकार ॥
माजी श्वापदगणांचे भार ॥ सुरवाडले सुख वस्ती ॥ ८ ॥

हें अरण्य ओलांडिल्यावर राजा दुष्यंत कश्यपारण्य नांवाच्या उपवनासमीप आला; त्या उपवनाचें वर्णन किती रमणीय उतरलें आहे पहा:—

" तेथें चंदन पारिजात ॥ देवदार केतकी सुपुष्पित ॥
तुळसी वनें सुशोभित ॥ दवने वनें घमघमिती ॥ १ ॥
सरिता सरोवरिंचीं पैं जळें ॥ पद्मगंधें सुशीतळें ॥
रातोत्पळें नीळोत्पळें ॥ सीतोत्पळें कनकाचीं ॥ २ ॥
तेथें राजहंस कारंडक ॥ चकोर सारस चक्रवाक ॥
करींद्र करिणी करिशावक ॥ स्वेच्छा करिती जळक्रीडा ॥ ३ ॥
मयूर गर्जती किंकारें ॥ कोकिळा गर्जती पंचमस्वरें ॥
षट्पद बोलती झुंकारें ॥ आणि कपोतें कूजती ॥ ४ ॥
सदा सर्वदा पुष्पीं फळीं ॥ वृक्ष लवती भूमंडळीं ॥
जैसा कुळीन ऐश्वर्यकाळीं ॥ विनयें भजे सर्वांतें ॥ ५ ॥
चहूं वेदांचीं पारायणें ॥ अनेक शास्त्रांचीं अध्ययनें ॥
रम्य परिसोनि अंतःकरणें ॥ पापक्षयो भाविला ॥ ६ ॥
नदी मालिनी पवित्रजीवनी ॥ वाहे जैसी देवतटिनी ॥
तरंगलिंगें सुफेन सुमनीं ॥ सुपूजित शोभती ॥ ७ ॥

या उपवनांत, ईश्वरप्रातिप्रीत्यर्थ प्रयत्न करणारे अनेक मतांचे व अनेक सांप्रदायांचे ऋषी, आपापल्या मताप्रमाणें ईश्वराराधना करीत होते. खालील वेंच्यां-

वरून आमच्या सनातन धर्मांतील ईश्वरप्राप्तीच्या अनेक मार्गांचें वर्णन व एकाचा दुसऱ्याशीं असणारा मतभेद यांचें केवळ चित्रच दृष्टीस पडेल व त्यावरून मुक्तेश्वर महाराजांचा धार्मिक ग्रंथांचा व्यासंग मोठा दांडगा होता व ते धर्मविचार करीत असत हें ही दृष्टोत्पत्तीस येईल.

" तिच्या तटाकीं असंख्यात ॥ संशित व्रती वानप्रस्थ ॥
श्रौतस्मार्त विधिनिरत ॥ अनुष्ठानी तपस्वी ॥ १ ॥
याजकीं रचोनी होमशाळा ॥ होमकुंडीं प्रदीप्त अनळा ॥
हवि होमितां रविमंडळा ॥ धूम भेदिती हविर्गंधें ॥ २ ॥
द्वादशपंचाग्नी धूम्रपानें ॥ ग्रीष्मीं रविचक्रावलोकनें ॥
वर्षाकाळीं वृष्टी साहणें ॥ शीतकाळीं जलशय्या ॥ ३ ॥
एक उभे एकचरणीं ॥ एक वातांबुपर्णाशनी ॥
ऐशा तपोधनाच्या श्रेणी ॥ असंख्यात देखिल्या ॥ ४ ॥
सप्त कोटी महामंत्रें ॥ अनेक पात्रीं अनेक यंत्रें ॥
सांग मंत्रें चतुःषष्टि तंत्रें ॥ मंत्रोपासक पूजिती ॥ ५ ॥
एक मौनी, एक स्मरणी ॥ एक साकार मूर्तिध्यानी ॥
एक आत्मानुसंधानी ॥ 'सोऽहमस्मि' या बोधें ॥ ६ ॥
साही अंगें दशलक्षणें ॥ पाठक करिती वेदपठणें ॥
साम करिती सामगायनें ॥ अति सुस्वरें ते ठायीं ॥ ७ ॥
ते परिसोनी भाष्यकार ॥ म्हणती 'अर्थानुष्ठान थोर ॥
वृथा पठणाची करकर ॥ कंठशोषणा वाउगी ॥ ८ ॥
चार्वाक म्हणती शरीरात्मा ॥ एक प्रत्यक्ष प्रमाण प्रतिमा ॥
स्वर्ग नरक उभय भ्रमा—॥ भ्रमें नरक भोगवी ॥ ९ ॥
हें ऐकोनी नरेश्वर ॥ मुरारीभट्ट प्रभाकर ॥
मीमांसक म्हणती पामर ॥ कर्मचि मुख्य आचरिजे ॥ १० ॥
तंव आवेशें नैय्यायिक ॥ साहित्य उपासक वैशेषिक ॥
म्हणती " कर्ता ईश्वर एक ॥ कारणभूत जगातें " ॥ ११ ॥
सांख्य म्हणती 'सांगा युक्ति ॥ आदिकारण पुरुषप्रकृति ॥
त्यापासोन जगदुत्पत्ति ॥ शैवागम संमतें' ॥ १२ ॥

हांसोनि बोलिले वेदांति ॥ अवघे आंधळे सिद्धांति ॥
सर्व बिंब ऐसी स्मृति ॥ उपनिषदार्थ अनुवादे ॥ १३ ॥
परिणामवाद विवर्तवाद ॥ बिंब प्रतिबिंब जीवेश्वरवाद ॥
अन्वयव्यतिरेकाचे शब्द ॥ अनुगत व्यावृत संकेतें ॥ १४ ॥
मूळज्ञान तुळाज्ञानें ॥ एकीं अनेक जीवलक्षणें ॥
अनेकविद्या पक्षापक्ष हरणें ॥ ब्राह्मणांसह मुच्यते ॥ १५ ॥

असे हे नाना प्रकारच्या मतवाद्यांचे वाद व कोटिक्रम श्रवण करून राजाला मोठी मौज वाटली व त्यानें त्या सर्व ऋषींना समबुद्धीनें साष्टांग नमस्कार घातला. यथें कवीनें एका गूढ गोष्टीचा निकाल लाविला आहे, असें वाटतें. ह्मणजे सनातन धर्मांत, जरी अनेक धर्मपुस्तकें, अनेक देवता व ईश्वरप्राप्तीचे अनेक मार्ग सांगितलेले आहेत, तरी त्या सर्वांपासून होणारी फलप्राप्ति एकच आहे व निरनिराळ्या पंथांचे जरी अनेक लोक असले तरी त्यांची अभीष्ट वस्तु एकच असल्यामुळें, त्यांच्या योग्यायोग्यतेचा विचार करणें आवश्यक नाहीं, असें, दुष्यंत राजाकडून, वरील वेंच्यांत दिलेल्या अनेक मतवादी ऋषींस, एकभावें वंदन करवून, मुक्तेश्वरांनीं ध्वनित केलें आहे.

दुष्यंत राजा कण्वऋषीच्या आश्रमांत आल्यावर—

“मग गर्जोनि नराधीशें ॥ म्हणे “या आश्रमीं कोण असे ॥
हें परिसोनी इंदिरावेशें ॥ लावण्यकलिका साजिरी ॥ १ ॥
कनकलतिका सौदामिनी ॥ कीं चंद्रकला तनुधारिणी ॥
सुवर्ण केतकी पत्रवर्णी ॥ सुगंधखाणी हरिणाक्षी ॥ २ ॥
रूपयौवन चातुर्यभरिता ॥ बाहेर पातली मुनीश्वरदुहिता ॥
अत्यादरें धरित्रीकांता ॥ पवित्रासन ओपिलें ॥ ३ ॥
स्वागत पुसोनियां वचनीं ॥ अर्घ्यपाद्यादि पूजनीं ॥
राजा तोषवोनि बहुमानी ॥ कुशळ विचारी कुशळत्वें ॥ ४ ॥
“दर्शनें स्वानंद झाला नयना ॥ नाम अभिधान करावें श्रवणा ॥
परिचयज्ञानें अंतःकरणा ॥ अष्टभावें भेटणें” ॥ ५ ॥
ऐकोनि चातुर्याच्या गोष्टी ॥ राजा चमत्कारला पोटीं ॥
म्हणे ‘ हे वयें धाकुटी ॥ विचारवृद्ध दिसताहे ॥ ६ ॥

मग म्हणे " वो सुलक्षणे, ॥ गुणालये कमलेक्षणे ॥
तुझेनि वचनमात्रें क्षणें ॥ श्रम सर्वही हरपला ॥ ७ ॥
मैथुली नरेंद्रपुत्र जगतीं ॥ दुष्यंत राजा चक्रवर्ती ॥
ऐकिला असेल तरी हे मूर्ति ॥ ओळखीं दृष्टीं सुजाणे ॥ ८ ॥

वरील वेंच्यांतील ओंव्यांवरून, प्राचीनकालीं, अरण्यांत राहणाऱ्या ऋषिकन्या सुद्धां चांगल्या सुशिक्षित असून, वडील माणसें आश्रमांत नसतांना, कोणी पाहुणा आल्यास, आतांच्या अशिक्षित व फाजील लाजाळू स्त्रियांसारख्या मागील दारीं पळून न जातां, त्याचा योग्य शब्दांनीं आदरसत्कार करीत असत व त्याच्याशीं मोकळ्या मनानें संभाषण करीत असत असें दिसतें. कालिदासानें आपल्या शाकुंतलांतील कथानकांत, नाट्यरचनेस परिपोषक असा बराच फेरफार केलेला आहे व एकंदरींत तें नाटक जरी फार उत्तम झालें आहे, तरी त्यांतील कृत्रिम रचनेच्या माधुर्यानें वाचकांस व प्रेक्षकांस जो आनंद होतो तो आनंद, या मुक्तेश्वरांच्या दुष्यंतशकुंतलाख्यानांतील सहजोक्ति व सहज वर्णनें वाचून, सहृदय वाचकांस होईल यांत संदेह नाहीं.

नंतर, दुष्यंत राजानें विचारल्यावरून, शकुंतलेनें आपलें जन्मवृत्त त्यास निवेदन केल्यावर, तिच्या सौंदर्यास व शुद्धाचरणास मोहित होऊन—

" तैसा राजा अत्यादरें ॥ म्हणे " ऐकें मद्वाक्य चतुरे ! ॥
तुझ्या दर्शनें पंचशरें ॥ हृदयवर्मीं भेदिलें ॥ १ ॥
तेणें विकळ झाली शक्ति ॥ गात्रें चळचळां कांपती ॥
मूर्छित होवोनि पडतां क्षिती ॥ धैर्यें तनु सांवरिली ॥ २ ॥
मनोवैद्यें पाहोनि हात ॥ औषध कथिलें समीप येथ ॥
तुवां होऊनि कृपावंत ॥ उतार केला पाहिजे ॥ ३ ॥
देऊनियां अधरपान ॥ उपडीं हृदयींचा मदनबाण ॥
देवोनि दृढ आलिंगन ॥ संतप्त वपू हे निववावी ॥ ४ ॥

हीं नृपोक्ति श्रवण केल्यावर, शकुंतलेनें खालील वाक्पुष्पांनीं राजाची पूजा केली—

" धराधीशा ! स्वधर्मपाळा ॥ तुझिया शुद्ध यशाचळा ॥
कीर्तिशृंगें रविमंडळा ॥ भेदूनि गेलीं सुतेजें ॥ १ ॥

कुकर्मकुलिश घेऊनि हातीं ॥ अमर त्यातें छेदूं इच्छिती ॥
होऊं पाहसी, माझिये मती ॥ अयुक्त ऐसें दिसताहे ॥ २ ॥
अमृत म्हणोनि हाळाहळ ॥ प्राशिल्याचें कवण फळ ॥
बाळ म्हणोनि धरितां व्याळ ॥ अनर्थ वाजे रोकडा ॥ ३ ॥
आम्हां स्त्रियांची संगती ॥ भली नोहे गा मेदिनीपती ! ॥
मातल्या काम भद्रजाती ॥ विवेकांकुशें वळवावा ॥ ४ ॥

हे केवळ सोळा वर्षांच्या तरुणीचे उद्गार आहेत ! अशा भर तारुण्याच्या वेळीं, एकांतीं, तरुण पाहुण्याबरोबर, अशा प्रकारच्या उदात्त विचारांनीं भरलेलें भाषण ज्या शिक्षणानें शकुंतलेकडून करविलें, तें शिक्षण स्त्रियांनां जर आज मिळेल तर स्त्रीशिक्षणावर जे कित्येकांकडून आक्षेप घेण्यांत येतात ते कां येतील बरें ?

नंतर राजानें शकुंतलेस, गांधर्वविधीनें आपण लग्न करूं, असें सांगितल्यावर, ती विनयसंपन्न व चतुर ऋषिकन्या काय म्हणाली तें पहा:—

" कन्यादेह तंव निश्चिती ॥ दिधला पाहिजे पुरुषाहातीं ॥
विशेषें, तुजऐसा भूपती ॥ परमदैवें पाविजे ॥ १ ॥
तुझियाऐसी माझ्या चित्तीं ॥ वर्तताहे अत्यंत प्रीति ॥
परी वडिलां नेणतां हे रीती ॥ व्यभिचारधर्मीं लागतसे ॥ २ ॥
यालागीं नावेक धरीं धीर ॥ आश्रमा येईल ऋषीश्वर ॥
वचन मान्य करूनि अत्यादर ॥ मज ओपील तुज हातीं ॥ ३ ॥ "

शकुंतलेच्या सौंदर्याचें यथायोग्य वर्णन खालील ओंव्यांत दिलें आहे:—

" मंदहासिनी ! कुंददशने ॥ कर्पूरगर्भरंभाजघने, ॥
फळाहार वल्कलवसनें ॥ तुज अयोग्य काननीं ॥ १ ॥
शिरीषपुष्पसकुमारे ! ॥ कनकचंपकदामगौरे ! ॥
तिळतरुकुसुमनासाकारे ॥ धरीं सुपाणी निजकरें ॥ २ ॥
गंधर्वी अप्सरा मिश्रकेशी ॥ रंभा तिलोत्तमा उर्वशी ॥
तुज लावण्यमाणिक्यराशी ॥ तुळितां गुंजा तैसिया ॥ ३ ॥
सुकेशी चार्वंगी सुश्रेणी ॥ कंबुग्रीवा पीनस्तनी ॥
तुझिया ऐशी चौदा भुवनीं ॥ अंगना आन असेना ॥ ४ ॥

सप्त निगूढ रत्नवर्णें ॥ उन्नत नेटकीं साही स्थानें ॥
लक्षितां तुझीं शुभलक्षणें ॥ मन वेधलें, परतेना ॥ ५ ॥

खालील गांधर्व विवाहाचें रूपकालंकारात्मक वर्णन हृदयंगम आहे:—

" आतां पंचभूतें हृदयवासी ॥ पंचप्राण इंद्रियेंसी ॥
दोहीं मंडपीं दों प्रदेशीं ॥ आदिदैवत स्थापिलें ॥ १ ॥
सूर्य साक्षी काळ सुकाळे ॥ घटिका प्रतिष्ठिली सुवेळे ॥
चढों लागली पळोपळें ॥ प्रीतिजावनें भरिताहे ॥ २ ॥
नेपुरें कंकण झणत्कार ॥ योजिलासे वाद्यगजर ॥
संवाद तोचि मंगळमंत्र ॥ आरंभिला सौरसें ॥ ३ ॥
मर्यादा तोचि अंतःपट ॥ वाढवेळ धरिलासे बळकट ॥
ब्रम्हसूत्र लग्न वरिष्ठ ॥ अति समयो वर्तत ॥ ४ ॥
तोचि सारुनियां धीटपणें ॥ आवडी पुढारां सरकणें ॥
ऐक्यभावें ओपणें ॥ लग्न लावीं सुंदरी ॥ ५ ॥
सोलणें कांडणें पाक करणें ॥ शर्करा भक्षणीं न लगे जाणें ॥
तैसें सुगम गंधर्वलग्नें ॥ सुख भोगणें तात्काळ ॥ ६ ॥

यानंतर, राजा व शकुंतला यांचें गांधर्वविधीप्रमाणें लग्न झालें व शकुंतलेचा निरोप घेऊन राजा हस्तिनापुरास निघून गेल्यावर कण्वऋषी आश्रमांत आले. पुढील हकीकत मुक्तेश्वरांच्या वाणीनें सांगतों:—

" पुरुषसंगें शंकान्वित ॥ बाहेर नये लज्जाभरित ॥
हें देखोनि सर्वज्ञनाथ ॥ जाणता झाला मानसीं ॥ १ ॥
जामातकन्यामैथूनराहाटी ॥ ऋषीनें देखिलें ज्ञानदृष्टीं ॥
परमसंतोष मानूनि पोटीं ॥ आश्वासीत कुमारीतें ॥ २ ॥
म्हणे माझिये निजात्मजे ॥ बाहेर येईं सांडूनि लाजे ॥
कर्तव्य होतें पैं सहजें ॥ सिद्धी नेलें प्रारब्धें ॥ ३ ॥
जें झालें तें बहुत बरवें ॥ मान्य केलें माझिये जीवें ॥
कधीं न मिळे तें स्वभावें ॥ पूर्वदैवें जोडिलें " ॥ ४ ॥
ऐकोनि पित्याची अभयवाणी ॥ कन्या येवोनि लागली चरणीं ॥
म्हणे " त्यां वरिला भूपाळ गुणी ॥ तो त्वां मान्य करावा ॥ ५ ॥

कृपानुग्रह वरप्रसादें ॥ गौरवीं आशीर्वचन शब्दें ” ॥
ऋषी बोले परम आल्हादें ॥ “ चिरंजीव तव भर्ता ॥ ६ ॥
शचीसुरेशासारिखें ॥ दोघें असा अक्षय सुखें ॥
विष्णुशक्ती समान तुकें ॥ ऐसा पुत्र पावसी ॥ ७ ॥ ”

वरील ओंव्यांतील वत्सलरसाच्या पानानें कोणत्या रसिकाच्या चित्तवृत्ती वेडावून जाणार नाहींत ?

कण्व ऋषीचे पुढील विचार, सर्वांनीं, विशेषतः स्त्रियांनीं मनन करण्यासारखे आहेत:—

“ सुंदर प्रौढ समर्थ वनिता ॥ चिरकाळ पितृगृहीं वसतां ॥
लोकनिंदेच्या अर्वाचिता ॥ पाषाण पडे मस्तकीं ॥ १ ॥
हो कां उत्तमाची कुमरी ॥ बहु काळ वसतां माहेरीं ॥
उद्धत होय विहिताचारीं ॥ तोंहीं शब्द वडिलांतें ॥ २ ॥
माता पितरीं स्नेह कळवळा ॥ बहुकाळ समीप ठेवितां बाळा ॥
काजळ लावी पितयाच्या भाळा ॥ होय अपकीर्ति लौकिकीं ॥ ३ ॥
स्वयें नर्तन गायन ॥ गीत नृत्य अवलोकन ॥
शृंगार कामशास्त्र श्रवण ॥ हेंचि दूषण कुळवंते ॥ ४ ॥
परघर अटण, परघर वस्ती ॥ जार जारिणींची संगती ॥
एकट शय्या, एकट पंथीं ॥ हें कुलक्षण कुळवंते ॥ ५ ॥
क्षणक्षणा चंचलपणें ॥ निरोनिरिया सरसावणें ॥
कच्छ फेडणें घालणें ॥ हें कुलक्षण कुळवंते ॥ ६ ॥
हृदय दाऊनि घाली पदर ॥ पुरुष अवलोकूनि बाळगी हार ॥
परक्रियासीं एकांत विचार ॥ हें कुलक्षण कुळवंते ॥ ७ ॥
बहु हांसणें बहु बोलणें ॥ सदां हांसत गोष्टी करणें ॥
परत परतोनि पाहणें ॥ हें कुलक्षण कुळवंते ॥ ८ ॥
आणिका वर्णी, निंदी भर्ता ॥ पती त्यागूनि धांवे तीर्था ॥
पुरुष आव्हेरूनि, देवतां ॥ भजतां दूषण कुळवंते ॥ ९ ॥
उपेक्षूनि पती ईश्वरु ॥ आणिक महानुभव करी गुरु ॥
भजनीं लोक निंदेचा सोर ॥ मांज थोर अभिशाप ॥ १० ॥

यत्नें शर्करा ठेविजे जेथें ॥ परी पिपीलिका लागती तेथें ॥
विश्वासस्थलीं ठेवितां वनितें ॥ तेथेंचि विपरीत उद्भवे ॥ ११ ॥
शिखा स्वस्थानीं साजिरी ॥ भ्रतारगृहीं पवित्र नारी ॥
शोभा श्लाघ्यता मान्यता थोरी ॥ उभय लोकीं ते पावे ॥ १२ ॥

शकुंतला, आपला मुलगा भरत यासह हस्तिनापुरीं आली असतां दुष्यंतराजा तिचा अंगीकार करीना. त्यावेळीं शकुंतला क्रोधायमान होऊन ह्मणाली:—

" म्हणे धन्य गा पुरुषोत्तमा ॥ उत्तम ऐसेचि रक्षिती नेमा ॥
कर्मसाक्षी अंतरात्मा ॥ तृप्त झाला या वचनीं ॥ १ ॥
मना नेणतां नाहीं पाप ॥ वन्ही नेणतां कैंचा दीप ॥
जीवनेंवीण वाढलें रोप ॥ पृथ्वीवरी कोठूनी ॥ २ ॥
जाणोनियां होय अजाण ॥ परिचय असतां पुसे " कोण " ॥
हें तंव अधर्माचें लक्षण ॥ तुज उत्तमा अयोग्य ॥ ३ ॥
ईश्वर आणि जोडिलें पुण्य ॥ स्मरोनि बोलें यथार्थ वचन ॥
माझी साक्षी तुझेंचि मन ॥ तुझे अंतरीं देताहे ॥ ४ ॥
यथार्थ जाणतां अंतःकरणीं ॥ अन्यथा प्रतिपादी जो वचनीं ॥
तेणें कोणती पापकरणी ॥ केली नाहीं सांग पा ? ॥ ५ ॥
' मी एक जाणता सर्व सृष्टीं ' ॥ ऐसा अभिमान वाहसी पोटीं ॥
सकळ मूर्खांच्या शेवटीं ॥ कर्म करिसी त्यां तुल्य ॥ ६ ॥
पाप एकांतीं करूनि पाहीं ॥ म्हणती ' कोणें देखिलें नाहीं; ' ॥
इंद्रियदेवता आणि देही ॥ अंतर पुरुष पहातसे ॥ ७ ॥
समर्था देखतां जें करणें ॥ त्याप्रती पुढती " नाहीं " म्हणणें ॥
तेणेंचि दंड पाविज तेणें ॥ हें तंव प्रसिद्ध जाणसी ॥ ८ ॥
आदित्य वन्ही चंद्र पवन ॥ आकाश पृथ्वी आणि जीवन ॥
हृदय यम हे नव जाण ॥ वृत्त जाणती नराचें ॥ ९ ॥
उभय संध्या दिवस रजनी ॥ धर्मस्वरूप अंतःकरणीं ॥
शुभाशुभ राहटे प्राणी ॥ तितुकें दृष्टी देखती ॥ १० ॥
इतुकें जाणे आपुल्या वक्त्रीं ॥ प्रगट करितां जगाचे श्रोत्रीं ॥
चित्रगुप्ताचे लेखनपत्रीं ॥ साक्ष देऊनि लिहीती ॥ ११ ॥

वेव्हार न साधे साक्षीवीण ॥ ऐसें बोलती जन अज्ञान ॥
साक्षी परमात्मा आपण ॥ सत्याकडे निर्धारें ॥ १२ ॥
मोहोनि जार जारिणी दोघां ॥ एकांतीं जाऊनि न पुरे संगा ॥
तंव गृहमस्तकीं ठाकूनि उभा ॥ ढोल पिटोनी जाणवी ॥ १३ ॥
कर्मसाक्षी हृदयस्थ ॥ क्षेत्रज्ञ आत्मा चैतन्यनाथ ॥
ज्याचेनि सत्क्रिये संतोषयुक्त ॥ सत्य शौच स्वधर्में ॥ १४ ॥
त्यातें दयाळ दंडपाणी ॥ धर्मराज कर जोडोनी ॥
आज्ञा मागे " म्हणे प्राणी ॥ उद्धरीन तव आज्ञा " ॥ १५ ॥
आतां असत्य पर्वतातळा ॥ उभा न राहें कुंभिनीपाळा ! ॥
वर पडेल वज्रशिळा ॥ परम अकीर्तिदोषाची ॥ १६ ॥
मस्तक होईल सहस्रभाग ॥ यया बोला न म्हणें व्यंग ॥
न्याय बोलतां उद्वेग । विवेकिये न पावती ॥ १७ ॥
सकल ऐश्वर्य घेऊनी भेटी ॥ पद्मा पावल्या पायें लोटी ॥
तो सभाग्य कीं अभाग्य सृष्टीं ॥ काय लागे सांगणें ? ॥ १८ ॥
अदुष्टा सविनया पतिव्रता ॥ यौवनीं तीतें त्यागी भर्ता ॥
तैं सप्त जन्म भोगी व्यथा ॥ बाल वैधव्य स्त्रीदेहीं ॥ १९ ॥
अचल श्री, आरोग्य काया ॥ सुगुण पुत्र, पवित्र जाया ॥
बहु जन्में हरिहरांच्या पायां ॥ भजतां हें फळ पाविजे ॥ २० ॥
विवेकबुद्धि न सांडी हृदया ॥ सर्वांभूतीं अभेद दया, ॥
बहु जन्में हरिहरांच्या पायां ॥ भजतां हें फळ पाविजे ॥ २१ ॥
सत्य वसविलें वदनालया ॥ परस्त्री त्याग गुह्येंद्रिया ॥
बहु जन्में हरिहरांच्या पाया ॥ भजतां हें फळ पाविजे ॥ २२ ॥
अपत्याचे आशेनें देखा ॥ अंड न भेदी पिपीलिका ॥
अमूल्य पुत्र वैडुर्य माणिका ॥ ग्राहिक कां न होसी ? ॥ २३ ॥
' आत्मा वै पुत्र नामासि, ' ॥ आपण तोची पुत्रवेषीं ॥
जैसें दर्पण निजमुखासी ॥ आडनांव प्रतिबिंब ॥ २४ ॥
आतां शेवटिलिया वचना ॥ एकदां ऐकें नरभूषणा ! ॥
मीं जातसें काश्यपारण्या ॥ कण्वाश्रमा सखेद ॥ २५ ॥

यया आत्मजा आपुलिया ॥ आदरें अंगिकारावें राया, ॥
समर्थ नव्हेसि त्यागावया ॥ सत्यसत्य त्रिवाचा ॥ २६ ॥
याचिया कल्याण जन्मकाळीं ॥ वाचा झालीसे अंतराळीं ॥
सार्वभौम पृथ्वीतळीं ॥ अश्वमेध शतसंख्य ॥ २७ ॥
करील, अनेक महदाख्यानें ॥ वंशा जयाचेनि अभिधानें ॥
भारत ह्मणतील, पुराणें ॥ कीर्ति गातील ययाची ॥ २८ ॥
स्वर्गनायिकांमाजी श्रेष्ठ ॥ मेनिका नामें अतिवरिष्ठ ॥
तिच्या पोटीं तपोनिष्ठ ॥ विश्वामित्रऋषिवीर्यें ॥ २९ ॥
ब्रह्मयोनींत माझें जनन ॥ वंचूनि पिता सुहृज्जन ॥
तुज ओपिलें देहदान ॥ तें उत्तीर्ण झालासी ! ॥ ३० ॥

वरील उताऱ्यांतील शकुंतलेचें भाषण किती उदात्त विचारांनीं भरलेलें आहे ! सर्व लोकांनीं तिचे विचार आपल्या हृदयपटांवर लिहून ठेवण्याइतक्या योग्यतेचे असतां, मुद्दाम वेड पांघरलेल्या दुष्यंत राजाच्या मनावर त्यांचा कांहींच परिणाम झाला नाहीं. कवि ह्मणतात:—

" ऐसे शकुंतलेचे बोल ॥ रायें मानिले निरस फोल ॥
जैसा क्षपणक निरोधी झोल ॥ पिकल्या मधुमोहळाची ॥ १ ॥
चंपकपुष्पांचे सुवासशोभे ॥ भ्रमर न होइजे जेविं रोलंबें ॥
कोकनदांचीं चारु कदंबें ॥ कुंजर सारी परौतीं ॥ २ ॥
नाना वेदींचे विधिवाद ॥ चार्वाक ह्मणती सर्वाबद्ध ! ॥
उपनिषदाचा गुह्यार्थ भेद ॥ वादी जेवीं अव्हेरिती ॥ ३ ॥
तैसीं प्रियेचीं पवित्र वचनें ॥ दुष्यंतें दुषिलीं आपुल्या मनें ॥
म्हणे " हे बहुभाष कवणें ॥ जिंकिली न वचे बोलतां ॥ ४ ॥
मातला हस्ती, क्षोभला सर्प ॥ भ्रष्टला ब्राह्मण, पेटला दीप, ॥
अमर्याद स्त्रियांचा जल्प, ॥ आवरूं न शके विधाता ॥ ५ ॥
हीन जातीचिया लक्षणा ॥ आतां जाणवलें या मना ॥
मेनिका ते पण्यांगना ॥ धर्मनिषिद्ध बंधकी ॥ ६ ॥
नगरद्वारींचा दर्पण ॥ अवलोकितां निवारी कोण ! ॥
विद्यामठीं रोंविला सहाण ॥ काष्ट घांशी भलताची ॥ ७ ॥

भेरी मांडिली देऊळीं ॥ येतां जातां वडविजे सकळीं ॥
धर्मशाळेच्या उखळीं ॥ आवडे तेणें कांडावें ॥ ८ ॥
जीचे उदरीं तव उत्पत्ति ॥ तिची निवडिली ऐसी जाती ॥
ह्मणोनि 'खाण तैसी माती' ॥ आह्मणा लोकीं प्रसिद्ध ॥ ९ ॥
यालागीं बोलती वडील वृद्ध ॥ उभय कुळें पाहूनि शुद्ध ॥
कन्या पर्णावी प्रसिद्ध ॥ जेंवी पताका वंशासी ॥ १० ॥
क्षत्रियें घेतला ब्रह्मवेष ॥ हा कोण जातींचा विशेष ॥
शूद्र होवोनि परमहंस ॥ म्हणे, "मी श्रेष्ठ संन्यासी" ॥ ११ ॥
भोगूनि त्यागिती पुष्पमाळा ॥ तेंवि निर्माल्य शकुंतला ॥
शकुंतीं रक्षितां, स्नेहाळा ॥ श्रेय घडलें कण्वातें ॥ १२ ॥
गळीं पडोनि विषय स्वार्था ॥ संबंध लाविसी मज समर्था ॥
अविचारबुद्धि सांडूनि आतां ॥ जाईं स्वस्थळा आपुलिया ॥ १३ ॥

हीं राजमुखींची मुक्ताफळें कानीं पडतांच, महासती शकुंतला रागानें केवळ वेडी होऊन गेली;—

"मंत्रबीजाक्षरांच्या ओळी ॥ अबद्ध जपतां भद्रकाळी ॥
क्षोभे, तैसी क्रोधानळीं ॥ अंगार टाकी शब्दांचे ॥ १ ॥
पवित्र विश्वामित्र बाळा ॥ शकुंतला अलिकुंतला ॥
म्हणे "कुंतळ मंडळपाळा ! ॥ तूंचि अविचारें जल्पसी ॥ २ ॥
तूं तव भूचर विचरसी क्षिती ॥ पाहें माझी सख्यां प्रतीती ॥
श्रेष्ठा सावित्री गौरी पार्वती ॥ साक्षी आणीन या ठाया ॥ ३ ॥
अपरसृष्टीचा परमेष्ठी ॥ गाधिज मुनी निंदिसी दोषदृष्टी ॥
हें ऐकोनी काय श्रेष्ठीं ॥ श्रेष्ठ तूंतें ह्मणिजेल ? ॥ ४ ॥
मागें एकासि बोलिजे न्यून ॥ याहून अपराध तो कवण ? ॥
विशेष समर्थ तपोधन ॥ निंदितां, अनर्थ रोकडा ॥ ५ ॥
पराचे दोष न बोलता मुखीं ॥ तो मान्यता पावे उभय लोकीं ॥
विष्णुदूत त्या मस्तकीं ॥ वाहूनि नेती वैकुंठा ॥ ६ ॥
कुरूप न पाहे आरसीं वदन ॥ तोंवरी वाहे रूपाभिमान ॥
देखिल्या ह्मणे अपार जन ॥ रूपें विशेष मजहूनी ॥ ७ ॥

वृद्धासि करितां अभिवंदन ।। साधु होती सुखसंपन्न ।।
करूनि साधूचा अवमान ।। परम लाभ दुष्टातें ।। ८ ।।
दोष न देखती जे लोकीं ।। ते सर्वत्र सदा सुखी ।।
दोषदुःखें स्वयेंच दुःखी ।। दुःख देती पुढिलातें ।। ९ ।।
मुख्य साधूचें लक्षण ।। परदोष न वदे गेलिया प्राण ।।
पैशुन्य बोले कारणेंविण ।। तोची दुर्जन दुरात्मा ।। १० ।।
नरसिंहा! सोडोनि कपट ।। मांडिये बैसवीं कुमार श्रेष्ठ ।।
सत्व स्वधर्म करीं प्रकट ।। वडील वृद्धां देखतां ।। ११ ।।
अश्वमेध शतांचें पुण्य ।। एकीकडे सत्य वचन ।।
तुळितां सत्य आगळें जाण ।। मेरुसर्षप दृष्टांतें ।। १२ ।।
कोटी पुण्यें जोडिलीं यत्नीं ।। तीं जळती एके असत्य वचनीं ।।
जैसी पावकस्फुलिंगकणी ।। नाशी कर्पूरगिरीतें ।। १३ ।।
सत्यापरता नाहीं धर्म ।। सत्य तेंची परब्रह्म ।।
सत्यापाशीं पुरुषोत्तम ।। सर्वकाळ तिष्ठत ।। १४ ।।

क्रोधावेशांत वरील भाषण केल्यावर शकुंतलेच्यानें पुढें बोलवेना ! :—

भूलिंगासी अधोवदनें ।। गळत्या लाविल्या अश्रुजीवनें ।।
उष्णवास धूम्रवर्णें ।। तीव्र सांडी सकोप ।। १ ।।
तो अधरसुवासें घोळिला ।। परिमळ धूप समर्पिला ।।
खेद संताप उपजला ।। हृदयटवळा दीपकु ।। २ ।।
वाक्यपुष्पें पुष्पांजुळी ।। सत्य साक्षीनें राजमौळीं ।।
ओपितां तंव तेचि काळीं ।। अति आश्चर्य वर्तलें ।। ३ ।।
सत्य सत्य शूलपाणी ।। प्रगट झाला तत्क्षणीं ।।
ह्मणोनि अंतरिक्षवाणी ।। होती झाली ते ऐका ।। ४ ।।
"रे रे ! दुष्यंतराज नृपती ।। ह्मणी अवमानिसी हे सती ।।
हे कोपलिया सर्व जगती ।। जाळूं शके क्षणार्धें ।। ५ ।।

मुक्तेश्वरांच्या कवितेंतील लांबलचक उतारे येथें देण्याचें कारण असें कीं, आमची मराठी कविता केवळ भाषांतररूप आहे, त्यांत खरें कवित्व नाहीं, वगैरे आरोप

करणारांच्या दृष्टीस, वरील उताऱ्यांतील अर्थगांभीर्य, यथायोग्य शब्दयोजना, उदात्त विचार, हृदयंगम अलंकार व सर्वमान्य उपदेश, हीं पहून, त्यांचा गैरसमज दूर व्हावा.

खालील ओंव्यांतील शृंगाररसाचें वर्णन पहाः—

" वाजी वारण पदाती रथ ॥ ठायीं ठायीं उतरले वनांत ॥
ययाती पातला त्वरित ॥ शर्मिष्ठेच्या मंदिरा ॥ १ ॥
तीतें जाहला बहु आनंद ॥ नमिलें नृपतीचें पादारविंद ॥
सहस्र दासींचें वृंद ॥ नमस्कारी नृपातें ॥ २ ॥
उदक ठेविलें दासीजनीं ॥ शर्मिष्ठेनें स्वहस्तें करोनि ॥
नृपतीस अभ्यंग घालोनि ॥ क्षीरोदक नेसविला ॥ ३ ॥
षड्रस अन्नें निपजवून ॥ दिधलें रायासी भोजन ॥
दिव्य मंचकीं आरक्त सुमन ॥ वरी निजवी नरेंद्रा ॥ ४ ॥
वेळा कर्पूर सुगंधयुक्ता ॥ तांबुल अर्पी धरित्रीनाथा ॥
मग संतोषोनि अवलोकिता ॥ राजा वदन तियेचें ॥ ५ ॥
जैसी सुवर्ण चंपककळी ॥ कीं ओतिली मन्मथपुतळी ॥
अत्यंत तारुण्यभरें लवली ॥ परी विनत सुकुमार ॥ ६ ॥
विराजे राजवदनचांद्रिका ॥ भाळीं रेखिला कस्तुरी टिका ॥
आकर्णपर्यंत कज्जलरेखा ॥ नयन तेणें शोभती ॥ ७ ॥
दृढ बिल्व पीनस्तन ॥ वरी मुक्तजाळी विराजमान ॥
हृदयीं पदक दैदिप्यमान ॥ तेज फांके हृदयाब्जीं ॥ ८ ॥
करिशावकशुंडादंड ॥ तैसे सरळ भुजदंड ॥
कंकणें रुणझुणती प्रचंड ॥ मदनातें चेतवावया ॥ ९ ॥
हरिकटिवरी शोभे घटी ॥ उभी राहे सन्मुख गोरटी ॥
नृपासी व्यंकटदृष्टी ॥ लक्षीतसे वेल्हाळी ॥ १० ॥

वरील ओंव्या वाचून, एखाद्या नूतन परमहंसदीक्षाधारीची सुद्धां लटपट उडून जाईल, मग ययाती राजाची काय अवस्था झाली असेल हें काय सांगितलें पाहिजे? मुक्तेश्वराच्या अंगीं, जो जो रस घ्यावा तो तो अगदीं उत्तम प्रकारें खुलवून दाखवावा, अशी अद्भुत शक्ति होती आणि खरें कवित्व म्हणजे तरी हेंच होय कीं,

मनांत उत्पन्न झालेले निरनिराळे मनोविकार, शब्दांत इतके हुबेहुब उठवून द्यावयाचे कीं, ते शब्द वाचित असतां वाचकांच्या मनांत त्या त्या मनोविकारांचें केवळ काहूर उत्पन्न झालें पाहिजे, ह्मणजे कवीच्या व काव्यवाचकांच्या मनाची एकात्मता झाली पाहिजे व या दृष्टीनें पाहिल्यास, मराठी कवींत, मुक्तेश्वरांना बरेंच उच्च स्थान द्यावें लागेल यांत संशय नाहीं.

खालील ओंव्यांत स्वर्गलोकीं प्राप्त होणाऱ्या सुखाचें वर्णन देऊन, पदरीं असलेलें पुण्य संपून गेलें ह्मणजे प्राण्याची कशी स्थिति होते हें सांगितलें आहे:—

" शतयोजनें विस्तारें ॥ रत्नखचित सहस्रद्वारें ॥
जांबूनदाचीं कनकागारें ॥ भास्करोपम झळकती ॥ १ ॥
दिव्यांबरें दिव्याभरणें ॥ दिव्यगंधें तनुलेपनें ॥
दिव्य स्त्रियांचीं आलिंगनें ॥ भोगचुंबन सुरतादी ॥ २ ॥
कल्पद्रुम पारिजात ॥ कामधेनू असंख्यात ॥
चैत्यसोपानें सुमंडित ॥ चिद्रत्नीं बांधिले ॥ ३ ॥
अमृतफळें फळभक्षण ॥ अमृतरसाचें रसपान ॥
गंधर्व अप्सरा नृत्यगायन ॥ क्रीडा विहार पुष्पकीं ॥ ४ ॥
उच्चैःश्रवा ऐरावती ॥ विमान यांनीं स्वेच्छागति ॥
पूजा त्रिदशांचे हातीं ॥ ईश्वरातुल्य पावलों ॥ ५ ॥

परंतु पुढें काय ?

" सरली सुकृताची नव्हाळी ॥ ' घाला सत्वर स्वर्गातळीं ' ॥
ऐसें बोलतां तात्काळीं ॥ पडोनि आलों या ठाया ॥ १ ॥
जैसा मनुष्य लोकांत ॥ द्रव्य गेल्या दरिद्र प्राप्त ॥
ते वेळीं सोइरे समस्त ॥ अव्हेरिती सर्वस्वें ॥ २ ॥
तयाचि परी स्वर्गलोक ॥ पुण्य सरतां तात्काळिक ॥
लोटोनी सांडिती अधेमुख ॥ तें म्यां अंगें भोगिलें ॥ ३ ॥

प्रत्येक प्रापंचिकानें, खालीं दिलेली गृहस्थाश्रमाची व्याख्या, आपल्या हृत्पटलावर लिहून ठेवण्यासारखी आहे:—

" धर्मन्यायें धनाची प्राप्ति ॥ तेणें अर्ची देव अतिथी ॥
पराचा अर्थ न शिवे हातीं ॥ न देतां कां देतां ही ॥ १ ॥

स्वीकारी न्यायार्जित धन ॥ तत्वज्ञानीं निष्ठा पूर्ण ॥
अतिथींचें प्रेम गहन ॥ प्राणमित्रा सारिखें ॥ २ ॥
परोपकारीं कीं श्राद्धोद्देशें ॥ जोडिलें वेंची धन उल्हासें ॥
प्राणसंकटीं सायासें ॥ असत्य तोंडीं न बोले ॥ ३ ॥

कौरव आणि पांडव हे द्रोणाचार्यांच्या सान्निध्यांत, सर्व प्रकारच्या युद्धकलांत पारंगत झाले, तेव्हां धृतराष्ट्रानें मोठी सभा भरवून, सर्व मुलांची परीक्षा घेतली. त्या वेळीं कर्णाचें हस्तकौशल्य पाहून दुर्योधन फार खूप झाला. परंतु, कर्ण हा सारथ्याचा मुलगा असल्यामुळें इतर राजपुत्रांप्रमाणें, आपलें कुलगोत्र सांगण्याची त्यास शरम वाटूं लागली. त्यावेळीं:—

" हें देखोनि दुर्योधन ॥ गुरूसि बोले परिहारवचन ॥
त्रिविधयोगें श्रेष्ठपण ॥ पुरुषालागीं बोलिजे ॥ १ ॥
जाति कुळें नामाथिला ॥ तो एक श्रेष्ठत्वें मानिला ॥
एक विद्येनें पूज्य झाला ॥ सेनाबळें पैं एक ॥ २ ॥
धनुर्वेद विद्या गुरू ॥ उपमे कार्तवीर्य अपरू ॥
ऐसियाचा अनादरू ॥ केंवीं चतुरीं करावा ? ॥ ३ ॥
क्षात्रधर्मी आगळा सृष्टीं ॥ तो केविं पहावा हळवट दृष्टीं ॥
तुह्मां सुज्ञांच्या गोष्टी ॥ नवल वाटे ऐकतां ॥ ४ ॥

एवढें बोलूनच दुर्योधन राहिला नाहीं तर तत्क्षणीं त्यानें कर्णाला अंग देशाचें राज्य देऊन आपल्या बरोबरीचा राजा केलें. ही हकीकत, प्रेक्षक मंडळींत कर्णाचा बाप होता त्यास कळतांच तो कर्णासमीप आला त्या वेळीं कर्णानें:—

आर्द्रशीर बद्धपाणी ॥ भाळ ठेवी पितयाचरणीं ॥
येरें आलिंगितां नयनीं ॥ आनंदाश्रु लोटले ॥ १ ॥
अवघ्राण करितां मस्तक ॥ चक्षुघटीं स्रवलें उदक ॥
केला दुसरा अभिषेक ॥ ऐसें वाटे समस्तां ॥ २ ॥

परंतु, जरी दुर्योधनानें कर्णाला अंगदेशाधिपतित्व दिलें तरी त्याचा बाप सारथी आहे हें पाहून:—

" धीर न धरवे भीमसेना ॥ ह्मणे 'रे ! सूतान्विया नंदना ! ॥
वर्णोत्तम ऐसी संज्ञा ॥ आज कळली आमुतें ॥ १ ॥

चित्त न घालोनि क्षात्रधर्मीं ॥ हातीं धरोनि प्रतोदरश्मी ॥
दासभावें दासधर्मीं ॥ रथसारथ्य करावें ॥ २ ॥
अर्जुनासीं द्वंद्वयुद्ध ॥ करूं पाहसी बुद्धिमंद ॥
जेवीं कां डोळसासीं अंध ॥ पैज घाली लपावया ॥ ३ ॥
अंगदेश राज्यासनीं ॥ योग्य नव्हेसी अधमवर्णी ॥
श्वान जवळा महायज्ञीं ॥ पुरोडाश लाभेना ॥ ४ ॥

भर सभेंत, भीमसेनानें कर्णाचा असा पाणउतारा केलेला पाहून दुर्योधन म्हणतोः—

'सभेमाजी श्रेष्ठांनिकटीं ॥ कवणा काय बोलिजे गोष्टी ॥
जया न कळे तो या सृष्टीं ॥ मनुष्य म्हणतां लाजीजे ॥ १ ॥
शल्य होउनी पर अंतरीं ॥ शब्द राहे बहुकाळवरी ॥
ऐसें बोले तो निर्धारीं ॥ कीटकातुल्य जाणावा ॥ २ ॥
शूर नृपाळ नदी साधू ॥ यांचा न कीजे मूळ शोधू ॥
मूळ बोलतां निंदावादू ॥ कोण श्रेष्ठत्व पावला ? ॥ ३ ॥
उदकापासोनि झाला अनळ ॥ तेजें आलीं ब्रह्मांडगोळ ॥
दधीचीचे अस्थी तेजाळ ॥ वज्र भेदी पर्वता ॥ ४ ॥
द्रोणाचार्य गुरु आमुचा ॥ द्रोण कलशीं उद्भव त्याचा ॥
स्कंद आग्नेय कृत्तिकांचा ॥ रौद्र गांगेय बोलिजे ॥ ५ ॥
जगद्गुरु व्यास भगवान ॥ त्याचें उपजतें कवण स्थान ॥
तुम्हां कैसें झालें जनन ॥ तें कां हृदयीं नाठवा ? ॥ ६ ॥
दृष्टी न घालूनी पादपमूळीं ॥ सुमस्वाद पाहिजे फळीं ॥
कर्दम सांडूनि अलिकुळीं ॥ सुवास पद्मीं सेविजे ॥ ७ ॥
शरस्तंबीं गौतमवीर्यें ॥ देह धरिला कृपाचार्यें ॥
ब्राह्मणापासाव क्षत्रियें ॥ जन्मले ऐसें बोलती ॥ ८ ॥
अवलोकनें ज्याचिया दृष्टीं ॥ कुंजर मरती कोट्यानकोटी ॥
तो सिंह जन्मला मृगीचे पोटीं ॥ हें कैसेनीं घडे पां ? ॥ ९ ॥
असंख्य रोमाग्रीं गिरिवर ॥ धरोनि बांधी जो सागर ॥
तो हनुमंत वानरीकुमर ॥ हें काय शाते बोलती ? ॥ १० ॥

वरील भाषणावरून दुर्योधनाच्या अंगीं वक्तृत्वशक्ति चांगलीच होती असें वाटतें.

वरील भाषण करून दुर्योधनानें, भीमास, त्याच्या अप्रासंगिक कुटिलोक्तिबद्दल शासन करावें या हेतूनें आपल्या गदेस हात घातला. त्या वेळीं जिकडे तिकडे हाहाकार झाला. परंतु इतक्यांत—

" वरुणदिग्वधूचें वदन ॥ चुंबिता झाला सहस्त्रकिरण ॥
हें देखोनि अति उद्विग्न ॥ म्लानमुख पद्मिणी ॥ १ ॥
भ्रष्ट पुरुषाची जाती ॥ ऐसा विकल्प धरूनि चित्तीं ॥
चक्रवाकी आपुला पती ॥ त्यजूनि जाती परपारा ॥ २ ॥
पवित्र स्पर्शला देखोनि दोषा ॥ कलंकी उजळी आपुली दशा ॥
क्षुद्र पावतां संतोषा ॥ तेंवि तारा झळकती ॥ ३ ॥
गृहस्थ पडतां अनाचारीं ॥ झाला आश्रित दिवा चारी ॥
गाढनिद्रेच्या अंधारीं ॥ निजावया चालिले ॥ ४ ॥
समर्थ पावती तेजहाणी ॥ दूतिका गर्जती निंदावचनीं ॥
पंकोद्भव नीचयोनी ॥ हाणोनि कुमुदें हांसती ॥ ५ ॥

अशी स्थिति झाल्यामुळें तो भीमदुर्योधनगदायुद्धाचा महाप्रसंग टळला. वरील संध्याकालाचें वर्णन किती बहारीचें आहे बरें? एकंदरींत, हा सबंध अध्यायच फार उत्कृष्ट उतरला आहे. अशी रसाळ वाणी व इतकी उत्कृष्ट कविताशक्ति अंगीं असतां, मुक्तेश्वर किती विनयशील होते, हें खालील ओंवीवरून ध्यानांत येईल.

" मुक्तेश्वर विनवी संतां ॥ कृपाहस्त ठेऊनि माथां ॥
शिकवाल तशी बोलें कथा ॥ शुकसारिके सारिखा ॥ १ ॥

द्रोणाचार्य आणि द्रुपदराजा हे गुरुबंधु होते. एके दिवशीं द्रोणाचार्य, द्रुपदराजाकडे आपल्या मुलाकरितां एक गाय मागावयास गेले असतां, राजानें तुच्छतादर्शक भाषणें करून त्यांचा उपहास केला. त्यावेळीं द्रोणाचार्यांस फार वाईट वाटलें. नंतर ते कौरव—पांडवांचे गुरु झाल्यावर, आपल्या शिष्यांकडून द्रुपदराजाचा पराभव करवून त्याचा गर्व परिहार करावा या हेतूनें शंभर कौरव व पांच पांडव आणि त्यांचें सैन्य यांसह त्यांनीं द्रुपदाच्या नगरीवर हल्ला केला. त्या वेळीं कौरव व त्यांचें सैन्य अघाडीस असून द्रोणाचार्य व पांडव हे मागें होते. द्रुपदराजा, द्रोणाचार्यांचा गुरुबंधु, तोही मोठा योद्धा होता. त्यानें कौरवांची व त्यांचे सेनेची आपल्या शरभारानें कशी तिरपिट उडवून दिली हें खालील उताऱ्यावरून समजेल:—

शूरत्वाचेनि बळाभिमानें ॥ पांचाळ मानी जैसीं तृणें ॥
गजदळावरी पंचाननें ॥ धांविजे तैसा धांवत ॥ १ ॥
घनें घातली सातवाकुडी ॥ तैसी संधानक्रिया गाढी ॥
धनुष्य ओढावया ओढी ॥ वाव न साघे कौरवां ॥ २ ॥
भिन्न भिन्न शतसायका ॥ नेमूनि विंधिलें एकएका ॥
समोर यावया आवांका ॥ सहसा कोणा न घरवे ॥ ३ ॥
अग्निवेश गुरूची दीक्षा ॥ लक्षितां न लक्षवे लक्षा ॥
चोज वाटे मुख्यमुख्या ॥ कर्णादिकां मानसीं ॥ ४ ॥
द्रुपद ह्मणे कौरवांतें ॥ " द्रोणा समान मानूनि मातें ॥
धनुष्य ठेवूनियां हातें ॥ दंडवतें मज घाला ॥ ५ ॥
माझिया गुरुबंधूचे शिष्य ॥ ते मी मानी आपुले दास ॥
विद्या अपूर्ण ते विशेष ॥ मजपासाव अभ्यासा ॥ ६ ॥
द्रुपदाचें शरसंधान ॥ नागरिकांचें करताडण ॥
तेणें कौरवांचें सैन्य ॥ दाही दिशा भांगिलें ॥ ७ ॥
धृतराष्ट्राचे बलिष्ट तनुज ॥ राया दुर्योधनाचे अनुज ॥
पळतां देखोनि पांचाळराज ॥ टाळी पिटोनि हांसतसे ॥ ८ ॥
ह्मणे ' अंधबाळकें चक्षुहीनें ॥ सैरा पळती आड रानें ॥
हातीं धरूनि अभयदानें ॥ नीट वाटे लावणें ' ॥ ९ ॥
घाय वार लागले एका ॥ दीर्घ स्वरें मारिती हाका ॥
एक ह्मणती ' राखा राखा ॥ धांवा भीमा ! अर्जुना ! ॥ १० ॥

ही कौरवसैन्याची दुःस्थिति अवलोकन करितांच भीम व अर्जुन हे द्रोणाचार्यांस अभिवंदन करून, पांचाळावर चालून गेले, त्या वेळच्या भीमाच्या भीमकर्मांचें वर्णन—

" गदा घेऊनि उतावीळ ॥ पुढां धाविन्नला भीम सबळ ॥
जेंवीं मांडिल्या प्रळयकाळ ॥ दंडपाणी भूतांतें ॥ १ ॥
पादचारी रणवेताळ ॥ घोषें गर्जवी ब्रह्मांडगोळ ॥
वर वळला देखोनि विकळ ॥ रणोत्साह वीरांचा ॥ २ ॥
तिमिंगल निघे समुद्रजळीं ॥ तैसा भीम पांचाळदळीं ॥
बळें मिसळतां खळबळी ॥ सेना यज्ञसेनाची ॥ ३ ॥

असंख्यात कुंजर थाट ॥ स्रवती मदोदकाचे पाट ॥
त्यावरी उठावला बळिष्ठ ॥ गदाघायीं ताडित ॥ ४ ॥
कुंभस्थळापासूनि धरणीं ॥ रक्तप्रवाह ताम्रवर्णी ॥
मुक्ताफळांचिया श्रेणी ॥ उभयभागीं विखुरल्या ॥ ५ ॥
गदाघायीं कुंभस्थळें ॥ फुटती जैसीं सुपक्क फळें ॥
कीं मृद्‌घटपंक्ति लोहमुसळें ॥ जेंवि फुटती फटफटा ॥ ६ ॥
नागरीकें मानूनियां दीनें ॥ न मारिजेती भीमसेनें ॥
शब्दें वळिजेती गोधनें ॥ तेंवी ह्मणे ‘ परतारे ’ ॥ ७ ॥
अशुद्ध नदीचे खळखळाट ॥ पुसती सागराची वाट ॥
मार्ग दावावया नीट ॥ अपार प्रेतें चालिलीं ॥ ८ ॥

शेवटीं अर्जुनानें द्रुपदराजाचा पराभव करून, त्यास धरून द्रोणाचार्यांजवळ आणिलें. त्यावेळीं द्रोण व द्रुपद यांचें जें भाषण झालें तें अत्यंत चित्तवेधक असून त्यावरून मुक्तेश्वराची प्रतिभा व वक्तृत्व हीं चांगलीं व्यक्त होतात.

“ ह्मणे राया ! आशीर्वचन ॥ तूं भूपळ मीं ब्राह्मण ॥
तूं दाता सर्वसंपन्न ॥ दीन आह्मीं मागते ॥ १ ॥
अराजा मित्र नव्हे रायातें ॥ ऐसें बोलिलां तें यथार्थतें ॥
आतां जरी मानेल तूतें ॥ तरी मित्रत्व मानींकां ॥ २ ॥
द्रुपद ह्मणे ‘ द्रोणाचार्या ! ॥ करणें न लगे येथें आश्चर्या ॥
हारी अथवा जय ऐश्वर्या ॥ पुरुष पावे प्रारब्धें ॥ ३ ॥
काळें लाभ, काळें हाणि ॥ याचा विचार कायसा मनीं ? ॥
तोष लाभ परदूषणीं ॥ चित्त न घाली जाणता ॥ ४ ॥
अवगुणासी करणें गुण ॥ हें उत्तम पुरुषाचें लक्षण ॥
उचिता चुकला अज्ञान ॥ तें सज्ञान स्मरेना ॥ ५ ॥
दैवापुढें न चाले बळ ॥ ऐसें बोलती विवेककुशळ ॥
कुबेरसखा सर्वकाळ ॥ दैन्य भोगी शंकर ॥ ६ ॥
असो ‘ सुकृतबळोपायें ॥ समर्थ करिती काय नोहे ? ॥
तुजसारिखा इच्छिलें लाहे ॥ हें काय नवल सांगणें ? ॥ ७ ॥

दुर्योधनानें, पांडवांचा नाश करावा अशी दुर्बुद्धि धारण करून, पुरोचन नामक

एका सेवकाला, वारणावत नांवाच्या नगरींत लाक्षागृहाची रचना करून, त्यांत पांडवांस जाळून मारावें अशी आज्ञा दिली, त्यावेळीं त्या दुष्टबुद्धि पुरोचनास मोठाच आनंद झाला. कवि सांगतात:—

" ऐसीं दुर्योधनाचीं वचनें ॥ येरें झेलिलीं अंतःकरणें ॥
जेंवीं कां वांती होतां श्वानें ॥ त्वरें चाटून जाइजे ॥ १ ॥
माडवृक्षापासूनि देखा ॥ अळुमाळ स्रवती मद्योदका ॥
मद्यपानी ओढवी मुखा ॥ धावोनियां लगबगां ॥ २ ॥
आर्दीच शंखध्वनीचा उल्हास ॥ त्यावरी पातला फाल्गुनमास ॥
कीं व्यभिचारिया मल्याळ देश ॥ दैवयोगें लाधला ॥ ३ ॥
तेंवीं साधूंचा उच्छेद ॥ करावया दुर्जना अति आल्हाद ॥
मृगसमुदाय देखूनि व्याध ॥ हांव बांधी वधावया ॥ ४ ॥

वरील दृष्टांतबाहुल्य मूळ भारतांत नाहीं. तें मुक्तेश्वरांच्या पदरचें असून त्यांत त्यांचें प्राविण्य दिसून येतें. मुक्तेश्वरांनीं कथाभाग विशद व विशेष मनोरम करण्याकरितां आपल्या कल्पनाचातुर्यानें जेथें साध्या व व्यावहारिक दृष्टांतांचा उपयोग केला आहे अशीं स्थळें त्यांच्या भारतांत बहुत आहेत.

पांडव वारणावतास जाण्याकरितां निघाले त्या वेळीं, कौरवांचा दुष्ट हेतु सिद्धीस न जावा एतदर्थ विदूरांनीं त्यांस केलेला उपदेश प्रत्येकानें लक्ष्यांत ठेवण्यासारखा आहे

' प्रज्ञा ' शब्दार्थ ' संकेत जाणे ॥ तो ' प्राज्ञ ऐसें बोलती शहाणे ॥
पराची प्रज्ञा ओळखी मनें ॥ नीतिशास्त्री सोज्वळ ॥ १ ॥
लोहो नव्हे, परी अति तीक्ष्ण ॥ काळीज भेदोनि निवटी प्राण ॥
तें शस्त्र ओळखे, त्या मरण ॥ शत्रुपासाव असेना ॥ २ ॥
विवर गर्भीं असतां प्राणी ॥ अग्नि अथवा सूर्यकिरणीं ॥
दाहिला न वचे, सुजाणीं ॥ जाणितलें पाहिजे ॥ ३ ॥
मार्ग नोळखे चक्षुहीन ॥ न कळे दिशा केउती कोण ॥
अधैर्य पुरुषातें कल्याण ॥ उभय लोकीं असेना ॥ ४ ॥
सकामातें न साधे सिद्धि ॥ सुखा न पावे अशांत क्रोधी ॥
अधैर्यवंत ऐश्वर्यपदीं ॥ पावूं न शके सर्वथा ॥ ५ ॥

शत्रुसंबंधीं असावधान । आलस्य निद्रा अधैर्य पूर्ण ॥
तेणें आंवतुनियां मरण ॥ निजपालवीं बांधिलें ॥ ६ ॥
अमित्रमुखींचा शब्द सुरस ॥ तो विषकमळाचा सुवास ॥
आलिंगनीं भेदपाश ॥ अतुट कंठीं शिरकला ॥ ७ ॥
अन्नस्वरूपें काळकूट ॥ गृहस्वरूपें हव्यवाट ॥
द्यूतस्वरूपें पाशकपट ॥ उत्तरोत्तर जाणावें ॥ ८ ॥
मन राखोनि सावध वृत्ती ॥ हितोपदेश मानूनि चित्तीं ॥
आत्महिताचे गूढ पंथीं ॥ नित्याभ्यासीं वर्तावें ॥ ९ ॥
अहोरात्र अटण करिता ॥ तो रात्रींही न चुके पथा ॥
नक्षत्रज्ञानिया सर्वथा ॥ दिशाभुली न पडेची ॥ १० ॥
हृदयीं वर्तला वृत्तांत ॥ तो पंचप्राणांसींच विदित ॥
ज्ञाते आपुला गुह्यार्थ ॥ बाहेर प्रगटों नेदितां ॥ ११ ॥
ध्रुवमंडळ घालूनि पाठीं ॥ अगस्तिचक्र लक्षूनि दृष्टीं ॥
दक्षिण भेदितां जगजेठी ॥ विजयी झाला हनुमंत ॥ १२ ॥
श्रेष्ठ जाणती श्रेष्ठ खुण ॥ हृदयीं स्मरतां श्रीकृष्णचरण ॥
अपायकाळीं संकटहरण ॥ उपाय येती सामोरे ॥ १३ ॥
मानस धाडिजे कृष्णापासीं ॥ कृष्णचि ठेविजे मानसीं ॥
तेणें अरिष्टें भंगोनि आपैसीं ॥ उपाय येती सामोरे ॥ १४ ॥
बुडवितां बुडवूं न शके आप ॥ दंशकर्ते सर्प होती अकोप ॥
विषें मरतया अमूप ॥ अमृत जोडे प्राशनीं ॥ १५ ॥
गृहीं धडकल्या प्रळयाग्नी ॥ विवरमार्ग दे मेदिनी ॥
षडिंद्रियें चक्रपाणी ॥ सत्व रक्षी सातवा ॥ १६ ॥
एकटें वनामाजी पडतां ॥ धैर्य देउनी बुडवी व्यथा ॥
अपाय चिंती विष्णुभक्ता ॥ तोचि आधीं विनाशे ॥ १७ ॥
रात्रीं उमजे मार्गरेखा ॥ जळ लंघनीं सांपडे नौका ॥
आतुडतां राक्षसमुखा ॥ तेथें रक्षी श्रीविष्णु ॥ १८ ॥
संकटीं क्षमा विष्णुस्मरण ॥ तात्काळ त्यासी गुरुदर्शन ॥
गुरुदर्शनें समाधान ॥ आपदा वाटे संपदा ॥ १९ ॥

भंगोनि विघ्नाचा उमाळा ॥ विजय लक्ष्मी घाली माळा ॥
आत्मपदाचा सोहळा ॥ भगवद्भक्त पावती ॥ २० ॥
जाळितां न जळे दैत्यकुमर ॥ जाळितां न जळे हनुमान वीर ॥
गाई गोपाळांचा भार ॥ जळतां कोणें रक्षिला ? ॥ २१ ॥
तेंचि स्मरण धरितां पोटीं ॥ जगीं स्फुरली चातुर्य गोष्टी ॥
मेघःशाम असतां पाठीं ॥ ताप संताप असेना ॥ २२ ॥

यानंतर पांडव वारणावत नगरींत, लाक्षागृहांत जाऊन राहिले. तेथें तो दुष्ट पुरोचन, यांस गोड गोड भाषणें बोलून मोठा विश्वास दाखवीत असे. परंतु त्याचा पांडवांचा नाश करण्याचा हेतु धर्मराजास ठाऊक असल्यामुळें तो पुरोचनाच्या भाषणावर बिलकुल विश्वास ठेवीत नसे. पुरोचनाच्या कपटी गोड भाषणावर मुक्तेश्वरांनीं योजिलेले खालील दृष्टांत किती समर्पक आहेत पहा:—

" दांभिक भजनाचा पसारा ॥ आदर उपजवी नारीनरां ॥
अंतरीं दोषाचा थारा ॥ तो एक जाणे ईश्वर ॥ १ ॥
जेवीं मंदाचा पवित्राचार ॥ प्रगट दिसे अतिसुंदर ॥
कीं वेश्येचा मुखशृंगार ॥ भुली पाडी कामिकां ॥ २ ॥
बचनागाची कांडी गुळगुळी ॥ सर्पा अंगींची मवाळी ॥
खदिरांगाराची सोज्वळी ॥ रत्नमाळा आभासे ॥ ३ ॥
व्याघ्र दयाशीळ लोकीं ॥ धेनु कुरवाळी निजनखीं ॥
फणाग्रीं वाहूनि उदकीं ॥ सर्प खेळवी बेडुका ॥ ४ ॥
सर्वे चोराची निर्लोभसेवा ॥ जाणता विश्वास नुपजवी जिवा ॥
तेवि तें गृह देखोनि पांडवा ॥ गोड न वाटे मानसीं ॥ ५ ॥

त्या लाक्षागृहांत पांडवांनीं एकवर्षपर्यंत वास केल्यावर कृष्णचतुर्दशीच्या रात्रीं पांडव निद्रित असतां, लाक्षागृहास अग्नि लावून त्यांचा समूळ नाश करावा अशी दुर्योधनानें पुरोचनास आज्ञा केली. परंतु ही गोष्ट विदुरानें पांडवांस पूर्वींच कळविल्यामुळें दुर्योधनाचा हेतु सिद्धीस न जातां, पांडव त्याच रात्रीं लाक्षागृहास अग्नि लावून विवरद्वारानें दुसरीकडे गेले व त्या दुष्ट पुरोचनाचा व त्या दिवशीं तेथें वस्तीस राहिलेल्या निषादीचा तिच्या पांच पुत्रांसह नाश झाला. तेथून पांडव

विवरद्वारानें एका मोठ्या अरण्यांत आले. त्या वेळच्या भयानक देखाव्याचें वर्णन वाचून अंगावर शहारे उभे राहतातः—

" भीमसेन पाहे दृष्टी ॥ तव अंधकारें कोंदली सृष्टी ॥
गुल्मलता वृक्षदाटी ॥ तृणें मार्ग लक्षेना ॥ १ ॥
निशाचरी श्वापद पक्षी ॥ थोर गर्जना करिती कक्षीं ॥
ओळकंबलीं महावृक्षीं ॥ अस्वलें आणि वाघुळें ॥ २ ॥
वनदेवता यक्षिणीपाळें ॥ धुमस घालिती गदारोळें ॥
दीपिका लावूनि भंबाळें ॥ गुत होती एकसरां ॥ ३ ॥
प्रेतगण स्मशानवासी ॥ रूपें धरूनि भ्यासुर वेषीं ॥
छळिती अशुचि मानवांसी ॥ झोंबती मांस भक्षावया ॥ ४ ॥
दिवाभितांचे घुंघाट ॥ पिंगळियांचे किलकिलाट ॥
भालू भुंकती सैराट ॥ टिटवे थोर टिवटिवती ॥ ५ ॥
चक्रवाकांचे आर्तस्वरीं ॥ कुमुदीं भ्रमरांचे झुंकारीं ॥
मरतकमणी तेज विखरीं ॥ जीव आहारा शोधिती ॥ ६ ॥
चारिया निघोनि निधानें ॥ धगधगीत प्रकाशमाने ॥
ईश्वरकृपेस्तव पूर्वपुण्यें ॥ येवों ह्मणती सभाग्या ॥ ७ ॥
असो, हे निशा दाटली काळी ॥ जेवी काळपुरुषाची कांबळी ॥
ब्रह्मांड देवतेवरी सगळी ॥ पांघुरविली आतत्वें ॥ ८ ॥

वरील निशाकालिक भीषण देखाव्याचें वर्णन वाचून, मुक्तेश्वरांच्या अंगीं खरी कविताशक्ति नव्हती असें कोण ह्मणेल? शेवटच्या ओवींतील उत्प्रेक्षा किती सरस आहे!

आतां उषःकालाच्या वर्णनाचा मासला पहाः—

" शेष वेंचतां अठरा घटिका ॥ पूर्व दिशेनें क्षाळिलें मुखा ॥
कुंकुम रेखिलें त्या तिलका ॥ अरुणोदय बोलिजे ॥ १ ॥
भार्गवाचार्य उदया येत ॥ तंव अपार क्रमूनियां पंथ ॥
पुढें जान्हवीजळाचा वात ॥ शीतळ मंद पातला ॥ २ ॥
हस्त आवरितां कुमुदीं ॥ अवमान मानिला षट्पदीं ॥
त्यांतें आदरें कोकनदीं ॥ पाचारिलें जवळिके ॥ ३ ॥

कुक्कुट रव करितां काका ॥ भयें पळ सुटला उलूकां ॥
भोग द्यावया चक्रवाकां ॥ चक्रवाकी चालिल्या ॥ ४ ॥
गाढालिंगनें पडली गांठी ॥ सोडितां दंपत्यें होती कष्टी ॥
वस्त्रें वेढिती परी पोटीं ॥ अपूर्ण कामें जळजळ ॥ ५ ॥
स्वैरिणी सांडोनी सखयातें ॥ दूतीसहित त्वरें बहुतें ॥
गृहा येऊनि स्वकर्मातें ॥ संपादिती लौकिका ॥ ६ ॥
वेश्यागारा सोडूनी विट ॥ लोकाचारा भिनले निकट ॥
वामी कौळिक धूर्त शठ ॥ वेष घेती शिष्टांचे ॥ ७ ॥
तस्करीं सांडिलें तस्करकार्या ॥ अभिचारिकीं कौटाळक्रिया ॥
जारण मारण मोहन यया ॥ प्रेतपूजा स्मशानीं ॥ ८ ॥
घेऊनि अंधकाराची बुंथी ॥ चंद्र स्वेच्छा भोगी जगती ॥
प्रकाश वेढोनि सूर्याप्रती ॥ ह्मणे मी शुद्ध पतिव्रता ॥ ९ ॥
भोग भोगूनि सांडिले राजे ॥ नूतनातें उपजवी लाजे ॥
भ्रम घालूनि ह्मणे माझें ॥ असे ऐश्वर्य अक्षयी ॥ १० ॥
गगनसमुद्रीं मुक्ताफळें ॥ अरुणचंचुनें कनकमराळें ॥
वेंचूनि घेतां कळाकुशळें ॥ नाहींच केलीं नक्षत्रें ॥ ११ ॥
कीं व्योमनर्मदेमाजीं थोर ॥ कार्तवीर्य सहस्रकर ॥
तारा बाणलिंगांचा भार ॥ निवटोनि करी परौता ॥ १२ ॥
कापडी चालिले तीर्थपंथें ॥ ‘ सोऽहमस्मि ’ चिंतिती ज्ञाते ॥
भक्त स्मरती हरिहरांतें ॥ प्रेमभावें आवडी ॥ १३ ॥
शाक्त चिंतिती शक्तिप्रतिमा ॥ सौर ह्मणती सूर्यचि आत्मा ॥
गाणपत्य गणेशमहिमा ॥ वाखाणिती ब्रह्मत्वें ॥ १४ ॥
प्रातर्होम द्यावया जाणा ॥ अग्निहोत्री उठले स्नाना ॥
एक सिद्ध झाले अनुष्ठाना ॥ जपी तपी सुनेमें ॥ १५ ॥

वरील वर्णनासंबंधानें कै. वामन दाजी ओक ह्मणतात, हें अरुणोदयाचें व[...] मुक्तेश्वराच्या पदरचेंच आहे. यांत मुक्तेश्वराचें सृष्टिवर्णनकौशल्य समुज्वलित [...] आहे. या अरुणोदयवर्णनांत जें कांहीं मनोरम आणि हृदयंगम असें आहे तें [...] कविप्रतिभेचें फळ होय.

लाक्षागृह जळून गेल्यावर, वारणावतांतील नागरिक जनांनीं, पांडव दग्ध झाले असें समजून, धृतराष्ट्रास खालील निरोप पाठविला:—

' पांडव जळाले जातुपालयीं ॥ कृतकृत्यता मानूनि हृदयीं ॥
धृतराष्ट्रा ! सुखी होई ॥ शल्य तुटलें ह्मणोनी ॥ १ ॥
सोमसूर्य गगनसूत्रीं ॥ फिरती तोंवरी पुत्रपौत्रीं ॥
भोगींत राहे धरित्री ॥ काळसर्पासारिखा ॥ २ ॥
पांडव दग्धले तुमचे यत्नें ॥ पुरोचन नेणों कोणे कारणें ॥
ऐसी वार्ता ऐकतां जनें ॥ हस्तिनापुरीं आक्रांत ॥ ३ ॥
पुत्रनिधन पडतां श्रवणीं ॥ हाहा शब्द करूनि वदनीं ॥
प्रज्ञाचक्षु पडला धरणीं ॥ हृदय हस्तें पिटीत ॥ ४ ॥
ह्मणे प्रिय प्राणापरता ॥ पांडु माझा सहोदरभ्राता ॥
आजि निमाला ऐसा चित्ता ॥ खेद वाटे अपार ॥ ५ ॥
अवलोकोनि हे पांडव ॥ बंधुवियोग शोकार्णव ॥
प्राशून झाला कुंभोद्भव ॥ वज्रहृदयी पापात्मा ॥ ६ ॥
सेखीं पांचही कुळदीपक ॥ अस्ता पावले जेंवी अर्क ॥
शून्य पडले तीन्ही लोक ॥ तैसें आजी मज वाटे ॥ ७ ॥
भीष्म द्रोण कृप बाल्हिक ॥ शोकें स्पर्शले एकएक ॥
दुर्योधनादि करिती शोक ॥ सत्य मिथ्या नेणोन ॥ ८ ॥
सकळ प्रजा करिती रोदन ॥ ह्मणती पांडव पंचप्राण ॥
गेले यास्तव दुःख दारुण ॥ मरणातुल्य आमुतें ॥ ९ ॥
दुर्योधनादि कृत्रिम क्लेशें ॥ ह्मणती, ' विदुरा ! झालें कैसें ? ॥
येरू विलपे, कांहीं हांसे ॥ ह्मणे नश्वर सर्वही ॥ १० ॥
' नवल नव्हे नृपाळा ! ॥ काय काय देखणें पडे डोळां ॥
ईश्वरेच्छा अलोट काळा ॥ नये सहसा विश्वासों. ॥ ११ ॥
एका आधीं एकावाटीं ॥ प्रत्यक्ष नाश देखिजे दृष्टीं ॥
हे मृत्युलोकींची राहाटी ॥ कोण अक्षयी उरलासे ? ॥ १२ ॥
गेलें अंतवंत ह्मणावें ॥ दिसतें साच केंवि मानावें ? ॥
संसारस्वप्नींचे राणिवे ॥ भुलों नये सर्वथा " ॥ १३ ॥

वरील ओंव्यांतील धृतराष्ट्राचे सरळ दुःखोद्गार, प्रजाजनांचें पांडवांवरील प्रेम, दुर्योधनादि दुष्टांचें कपटक्लेशप्रदर्शन इत्यादिकांचें वर्णन व विदुराचे सृष्टीच्या रह्राटीसंबंधाचे समर्पक उद्गार, हीं किती उत्तमप्रकारें ग्रथित झालीं आहेत बरें ?

इकडे पांडव अरण्यांतून मार्गक्रमण करीत असतां, धर्म, अर्जुन, नकुळ, कुंति व सहदेव हीं श्रमानें अगदीं थकून गेलीं, असें पाहून भीमसेनानें त्यांस तृणशेजेवर निजविलें व आपण उदकपानार्थ निघून गेला. कांहीं वेळानें येऊन पाहतो तों सर्वांस गाढ झोंप लागली होती. त्यावेळीं भीमाच्या तोंडून सहजगत्या निघालेले खालील उद्गार वाचून सहृदय वाचकांच्या डोळ्यांतून अश्रुपात झाल्याविना राहणार नाहीं:—

" ह्मणे ' विधातिया मूर्खा ! ॥ काय रेखिली कर्मरेखा ? ॥
आह्मांऐशा अभाग्यपुरुषां ॥ काय ह्मणोनी निर्मिलें ? ॥ १ ॥
कुंतिभोजाची नंदिनी ॥ वसुदेवाची पवित्र भगिनी ॥
राया पांडूची वीरपत्नी ॥ स्नुषा विचित्रवीर्याची ॥ २ ॥
आह्मां पापिष्ठांची माता ॥ जैंवी दीन भणगाची कांता ॥
भूतळीं लोळे प्रेता—॥ तुल्य दिसे मज दृष्टीं ॥ ३ ॥
सत्यशीळ पवित्र परम ॥ पुण्यश्लोकांमाजी उत्तम ॥
धर्मस्वरूप राजा धर्म ॥ कर्म भोगी केवढें ? ॥ ४ ॥
ज्याचिये उपमें त्रिजगतीं ॥ भार्गवराम कीं दाशरथी ॥
तोहा अर्जुन वीर क्षीतीं ॥ लोळे रंकासारिखा ॥ ५ ॥
ज्यांचिया रूपा वेधोनि पुढती ॥ देवांगना न लाविती पातीं ॥
चातुर्या लाजोनि सरस्वती ॥ पांडुरवर्ण विवर्णा ॥ ६ ॥
ते हे माद्रीकुमर दोन्ही ॥ अतिसुकुमार सर्वगुणी ॥
स्यमंत आणि कौस्तुभ मणी ॥ जैंवि कां धुळीनें लेपिले ॥ ७ ॥
याहीपरतें थोर दुःख ॥ भोगिलें आणि भोगिती लोक ॥
परि हें सर्वथा न घडे देख ॥ एका पांडवांवेगळें ॥ ८ ॥
विश्ववनिता हो ! पवित्र ॥ पोटीं प्रसवावा सभाग्यपुत्र ॥
रूपविद्याबळपात्र ॥ काज नाहीं ययाचें ॥ ९ ॥

रूप विद्या बळ वरिष्ठ ॥ त्या आह्मां पांडवां ऐसी वाट ॥
इतर मानवांतें कष्ट ॥ काय होतां कळे ना ॥ १० ॥
भाग्यरेखा नसतां भाळीं ॥ वंध्या विद्याकळा सकळी ॥
जैसीं प्राणेवीण मोकळीं ॥ काय करावीं इंद्रियें ? ॥ ११ ॥

भीम हा अगदीं मंदबुद्धि होता, असा समज आहे; परंतु मुक्तेश्वरांनीं त्याच्या तोंडीं घातलेल्या वरील भाषणामुळें, त्याची योग्यता मोठी असावी, असें वाटूं लागतें.

हिडिंबी राक्षसी, भीमसेनास घेऊनः—

" गुहागव्हरीं पर्वतमौनीं ॥ नाना रमणीक वनस्थळीं ॥
नदीपुलिनीं गंगाजळीं ॥ क्रीडा करी मनेच्छा ॥ १ ॥
द्रोणाचळीं चंद्राचळीं ॥ मंदराचळीं विंध्याचळीं ॥
मलयाचळीं हिमाचळीं ॥ सुखसंमेळीं क्रीडती ॥ २ ॥
कनकमेरूचे रत्नशिखरीं ॥ शीतळ हिमालय परिसरीं ॥
रजताचळाचे पाठारीं ॥ सुरतोपचारीं क्रीडती ॥ ३ ॥
सोमकांत शीतळ तळीं ॥ सूर्यकांत काश्मीराचळीं ॥
हेमभूमिके रत्नस्थळीं ॥ सुखसमेळीं क्रीडती ॥ ४ ॥
कर्पूर कर्दळींचे वनीं ॥ कुंकुम केशर उद्भवस्थानीं ॥
सुरतानंदें क्रीडती दोन्हीं ॥ मद्यपानीं मनइच्छा ॥ ५ ॥
मानस सरोवर हंस तडागीं ॥ सुवर्ण पंकज वनपरागीं ॥
प्रवाळ वल्लीच्या सुरंगीं ॥ सुखसंभोगीं क्रीडती ॥ ६ ॥

वरील वर्णनासंबंधानें के० ओक ह्मणतातः—' या विस्तृत वर्णनास मूळांत फारसा आधार नाहीं. हें मनोहर वर्णन मुक्तेश्वरानें प्रसंग मनांत आणून योजिलें आहे. मुक्तेश्वराचा वर्णनविस्तार मधून मधून बाणभट्टासारखा भासमान होतो, असें मार्मिक वाचकांस दिसून येईल.

खालील रूपक किती मनोहर आहे पहा.

" इति श्रीभारते आदिपर्वणी ॥ व्यासोक्ति तेच मंदाकिनी ॥
वैशंपायन ओघजनी ॥ मित्रात्मजा जाणिजे ॥ १ ॥
अर्थगुप्त सरस्वती सुंदर ॥ तो स्वामी लीलाविश्वंभर ॥
भरतां त्रिवेणी ओघ परिकर ॥ अक्षय्यवट जनमेजया ॥ २ ॥

श्रवणतीर्थीं तीर्थ विधान ॥ सांगता तीर्थ उपाध्या ब्राह्मण ॥
मुक्तेश्वर परमदीन ॥ कीं तो किंकर संतांचा ॥ ३ ॥

मुक्तेश्वरांच्या अपन्हुति अलंकाराचें उदाहरण पहा:–

" चंद्रप्रकाशें अर्धरात्रीं ॥ चालतां लोटलीं पथधात्री ॥
चंद्रअस्त झालिया नेत्रीं ॥ अंधकार दाटला ॥ १ ॥
रत्न झांकणें समुद्रीं पडिलें ॥ ब्रह्मांड करंडां काजळ भरिलें ॥
विश्वलोचनीं भरोनि उरलें ॥ अपरिमित दशदिशा ॥ २ ॥
माया मोह निबिड जाण ॥ अंध होती जगाचे नयन ॥
योगी लेऊन ज्ञानांजन ॥ निघती गिधानें साधावया ॥ ३ ॥
कीं निशा नव्हे ते भद्रकाळीं ॥ पूजिली नक्षत्र मुक्ताफळीं ॥
आरती उजळावया करतळीं ॥ दीप अर्जुनें लाविला ॥ ४ ॥

द्रौपदीस्वयंवरवर्णनप्रसंगीं, मुक्तेश्वर ह्मणतात:—

" प्राकृत कवींचा वाग्जल्प ॥ तैल कढईंत पाहुनि रूप ॥
फिरतां मत्स्य सकंप ॥ वामनेत्रीं विंधिला ॥ १ ॥
परी तें मूळ भारतीं नाहीं ॥ ह्मणोनि असो न बोलों कांहीं ॥
नळिका छिद्रांतूनि पाहीं ॥ यंत्र भेदोनि पाडिलें ॥ २ ॥

यावरून मुक्तेश्वरांनीं आपल्यापूर्वीं होऊन गेलेल्या प्राकृत कविजनाच्या अवलोकन केलें होतें असें वाटतें. मुक्तेश्वरांपूर्वीं महाभारतावर कोणकोणत्या कवींनीं ग्रंथ रचना केली आहे, हें याच लेखांत पूर्वीं सांगितलेंच आहे. तसेंच ते म ग्रंथ नीट पाहून काव्यरचना करीत असत असाही तर्क करण्यास हें स्थल चांगलें आहे. वरील उद्गार काढून इतर कवींस दोष दिल्याबद्दल रा. भिडे यांनीं मुक्ते दोष दिला आहे. पण माझ्यामतें तो व्यर्थ होय. कारण कीं, निरनिराळ्या भा पोथ्यांत निरनिराळे कथाभाग दिले आहेत, हें मुक्तेश्वरांस ठाऊक असणें शक्य आपल्यापाशीं असलेल्या पोथींत नाहींत असे कथाभाग दुसऱ्यांनीं वर्णिलेले पा त्यांनीं स्वतःच रचून घातले असावे, असें कोणासही वाटणें साहाजिक आहे.

द्रौपदी पांच पांडवांची भार्या झाली हें ऐकतांच कौरवांस किती वाईट वाटलें

" द्रुपदें दीधलें बहु आंदण ॥ कृष्णें धाडिलें उपायन ॥
हें ऐकोनि दुर्योधन ॥ हृदय पिटी हस्तकें ॥ १ ॥

कर्ण झाला अति विवर्ण ॥ ह्मणे हें विधीचें करणें कोण ? ॥
शकुनी ह्मणे गेला प्राण ॥ आलें मरण रोकडें ॥ २ ॥
दुःशासन मोकली धाय ॥ ह्मणे गेले हात पाय ॥
आतां विचार करणें काय ॥ तो तात्काळचि विचारा ॥ ३ ॥

मग पांडवांचें निर्मूलन करण्याच्या हेतूनें, कौरव पांचाळपुरावर चालून गेले, त्या प्रसंगाचें वर्णन पहाः—

" चालिले कौरव दळभार ॥ जेवीं माजला जळसागर ॥
बुडवावया पांचाळपूर ॥ करिती भयासुर गर्जना ॥ १ ॥
कर्ण महापुराचा लोट ॥ शल्य तो महा उर्मींचा संघाट ॥
दुःशासनादि परम नष्ट ॥ मत्स्य सैरा तळपती ॥ २ ॥
दुर्योधन महाग्राहो ॥ शकुनि आवर्त भोंवे पहा हो ! ॥
ऐसा महार्णवाचा प्रवाहो ॥ पांचाळपुरा प्रगटला ॥ ३ ॥
बांधिला मथिला वरी लंघिला ॥ एकें प्राशूनि निर्मूळ केला ॥
तरी निर्लज्ज गर्वाथिला ॥ गर्जना करितो जलनिधि ॥ ४ ॥
तेवीं पांडवहस्तीं सकळ ॥ अवमान पावले बहुत वेळ ॥
तरी गर्वाचा गोंधळ ॥ घालीत आले युद्धार्थी ॥ ५ ॥

परंतु पांडवपांचाळांसारख्या महायोद्ध्यांपुढें त्यांचें काय चालणार ? कवि म्हणतोः

" पांडवप्रताप पुरुष तरणा ॥ नववधू कौरवसेना ॥
शृंगारिली परी संघट्टना ॥ युद्धसुरता न थारवे ! ॥ १ ॥
गळालें अभिमानाचें वास ॥ अधैर्याचे मोकळे केस ॥
रणशय्यासनीं त्रास ॥ पावोनियां पळाली ॥ २ ॥
कर्णसैंधव पयोधर पीन ॥ मर्दितां झाले आरक्तवर्ण ॥
शकुनी कंचुकी आवरण ॥ पडिलें कोठें नेणवे ! ॥ ३ ॥
शस्त्रधारा तीक्ष्ण दांतीं ॥ चुंबितां मुख आंतलें क्षितीं ॥
झाली रूपाची उपहती ॥ कौरवसेनावधूची ॥ ४ ॥

वरील रूपकालंकार किती हृदयंगम आहे (!) इतर मराठी कवींच्या काव्यांत असलीं मनोरम स्थळें कितीशीं मिळतील बरें ?

खालील विदुरोक्ति वाचनीय आहेः—

" ऐकोनि कर्णाचें उत्तर ॥ विदूर बोले न्यायनिष्ठुर ॥
दुष्ट नष्टाचा विचार ॥ ऐसिया बोलीं जाणावा ॥ १ ॥
जे नेणती कपट लेश ॥ आप्तभावें अति विश्वास ॥
त्यांसीं निष्कारण द्वेष ॥ मुळींहूनि चालविसी ॥ २ ॥
तुम्हांकडोनि रे ! दुर्बुद्धि ॥ अपराध घडले पदोपदीं ॥
त्यांचा ( पांडवांचा ) अपराध एकशब्दीं ॥ प्रकट करोनि बोल पां ? ॥ ३
हित सांगतां भीष्म द्रोणा ॥ तेथें तूं लाविसी दूषणा ॥
धार्तराष्ट्र मुकतील प्राणा ॥ तुझिये बुद्धी वर्ततां ॥ ४ ॥
जे बोलती पुरुषार्थवचनें ॥ ते वांझवृक्षाचीं सुमनें ॥
राया ! विचारूनि मनें ॥ हित आपुलें तें करीं ॥ ५ ॥
हिडिंब वधिला वनांतरीं ॥ बक मारिला एकचक्रीं ॥
राजे पराभविले समरीं ॥ शल्यादिक बळियाढे ॥ ६ ॥
ते वेळीं यांचीं वीरवादित्व ॥ कोठें गुन ठेविली होती सर्व ? ॥
आतां शब्दांचें वैभव ॥ विस्तारूनि बोलती ॥ ७ ॥

शेवटीं, पांडवांशीं युद्ध न करितां सख्यच करावें हा विदुरादि वृद्ध सुहृज्जनांचा सुविचार, धृतराष्ट्रास पसंत पडला. तो विदुरास ह्मणतोः—

" बोधोनि पांचाळ नरेश्वर ॥ भेटवीं उपायनें अपार ॥
धृष्टद्युम्नादी राजकुमार ॥ एक एक गौरवीं ॥ १ ॥
जांबूनद दिव्याभरणीं ॥ शृंगारावी याज्ञसेनी ॥
स्नुषासहित द्रुपदपत्नी ॥ रत्नीं वसनीं पूजावी ॥ २ ॥
पृथेचिया चरणा नमन ॥ स्नेहशब्दें शांतवन ॥
करूनि माझें आशीर्वचन ॥ पांचही पुत्रां सांगावें ॥ ३ ॥
मज वृद्धातें प्रतिपाळावें ॥ मागील कांहीं नाठवावें ॥
द्रौपदीसहित शिघ्र यावें ॥ आपुलिया नगरातें ॥ ४ ॥
त्रैलोक्यनाथ द्वारकापती ॥ लक्ष्मीपती रुक्मिणीपती ॥
निर्जरपती भक्तपती ॥ रेवतीपती समवेत ॥ ५ ॥
त्या कृष्णासी वारंवार ॥ लोटांगणीं नमस्कार ॥
विनवूनि मधुर उत्तर ॥ माझें तया सांगणें ॥ ६ ॥

पांडव घेऊनि सांगातें ॥ कृपेनें शीघ्र येइजे येथें ॥
माझें वचन तो निश्चितें ॥ न मोडी हें मी जाणें ॥ ७ ॥

हा धृतराष्ट्राचा निरोप मूळ भारतांत नाहीं. मुक्तेश्वरांची सरस्वती या ठिकाणीं कि तरी रसाळ आणि हृदयंगम आहे. खालील विदुरोक्ति मुक्तेश्वरांच्या उज्ज्वल प्रतिभे दर्शक आहे:—

लागोनि बळदेवाचे चरणीं ॥ मग बैसले एकासनीं ॥
विदुर ह्मणे' जी ! श्रवणीं ॥ विज्ञापना परिसिजे ॥ १ ॥
वारंवार जोडूनि हस्त ॥ कौरवराजें प्रार्थिलें बहुत ॥
त्यासी देऊनियां चित्त ॥ सकळीं परिशिलें पाहिजे ॥ २ ॥
भाग्यें वांचले लाखाजोहरीं ॥ भाग्यें जोडिली राजकुमरी ॥
भाग्यें पुरोचन दुराचारी ॥ भस्म झाला स्वदोषें ॥ ३ ॥
श्रेष्ठ भाग्य माझें सृष्टीं ॥ भाग्यें मागुतें देखलें दृष्टीं ॥
आतां कृपा करूनि भेटी ॥ पाठवावे पुत्रांतें ॥ ४ ॥
सर्वे देऊनि कुंती कृष्णा ॥ आणि कुमार धृष्टद्युम्ना ॥
येऊनि द्वारकेचा राणा ॥ सांभाळील मजलागीं ॥ ६ ॥

इंद्रप्रस्थ नगरीचें खालील वर्णन पहा:—

" परिघ पौळिया गड गोपुरें ॥ सौधें शतखणी दामोदरें ॥
मध्यें तळघरें उपरिकाकारें ॥ पडशाळा देहलिका ॥ १ ॥
गगनचुंबी विशाळ हुडे ॥ वर्तुल पर्वतान्वेनि पाडें ॥
द्वारीं कनक कपाट जोडे ॥ गर्जतां छळिती वैरिया ॥ २ ॥
लाज सांडोनिया क्षिती ॥ गेमाआड अमरावती ॥
लपाली, आणि भोगावती ॥ पाताळगर्ते निघाली ॥ ३ ॥
पश्चात्ताप धरूनि चित्तीं ॥ कुबेराची अलकावती ॥
कैलासवनामाजीं वस्ती ॥ करूनि वसे वैराग्यें ॥ ४ ॥
उपवनें अवलोकितां नयनीं ॥ लज्जा दाटली नंदनवनीं ॥
सेऊनि मंदाकिनीचें पाणी ॥ तपश्चर्या आचरे ॥ ५ ॥
वापी कूप सरोवरें ॥ अमृतस्वादु सरिता नीरें ॥
अनेक रंगांचीं कल्हारें ॥ विकाशिलीं घमघमिती ॥ ६ ॥

बकुल जातिका शतपत्र ॥ चंपक केतकी दमनकांकुर ॥
पराग धुरोळा मधुकर ॥ गुंजारवें खेळती ॥ ७ ॥
हंस कारंडव मयूर ॥ चातक चक्रवाक चकोर ॥
खंजरीट मधुरस्वर ॥ कोकिलांचे उमटती ॥ ८ ॥

स्वतःच्या भारतासंबंधानें व मराठी भाषेसंबंधानें मुक्तेश्वरांनें खालील उद्गार पहा:—

मुक्तेश्वरकविभारत ॥ टीका प्रांजळ व्यक्त ॥
जेंवि वेदाचा मथितार्थ ॥ श्रुति पुराणें बोलती ॥ १ ॥
जो राजयांतें वीररस ॥ विप्रवर्यातें वेदसारांश ॥
तत्वार्थबोध परमहंस ॥ योगेश्वर भाविती ॥ २ ॥
बुद्धियुक्तींचा सागर ॥ ऐसें मानिती मंत्री चतुर ॥
विलासियातें शृंगार ॥ सुरतानंदवर्धक ॥ ३ ॥
विद्याप्रवीण शास्त्रपंडित ॥ कौतुकें मानिती कर्णामृत ॥
दोषादोषी यांचें आर्त ॥ पुरवी गंगेसारिखें ॥ ४ ॥
पर्वतामाजीं कनकमेरु ॥ तडागांमाजीं क्षीरसागरु ॥
महाराष्ट्रासी काव्यगुरु ॥ हा गौरव ये ग्रंथा ॥ ५ ॥
व्यासवचन इक्षुदंडु ॥ गाळूनि सुरस सारांश गोडु ॥
देशभाषा वळिले लाडु ॥ नावडेचे आवडी ॥ ६ ॥
ते जैसे सुर्शी न सेवणें ॥ तें आम्रशाखांचूनि काय उणें ? ॥
कळंकरेखेस्तव चांदणें ॥ काय चकोरां नाळिजे ? ॥ ७ ॥
व्यासग्रंथगिरीचें सोनें ॥ संस्कृत खोटेंचे गाळूनि मनें ॥
देशभाषा घडिलें लेणें ॥ साहित्यरत्नीं सुजडित ॥ ८ ॥
तें लेववितां कर्णभूषण ॥ कांहो ! परतें करणें कोण ? ॥
श्रोते हो ! तुह्मी विचक्षण ॥ निर्मत्सर विचारा ॥ ९ ॥

खालील श्रीकृष्णोक्तींतील रूपकालंकार किती बहारीचा आहे !

" सरला सुकृताचा तंतु ॥ आयुष्य तैला झाला अंत ॥
माझिये हस्तीं व्यजनवात ॥ भीमरूपें उदेला ॥ १ ॥
तो झडपतां सत्वरगती ॥ प्राणदीपक पंचज्योती ॥
माळवोनी पडेल क्षिती ॥ गात्र पात्र पाळसें ॥ २ ॥

पुराणप्रसिद्ध मानस सरोवराचें वर्णनः—

“ पुढें मानससरोवर ॥ समुद्रप्राय देखिलें थोर ॥
अमृततुल्य तोय मधुर ॥ शरयू पाट जेथींचा ॥ १ ॥
भोंवत्या रत्नसुवर्णखाणी ॥ प्रवालवल्ली उतरल्या जीवनीं ॥
कर्पूरकर्दळींच्या काननीं ॥ कस्तूरीमृग खेळती ॥ २ ॥
जळीं मुक्ताफळांचे घोंस ॥ सुवर्णकमळीं दिव्य सुवास ॥
स्वेच्छानंदें राजहंस ॥ हंसिणीयुक्त क्रीडती ॥ ३ ॥

निरनिराळ्या लोकांच्या युद्धप्रकारांचें वर्णन देतेवेळीं, पोर्तुगिज लोकांची युद्धपद्धती खालील ओंवींत वर्णिली आहे.

“ नौकायानीं यंत्रमारें ॥ पोत भंगिती पाणीभारें ॥
वातवेगीं पळावें त्वरें ॥ फिरंगीयुद्ध या नांवें ॥ १ ॥

त्याचप्रमाणें सभापर्वांत एकेठिकाणीं पोर्तुगिज व इंग्रज यांचा उल्लेख केला आहेः—

जावी जंगी फिरंगी ॥ इंग्रेज बहुधा रक्तरंगी ॥
मलेबार नौकामार्गी ॥ विघ्नकर्ते दंडिले ॥ १ ॥

हे पोर्तुगिज व इंग्रज मुक्तेश्वरांपूर्वी थोडीं वर्षें हिंदुस्थानांत आले होते. परंतु त्यांचाही उल्लेख ज्याअर्थी मुक्तेश्वरांनीं आपल्या काव्यांत केला आहे त्या अर्थी तत्कालीन देशस्थितीचें व लोकांचें त्यांनीं चांगलेंच निरीक्षण केलें होतें असें वाटतें. फिरंगी लोकांचें जलपर्यटनपटुत्व मुक्तेश्वरांस माहित होतें व इंग्रज लोकांचा रक्तवर्णही त्यांनीं पाहिला होता. मुक्तेश्वरांनंतर होऊन गेलेल्या, शेवटच्या एक दोन सामान्य प्रतीच्या कवींशिवाय, दुसऱ्या कोणत्याही कवीनें या परदेशस्थ लोकांसंबंधानें, अपल्या ग्रंथांत बिलकुल उल्लेख केलेला नाहीं, हें आश्चर्य आहे ! एकंदरींत इतर मराठी कवींपेक्षां मुक्तेश्वर अधिक बहुश्रुत व शोधक होते असें ह्मणण्यास हरकत नाहीं. आतां वरील लोकांचा आपल्या भारतांत उल्लेख करितांना, मुक्तेश्वरांच्या हातून, कालविपर्यासात्मक दोष घडला आहे हें मात्र कबूल केल्यावांचून गत्यंतर नाहीं !

सभापर्वाच्या दहाव्या अध्यायांत श्रीकृष्णमूर्तीचें मुक्तेश्वरांनीं दिलेलें वर्णन फार सरस आहे, परंतु विस्तार होत चालल्यामुळें तें येथें न देतां, वाचकांनी तें मूळ ग्रंथांत पहावें अशी सूचना करून पुढें वळतों.

मुक्तेश्वरांनीं उद्योग व नशीब यांसंबंधानें खालील उद्गार काढिले आहेतः—

" ईश्वर निष्ठुर कीं कृपाळु ॥ काय करील केव्हां काळु ॥
याचा निश्चय विवेककुशळु ॥ करूं नेणें सर्वथा ॥ १ ॥
न कळे विष्णुमायेचा महिमा ॥ जे विचार हिरोनी पाडी भ्रमा ॥
ह्मणोनी नला आणि रामा ॥ अपाय घडले जाणतां ॥ २ ॥
पुण्यमार्गीं खेळतां निखिल ॥ दुःखें प्राप्त होती प्रबल ॥
पाप करितां क्षेम कुशल ॥ दिसे ये काळीं वाटतें ॥ ३ ॥
पाप करीतां पाविजे दुःख ॥ सुकृतें भोगिजे अक्षयी सुख ॥
ऐसें बोलती मन्वादिक ॥ वेदवाक्य प्रमाण ॥ ४ ॥
नकळे पापपुण्याचें रूप ॥ पापी पुनःपुन्हा करी पाप ॥
पाप करीतां ही अमुप ॥ पुण्यफळें भोगिती ॥ ५ ॥
अधर्मेंची धर्म एकांतें ॥ विहित तें अविहित सर्वांतें ॥
दिसे सर्वत्र बहुतांतें ॥ समाधाना सारिखें ॥ ६ ॥
यालागीं कांहीं नेणवे मनें ॥ ईश्वराचें ईश्वर जाणे ॥
ऐशा वेदवाक्यप्रमाणें ॥ पुरुष जाणते वर्तती ॥ ७ ॥
विचारें पाहतां न मिळे साक्षी ॥ ह्मणोनि मिळिजे प्रारब्धपक्षीं ॥
जैसा समुद्रीं भ्रमोनि पक्षी ॥ नौकास्तंभीं आरुढे ॥ ८ ॥
विवेकबुद्धिनें जितकें टळे ॥ तितकें टाळिजे विवेककुशळें ॥
यालागीं माझीं हीं प्रांजळें ॥ वचनें हृदयीं धरावीं ॥ ९ ॥
पुढें ओढवूनि प्रारब्धा ॥ जो टाकी प्रयत्न धंदा ॥
तो पुरुष बुद्धिमंदा—॥ माजी गणिती जाणते ॥ १० ॥

दुष्ट दुःशासनानें, द्रौपदी रजस्वला असतां, तिला राजसभेंत नेण्याच्या हेतूनें, तिची वेणी धरून ओढिली, त्यावेळीं द्रौपदीनें मोठा आकांत केला, कवि म्हणतात:—

हांक मारितां याज्ञसेनी ॥ कंपें थरारली मेदिनी ॥
खचोन पडों पाहे तरणी ॥ चंद्र तारांसहित ॥ १ ॥
आंदोळला गिरि कैलास ॥ ढकला वैकुंठींचा कळस ॥
देवांगना मानूनि त्रास ॥ शोक करिती आक्रोशें ॥ २ ॥
उमा रमा रेणुका सती ॥ लोपामुद्रा अरुंधती ॥
क्षोभोनि उदक घेती हातीं ॥ शाप मुखें वदावया ॥ ३ ॥

शंकरनयनींचा प्रळयाग्नी ॥ उसळोनि श्रवो पाहे धरणी ॥
कौरव कुळाचिया काननीं ॥ बीज निर्मूळ करावया ॥ ४ ॥
कपिलादिक सिद्ध पुरुष ॥ तयां नावरे अद्भुत रोष ॥
ह्मणती क्षमा करील ईश ॥ परी आमुतें न करवे ॥ ५ ॥

दुःशासनानें द्रौपदीस सभेंत आणिल्यावर, तिनें क्रोधदृष्टीनें भीमसेनाकडे पाहिलें. तिची ती हृदयद्रावक स्थिति अवलोकन करितांच, भीमानें आपल्या गदेस हात घातला व तो दुष्ट कौरवांचा सूड घेणार इतक्यांत धर्मराजा त्यास ह्मणतो :—

" ह्मणे क्रोध नावरे तुझिया चित्ता ॥ तरी गदा ओपीं माझिया माथां ॥
परी असत्य दोष कुंतीसुता ॥ स्पर्शे ऐसें न करावें ॥ १ ॥
सत्य रक्षावया श्रीरामें ॥ अरण्य सेविलें पुरुषोत्तमें ॥
पिता प्राणें गेलिया, सौमे ॥ नुलंघींच मर्यादा ॥ २ ॥
लटिकें साच करूनि स्वप्न ॥ राज्य ब्राह्मणा दिधलें दान ॥
तया हरिश्चंद्राचें कथन ॥ ग्रंथकर्ते बोलती ॥ ३ ॥
कपोत शरणागत पातलें ॥ शिबीनें निजमांस छेदिलें ॥
दधीची ऋषीनें दीधलें ॥ देहदान द्विजातें ॥ ४ ॥
पार्वतीचिया प्राणनाथें ॥ सत्वें छळिलें श्रियाळातें ॥
पुत्र वधोनि स्वहस्तें ॥ मांस दिधलें भोजना ॥ ५ ॥
तैसें येथें अवघड कायी ॥ विचारूनि तूं आपुल्या हृदयीं ॥
सत्यनिष्ठातें अपायीं ॥ ईश्वर न घाली सर्वथा ॥ ६ ॥

परंतु या धर्माच्या धर्मोक्तीनें भीमाचा क्रोधाग्नि शांत झाला नाहीं. त्यानें, धर्माचे हात जाळून टाकावे ह्मणून सहदेवास अग्नि आणावयास सांगितलें. त्यावेळीं अर्जुन ह्मणाला:—

" गुरु स्वामी वडील बंधू ॥ पवित्रसात्विक धर्मसिंधु ॥
येणें नेमें गोंविला शब्द ॥ तोचि प्रमाण आमुतें ॥ १ ॥
लाधलासी बळाची प्रौढी ॥ त्याची काय हेचि जोडी ? ॥
धर्मासी मारूनि ब्रह्मांडीं ॥ अपकीर्तिशब्द उरवणें ॥ २ ॥
सत्यसन्मार्गी वर्ततां नर ॥ त्याचा कैवारी जगदीश्वर ॥
त्याचें कार्य शार्ङ्गधर ॥ आपण आंगें संपादि ॥ ३ ॥

ही सत्यप्रशंसा किती तरी प्रगल्भ आणि उदात्त आहे. हा एक नीतिबोधाचा उत्तम मासला आहे. असे प्रगल्भ विचार मुक्तेश्वराच्या काव्यांत कोठें कोठें चमकतात, हें नव्यानें सांगितलें पाहिजे असें नाहीं. या वर्णनास मूळ महाभारत ग्रंथांत आधार नसावयाचा; कारण हे खुद्द मुक्तेश्वराच्या मनांतील उद्गार आहेत. ( कै. ओक )

* दुर्योधनानें द्रौपदीस "माझ्या मांडीवर बैस" असें निर्लज्जपणानें सांगितलें त्यावेळीं द्रौपदीची कशी स्थिति झाली, हें कवि सांगतात:—

"पापशब्द पडतां कानीं ॥ हृदयीं धडकला क्रोधाग्नि ॥
ह्मणे "दुरात्मिया ही वाणी ॥ जळो तुझी पापिष्ठा ! ॥ १ ॥
प्रळयबीज माथांपडो, ॥ दृष्टी जळोनि जिव्हा झडो ॥
कायेपासूनि प्राण विघडो ॥ तात्कालिक पैं तुझा ॥ २ ॥
भीमाकरीं जे केळवली ॥ गदा नोवरी सुगुणाथिली ॥
वाग्निश्चयें तुज नेमिली ॥ गोत्र घटित निर्धारें ॥ ३ ॥
बाहुलें योजिलें रणतळवट ॥ आयुष्य अवधीचा अंतपाट ॥
हातें सारूनि बळी वरिष्ठ ॥ लग्न लावील स्वहस्तें ॥ ४ ॥
रक्त हरिद्रा तनुलेपनीं ॥ माथां अक्षता पायपिटणी ॥
स्त्रियाप्रलाप वाद्यध्वनी ॥ सुखसोहळा भोगिसी ॥ ५ ॥
ते गदा घेऊनि मांडीवरी ॥ रणमंचकीं निद्रा करीं ॥
प्राण पारखे दवडूनि दूरी ॥ मग एकांतीं पहुडे कां ॥ ६ ॥

वरील रूपकालंकाराची बहार खऱ्या रसिकांस किती आल्हाददायिनी आहे !

सभापर्वांत, पंधराव्या अध्यायांत, अनेक प्रकारच्या व अनेकदेशीय वस्त्रांचें विस्तृत वर्णन दिलेलें आहे. त्यासंबंधानें कै० ओक म्हणतात "हें अनेक जातींच्या आणि रंगांच्या वस्त्रांचें वर्णन शोधक पुरुषांस फार उपयुक्त आहे. सांप्रत स्त्रीवेश-परिधानमीमांसा करणारांनीं, प्राचीन काळीं, निदान मुक्तेश्वर कविराजाच्या काळीं, कोणतीं वस्त्रें कोठें होत होतीं व तीं कशाप्रकारचीं होतीं, याचा शोध त्यानंतर हा सभापर्वांतील लेख कितीसा उपयुक्त होतो तें पहावें."

नलोपाख्यानांत, नलराजाचें वर्णन करितांना मुक्तेश्वर म्हणतातः-

'सुरमंडळीं सहस्रनयन ॥ ग्रहमंडळीं सहस्रकिरण ॥
पाताळ भुवनीं सहस्रवदन ॥ तेवी तो मान्यभूतळीं ॥ १ ॥

या ओंवीसंबंधानें कै. ओकांनीं खालील उद्गार काढिले आहेत.

' या ओंवींत कवीनें शब्दालंकार व अर्थालंकार मोठ्या खुबीनें साधिले आहेत. पहिल्या तीनही चरणांत सहस्र शब्द आणून यमक साधिलें आहे. ' सहस्रनयन ' ' सहस्रकिरण ' व ' सहस्रवदन ' या उपमांनीं कथेचा नायक जो नळ त्याचे अप्रतिम सद्गुण ध्वनित केले आहेत.

वरील तीनही उपमांनीं, न्यायानें प्रजापालन करण्याचें नळाचें सामर्थ्य, त्याचें अप्रतिम राजतेज, त्याची अप्रतिम विद्वत्ता व त्याची ईश्वराविषयींची दृढभक्ति इतके सद्गुण ध्वनित होतात. अशा रीतीनें शब्दचमत्कार करूनही कवीनें थोडक्यांत पुष्कळ अर्थ आणला आहे, या ' बह्वर्थजनमनोहरस्वल्पाक्षरत्वा ' बद्दल मुक्तेश्वराची कोण तारीफ कणार नाहीं ? ,

नलराजा दमयंतीस्वयंवरास्तव कुंडिन नगरीं चालला असतां इतर देवांसह इंद्राची व त्याची वाटेंत गांठ पडली, त्यावेळीं इंद्रानें नलराजास विनंति केली कीं:—

" धरूनि दमयंतीची आर्ती ॥ आह्मी पातलों भूतळाप्रती ॥
तुवां जाउनी नानायुक्तीं ॥ प्रबोधिली पाहिजे ॥ १ ॥
तूं परोपकारी पुण्यवंत ॥ ऐकोनि जाणों यथार्थ ॥
आपुला सांडुनी स्वार्थ ॥ कार्य करीं दुजियाचें ॥ २ ॥
आपुला सांडुनियां स्वार्थ ॥ यत्नें पुरवी पराचें आर्त ॥
तोची ईश्वर मूर्तिमंत ॥ सत्य सत्य जाणपां ॥ ३ ॥
यत्नें साधिलें निधान ॥ तेणें परांची कामना पूर्ण ॥
करी त्या हरिहरकमळासन ॥ सेवक होउनी सेविती ॥ ४ ॥

येथें इंद्रादि देवांनीं नळाची याचकांप्रमाणें खूब स्तुति केली हें लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे. श्रीहर्षमहाकवीकृत " नैषधकाव्य, ' रघुनाथपंडितकृत नलदमयंतीस्वयंवराख्यान इत्यादि संस्कृत प्राकृत काव्यांत नळराजानें दूतत्व पतकरण्याचें नाकबूल केल्यानंतर इंद्रादिकांनीं त्याची निर्भर्त्सना केली आहे, तें वास्तविक पाहतां बरोबर नाहीं. कारण इंद्रादिक नळाकडे मालक या नात्यानें गेले नव्हते, याचक या नात्यानें गेले. यजमानानें कोणतीही गोष्ट नाकबूल केल्यास त्याची निर्भर्त्सना करण्याचा याचकांना मुळींच हक्क नाहीं. यजमानाचें मन वळविण्याचें स्तुतीशिवाय त्यांजपाशीं दुसरें कांहीं साधन नसल्यामुळें ते यजमानाची स्तुत

स्तुति करीत असतात. या व्यवहारांतल्या रीतीला अनुसरूनच मुक्तेश्वरानें इंद्रादिकांच्या मुखीं नळाची किंचित् ही निंदा न घालितां खूब स्तुति घातली आहे. यावरून कवीला आवश्यक जें पूर्ण व्यवहारावलोकन त्यांत आपला कवि इतरांपेक्षां श्रेष्ठ होता असें ह्मणावें लागतें ' ( कै० ओक )

नलराजाच्या राज्यांत प्रजाजन किती सुखी होते याचें खालील ओंव्यांतील वर्णन परम हृदयंगम आहेः—

धर्मसंपदा हीं दोन्हीं ॥ चक्रवाकें एकत्र ॥ १ ॥
दारिद्य दोषाची हो राती ॥ नाहींच केली सर्व जगती ॥
दुर्जन तारकांची वस्ती ॥ पाहतां कोठेंही दिसेना ॥ २ ॥
पाषांड उलुकांचे घुंगाट ॥ नाहीं कुतर्क तस्करवाट ॥
हंस कोकिल साधु श्रेष्ठ ॥ विष्णुस्मरणें गुंजती ॥ ३ ॥
वसुधा पाळिली बहुत काळ ॥ कीर्तीनें भरला ब्रह्मगोल ॥
पुण्य श्लोक राजा नळ ॥ स्मरणें नासती अघें तीं ॥ ४ ॥

खालील ओंव्यांतील इंद्र व कली यांच्या भाषणांत मुक्तेश्वरांच्या उदात्त विचारशक्तीची कमाल झाली आहेः—

" कली ह्मणे ' त्रिदशेश्वरा ॥ जाणें दमयंती स्वयंवरा ॥
ते आमुतें होय दारा ॥ ऐसें करूं बहु यत्नीं ॥ १ ॥
इंद्र ह्मणे ' निवडले सकळ ॥ दमयंतीनें वरिला नळ ॥
आतां तुमचा प्रयत्न विफळ ॥ वांझवृक्षासारिखा ॥ २ ॥
कली बोले प्रत्युत्तर ॥ प्रत्यक्ष सोडुनी सुरेश्वर ॥
दमयंतीनें वरिला नळ नर ॥ हा अन्याय मज वाटे ॥ ३ ॥
अनुचित देखतां विशेषें ॥ दंडन नाहीं केलें कैसें? ॥
शक्र ह्मणे म्यां संतोषें ॥ हें घडविलें आवडी ॥ ४ ॥
दमयंती पातली शरण ॥ म्यां होउनी सुप्रसन्न ॥
कृपेनें देउनी दान ॥ हें सुलग्न लाविलें ॥ ५ ॥
यथायोग्य पुण्यवंता ॥ हृदय शुद्ध शरणागता ॥
इच्छिलें फळ तें न देतां ॥ ईश्वरत्व केउतें (?) ॥ ६ ॥
नित्य स्मरे त्याचें योगक्षेम ॥ जरी न वाहे पुरुषोत्तम ॥
शरणागताचा न दवडी श्रम ॥ तरी तो देव कासया? ॥ ७ ॥

न करूं दीनाचें रक्षण ॥ तरी आमुतें देव ह्मणे कोण ? ॥
हा भाव नेणती अज्ञान ॥ तुजसारिखे कलिपुरुषा ॥ ८ ॥

" देवत्वाची वरील ओंव्यांतील ही उदात्त कल्पना फारच विचार करण्यासारखी आहे. ही कल्पना इंद्राच्या तोंडीं घातल्यामुळें, त्याची योग्यता प्रस्तुत स्थलीं बरीच वाढून वाचकांच्या मनांत त्याविषयीं फारच पूज्यबुद्धि उत्पन्न होते. मुळांत इंद्राच्या भाषणांत ही कल्पना नाहीं व इतर कविकृत कोणत्या प्राकृत भारतांतही नाहीं. तेव्हां या कल्पनेचें सर्व श्रेय मुक्तेश्वरालाच दिलें पाहिजे हें निर्विवाद आहे. असल्या नूतन उदात्त विचारांमुळें मुक्तेश्वराच्या काव्याला विशेष शोभा आलेली आहे व शब्द-चमत्कारांपेक्षां अर्थमाधुर्याकडे लक्ष्य देणाऱ्या सर्व विद्वानांना मुक्तेश्वराचीं काव्यें विशेष आवडतील यांत संशय नाहीं. " ( कै० ओक )

दमयंती निद्रित असतां, तिचा त्याग करून नळराजा निघून गेल्यावर, ती फिरत फिरत चैद्यराजाच्या नगरांत आली. तेथें राजाच्या मातेनें तिला राजवाड्यांत आणविलें व अभय देऊन आपल्याजवळ तिला ठेवून घेतलें, व

सुनंदा आपुली भगिनी ॥ तीतें ह्मणे हे तुझी भगिनी ॥
दोघीं असावें एक मिळणीं ॥ गंगायमुनेसारिख्या ॥

या ओंवींतील उपमालंकारासंबंधानें कै. ओक यांनीं आपल्या काव्यसंग्रहांत उत्तम विवेचन केलेलें आहे. तें वाचनीय व मुक्तेश्वरांच्या काव्यांतील ओजो गुणाचें दर्शक असल्यामुळें येथें उतरून घेतों. गंगा ही विष्णूची मुलगी व यमुना ही सूर्याची मुलगी ह्मणजे गंगा व यमुना ह्या बहिणी नव्हेत. असें असून त्या सख्या बहिणीप्रमाणें राहतात, एकत्र मिळून चालतात, एकमेकांना कधीं सोडीत नाहींत. तशाच तुह्मीं ( दमयंती व सुनंदा ) जरी सख्या बहिणी नाहीं—तरी एक दिलानें वागा, एकमेकांना सोडूं नका व एकमेकांवर प्रेम ठेवा—असा राजमातेच्या सांगण्याचा भाव. गंगायमुनेचा दृष्टांत या स्थळीं फारच समर्पक आहे. कारण राजमातेच्या दृष्टीनें ज्याप्रमाणें गंगा व यमुना यांचा मूळचा कांहींच संबंध नव्हता त्याचप्रमाणें दमयंती व सुनंदा यांच्यांत रक्तसंबंध मुळींच नव्हता. शिवाय दोन मैत्रिणीचा एक जीव झाल्याचें गंगा व यमुना यांच्या संगमापेक्षां उत्तम उदाहरण दुसरें सांपडणें कठिण. प्रयागक्षेत्रीं गंगा व यमुना या नद्यांचा संगम झाला आहे हें प्रख्यातच आहे. या क्षेत्रापासून दोनही नद्यांचा एक जीव झाला व त्या नेहेमीं अद्वितीय मैत्रिणी झाल्या. दुःख,

प्रवासप्रयास, रस्त्यांतली व खोडकर मुलांनीं फेंकलेली माती इत्यादिकांमुळें दमयंती काळसर व मळकट दिसत होती ह्मणून तिला सांवळ्या यमुनेची उपमा व गौरवर्णा सुनंदेला शुभ्र गंगेची उपमा फारच शोभते. या शब्दरचनेबद्दल वाचकांना आनंद झाल्यावांचून राहणार नाहीं व या द्राक्षारसपाकाबद्दल कोण काव्यलोलुप कवीची तारीफ करणार नाहीं ? ;;

अशीं रमणीय स्थलें मुक्तेश्वरांच्या काव्यांत पुष्कळ असून खऱ्या रसिकांच्या चित्तवृत्ति वेडावून सोडणाऱ्या शृंगार, वीर, करुण वगैरे रसांची तर जिकडे तिकडे रेलचेल आहे. मराठी कविता सामग्र्यानें व लक्ष्यपूर्वक न वाचितां तिच्यावर भलभलते आरोप करणारांच्या मनावर येथपर्यंत दिलेल्या मुक्तेश्वरी भारतांतील वेंचे वाचून जर कांहींच सुपरिणाम झाला नाहीं; ते आपले आरोप मागें घेण्यास कबूल झाले नाहींत (;) उदात्त विचार, सर्वमान्य उपदेश, विविधरसमाधुर्य व मनोरंजक सृष्टिसौंदर्यवर्णन हीं इंग्रजी व संस्कृत कवितेप्रमाणें मराठी कवितेंतही आहेत असें जर त्यांच्यानें बोलून दाखवलें नाहीं तर मग त्यांच्यासारखे रसिकशिरोमणि तेच ! खुद्द सरस्वती जरी आपल्या हातीं वीणा धारण करून त्यांजपुढें गायन करूं लागली तरी या राजश्रींच्या मठ्ठ अरसिकतेवर त्याचा बिलकुल परिणाम न होता, शेवटीं तिला पश्चात्तापानें आकाशमंडलांत निमूटपणें अंतर्धान पावावें लागेल !

वनपर्वाच्या सातव्या अध्यायाच्या शेवटीं मुक्तेश्वर ह्मणतातः—

" इतिश्री भारत वनपर्वणी ॥ कथा नर्मदा रसवाहिनी ॥
ओंवियारूपें पवित्र पुलिनीं ॥ बाणलिंगें विचित्रें ॥ १ ॥
तटीं श्रवण सुखाचे आर्ती ॥ तपश्चर्या करितां श्रोतीं ॥
भुक्तिमुक्ति आयती ॥ स्वधर्मपत्नीसारिखी ॥ २ ॥

येथें कवीनें आपली कल्पनाशक्ति फारच उत्तम रीतीनें व्यक्त केली आहे. या वाक्यांत जरा गर्वोक्ति आहे, परंतु मुक्तेश्वरासारख्या महाकवीला ती शोभत नाहीं असें कोण ह्मणेल ? वरील दोन्ही ओंव्यांत जो रूपकालंकार साधिला आहे तो फारच उत्तम आहे. यांत नदीचें व काव्याचें, ओंव्यांचें व बाणलिंगांचें, श्रोत्यांचें व तापसी जनांचें साम्य दाखविलें आहे.

मुक्तेश्वर, काव्यरचनाप्रसंगीं, तदंतर्गत विषयांशीं किती तादात्म्य पावत असत हें कै० ओकांच्या खालील लेखावरून ध्यानांत येईल.

"ऋतुपर्ण राजाच्या घरीं आल्यापासून नळाचा 'नळ' या नांवानें उल्लेख न करितां नळानें आपणांस ठेवून घेतलेल्या 'बाहुक' याच नांवानें कवि त्याचा उल्लेख करित आहे हें विशेष लक्षांत ठेवण्यासारखें आहे. वर्णित असलेल्या कथानकाशीं तादात्म्य झाल्यामुळें ज्यावेळीं ज्या नांवानें ज्या रूपानें व ज्या स्थितींत नायक असेल, त्या वेळीं, त्याच नांवानें, त्याच रूपानें व त्याच स्थितींत कविजन नायकाचें वर्णन करीत असतात. ह्मणूनच मुक्तेश्वरानें नळाच्या अज्ञात वासांत 'बाहुक' याच पदाचा उपयोग केला आहे. यावरून काव्याची रुची वाढविणाऱ्या लहान सहान गोष्टींकडे देखील कधीं कधीं आपल्या कवीचें लक्ष्य जात असे असें दिसतें. सांप्रत स्थळीं आपल्या कवीनें मोरोपंतापेक्षांही अधिक विपर्यासदोषभीति दाखवून आपली रसिकता प्रगट केली आहे, कारण पंतानें याच प्रसंगीं पुष्कळ वेळां 'बाहुक' शब्दाचाच उपयोग केला आहे तरी 'नळ' शब्द तीन चार ठिकाणीं आलेला आहे—हा अत्यंत क्षुल्लक दोष आहे ह्मणून याबद्दल पंतांनां मुळींच दोष देतां येणार नाहीं, परंतु येवढ्या लहानशा दोषाकडेही लक्ष्य पुरविल्याबद्दल मुक्तेश्वराची तारीफ कोण करणार नाहीं?"

आमचे कवि केवळ भाषांतरकार होत असा ज्यांचा समज आहे त्यांस एवढेंच सांगतों कीं निदान मुक्तेश्वरासंबंधानें तरी तो समज केवळ चुकीचा आहे. मूळ भारताशीं मुक्तेश्वरी भारत ताडून पाहिल्यास, आपलें काव्य विशेष हृदयंगम करण्याकरितां मुक्तेश्वरांनीं पुष्कळ ठिकाणीं भाषणादिकांत फेरफार केलेला दृष्टीस पडतो.

शैववैष्णवांचें परस्परांशीं जें हाडवैर असतें तें मुक्तेश्वरांच्या वेळीं फार जोरांत होतें असें वाटतें; ते ह्मणतात:—

"चैद्य कौरव एकपंक्ति ॥ हस्त मेळवूनियां हस्तीं ॥
क्षुद्रबुद्धि अवलोकिती ॥ कृष्णद्वेषी दुरात्मे ॥ १ ॥
काशीविश्वेश्वराचें लिंग ॥ सुवर्णकमळीं पूजिलें सांग ॥
जें देखतां पावती भंग ॥ महा पर्वत पापांचे ॥ २ ॥
तें नूतन पाखांडी वैष्णवां ॥ देखतांचि संताप उपजे जीवा ॥
जेंवि कां पूर्वजांचा ठेवा ॥ हिरोनि नेला तस्करीं ॥ ३ ॥
ना तरी बिंदुमाधव प्रतिमा ॥ शृंगारिली देखोनि अधमा ॥
केशकपाळीं जंगमा ॥ शिरच्छेदनासारिखें ॥ ४ ॥

यावरून मुक्तेश्वर स्वतः नेमस्त शैव होते असें वाटतें. असो.

येथपर्यंत मुक्तेश्वरांच्या काव्योदधींतील वरींच रत्नें वाचकांपुढें ठेविलीं. ज्याच्या त्याच्या ग्रहणशक्तीप्रमाणें तीं घेणें न घेणें हें ज्याचें त्याचें काम आहे. या स्थळांपेक्षां दुसरीं कितीतरी चांगलीं स्थळें मुक्तेश्वरी भारतांत आहेत. विशेषतः द्रौपदीवस्त्रहरण, दुष्यंतशकुंतलाख्यान, नलोपाख्यान, सावित्रीआख्यान, जरासंधवध, हिडिंबवध, राजसूययज्ञ, द्रौपदीस्वयंवर, उत्तराअभिमन्युविवाह, नारदनीति हीं सगळीं प्रकरणें अत्यंत हृदयंगम आहेत, हीं सर्व वाचून पाहिल्याशिवाय त्यांतील माधुर्याचा लाभ होणार नाहीं. मनोहरसृष्टिसौंदर्यवर्णन, निरुत्तर करणारा कोटिक्रम, मार्मिक व उदात्त संभाषणें, पाषाणहृदयासही द्रवीभूत करणारे करुणालाप, व एकंदरींत सर्व प्रकारच्या वाचकांच्या मनोवृत्ति वेधून टाकणारे चमत्कारिक काव्यप्रसंग, हे सगळे मुक्तेश्वरी कवितेचे विशेष होत. अशा सर्वांगसुंदर मुक्तेश्वरी कवितेच्या वाचनाकडे महाराष्ट्रीयांची थोडी तरी प्रवृत्ति व्हावी, या हेतूने हा लहानसा निबंध लिहिण्याचा जो मी प्रयत्न केला आहे, तो सत्यसंकल्पाचा दाता भगवान् सफल करो !

---

# आनंदतनय

‘ आनंदतनय अरणीकर शोभवि फार कवन यमकाहीं ।
तत्सूक्ति पाठ ज्याला त्याचें पाहे न भवन यम कांहीं ॥ १ ॥*

सन्मणिमाला मोरोपंत.

महाराष्ट्रकविकुलतिलक मोरोपंत यांच्या शिरोभागीं दिलेल्या आर्येवरून, आनंदतनयाची महाराष्ट्रशारदामंदिरांत केवढी योग्यता आहे, याची रसिक वाचकांस सहज कल्पना होईल. या कवीच्या चरित्रासंबंधानें जितकी माहिती उपलब्ध होणें अवश्य आहे, तितकी अद्याप झालेली नसल्यामुळें, काव्यसंग्रहांत प्रसिद्ध झालेली या कवीची

*काव्यसंग्रहांत कै. ओक यांनीं प्रसिद्ध केलेल्या आनंदतनयावरील चरित्रलेखाच्या शिरोभागीं या आर्येच्या दुसऱ्या चरणाचा जो पाठ दिलेला आहे, तो चुकीचा आहे. तेथें ‘कवन फार यम कांहीं’ याच्या जागीं ‘फार कवन यम कांहीं’ हा पाठ असून, खालील चरणाच्या यमकाकडे पाहिल्यास, हाच पाठ खरा आहे, हें कोणाच्याही लक्षांत येईल.

काव्यें, त्यांत क्वचित् स्थलीं कवीनें केलेला स्ववृत्तनिर्देश व कै. वामन दाजी ओक या रसिक व विद्वान् गृहस्थांनीं काव्यसंग्रहांत प्रसिद्ध केलेलें या कवीचें संक्षिप्त चरित्र, यांच्या आधारानें हा लहानसा चरित्रलेख लिहिण्याचा मी प्रयत्न करितों.

कर्नाटक प्रांतांत, अरणी या नांवाचें एक इतिहासप्रसिद्ध गांव आहे. तें या कवीचें वास्तव्यस्थान होय. या गांवीं, इसवी सनाच्या सतराव्या शतकांत, ह्मणजे महाराष्ट्रराज्यसंस्थापक छत्रपति शिवाजीमहाराज यांच्या जन्मापूर्वीं, आनंदराव नामक ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण कुळकर्णी होता. त्यास गोपाळराव ह्मणून एक मुलगा होता; तोच हा आनंदनय होय. स्वतः आनंदतनयानें, आपल्या कवितेंत 'आनंदतनय, आनंदनंदन व 'अरणीचा शिपाई, या दोन शब्दांशिवाय, स्वतःच्या वृतांताचा बिलकुल उल्लेख केलेला नाहीं, व अशा स्थितींत या कवीचें विश्वसनीय व विस्तृत चरित्र लिहिण्याचें काम कितपत शक्य आहे, याचा वाचकांनींच विचार करावा. आपल्या कवितेंत आपला स्वतःचा नामनिर्देश करण्याचा जो कविसंप्रदाय आहे, तो सोडून, या कवीनें आपल्या प्रत्येक काव्यांत व पदांत, आपल्या बापाच्या नांवाचा जो उल्लेख केला आहे, त्यावरून त्याची निरभिमानता व पितृभक्ति हे गुण उत्तम प्रकारें व्यक्त होतात, यांत संशय नाहीं. आनंदतनय हा, शिवाजीमहाराजांचे तीर्थरूप शहाजी यांचा गुरु होता, अशी आख्यायिका आहे व ती खरी असल्यास हा कवी इसवी सनाच्या सतराव्या शतकाच्या पूर्वार्धांत उदयास आला व रामदासतुकारामाशीं तो समकालीन होता, असें मानण्यास हरकत नाहीं. कै. वामन दाजी ओक यांचें मत तर असें आहे कीं, हा कवि इसवीसन १६५० पासून विशेष प्रसिद्धीस आला असावा. परंतु, यामुळें एक मोठा घोटाळा उत्पन्न होतो, तो असा कीं, अक्षरगणवृत्तात्मक काव्यरचना मराठी भाषेंत पहिल्यानें केल्याचा जो मान कै. ओकांनीं आनंदतनय यास दिला आहे, तो मुक्तेश्वराकडे जाऊं पाहतो. कारण मुक्तेश्वर हा इ. स. १६५० पूर्वींच कवि ह्मणून प्रसिद्धीस आला होता, व त्याचें पहिलें काव्य जें 'नाटक ऊर्फ कौतूहल रामायण, तें, अक्षरगणवृत्तात्मकच आहे. एकंदरींत, या ठिकाणीं, कै. ओक यांची नजरचूक झालेली असून, आनंदतनय हा मुक्तेश्वरांचा उदयकाल व रामदास तुकारामाचा उदयकाल यांच्या दरम्यानच्या कालीं होऊन गेलेला असून, मराठी भाषेंत पहिल्यानें अक्षरगणवृत्तात्मक काव्यरचना केल्याबद्दलच्या अग्रपूजेच्या बहुमानावर त्याचा बिलकल हक्क

पोहोंचत नाहीं, असें माझ्या अल्पमतीस वाटतें. यानें अरणी येथील लढाईंत स्वतः तलवार गाजविली होती असें, पुढील पद्याच्या शेवटच्या चरणांत स्वतःच्या शिपाईगिरीसंबंधानें त्यानें जे उद्गार काढिले आहेत, त्यांवरून उघड होतें:—

‘ गोपी, गोपाळ, गाई, पडुनि महितळीं, शब्दती तैं अगाई ।
ऐशी राया ! नवाई, जनिं वनिं पसरे राक्षसीची अवाई ।।
तों हांसे शेषशायी भवतपनतपाक्रांतसंतोषदायी ।
त्या कृष्णाचेच पायीं नमन करितसे आरणीचा शिपायी ।। १ ।।

पूतनावध ’

यावरून, आमच्या मराठी कवींवर, कित्येक वाजवीपेक्षां अधिक शहाणे लोक जो पंगुपणाचा आरोप आणितात तो केवळ बनावट आहे, हें पूर्णपणें सिद्ध होतें, मराठी कवींच्या काव्योदधीचें आस्थापूर्वक अवलोकन केल्यास, महाराष्ट्राच्या इतिहासास साधनीभूत असणाऱ्या अशा बऱ्याच गोष्टींचा सहज उलगडा होतो, असें जें रा. रा. पांगारकर हे आपल्या लेखांत व व्याख्यानांत पुनःपुनः विधान करितात, त्याचाही अशा प्रकारच्या गोष्टींवरून चांगलाच प्रत्यय येतो. निरंजनमाधव कवीचें राजकारणनैपुण्य, समर्थांनीं शिवाजीमहाराजांस केलेला हितबोध, तुकारामाचें शिवाजीस पत्र, आनंदतनयानें अरणीच्या लढाईंत गाजविलेली शिपाईगिरी व त्यासंबंधानें आपल्या कवितेंत काढिलेले गर्वोद्गार, अनंतफंदीनें आपल्या माधवग्रंथांत शेवटच्या दिवट्या बाजीरावावर व त्याच्या सुलतानी राज्यकारभारावर केलेली टीका व झाडलेला ताशेरा, ज्ञानदेवांनीं आपल्या ज्ञानेश्वरीच्या शेवटीं, रामदेवराव जाधवाचें गौरवयुक्त शब्दांनीं केलेलें वर्णन, कृष्णदास कवीनें पेशवाईच्या अखेरीस पुण्यांत जो घोटाळा व बेबंदशाही माजून राहिली होती, तिच्यासंबंधानें स्पष्ट शब्दांनीं दाखविलेला तिरस्कार

१ याच ग्रंथांतील मुक्तेश्वराचें चरित्र पहा.

२ कृष्णदास ह्मणतो:—

पद.

‘ बाजिराव महाराज अर्जी ऐकतो बायकांची ।
चल गडे ! जाऊं पुण्याशी, हौस मोठी माझ्या मनची ।। ध्रु० ।।
या चैत्रमासीं आनंद करा हळदीकुंकु गौरीचें ।
नार गेलिग ! वाड्यांत इनें भेट घेतली खाशाची ।

देवनाथांनीं, नानाफडनविसाच्या कारभारावर केलेली टीका व मोरोपंतांनीं अहल्याबाई होळकरणीवर केलेल्या आर्या, या गोष्टी, मराठी कवींच्या राजकीय मतांवर चांगला प्रकाश पाडीत असतां, केवळ स्वाभिमानांधकारांत चांचपडणाऱ्या कित्येक दिवाभितांनीं त्यांजवर पंगुपणाचा आरोप करावा आणि आपण हा एक मोठा महत्वाचा शोध लाविला, असा पोकळ डौल मिरविण्यांतच आनंद मानावा, हें माझ्यामतें अगदीं पोरकटपणाचें होय. असो.

प्रसिद्ध व लोकप्रिय काव्य 'नलदमयंतीस्वयंवराख्यान' याचा कर्ता रघुनाथपंडित हा आनंदतनयाचा व्याही होता, अशी एक आख्यायिका सुप्रसिद्ध आहे. या संबंधानें कै. वा. ओक लिहितात 'हे दोघे व्याही होते, इतकीच गोष्ट जरी खरी असेल तर हे दोघे समकालीन असून, रघुनाथपंडितही इ. सनाच्या १७ व्या शतकाच्या उत्तरार्धांत होता, असें निष्पन्न होतें. आनंदतनयानें 'सीतास्वयंवर काव्य रचलेलें पाहून, रघुनाथपंडितास 'नलमदयंतीस्वयंवराख्यान' रचण्याची स्फूर्ति झाली असें ह्मणतात. 'ताटकावध' काव्यांतील 'केव्हां कोठुन घेतला शर करीं, केव्हां गुणीं योजिला, इत्यादि श्लोक पाहून, पंडितांनीं 'कदा नेणो ओढी शरधितुनि काढी शर कदा' हा श्लोक रचिला असाही प्रवाद आहे.' एकंदरींत, हे दोघे कवि च्याही व्याही होते, ही समजूत आपल्या लोकांत अगदीं रूढ होऊन गेल्यासारखी दिसते व दोघांच्याही काव्यांतील रचनासादृश्य व विचारसादृश्य, हीं या समजुतीस अधिकच बळकटी आणितात. परंतु, या आख्यायिकेच्या विरुद्ध असा कांहीं पुरावा हल्लीं मला मिळाला असून, त्यावरून आनंदतनय व रघुनाथपंडित हे एका जातीचेही नव्हते, असा संशय घेण्यास जागा झाली आहे. हा पुरावा ह्मटला, ह्मणजे, सत्संग मासिकपुस्तकाच्या संपादकांमार्फत उपलब्ध झालेली 'नलदमयंतीस्वयंवराख्यानाची एक जुनी हस्तलिखित प्रत होय. या प्रतींतील वरील काव्याची श्लोकसंख्या २४५ असून, ती नवनीतांत व स्वतंत्र रीतीनें प्रसिद्ध झालेल्या या काव्याच्या श्लोकसंख्येपेक्षां मोठी आहे. शिवाय, नवनीतांतील काव्याच्या शेवटीं 'बोले त्या रघुनाथ पंडित कवी भेटे हरी सादर' या चरणानें पूर्ण झालेला जो श्लोक आहे, त्याच्या जागीं, आमच्या तींत खालील श्लोक आढळतो:—

---

चाल । या नारीनें जाऊन कसा लाविला लाग ।
पति आमुचे घरीं बसले कांहिं रोजगार सांग ।
हा सर्वस्वी देह केला अर्पण करुनि आण तुमची ॥ १ ॥

'नळातें देऊनी वर अमृतपानींहि गगनीं
निघाले त्यामागें नळसह करीराजगमनी ॥
स्वराज्यीं आनंदें द्विजऋषि जनांतें सुखकरी ।
कथा ऐसी चंदावरकर रघूनाथचि करी ॥ १ ॥

यावरून, रघुनाथ पंडित हा जातीनें सारस्वत ब्राह्मण असून, चंदीचंदावराकडील राहणारा होता, असें वाटतें. शिवाय, या प्रतींतील श्लोकांत बरेच पाठभेदही आढळतात. आतां, नवनीतांतील नलदमयंतीस्वयंवराख्यानाच्या शेवटीं जो श्लोक दिलेला आहे, तो क्षेपक आहे, असें कोणासही ह्मणतां येणार नाहीं व यावरून, या आख्यानाच्या शेवटीं मूळचा श्लोक कोणता आहे, यांचा उलगडा करणें हें मोठ्या मुष्किलीचें काम आहे. तथापि, एकंदरींत, रघुनाथ पंडित हा जातीनें सारस्वत ब्राह्मण होता व त्याची मातृभाषा 'कोंकणी' होती असें मानण्यास थोडासा आधार आहे. 'पाटीभर'[१], वळी' (ओळ) इत्यादि शब्द कोंकणी भाषेंतील आहेत.

दुसरें असें कीं, आनंदतनयाचें 'सीतास्वयंवर' काव्य पाहून, आपलें काव्य लिहिण्याची रघुनाथपंडितांस स्फूर्ति झाली, हें जर खरें ह्मणावयाचें तर त्यांनीं आपल्या काव्यास 'नलदमयंतीस्वयंवराख्यान' असें नांव न देतां, सीतास्वयंवराशीं साम्य दाखविणारें 'दमयंतीस्वयंवर' असें नांव दिलें पाहिजे होतें, हें उघडच आहे. परंतु वस्तुस्थिति ज्या अर्थीं तशी नाहीं, त्या अर्थीं, आनंदतनय हा आपला व्याही ह्मणून त्याच्या कवित्वाशीं आपल्या कवित्वाची बरोबरी करण्याच्या हेतूनें, रघुनाथपंडितांनीं आपलें काव्य लिहिलें, असें ह्मणणें बरोबर दिसत नाहीं. के. ओकांनीं ताटकावधांतील एका श्लोकाशीं, पंडितांच्या 'कदा नेणो ओढी' या श्लोकाचें साम्य दाखविलें आहे, परंतु तेवढ्यावरून फार तर इतकेंच व्यक्त होतें कीं नलदमयंतीस्वयंवराख्यान लिहिण्यापूर्वीं पंडितांनीं, आनंदतनयाचीं काव्यें एकवेळ वाचिलेलीं असावीं. आख्यायिकेंतील सीतास्वयंवर काव्याचें, पंडितांच्या काव्याशीं ह्मणण्यासारखें साम्य आहे, असेंही नाहीं. दुसरी गोष्ट अशी कीं,

---

१ छापील प्रतींतील 'पिता तीचा पाटीभर धनहि वांटी बहु विडे ।' याच्या जागीं 'पिता तीचा ताटीं भरुनि घन वांटी बहु विडे' असा पाठ आमच्या प्रतींत आहे.

काव्यसंग्रहांत प्रसिद्ध झालेलें पांडुरंगकवीचें 'द्रौपदीस्वयंवर *' काव्य आनंदतनयाच्या सीतास्वयंवराशीं अत्यंत सदृश आहे; परंतु तेवढ्यावरून 'पांडुरंग' हा आनंदतनयाचा व्याही किंवा दुसरा कोणी आप्त होता, असें विधानकरणें हास्यास्पद होईल. तथापि मला मिळालेल्या प्रतींतील वरील श्लोक जर प्रक्षिप्त असेल, तर माझी ही शंका चुकीची असण्याचाही संभव आहे, हें मी प्रांजळपणें कबूल करितों.

वृद्धजनांच्या माहितीवरून असें कळतें कीं, मुरारपरब्रह्म अथवा मुरारपंत या नांवाचे एक ब्राह्मण गृहस्थ मोठे नामांकित साधु होते, त्यांचा आनंदतनय हा शिष्य होय. आनंदतनयासंबंधानें मोरोपंतांचें काय मत होतें, हें या लेखाच्या आरंभीं दिलेल्या सन्मणिमालेंतील आर्येवरून व्यक्त होतच आहे. शिवाय, त्यांनीं आपल्या 'सन्नामगर्भ' रामायणांतही आनंदतनयाचा समावेश केलेला आहे, हें खालील आर्येवरून दिसून येईल:—

'विधिसहि दुर्लभ जें तें आलिंगन वात नंदना देहा ।
गाती पुरातन यती या कपिच्या विहित नंदना देहा ॥'

आनंदतनय हा शिवोपासक होता, असें कै. वा. दा. ओक यांनीं लिहिलें आहे, परंतु हें त्यांनीं कशाच्या आधारानें लिहिलें आहे, हें समजण्यास मार्ग नाहीं. वास्तविक पाहतां त्यावेळीं, कर्नाटकांत वैष्णव मताचें प्राबल्य होतें; असें असतां आनंदतनय हा शैव होता, असें मानण्यास, त्याच्या कवितेंत तरी कांहीं आधार सांपडत नाहीं. दुसरें असें कीं, त्याची जी कविता काव्यसंग्रहांत प्रसिद्ध झालेली आहे, त्यांतील बहुतेक आख्यानें, किंबहुना एक आख्यान (मार्कंडेयाख्यान) शिवायकरून, बाकीचीं आख्यानें विष्णुचरित्रपरच आहेत. तसेंच त्याचीं बहुतेक पदेंही विष्णुपरच आहेत. तर अशा स्थितींत, हा कवि शैव होता कीं वैष्णव होता, हें निश्चयपूर्वक सांगतां येणें अशक्य आहे, हें उघडच आहे.

या कवीनें भारत, भागवत व रामायण या लोकप्रिय पुराणग्रंथांच्या आधारानें लिहिलेलीं अशीं वीस काव्यें, आजपर्यंत उपलब्ध झालेलीं असून, तीं सर्व काव्यसंग्रहांतून प्रसिद्ध झालेलीं आहेत. याशिवाय त्याचीं १५६ पदेंही त्याच मासिकपुस्त-

* काव्यसंग्रह, अनेक कविकृत लघुकाव्यमाला, भाग १ ला, पृष्ठें १–१७. हें काव्य फार रसाळ आहे.

कांत प्रसिद्ध झालेलीं आहेत. याशिवाय आनंदतनयानें दुसरींही कित्येक काव्यें लिहिलीं असण्याचा असंभव आहे असें नाहीं. परंतु तीं जोंपर्यंत प्रकाशांत आलीं नाहींत तोंपर्यंत त्यांच्यासंबंधानें कोणत्याही प्रकारें ऊहापोह करितां येणें शक्य नाहीं, तथापि, या कवीचीं जीं काव्यें प्रसिद्ध झालेलीं आहेत, त्यावरून आनंदतयानें महाराष्ट्रवाङ्मयाप्रीत्यर्थ आपल्या वाणीस बरेच परिश्रम दिले होते, हें प्रांजलपणें कबूल करणें भाग आहे. या कवीनें लिहिलेलीं आख्यानें व त्यांची श्लोकसंख्या, यांची यादी पुढें दिली आहे:—

| | रामायणांतील आख्यानें | पद्यसंख्या |
|---|---|---|
| १ | विश्वामित्राभिगमन .... ... .... ... .... | ३० |
| २ | ताटकावध ... ... ... .... ... | २० |
| ३ | विश्वामित्रयज्ञरक्षण .... .... .... .... .... | ३८ |
| ४ | सीतास्वयंवर ... .... .... ... .... | ८३ |
| ५ | शबर्याख्यान ... .... .... ... .... | २१ |
| ६ | सेतुबंध ... ... .... ... ... .... | ४१ |
| | **भागवतांतील आख्यानें** | |
| ७ | बालचरित्र .... .... .... .... ... | १५ |
| ८ | पूतनावध .... .... .... .... ... | ४३ |
| ९ | कंदुकाख्यान .... .... .... .... ... | ३२ |
| १० | कृष्णचरित्र ... .... ... ... .... | ४० |
| ११ | गोरसक्रीडा .... .... .... ... .... | ४३ |
| १२ | महाबळचरित्र ... ... .... .... ... | ५० |
| १३ | नवरसचरित्र .... ... .... .... .... | ५३ |
| १४ | सुदामचरित्र ... .... ... ... .... | ४४ |
| | **इतर पुराणांतील आख्यानें** | |
| १५ | गणिकोद्धार ... .... ... ... ... | १३ |
| १६ | उमारमासंवाद .... ... ... ... ... | १३ |
| १७ | मार्कंडेयाख्यान ... ... ... ... .... | ६० |

वरील यादींतील आख्यानें, मूळ संस्कृत ग्रंथांतून अशा चातुर्यानें आणि खुबीनें निवडून घेतलीं आहेत कीं, त्यांत चित्तवेधक असे अनेक प्रसंग असल्यामुळें, त्यांचीं वर्णनें सरस उतरलीं आहेत. त्यांतही, रामायणांतील पहिलीं सहा आख्यानें व मार्कंडेयाख्यान हीं फार सुरस व हृदयंगम असून बाकीचीं साधारण प्रतीचीं आहेत. कृष्णचरित्रावरील आख्यानांची रचना थोडीशी अप्रौढ दिसते व यावरून असा तर्क होतो कीं हीं आख्यानें, कवीनें आपल्या कवनशक्ती-च्या बाल्यावस्थेंत लिहिलीं असावीं, व सीतास्वयंवर, सेतुबंध, मार्कंडेयाख्यान व ताटकावध हीं आख्यानें, आपली कविताशक्ति पूर्ण विकास पावली होती, त्यावेळीं त्यानें लिहिलीं असावीं. एरवीं एकाच कवीच्या काव्यांत इतका फरक असणें संभवनीय दिसत नाहीं. तथापि एकंदरींत, आनंदतनयाची कविता, स्थल विशेषीं बरीच प्रौढ, सरळ आणि चित्ताकर्षक अशी आहे. त्याची वर्णनशैली बरीच मोहक आहे. कित्येक ठिकाणीं शब्दयोजना अशी खुबीदार केलेली आहे कीं, तें स्थल पहात असतां रसिकाचें मन क्षणभर तल्लीन झाल्याशिवाय राहणार नाहीं. या बाबतींत कै. वामन दाजी ओक यांनीं जें मत दिलें आहे, तें मी त्यांच्याच शब्दांनीं येथें नमूद करितों. ' तात्कालिक मनोरंजनाचें साधन जें शब्दालंकारविशिष्ट चित्रकाव्य त्याजकडे यानें विशेष लक्ष पुरविलें आहे. यद्यपि चित्रकाव्य हें संस्कृत अलंकार-शास्त्रकारांनीं कनिष्ट गणिलें आहे, तथापि ज्या अर्थी फार प्राचीनकाळापासून कालिदास, माघ, भारवी यांजसारख्या सन्मान्य व सहृदयवर्य संस्कृत कविजनांनीं

त्याचा प्रेमपुरस्सर अंगीकार केला आहे, आणि महाराष्ट्रकवि मोरोपंत यांनीं अष्टोत्त-रशत रामायणें रचून त्याजविषयींची आपली आदरबुद्धि दर्शविली आहे, त्या अर्थीं तें खरोखर त्याज्य आणि अनादरणीय नसून, मनोरंजनाचें अत्यंत सुलभ साधन होय. श्रवणमात्रेंकरूनच आनंद उत्पन्न व्हावा अशी रचना आनंदतनयानें केल्यामुळें लोक त्याच्या काव्यावर लुब्ध झाल्याशिवाय खचित राहणार नाहींत. अर्थालंकारापेक्षां शब्दालंकाराकडे याचें लक्ष जास्त, तथापि बाह्य शोभेच्या नादीं लागून आपलें काव्यास दुर्बोधांकित केलें आहे अथवा रसहानि केली आहे, असें स्थळ फारच विरळ आढळेल. अंतःशोभादायक जे अर्थालंकार त्यांजकडे अगदींच लक्ष पुरविलें नाहीं, असेंही नाहीं. वस्तुस्थितीचें अथवा व्यापाराचें हुबेहुब वर्णन ज्यांत केलें असतें, असा जो स्वभावोक्ति नामक अलंकार, त्याची योजना आनंदतनयानें अनेक ठिकाणीं केली आहे. यामुळें तीं तीं स्थळें वाचीत असतां मनास कांहीं विलक्षण आनंद होतो, आणि मनाचा असा ग्रह होतो कीं, काव्यरचनेस जी स्वाभाविक प्रतिभा-शक्ति अवश्यक लागते ती याच्या अंगीं कांहीं अंशीं होती. निदान प्रतिभादेवीच्या मंदिरांत याचा प्रवेश झाला असून तदुपासक भक्तांच्या दुसऱ्या अथवा तिसऱ्या ( माझ्यामतें दुसऱ्याच ) वर्गांत याची गणना करण्यास हरकत नाहीं. वाचकांस क्षणभर मोहून टाकणारीं अशीं स्थलें आनंदतनयाच्या काव्यांत मधून मधून अनेक आहेत. याच कारणास्तव आम्हीं असें ह्मणतों कीं, आनंदतनयाची कविता ही आमच्या हरिदासांची अन्नदात्री होय. या कवितोद्यानांतील मकरंद हा हरिदासांच्या हातीं ऐहिक जीवनकलहशमनाचे आणि पारलौकिक सुखसाधनाचे जे अनेक उपाय आहेत, त्यांतील एक आहे. ' हें कै. ओक यांचें मत आहे व त्याजपुढें माझ्या मताची फारशी मातब्बरी नाहीं, हें सांगावयास नकोच.

आनंदतनयाच्या कित्येक आख्यानांची भाषा सरस आणि प्रौढ आहे. संस्कृत शब्दांचे लांब लांब समास त्याच्या कवितेंत बरेच आढळतात. तशीच कित्येक ठिकाणीं त्यानें यमकांचीही फार गर्दी उडवून दिलेली दिसते. जुने अप्रसिद्ध शब्द आणि शब्दांचीं जुनीं रूपें त्याच्या कवितेंत फार आढळतात. यासंबंधानें, ' ज्या जुन्या कर्मणीरूपांचा प्रचार मुकुंदराज आणि ज्ञानेश्वर यांच्या ग्रंथांशिवाय अन्यत्र फारसा पाहण्यांत येत नाहीं, तीं रूपें:—' वदिजे ' आज्ञापिजे, ' ' कथिजे, ' वर्णिजे ' इत्यादि—या कवीच्या ग्रंथांत अनेक स्थलीं योजिलेलीं आहेत, ' असें कै. ओक यांनीं

लिहिलें आहे. परंतु, त्यांच्या ह्मणण्याप्रमाणें हीं रूपें ज्ञानेश्वर आणि मुकुंदराज यांच्याच ग्रंथांत फार आढळतात, इतरत्र आढळत नाहींत, असें नाहीं; तर, एकोणिसाव्या शतकापूर्वीं, महाराष्ट्रांत होऊन गेलेल्या बहुतेक सर्व कवींच्या काव्यांत, हीं रूपें आढळतात. तशांत, आनंदतनय हा तर फार जुना कवि, मग त्याच्या काव्यांत असलीं रूपें आढळलीं तर त्यांत कांहीं मोठेंसें आश्चर्य नाहीं. त्यावेळीं कर्नाटकांत यवनी राज्य असल्यामुळें, आनंदतनयाच्या काव्यांत कांहीं फारशी व आरबी शब्द आढळतात. ‘ शंकरजी मैं बाल तुमारो ’ हें आनंदतनयाचें हिंदुस्थानी पद तर प्रसिद्धच आहे.

आनंदतनयाची शब्दयोजना कित्येक ठिकाणीं फार रमणीय व चित्ताकर्षक आहे, हें पूर्वीं सांगितलेंच आहे. तथापि कांहीं ठिकाणीं त्यानें योजिलेले शब्द इतके क्लिष्ट आहेत कीं, तेथें त्या शब्दांचा समुच्चयेंकरून काय अर्थ होतो, हें चांगलेंसें लक्षांत येत नाहीं. विशेषतः त्याच्या कृष्णचरित्रपर आख्यानांत, अशीं पांच सहा स्थळें आहेत. आनंदतनयाच्या कांहीं काव्यांत, अनुप्रासांची फार गर्दी आहे व या त्याच्या शब्दालंकारप्रियतेमुळेंच, त्यास कितीएक ठिकाणीं, दुर्बोध, निरर्थक व क्लिष्ट अशा शब्दांचा उपयोग करावा लागला आहे. पुढील श्लोकांवरून या आमच्या विधानाची सत्यता सहज दिसून येईल:—

‘ कीं ऐसा दुबळा तयासि अबळा मागे चिरें कांबळा ।
बाळाच्या कवळा निमित्त, **कबळा** विस्तारुनियां वळा ॥
ते बोले प्रबळागतीं चळबळा, चर्चा करो **पाबळा** ।
कां **जानात** बळानुजाप्रति, बळारातीस जो दे बळा ॥ १ ॥

नुस्ता पोरवडा घरीं न कवडा चित्तीं बरा नीवडा ।
नाहीं भातवडा तया दहिंवडा कैंचा ? ग ! तो **जीवडा** ॥
दारिद्र्यें चिवडाचि सर्व, दवडा **थोरीवडापावडा** ।
मागा तो **यदुरावडा गयवडा** नाशील त्या आवडा ॥ २ ॥

वरील श्लोकांतील मोठ्या अक्षरांनीं लिहिलेल्या शब्दांच्या शुद्ध स्वरूपांत, अनुप्रासमुखार्थ, कशी फिरवाफिरव व ओढाताण करावी लागली आहे, हें वाचकांच्या ध्यानांत येईलच. तथापि एकंदरींत, आनंदतनयाची कविता चांगल्यापैकीं आहे, असें ह्मणण्यास हरकत नाहीं, इतकेंच नव्हे तर मुक्तेश्वर, वामन व मोरोपंत हे जर पहिल्या

प्रतीचे मराठी कवि ठरले तर आनंदतनयाची गणना दुसऱ्या प्रतीच्या महाराष्ट्र कवींत प्रमुखत्वानें करण्यास बिलकुल प्रत्यवाय नसावा, अशी माझी समजूत आहे.

आनंदतनयानें यमकरचनेकडे बरेंच लक्ष दिलेलें आढळतें. परंतु मोरोपंताप्रमाणें सर्वच काव्यांत त्यानें असें केलें आहे, असें नाहीं; तर कित्येक काव्यांत त्यानें यमकांची गर्दी उडवून दिली आहे व कित्येक काव्यांत, श्लोकपादाच्या शेवटच्या अक्षरांपुरतेंच यमक साधिलें आहे. तथापि, दोन अक्षरांपासून सात अक्षरांपर्यंत यमक साधला आहे अशीं पद्यें अनेक आढळतात, व त्यांतही यमक साधण्यासाठीं शब्दांची व त्यांजबरोबर अर्थाची त्यानें फारशी ओढाताण केलेली दिसत नाहीं. या त्याच्या यमकरचनाप्रावीण्याचा विचार करितां, या लेखाच्या शिरोभागीं दिलेल्या आर्येत 'आनंदतनय अरणीकर शोभवी फार कवन यमकांहीं' असे जे पंतांनीं उद्गार काढिले आहेत, त्यांची यथार्थता चांगली व्यक्त होते.

आनंदतनयाची भाषा सरस, प्रौढ आणि स्थलविशेषीं अलंकृत अशी आहे. प्रौढ पदरचनेची त्यास बरीच आवड असल्यामुळें त्यानें आपल्या काव्यांत मोठमोठ्या संस्कृत शब्दांची आणि दीर्घसमासघटित पदांची योजना बरीच केली आहे, तथापि त्यामुळें, सरळपणास फारसा धक्का पोंचला आहे, अशी शंका कोणी अभिज्ञ व रसिक वाचक घेईल, असें वाटत नाहीं. त्याच्या भाषेंत मोठा दोष म्हटला म्हणजे भाषेच्या शुद्धतेकडे दुर्लक्ष. या संबंधानें कै० ओक म्हणतातः— 'पण ज्या काळीं त्यानें काव्यरचना केली त्याजकडे विचारपूर्वक दृष्टि पुरविली असतां या दोषाचें महत्त्व बरेंच कमी होतें. महाराष्ट्रकविमंडळांत मोरोपंताशिवाय कोणताही अन्य कवि घेतला, तरी त्यानें भाषेच्या शुद्धतेकडे लक्ष दिलें आहे, असें दिसून येत नाहीं. आनंदतनयाला संस्कृत भाषा चांगली येत होती असें दिसतें. तसेंच त्यास हिंदीचेंही बरेंच ज्ञान असावें, तेव्हां हा दोष त्याला सहज टाळतां आला असता. पण टापटीप, ठाकठिक, बेतबात यांजकडे सूक्ष्म दृष्टि देऊन मुद्देसूद संगतवार मजकूर लिहिणें,—हा जो कारकुनी बाणा,—त्याचा अभाव आमच्या भाविकमहाराष्ट्रकविजनाचेपाठायीं बराच असल्यामुळें, त्यांच्या कवितावधूचें स्वरूप जितकें साजरें उतरावें तितकें सर्वत्र उतरलें नाहीं. कवितावधूची स्थिति तरी कांहींशी पतिव्रतेसारखीच म्हणावयाची. तिचें सगळें लक्ष पातिव्रत्याकडे असतें, त्यामुळें तिचा ओंचापदर फारसा टेकटेकीचा नसतो—

किंबहुना गलबलीत असतो—त्यामुळें सामान्य सुरूपतुष्ट जनांस तो दर्शनीय वाटत नाहीं; परंतु पातिव्रत्यभक्तांस, तो गबाळेपणा दोषरूप असा दिसत नाहीं, एवढेंच नव्हे, तर त्या गबाळेपणानेंच त्या पातिव्रत्यास विशेष शोभा आल्यासारखी त्यांस दिसते. तसें अर्थाच्या मार्मिक भोक्त्यांस ह्या बाह्य टापटिपेची फारशी पर्वा नसते आणि तें पुष्कळ अंशीं खरें वाटतें. कवितेच्या बाह्य सौंदर्याकडे आमच्या कविजनाचा ओढा फारच कमी दिसतो. शब्दशुद्धि नसो, छंदोभंग होवो, प्रयोग बिघडो, दूरान्वय होवो, सरासरी अर्थ बोध झाला ह्मणजे आपलें काम झालें असें एकंदर महाराष्ट्र कवींचें धोरण दिसतें. या कारणास्तव वृत्तसुखार्थ ऱ्हस्वाचें दीर्घ आणि दीर्घाचें ऱ्हस्व, असंमत समास ह्मणजे प्राकृत आणि संस्कृत शब्दांचा समास, शब्दांची ओढाताण करून रूप बदलणें इत्यादि दोषात्मक प्रकार आनंदतनयाचे ग्रथांत आढळतात.' आमच्या जुन्या कवींच्या कवितेसंबधानें अभिप्राय देतांना, त्यांची निरपेक्षबुद्धीनें वकिली पतकरून, कै० ओक यांनीं वरील उताऱ्यांत जी रसिकता प्रगट केली आहे; तिचें आमच्या सहृदय वाचकांस मोठें कौतुक वाटेल यांत संशय नाहीं.

आनंदतनय हा, मुक्तेश्वर, मोरोपंत किंवा वामन यांच्यासारखा मोठा भाषापंडित होता, असें जरी ह्मणतां येत नाहीं, तरी त्यास मराठी, संस्कृत आणि हिंदी या भाषा इतक्या चांगल्या अवगत होत्या कीं त्या भाषांत काव्यरचना करण्यासारखी त्याच्या अंगीं निपुणता होती. त्यानें आपल्या काव्यांत, विशेषतः सीतास्वयंवर व मार्कंडेया-ख्यानांतील चूर्णिकांत, जीं लांब लांब समासबद्ध पदें घातलीं आहेत, त्यावरून त्याचें संस्कृतभाषाज्ञान चांगलें होतें, हें कोणीही कबूल करील. शिवाय मराठींत पहिल्यानें अक्षरगणवृत्तात्मक काव्यरचना कोणीं केली, हें येथें निर्णित करीत बसणें जरी अप्रासंगिक होईल, तरी संस्कृतांतील बहुतेक अक्षरगणवृत्तांचा मराठींत पहिल्यानें उपयोग करणारा आनंदतनयच होय, यांत संशय नाहीं. येथें मला अशी एक शंका उत्पन्न होते कीं, दिंडी वृत्त आनंदतनयानेंच पहिल्यानें प्रचारांत आणिलें असावें. कारण, मुक्तेश्वरी रामायण, हा जो मराठींतील पहिला श्लोकबद्ध ग्रंथ त्यांत दिंडी वृत्त आढळत नाहीं. शिवाय, आनंदतनयाच्या दिंडींत आणि, वृत्तदर्प-णांत कै. परशुरामपंत तात्यांनीं दिलेल्या दिंडींत बरेंच अंतर आहे. पदाच्या आरंभींचा चरण, पुढील प्रत्येक चरणाच्या अखेरीस पुनः ह्मणावा लागतो व त्यास ध्रुवपद असें ह्मणतात. तशीच आनंदतनयानें आपल्या दिंडीची रचना केली आहे. उदाहरणः—

दिंडी.

काय वर्णू लावण्य कामिनीचें । इंद्रचंद्रा नेणवें रूप जीचें ॥ ध्रु० ॥
भूमिपर्यंत रुळे नीळ वेणी । वरी शोभे ती भव्य नगश्रेणी ।
चंद्र आणि शिसफूल फुलावाणी । भाळिं भांगटिळा नासिकीं सुपाणी ॥ १ ॥
चुडे कंगणिया हातसरे दोरे । कटीं शोभति ते भव्य कडदोरे ।
फार साजे सौंदर्य दैत्यदारे । कामिलोकांचें चित्त जें विदारे ॥ २ ॥
बाळ्या भोंकरें जडित ते काप कानीं । हार कंठीं दैदीप्य माणिकांनीं ।
करीं मुद्रा वीराजमान मानी । कोण ऐशी देखुनी धैर्य मानी ॥ ३ ॥
वांकि बाहुवटें बाजुबंद बाळी । त्यालि चोळी ते मोतियांचि जाळी ।
हेमवसनाचे घोळ तळीं घोळी । मनीं कपटि, बाहेरी दिसे भोळी ॥ ४ ॥
पदीं सांखळिया नूपुरादि वाळे । ब्रिदी चालतसे दाखवीत चाले ।
डोळे मोडतांचि गोपवृंद भाळे । जो तो पाहे तल्लीन राजबाळे ॥ ५ ॥
ऐशि सुंदरि ते मंदहास चाली । नंदरायाच्या मंदिरास आली ।
द्वारपालां टाकोनि तीव्र जाळी । मोह पाडोनी मंदिरीं निघाली ॥ ६ ॥
पंकजाक्षी निःशंक शांत बंकीं । रक्षपालां पाडूनी मोहपंकीं ।
जाति झाली कृष्णासि घेउं अंकीं । जो हा दाता आनंदतनय रंकीं ॥ ७ ॥

ही आनंदतनयाची एक दिंडी झाली ! आरंभींचें ध्रुवपद व शेवटच्या चरणांतील कवीचें नांव, गाळून, ही दिंडी ह्मणजे, हल्लींच्या दिंडीच्या चालीवर ह्मणावयाचें ... पदच आहे, असें वाटतें ! प्रसिद्ध व लोकप्रिय महाराष्ट्र कवि श्रीधर यांच्या ओंवीबद्ध ग्रंथांशिवाय, त्यांचीं जीं इतर काव्यें आहेत,* त्यांचें हेंच वृत्त आहे. शिवाय 'सखया रामा विश्रांति तुझे नामीं !' हें श्रीधराचें पदही याच चालीवर ह्मणतात. वरील प्रकारच्या दुसऱ्या एका दिंडीच्या शेवटीं, 'दिंडी ऐशी आनंदसुतें केली' असे आनंदतनयानें उद्गार काढिले आहेत. अस्तु.

आतां आनंदतनयाचे कवितेंतील थोडेसे वेंचे येथें देतों

* हीं काव्यें अद्याप अप्रसिद्ध आहेत. श्रीधराचें 'जांबूळ' या नांवाचें एक काव्य आह्मापाशीं आहे. त्यांत, द्रौपदीच्या मनांत कर्णसंबंधानें उद्भवलेल्या पातकाचा, श्रीकृष्णांनीं तिच्या तोंडून उच्चार करविला आहे.

सीतास्वयंवरांत, जनकानें आपल्या कन्येचा पण काय आहे, हें निवेदन केलें, त्यावेळीं लंकापति रावणराज महाराज यांनीं जी वल्गना केली, ती पुढील श्लोकांत वर्णिली आहे:—

‘ दंती ज्यां देवदंती धरुनि मुरडिला; शैल कैलास गाढा ।
घेतां हस्तीं समस्तीं कडकडति कडे; कायती काळदाढा ॥
तेथें या कांविटाचा गरिब गुण किती ! प्रौढिही कोण येणें ।
माझे गाजोनि भोजे ह्मणति मज असा कायसा कास घेणें ॥ १ ॥

पाहीन डोळां नवरी वराया ।
‘ आणा म्हणे रावण राव ‘ राया ’ ॥
विदेह बोले जिणतां पण तें ।
वरील ते आपण आपणातें ॥ २ ॥

हें ऐकतांच रावण धनुष्य उचलूं लागला, त्यावेळीं सीतादेवीची स्थिति कशी झाली, हें आनंदतनय वर्णितात:—

‘ लंकानायक सायकासन गुणीं सज्जावया सज्जला ।
तों सीता भयकंपिता, जन महाचिंताबुधीं मज्जला ॥
झाल्या म्लानमुखी मनोरम सखी, तो जों भुजा सांवरी ।
तों आकार धिकार देखोनि उठे हाकार माडीवरी ॥ १ ॥
तो जेव्हां कडकावला धनुवरी ठेला उभा भूतसा ।
सीतेला धडका उठे निजमनीं कीं बोलवेना तसा ॥
ते बोले ‘ पण कासयासि जनकें केला सख्यांनो ! असा ।
कैसें कारण काय कीं, कटकटा आतां प्रयत्नीं असा ॥ २ ॥
वीरासनीं, कनककार्मुक बाणपाणी ।
टेंकूनि ढाल, कर घालुनियां कृपाणीं ॥
जो बैसला द्विजगणांत कलानिधी तो ।
त्यां आपणें प्रणियला गुणवारिधी तो ॥ ३ ॥
रघुपतिजलधीतें मी नदी जाण वाहें ।
उचित ह्मणुनि त्याचें वाक्य ही आण वाहें ॥
जननिजनककानीं गूज हो ! जाणवा हें ।

न तरि सखि न ठेवीं प्राण मीं आण वाहें ॥ ४ ॥
पण ह्मणुनि पित्यानें घातला कोण पाया ? ।
कवण वधु वरीते कश्मला कोणपा या ? ॥
सखि ह्मणति ' वरीते बुद्धि हे तूज सांते ।
पुरविल परमात्मा बुद्धि हेतू जशी ते ॥ ५ ॥
हा कोण शैवधनुपारखि येर मेला ! ।
हा काय योग्य तुजसारिखिये रमेला ॥
कीं हेमवल्लि सुरधामतरूप मानें ।
तूं आणि राम जनसंमत रूपमानें ॥ ६ ॥

या प्रमाणें सीता व तिच्या सख्या काळजींत असतां, ती त्यांची काळजी रावणानें आपल्या मूर्खपणानें कशी दूर केली हें पुढील श्लोक सांगतील:--

सौधांगीं विबुधांगनाचि वदती तैशा सख्या तीप्रती ।
तों तेथें भुजराजिमंडित तनू आला धनुष्याप्रती ॥
शेषाकार अशेष भूषणगणीं शृंगारिलें देखिलें ।
दृष्टीं कार्मुक रोखिलें, मग मदें तेणें हलू लेखिलें ॥ ७ ॥
हातें थापटिल्या भुजा, मज असा नाहीं त्रिलोकीं दुजा ।
मेरूही मजशीं खुजा, सुरवरीं माझीच आधीं पुजा ॥
ऐसा जल्पुनि चाप जाड उचलों जातां न हाले कदां ।
जैसा शैल मतंगजासि न ढळे; पाहे विदेहात्मजा ॥ ८ ॥
एका दों न ढळेचि कार्मुक करें, हें नेटकें जों कळे ।
लावी हात वळें समग्रहि, तदा, तों कांहिंसें आकळे ॥
मोठि आरभटी करूनि, भ्रुकटी दंतावळी चावुनी ।
आक्रोशे, अतिविक्रमें, क्षितितळीं जानुद्वया लावुनी ॥ ९ ॥
विसां करांहीं धनु तें न तोले ।
न सांवरे यास्तव देह डोले ॥
भोंरे तयाच्या बहु खाय झोले ।
त्याहीमधें रावण काय बोले ॥ १० ॥

'या भूपें पण जिंकिला; उभविलें कोदंड चंडाकृति ।
मद्दोर्दंड उदंड दंड करिती; शाबास माझी धृति ॥
डोले बोलत बोल तों न धरवे, गेलाचि झोला भला ।
आलें चाप अपाप त्यावरि उरीं, तो भूतळा पातला ॥ ११ ॥
आला भूमितळासि गर्वपुतळा, पिंजारुनी कुंतळा ।
चापातें उखळावया बळ खळा नाहींच उत्संखळा ॥
सर्वांगींच कळा, विटे मुखकळा, झाला भुजामोकळा ।
वाजे ऊर गळा, स्वदेह सगळा झिंजाडितां आगळा ॥ १२ ॥

पुढील श्लोकांत आनंदतनयाच्या कवनशक्तीची व कल्पनाशक्तीची अगदीं परमावधि झाली आहे:—

'तों, त्या सौधतटीं सख्यांस निकटीं चांपेकळी गोरटी ॥
सीता सिंहकटी ससंभ्रम उठी, कासे धटी गोमटी ॥
सज्जी चाळत सज्जनस्तुतगुणा, ते भव्य भागीरथी ।
पावे दाशरथी कृपाब्धिजवळी, ते कोण लीला कथी ॥ १ ॥
डोळे मीन विलोल ते तळपती, हस्तांघ्रि पद्में नवीं ।
वक्षोजद्वय चक्रवाक; कच ते भृंगालि ओघच्छवी ॥
शैवालावळि नीलरोमलतिका, ते हंस, वाटे नदी ।
वेणी ते यमुना, सरस्वति गळां माळ, स्वयें स्वर्नदी ॥ २ ॥

सकलहि कलहंसीसारख्या चांगचाली ।
चमकति सखिया त्यांमाजि सीता निघाली ॥
उतरति तरुणांगी सौधसोपान माला ।
निरखति निजभावें आवघ्या राघवाला ॥ ३ ॥
सहज जंव विलोकी श्री वराया वरा या ।
तइं निरखुनि डोळां देवरा देवराया ॥
हृदयिं बहू सुखावे; पावली भावलीला ।
प्रणमन करि रंगीं ते धुनी मेघनीला । ४ ॥
समजति मनिं जीतें योगिये योगमाया ।
अतिघन गतिनें ते शीघ्र येती नमाया ॥

अतुर तरि तशी ते जानकी रामचंद्रा ।
निरखि निजअपांगें, योगि हृद्व्योमचंद्रा ॥ ५ ॥
हळुहळु अमलांगी, संगती राजबाळी ॥
जवळ जवळ आली डोलते घोंसबाळी ॥
स्वकरिं कुसुममाला घेउनी, त्या कृपाळा ।
धरुनि सुख उमाळा, लक्षिती लोकपाळा ॥ ६ ॥

आनंदें अळुमाळ लक्षित पदा वेल्हाळ त्या अंगणीं ।
लज्जानम्र मदालसा चमकतां, कोल्हाळ भूपांगणीं ॥
हांसे मंद अनालसा, अलिकुलस्तोमालका, मंगला ।
रंगे भव्यतमालनीलविभुच्या ते माळ घाली गळां ॥ ७ ॥

आनंदतनयाचें हें सीतास्वयंवर काव्य सर्वोत्कृष्ट आहे; किंबहुना, वामन, नागेश, विठ्ठल, चिंतामणी, अनंत व गोसावीनंदन या कवींच्या सीतास्वयंवरापेक्षां आनंदतनयाचेंच सीतास्वयंवर अधिक सरस आहे, असें मला वाटतें. आनंदतनयाचें 'शबर्याख्यान' हें भक्तिरसप्रधान काव्य फार हृदयंगम आहे परंतु स्थलाभावास्तव व जुन्या मराठी चौथ्या पुस्तकांत हें काव्य दिलेलें असल्यामुळें, त्यांतील वेंचे येथें द्यावयास सवड नाहीं.

सुदाम्याची स्त्री सुदाम्यास ह्मणतेः—

पद–( अजुनी कां रें नयेसी० )

हरिपदिं लागा मागा धनधान्यचिरें ।
सुखवरदायकांहीं । न पवे अचिरें ॥ ध्रु० ॥

मारमनोज्ञ उदार दयानिधि, द्वारवतीचा राजा । द्विजदेव भला ।
येईल तुमच्या काजा । कळलें मजला ।
संशय न ह्मणा जा जा । सुमुहूर्त चला ॥ १ ॥

बाळपणीं जगपाळ गडी तुह्मि होउनि लिहितां साळे ।
बहु खेळतसां ।
ते खुण बोला, भाळें । प्रभु तो सहसा ।
कां धरुनी जपमाळे । उगलेचि बसा ॥ २ ॥

आनंदात्मज आदिगुरू हरि आदर करितां कांहीं । मग काय उणें ।

वाद नको, भय नाहीं, । लौकीकगुणें ।
हा धरितां पथ पाहीं । सुख होय दुणें ॥ ३ ॥

श्लोक

नाना प्रयत्न पुरुषें स्वकरें करावा ।
यत्नें फळेल हरि शब्द मनीं धरावा ॥
भूपाळ देव गुरु यांप्रति रिक्तहातें ।
जाऊं नये सदनि काय असे, पहातें ॥

द्वारका नगरीचें वर्णनः—

पद

ऐशी देखिली द्वारका । दीनोद्धारका ॥ ध्रु० ॥
विविध उपवनें । मलयजपवनें । डोलति फळदळकुसुमभरें ॥
कुसुमित बकुळी । निबिड अलिकुळीं । दणदुणती अनुदिनिं निकरें ॥
हंस काक बक । शुकशिखि पिक मुख । उचलुनि निगदिति मधुरस्वरें ॥
परिमळ घमघम पसरतसे मग, जग नगमुख अनुभविति बरें ॥ ऐशी० ॥ १ ॥
भवतिं उपपुरें । गुढ्या गोपुरें । निबिड असा हें नभ अपुरें ॥
टके पट रुचिरें । तळपति रुचिरें । झळकति गगनीं जेंवि अचिरें ॥
सौधसुशिखरें । सेविति नभ खरें । दिसति बरें अगिमय भवरें ॥
शातकुंभनव कुंभ विराजित । भवति दशदिशा द्युति पसरे ॥ ऐशी० ॥ २ ॥
कनकतोरणी । कलितधोरणी । लसति आणि बहु ज्या उपन्या ॥
खखलखती वरि । नसे ज्यासि सरि । हेमविनिर्मित बुरुजन्नन्या ॥
सघन अचाटें । वज्रकपाटें । पुरद्वराजे भेदकन्या ॥
आनंदतय ह्मणे, ' प्रतिमंदिरिं नवनिधि नांदति बहुत धन्या ॥ ऐशी ॥ ३ ॥

पुढें सुदामा श्रीकृष्णास भेटल्यावर, भगवंतानें त्याच्याशीं किती औदार्याचें वर्तन केलें तें पद्यः—

श्लोक

कांहीं एक, तटस्थ होउनि सभाप्रांतीं उभा राहिला ।
श्रीकृष्णें कमलेक्षणें प्रियसखा प्रेमादरें पाहिला ॥
आधीं पाय नमूनियां, मग भुजां आलिंगिला प्रेमळें ।
स्नेहें पूर्ण सुधामयें निगदिलीं वाक्यें महा कोमळें ॥ १ ॥

' मत्पुण्य तें पूर्ण फळास आलें । बारे तुझें दर्शन आजि झालें; ॥
स्मरूनियां तूं मज भेटलासी । सुधानिधी संनिभ वाटलासी ॥ २ ॥

' दादा चला ' ह्मणुनि हात धरूनि देवें ।
सिंहासनीं बसविला मग वासुदेवें ॥
आज्ञापिली जलधिजा द्विजवंदनातें ।
हांसोनि ते नमितसे समजोनि नातें ॥ ३ ॥

त्या नंतरें देव तया सुदाम्या ।
वार्ता विचारी विबुधा सुधाम्या ॥
' आहे बरी कीं वहिनी सुवृत्ता ? ।
बाळें बरीं कीं वद ह्याचि वृत्ता ॥ ४ ॥

कांहीं आठवतें गड्या ! शिशुपणीं साळेंतलें खेळणें ? ।
नाना हास्यविनोद, मोद, सगडी कुस्ती करूं, हेळणें ॥
मी तूं हा मज तूज भेद न जगीं, ते मूळ मैत्री भली ।
येतें कीं स्मरणासि ? जाण सखया ! पुण्यें बहू लाधली ॥ ५ ॥

आह्मां भेटी आणिला काय मेवा ।
तूं भूदेवा ! देइं सर्वस्व ठेवा ॥
जों जों देखे देव काखेंत बोळा ।
तों तों त्याचा होतसे जीव गोळा ॥ ६ ॥
मग विभु वसनासि त्याचिया हात घाली।
उकलुनि जंव पाहे, मुष्टि पोहे निघाली ॥
द्विजवर दुबळा तो फार संकोच मानी ।
हरि तरि बहु वानी पूर्ण भक्ताभिमानी ॥ ७ ॥

' मजवरि सखया ! त्वां स्नेहसंभार केला ।
श्रमवरि चिरकाळें येऊनी द्वारकेला ॥
शुभदिन दसरा हा, आजि वाटे दिवाळी ।
न मज गमति पोहे दीधल्या वैभवाली ॥ ८ ॥

आनंदतनयाचीं पदें किती उत्कृष्ट आहेत, हें, ' कांरे ! नाठविसी कमलनयन वासुदेव ' ' रतहरिपदकमलकंद सेविं मनोभ्रमरा ' कोण तुझ्या मनासि येतो

सांग वो ! सीते ' ' तयावरि देव करील दया ' इत्यादि त्याचीं पदें, हरिदासांच्या कीर्तनांतून ज्यांनीं श्रवण केलीं असतील, त्यांस सांगावयास नकोच. तथापि त्याचीं एकदोन पदें येथें दिल्यावांचून माझ्यानें राहवत नाहीं.

पद

आहा ! हें काय बरें मानवा ! । संतचरणीं अभिमान वा । ध्रु० ॥
भुललासी निरखुनियां कामिनि । मोहगगनाची यामिनी ॥
तेचि ते ह्मणूनि सौदामिनी । कैसी सुंदर गजगामिनी ? ॥ १ ॥
उकडे हा पिंड जठरांतरीं । नरकमूत्राचे अंतरीं ॥
ऐशियाचा मोह तूज ये जरी । तरी तूं पडसी भवपंजरीं ॥ २ ॥
रेतरक्तबिंदु जठरीं गोठती । त्यासीं हस्तचरण फुटती ॥
कितीएक दिवस तेथें लोटती । जननी यातना बहु वाटती ॥ ३ ॥
अस्थिचर्म रक्तमांस पिंडरे ! । महादुरिताचें कुंड रे ! ॥
काळभक्ष तनु मांसखंड रे ! । अवघें दों दिवसांचें बंड रे ॥ ४ ॥
आनंदतनय विभु माउली । आह्मां सकळांची साउली ॥
तीतें भजतांना लाज वाटली । तुझी मति काय खुंटली ? ॥ ५ ॥

पद

ऐका हो ! अद्भुत देणें त्या एका भगवंताचें ॥ ध्रु ॥
नेणें पूजा नेणें सेवा । शरणागत मी आलों देवा ! ।
ह्मणतां देउनियां निजठेवा । दिधलें स्थान सोन्याचें ॥ १ ॥
केवळ मुग्धाचिये घाटी । आली घेतां दुग्धासाठीं
दिधली क्षीराब्धीची वाटी । बाळक धालें विप्राचें ॥ २ ॥
उंचीं बैसायाच्या काजा । निघतां विपिना गाजावाजा ।
केला अढळपदींचा राजा । निरखी अजुनी जन साचें ॥ ३ ॥
भेटी नेले पोहे मुष्टी । तेणें देवा झाली तुष्टी ।
आली सौभाग्यासी पुष्टी । झालें कल्याण दुबळ्याचें ॥ ४ ॥
बोले आनंदाचा बाळ । होती मुक्याचें वाचाळ ॥
पांगुळे लंधिति पर्वतमाळ । होईल पीयूष विखाचें ॥ ५ ॥

प्रसिद्ध इतिहाससंशोधक रा. राजवाडे हे तंजावरास गेले होते, तेथें आनंदतनया-संबंधानें त्यांस पुढील माहिती मिळाली:—

‘ आनंदतनय हे मूळचे अरणी येथील रविवासी. विजापूर दरबारचे प्रसिद्ध मुत्सद्दी वेदोभास्कर यांना शिवाजीमहाराजांचे तीर्थरूप शहाजी राजे यांस धरून आणण्यासाठीं विजापुरास पाठविलें. ही कामगिरी त्यांनीं चांगल्या रीतीनें बजाविली म्हणून विजापुरकरांनीं त्यांस अरणी प्रांत जहागीर दिला. वेदोभास्कर यांजबरोबर आनंदतनयांचे तीर्थरूप आनंदराव हे अरणीस आले. हे चांगले शिपाई असून, उत्तरवयांत त्यांनीं संन्यास घेतला होता. ह्यांनींच आपल्या मुलाला गुरूपदेश दिला; हें अरणी येथील एका गृहस्थानें म्हटलेल्या पुढील आरतीवरून उघड होतें:—

‘ संसारार्णवतारक संशयतमसूर्या । सज्जनमुकुटालंकृत चिन्मयवैडूर्या ।
धार्मिक जनघन वर्णिति तवचर्या । स्वानंदैकविहारा स्वामी गुरुवर्या ॥ १ ॥
जयदेव जयदेव जय जी आनंदा । जय परमानंदा ।
ज्ञानोज्ज्वलनीराजन तुज निजसुखकंदा ॥ धृ० ॥
नमितां तुझिया न दिसे भवममता ।
रमतां निजात्मबोधें अंगीं भरली समता ।
भ्रमतां बहुविध जन्मीं जाली विश्रमता ।
दमितां मन मग कैंची भवभयविभ्रमिता ॥ २ ॥
अपाप तवपदभजनें अपाप मी जालों ।
कृपापांगें तुझिया पायां उदरा मग आलों ।
अपाय गेले उपाययोगें बहु धालों ।
आनंदनंदन विनवी परिपूरण जालों ॥ ३ ॥

आनंदतनय रामोपासक होते व त्यांचें नित्यपूजेचें रामपंचायतन त्यांच्या अलीकडच्या वंशजांपाशीं अद्यापि तंजावर येथ आहे. तंजावर प्रांतीं हल्लीं जे महाराष्ट्रीय लोक आहेत, त्यांच्या मूळ तंजावरांत आलेल्या पूर्वजांपासून हल्लींची आठवी नववी पिढी आहे; दर पिढी पंचवीस वर्षांची धरली तर आनंदतनय शके १६१२ ( इ. स. १६८० ) च्या सुमारास विद्यमान होते, असें ठरतें. आनंदतनय, गोसावीनंदन व रघुनाथपंडित हे समकालीन होते असें अरणींतील वृद्ध लोक सांगतात. आनंदतनय व रघुनाथपंडित हे दोघेहि कीर्तनकार असून, ते परस्परांचे व्याही होते, ही आख्यायिका तिकडेही प्रचलित आहे. त्या प्रांतांत आनंदतनयांस ‘ आरणीबाबा ’

'आरणीकर' असेंही ह्मणण्याचा प्रचात आहे. काव्यसंग्रहांत छापलेल्या प्रकरणाशिवाय गर्भगीता, पदें, आख्यानें वगैरे आनंदतनयाचा आणखी* कविता नुकतीच उपलब्ध झाली आहे. तंजावर येथें भाऊस्वामीच्या मठांत, आनंदतनयाचे आठवे वंशज बाबा या नांवाचे आहेत. ह्यांचें वय सध्यां साठीच्या सुमाराचें आहे. गोत्र भारद्वाज, शाखा आश्वलायन. हे बावा नृत्य व नाट्यकलेंत चांगले प्रवीण आहेत. ह्यांचीं बायकामुलें वगैरे कोणी हयात नसल्यामुळें, ह्यांच्या पश्चात् आनंदतनय कवीचा निर्वंश होणार आहे (!)

---

# जयरामस्वामी.

" जयरामस्वामियशें हृदया ! राहोनि परिस वडगांवीं ॥
संसारीं फावेना क्षण, तरि पाहोनि परि सवड गावीं ॥ १ ॥"

सन्मणिमाला, मोरोपंत.

हे रामदासपंचकांतील एक प्रसिद्ध साधु होत. हे जातीचे देशस्थ आश्वलायन ब्राह्मण. यांचें उपनांव केसर-यांचे तीर्थरूप भिकाजीपंत हे कात्राबाद मांडवगण येथील देशपांडे होते; जयरामस्वामीच्या आईचें नांव कृष्णाबाई." असें रामदासस्वामींचे चरित्राची बखर या पुस्तकांत लिहिलें आहे, परंतु 'जयरामस्वामीची बखर,' या नांवाची एक जुनी बखर काव्येतिहाससंग्रहांतून प्रसिद्ध झाली आहे, तींत जयरामस्वामींच्या आईचे नांव 'काशीबाई' होतें असें लिहिलें आहे.

शिखर शिंगणापूर येथें 'श्रीशांतलिंगस्वामी' या नांवाचे एक परमतपस्वी सत्पुरुष रहात असत; त्यांचे शिष्य श्रीकृष्णाप्पास्वामी हे जयरामस्वामींचे गुरु होत.

---

* ह्यांपैकीं पुढील प्रकरणें ठाणें येथील 'महाराष्ट्र कवि' मासिक पुस्तकांत प्रसिद्ध झालीं आहेत. १ राधाविलास २ नौकाचरित्र ३ गर्भगीता. या तिन्ही प्रकरणांची एकंदर श्लोकसंख्या १३७ आहे. पहिलीं दोन श्लोकबद्ध असून, तिसरें ओवीबद्ध आहे.

हे कृष्णाप्पास्वामी पूर्वाश्रमीं वारुळवाणें येथील कुळकर्णी असून ते सद्गुरूंच्या शोधार्थ प्रवास करीत असतां शिखर शिंगणापूर येथें आले. तेथें श्रीशांतलिंगस्वामीचा त्यांस उपदेश झाला. शांतलिंगस्वामीच्या प्रसादानें कृष्णाप्पास्वामी योगसंपन्न झाले व त्यांनीं चमत्कारही पुष्कळ केले. या महापुरुषासंबंधानें पंतांनीं आपल्या सन्मणिमालेंत ह्मटलें आहेः—

" जयरामस्वामीतें तारुनि जो कृष्णदास संत तरे ॥
चित्ता, वित्ता जैसा कृपण, स्मर तत्पदास संतत रे ॥ १ ॥

यांचें संपूर्ण नांव ' कृष्णाजी अप्पा अभ्यंकर ' हें होतें.

श्री शांतलिंगस्वामी शिखर शिंगणापुर येथें समाधिस्थ झाल्यावर कृष्णाप्पास्वामी वडगांवीं येऊन राहिले. इकडे इंदापूर येथें जयरामस्वामींची आई काशीबाई ईस दृष्टांत झाला कीं ' वडगांवीं कृष्णाप्पास्वामी हे सत्पुरुष आहेत, त्यांजपाशीं जाऊन त्यांचा उपदेश घ्यावा, ह्मणजे तुझे इच्छित हेतु परिपूर्ण होतील. ' दृष्टांताज्ञेप्रमाणें काशीबाई पतिसहवर्तमान वडगांवीं आली व स्वामीस नमस्कार करून उभी राहिली. स्वामींनीं ध्यान विसर्जन करून बाईकडे पाहिलें व तिचा भाविकपणा पाहून आनंदवृत्तीनें त्यांनीं तिला व तिच्या पतीला उपदेश देऊन आज्ञा केली कीं ' वर्षांतून दोन वेळां दर्शनास यावें. ' नंतर काशीबाई आपल्या गांवीं येऊन राहिली असतां तिला दोन पुत्र झाले. त्यांपैकीं जयरामस्वामी हे एक होत. जयरामस्वामींचे तीर्थरूप वारल्यावर काशीबाई मुलास घेऊन पंढरपुरीं येऊन राहिली. तेथें भिक्षा मागून तिनें जयरामस्वामींची मुंज केली. जयरामस्वामींच्या आठव्या वर्षीं काशीबाईसही देवाज्ञा झाली.

मग जयरामस्वामींनीं श्रीपांडुरंगाचे देवालयांत जाऊन त्यास साष्टांग नमस्कार घालून प्रार्थना केली कीं " माझी आई मेली व बापही मेला; आतां माझें संरक्षण तूं कर " नंतर स्वामी तेथून गोपाळपुरास आले व अनुष्ठान करीत बसले. एके दिवशीं आपल्या गुहेमध्यें स्वामी समाधिस्थ असतां त्यांस पांडुरंगाचा साक्षात्कार झाला कीं " उदयिक तुह्मी चंद्रभागेचें स्नान करून येतेवेळीं चंद्रभागेच्या कांठची दरड ढांसळेल, त्यावेळीं मीं तुमच्या हृदयांत प्रगट झालों असें समजावें. ' स्वामी समाधी विसर्जन करून पाहतात तों सूर्योदय झाला होता. मग चंद्रभागेवर जाऊन स्नान संध्यादि नित्य कर्मविधि सारून मागें फिरतात तों दृष्टांतांत सांगितल्याप्रमाणें नदीची

दरड ढांसळली. तें पाहतांच दृष्टांताच्या खरेपणाची खूण पटली परंतु आपल्या चित्तवृत्तींत कांहींच पालट झाला नाहीं ह्मणून स्वामीनीं फिरून गोपाळपुरास जाऊन अनुष्ठान सुरू केलें. तेथें श्री विठ्ठलानें त्यांस " वडगांवीं श्रीकृष्णाप्पास्वामी हे माझे परमभक्त आहेत त्यांची भेट घ्या, ते तुह्मांस आत्मज्ञानाची किल्ली दाखवितील " असा दृष्टांत दिल्यावर स्वामी गोपाळपुराहून श्रीकृष्णाप्पास्वामीच्या दर्शनार्थ वडगांवीं यावयास निघाले. स्वामी वडगांवच्या सीमेवर आले तोंच त्यांचें आगमन श्रीकृष्णाप्पास्वामीस अंतर्ज्ञानानें समजलें व त्यांचा अधिकार मोठा आहे यास्तव त्यांस आणावयास पुढें जावें ह्मणून मंडळीस बरोबर घेऊन श्रीकृष्णाप्पास्वामी सिंवेपर्यंत आले, तेथें जयरामस्वामी व श्रीकृष्णाप्पा यांची गांठ पडतांच मोठा चमत्कार झाला. जयरामस्वामीस साक्षात् पांडुरंगाची भेट झाली होती. ह्मणून श्रीकृष्णाप्पास्वामीनीं त्यांस साष्टांग नमस्कार घातला. परंतु जयरामस्वामीस त्याचें आश्चर्य वाटलें. मग त्यांनीं श्रीकृष्णाप्पास्वामीच्या चरणी दंडवत प्रणिपात करून, हात जोडून, विनंति केली कीं, स्वामीनीं, माझा अधिकार न पाहतां 'मी कोण आहें,' हें मला कळवावें. मग श्रीकृष्णाप्पानीं त्यांस आलिंगन दिलें, व ते त्यांस वडगांवीं आपल्या आश्रमीं घेऊन आले. तेथें परस्परांनीं आपापला वृत्तांत निवेदन केला.

नंतर एके दिवशीं, तेथें भवानी शंकराचें देवालय आहे, त्यांत एक खोली आहे तेथें स्वामीस बसवून श्रीकृष्णाप्पानीं त्यांस मंत्रोपदेश केला. उपदेश होतांच स्वामीची समाधि लागली ती बाविसावे दिवशीं उतरली. तोंपर्यंत अन्नोदकावांचून स्वामी एका जागीं बसून होते. तेविसाव्या दिवशीं श्रीकृष्णाप्पास्वामीनीं त्यांस जागृत करून सांगितलें कीं " आपला आवतार जगदुद्धारासाठीं झालेला आहे ".

याच वेळीं रहिमतपुर येथें, श्रीएकनाथस्वामी यांचे शिष्य रहात असत. त्यांस दृष्टांत झाला कीं आह्मी वडगांवीं अवतार धारण करून आलों आहों, तरी तथें येऊन आपलें शंकासमाधान करून घ्यावें. श्रीएकनाथस्वामी हयात असतांना या शिष्यांनीं त्यांस कांहीं शंकांचें समाधान करावयास सांगितलें होतें, त्यावेळीं 'आह्मीं गुरुभक्तीकरितां वडगांवीं येणार आहों तेथें आपल्या शंकांचें निरसन केलें जाईल' असें नाथ ह्मणाले होते. त्यावेळीं ते शिष्य ह्मणाले कीं " इतके दिवस आह्मीं वांचूं याचा काय नेम ? " त्यावर नाथ ह्मणाले 'मी अवतार घेईपर्यंत तुह्मांस काळाचें भय नाहीं ! नंतर 'जयरामकृष्ण' या नांवाचा घोष करीत नाथ समाधिस्थ झाले.

नंतर ते दोन्ही शिष्य अत्यंत वृद्ध झाल्यामुळें, काठ्या टेंकीत, वडगांवीं आले. तेथें 'येथें कोणी सत्पुरुष आले आहेत काय ?' असें त्यांनीं गांवांतील लोकांस विचारिल्या-वरून त्यांनीं श्रीकृष्णाप्पास्वामीचे शिष्य जयरामस्वामी यांचें नांव सांगितलें. मग ते दोन्ही वृद्ध पुरुष श्रीकृष्णाप्पास्वामीच्या मठांत आले व तेथें त्यांची व जयरामस्वामी-ची दृष्टिभेट होतांच स्वामींनीं त्यांस त्यांची नांवें घेऊन हाका मारिल्या. त्या शिष्यां-पैकीं एकाचें नांव कान्हेरपंत व दुसऱ्याचें नारोपंत होतें. एकमेकांचें कुशल विचारि-ल्यावर स्वामींनीं त्यांस अंतर्गृहांत नेलें व तेथें वेदांतनिरूपण करून त्यांचें समाधान केलें. एकनाथस्वामीच्या वचनाची सत्यता आल्यावर ते दोन्ही शिष्य जयराम-स्वामीस प्रेमपूर्वक अभिवंदन करून निघाले तों नारोपंताचा देह तेथेंच स्वामीसन्मुख विसर्जन झाला. तेथें आतां श्री काशीविश्वेश्वराचें देवालय आहे. कान्हेरपंतांनीं पुढें अर्धकोशावर नदींत जलसमाधि घेतली. त्यावेळीं 'गुरुभक्तीचा महिमा प्रगट कर-ण्याकरितां नाथ जयरामस्वामींच्या रूपानें अवतरले आहेत' अशी सर्वांची खातरी झाली.

वडगांवीं, जयरामस्वामी, कृष्णाप्पास्वामींच्या सेवेंत आयुष्क्रमण करीत असतां एके दिवशीं, नरसोबाआप्पा गोसावी, आप्पा गोसावी व रेखुना गोसावी या तीन गृहस्थांनीं, वडगांवीं येऊन स्वामीस विनंति केली कीं, 'कृपाळू होऊन आह्मांस मंत्रोपदेश करून आमचा उद्धार करावा.' परंतु जयराम स्वामींनीं तें ऐकल्या न ऐकल्यासारखें केलें व ते समाधि लावून बसले. हें पाहून त्या गृहस्थांनीं हात जोडून पुनः विनंति केली कीं, आह्मांस आपल्यावांचून दुसरा गुरु करणें नाहीं, यास्तव शरणागताचा अव्हेर न व्हावा! मग त्यांचा शुद्ध भाव अवलोकन करून स्वामींनीं त्यांस उपदेश केला व आपणासन्निध ठेवून घेतलें.

एके दिवशीं कृष्णाप्पास्वामींच्या मनांत आलें कीं या 'पंचभूतात्मक जड देहाचा त्याग करावा.' मग आपला मनोदय त्यांनीं जयरामस्वामीस सांगितला व ह्मणाले कीं 'स्वरूपस्थितींत अखंडित योग करून एकांतस्थानीं गुहेंत वास करावा अशी माझी इच्छा आहे. याकरितां सर्व मंडळीचीं मतें घ्यावीं.' त्यावेळीं जयरामस्वामीचा कंठ दाटून आला. त्यांस असें वाटलें कीं 'कृष्णाप्पानीं आपणांस आईबापांचीसुद्धां आठवण होऊं दिली नाहीं. केवळ मुलाप्रमाणें आपलें वत्सलतेनें संगोपन केलें. परंतु आतां त्यांचा आपणास वियोग होणार.' अशा चिंतावस्थेंत स्वामींची रात्र गेली. शिष्यास आपला विरह सहन होणार नाहीं हें जाणून श्रीकृष्णाप्पास्वामींनीं, जयराम-

स्वामीस सांगितलें कीं ' मी तुम्हांस त्रिकाळ दर्शन देत जाईन. तुम्ही कांहीं काळजी करूं नका. "

मग गुर्वाज्ञेप्रमाणें जयरामस्वामी, कृष्णाप्पास्वामीच्या समाधीच्या तयारीस लागले. त्याच गांवांत, कृष्णाप्पास्वामीचा एक शिष्य, म्हणजे जयरामस्वामीचा गुरुबंधु, कुंदाजी पाटील या नांवाचा गृहस्थ रहात असे, त्यास स्वामींनीं बोलावून आणून कृष्णाप्पास्वामींचा मनोदय कळविला. त्यावेळीं पाटील यांस क्षणभर खेद उत्पन्न झाला तथापि तो बाजूस ठेवून गुरूंच्या समाधीची सर्व व्यवस्था त्यांनीं केली.

मग कृष्णापास्वामींनीं ' आज तिथी कोणती ? अशी चौकशी केली त्यावेळीं जयरामस्वामींनीं सांगितलें कीं, आज शके १५४५, उत्तरायण, माघमास, तिथी पौर्णिमा व नक्षत्र आश्लेषा आहे. ' मग तयार केलेल्या गुहेमध्यें दर्भ पसरून त्यावर कृष्णाजिन घालून, कृष्णाप्पास्वामी पूर्वाभिमुख आसनस्थ झाले. समोर श्रीकृष्णमूर्ति ठेवली व ज्ञानेश्वरीचा नववा अध्याय वाचिला. त्यावेळीं जयरामस्वामींचे आवडते व समकालीन संत रंगनाथस्वामी, रामदासस्वामी, केशवस्वामी व आनंदमूर्ति हे वडगांवीं आले होते. मग जयरामस्वामीसुद्धां या संतपंचकानें पावनतीर्थांत स्नान केलें, व तुळसी, फुलें वगैरे यांचे हार करून श्रीकृष्णाप्पास्वामीची यथासांग पूजा केली. त्यावेळीं महानीराजन कर्पूरदीप लावून जयरामस्वामींनीं कृष्णाप्पाची आरती केली. एकंदर समारंभ फार प्रेक्षणीय झाला.

नंतर कृष्णाप्पास्वामींनीं, सर्वांस आपापले गुरुमंत्रांचा जप करण्याची आज्ञा देवून अर्धोन्मिलित नेत्र करून, नासिकाग्रीं दृष्टी लावून देहविसर्जन केलें. मग गुहेचे तोंडाशीं शिळा लावून मंडळी वर आली. जयरामस्वामींनीं गुरुपुण्यतिथिप्रीत्यर्थ एक संवत्सर कीर्तनसमारंभ केला.

श्रीकृष्णाप्पास्वामींची एक शिष्यीण काशीबाई इंदापुरकरीण ही काशीयात्रेस गेली होती. जातेवेळीं कृष्णाप्पास्वामीस " मी आल्याशिवाय आपण समाधि घेऊं नये ' अशी तिनें विज्ञापना केली होती. काशीयात्रा करून ती आपल्या गांवीं आल्यावर तिला कृष्णाप्पास्वामींनीं समाधि घेतल्याची हकीकत समजली. त्यावेळीं आपल्या पतीसह काशीबाई वडगांवीं येऊन स्वामींच्या समाधीपाशीं विलाप करीत बसली. तिनें प्रतिज्ञा केली कीं ' जर स्वामींनीं समाधि उघडून मला दर्शन दिलें नाहीं तर मी येथल्या येथें प्राण सोडीन. ' अशी भयंकरप्रतिज्ञा करून ती तेथें खात

दिवस बसली. सातव्या दिवशीं व्याकुल होऊन ती अगदीं निचेष्टित पडली. त्या दिवशीं रात्रीं, जयरामस्वामीस, 'समाधी उघडून, बाईस माझें दर्शन घेऊं द्यावें' असा कृष्णाप्पास्वामींनीं दृष्टांत दिला. सकाळीं उठून जयरामस्वामी समाधी उघडावी कीं नाहीं या विचारांत आहेत तोंच त्यांचे गुरुबंधु कुंदाजी पाटील व त्याच गांवांतील दुसरा एक भगवद्भक्त ब्राह्मण, तेथें आले. पाटील यांसही "बाईस समाधीचें दर्शन द्यावें' असा कृष्णाप्पास्वामींचा दृष्टांत झाला होता. मग पाटील यांनीं जयरामस्वामीस दृष्टांताची हकीकत सांगितली; व त्या ब्राह्मणानेंही आपणांस तसाच दृष्टांत झाल्याचें सांगितलें. मग 'समाधी उघडून बाईस स्वामीचें दर्शन घेऊं द्यावें' असा सर्वानुमतें विचार ठरल्यावर जयरामस्वामींनीं रामदासादि साधु मंडळीस आमंत्रणें केलीं. मग ठरलेल्या दिवशीं वरील मंडळी वडगांवीं येऊन दाखल झाल्यावर जयरामस्वामींनीं बाईची व दृष्टांताची सविस्तर हकीकत त्यांस निवेदन केली. रामदास, रंगनाथ, केशवस्वामी व आनंदमूर्ति यांनींही, स्वामीच्या आज्ञेप्रमाणें 'समाधी उघडावी' असा आपला अभिप्राय दिला. मग जयरामस्वामींनीं समाधीच्या तोंडीं बसविलेला दगड काढविला व सर्वांनीं श्रीकृष्णनामाचा मोठा गजर केला. त्यावेळीं, कृष्णाप्पास्वामी, जे समाधि घेतेवेळीं पूर्वाभिमुख बसले होते ते आतां उत्तराभिमुख बसलेले सर्वांच्या दृष्टीस पडले. जयरामस्वामींनीं काशीबाईस सांगितलें कीं तुझी प्रतिज्ञा शेवटास गेली. आतां स्वामीचें दर्शन घेऊन पावन हो. मग काशीबाईनें मोठ्या भक्तियुक्त अंतःकरणानें स्वामींचें दर्शन घेतलें; त्या वेळीं चोहींकडे लागलेल्या समया पेटत होत्या व स्वामीपुढील पंचायतनाच्या संपुष्टाची पूजा जशी कांहीं आतांच केली आहे कीं काय असें वाटलें. हा चमत्कार अवलोकन करितांच काशीबाई कांहीं बोलणार तोंच श्रीकृष्णाप्पास्वामी, नेत्र उघडून, बाईस ह्मणाले कीं 'दर्शन झालें! मग जयरामस्वामीस हाक मारून स्वामींनीं समाधी बंद करावयास सांगितलें. मग समाधीच्या तोंडावर पूर्ववत् दगड बसविल्यावर सर्वानुमतें असें ठरलें कीं या नंतर स्वामीच्या आज्ञेशिवाय समाधी उघडावयाची नाहीं. त्या वेळीं कृष्णाप्पास्वामीच्या समाधीस एक वर्ष व पांच दिवस झाले होते. मग जयरामस्वामींनीं मोठा कीर्तनोत्सव केल्यावर सर्व संत आपापल्या गांवीं निघून गेले.

ही गोष्ट घडल्यावर एक वर्षानें कृष्णाप्पास्वामींच्या दुसऱ्या पुण्यतिथीचा दिवस

आला. त्यावेळीं रामदासस्वामी यांनीं एक भेंडाचा रथ करून, तो पत्रासह वडगांवीं जयरामस्वामींकडे पाठविला. पत्रांत खालीं लिहिल्याप्रमाणें मजकूर होता.

" स्वस्ति श्रीगुरुभक्तिपरायण जयरामस्वामी यांस रामदासस्वामी यांचा प्रीतिपूर्वक शिरसाष्टांगनमस्कार विज्ञापना वि० श्रीरामाचे कृपेंकरून आजतागाईत क्षेम असों विशेष. हल्लीं भेंडाचा रथ करून पाठविला आहे तरी आपले गुरूच्या पुण्यतिथीच्या दुसऱ्या दिवशीं, त्यांत स्वामीच्या पादुका घालून रथ मिरवीत जाणें, बहुत काय लिहिणें हे वि०. "

मग जयरामस्वामींनीं समर्थांस लिहिलें कीं ' आपण आल्यावांचून रथोत्साह होणार नाहीं, याकरितां अगत्य यावें. ' मग रामदासस्वामी वडगांवीं आल्यावर कृष्णाप्पा स्वामीच्या पुण्यतिथीप्रीत्यर्थ मोठा उत्सव झाला व स्वामीच्या पादुका रथांत घालून तो सर्व गांवांत मिरविला.

तिसऱ्या पुण्यतिथीच्या वेळीं रंगनाथस्वामींचा घोडा वडगांवीं मृत्यु पावला त्यावेळीं रंगनाथांस फार वाईट वाटलें. हें पाहून जयरामस्वामी रंगनाथांस ह्मणाले " घोडा कांहीं मरावयाचा नाहीं. त्यास निद्रा लागली आहे. तूं कांहीं चिंता करू नकोस. उदयिक रथोत्सव झाल्यावर पाहतां येईल. " असें ह्मणून स्वामींनीं कीर्तनास प्रारंभ केला. दुसरे दिवशीं रथोत्सव झाल्यावर स्वामी रंगनाथांस घेऊन घोड्यापाशीं आले. तों, तो मरून पडलेला पाहून रंगनाथ रडूं लागले. मग जयरामस्वामींनीं, कृष्णाप्पा-स्वामींचें तीर्थ घोड्यावर शिंपडलें व आपली छाटी त्याजवर तीन वेळ फिरवून, " तूं आतां सावध हो " असें सांगितलें. स्वामींची आज्ञा होतांच घोडा एकदम उभा राहून खिंकाळूं लागला. त्यावेळीं जयरामस्वामींच्या अमानुषत्वाबद्दल सर्वांची खातरी झाली. मग स्वामींनीं त्या घोड्यास सांगितलें कीं ' रंगोबाची तुजवर फार प्रीति आहे या करितां त्याचा जीवात्मा असेपर्यंत त्यास अंतर देऊं नको. "

जयरामस्वामी व श्रीगोंदें येथील प्रसिद्ध सत्पुरुष शेख महंमद बावा यांचा मोठा स्नेह होता. या संबंधाची एक आख्यायिका शेखमहंमद बावांच्या चारित्रांत दिलेली आहे. ( यांचें चरित्र याच ग्रंथांत दुसरीकडे दिलें आहे. )

यानंतर स्वामी तीर्थयात्रा करावयास निघाले. प्रथमतः रेवणसिद्ध येथील डोंग-रावर त्यांनीं अनुष्ठान केलें. त्या डोंगरावर, स्वामींची अनुष्ठान करण्याची ओहरी अद्याप आहे. मग तेथून स्वामी पंढरपुरास आले व तेथें श्रीपांडुरंगाचें दर्शन घेऊन पुढें पैठणास गेले. तेथें एकनाथमहाराजांच्या समाधीचें दर्शन घेऊन पुढें निघाले.

काशीक्षेत्रीं आल्यावर, त्रिस्थळी यात्रा करून स्वामी बदरीनारायण येथें गेले. तेथें रेतोदक नामक एक तीर्थ आहे त्याच्या कांठीं स्वामी गुंफा बांधून राहिले. तेथेंच बदरी नारायणापाशीं एक ब्राह्मण आपणास गुरु मिळावा ह्मणून अनुष्ठान करीत बसला होता. एके दिवशीं रात्रीं बदरी नारायणानें त्यास दृष्टांत दिला कीं रेतोदकापाशीं गुंफा बाधून रहात असलेला ब्राह्मण तुझा गुरु आहे. त्यास शरण जा. मग तो ब्राह्मण गुंफेपाशीं येऊन पाहतो तों जयरामस्वामी समाधी लावून बसलेले त्याच्या दृष्टीस पडले. त्या ब्राह्मणाच्या मनांत असा विचार आला कीं यांचें सामर्थ्य किती आहे हें पाहून नंतर यांस शरण जावें.

मग त्या ब्राह्मणानें, स्वामीस आसनासुद्धां उचलून रेतोदक तीर्थांत ठेविलें व आपण बाहेर उभा राहिला. स्वामी समाधिस्थ असल्यामुळें हा प्रकार त्यांच्या लक्षांत आला नाहीं. रेतोदक तीर्थांतील उदक इतकें थंडगार होतें कीं कोणी आंत हात घातल्यास, तो आतां गळून पडतो कीं काय असें वाटावें. त्या उदकानें कोणास मार्जन करावयाचें असेल तर तें दर्भानें करावें लागतें. परंतु अशा शीतोदकांतही स्वामीची समाधि बिलकुल ढळली नाहीं. हें पाहून त्या ब्राह्मणास परम पश्चात्ताप झाला व तो मोठ्यानें हंबरडा फोडून रडूं लागला. स्वामी समाधिविसर्जन करून पाहतात तों समोर रडत बसलेला ब्राह्मण त्यांच्या दृष्टीस पडला. मग ते त्या ब्राह्मणास ह्मणाले ' मला वर काढ '. ब्राह्मण ह्मणाला, ' मला अशा गार पाण्यांत यावयास सामर्थ्य नाहीं. मग स्वामी आसनासुद्धां आपणच बाहेर निघाले. त्या ब्राह्मणानें, स्वामीस, आपणास बदरीनारायणाचा दृष्टांत झाल्याची हकीकत सांगितली. मग स्वामींनीं त्यास मंत्रोपदेश दिला व त्याचें नांव गोपाळस्वामी असें ठेवून तेथें कांहीं दिवस राहिल्यावर स्वामी काशीकडे यावयास निघाले.

काशींत आल्यावर स्वामीस शीतज्वराची भावना झाल्यामुळें तेथें बरेच दिवस मुक्काम करावा लागला. अंगांत थंडी भरत होती तरीही स्वामींनीं आपला कीर्तन करण्याचा नियम मोडिला नाहीं. ते कीर्तनास उभे रहात व अंगावरील छाटी काढून ती बाजूस ठेऊन, अंगांत भरलेल्या थंडीस, त्या छाटींत जावयास सांगत. सत्पुरुषाची आज्ञा कोण अमान्य करील ? बिचारी थंडी निमुटपणें त्या छाटींत जाई व कीर्तन संपेपर्यंत, थंडीनें छाटी हींव भरलेल्या माणसासारखी उडत असे. हा अद्भुत चमत्कार अवलोकन करितांच काशींतील लोकांच्या मनांत स्वामीसंबंधानें फारच पूज्यबुद्धि उत्पन्न झाली.

येथें, सांप्रतच्या एका विलक्षण आक्षेपाबद्दल दोन शब्द लिहावेसे वाटतात. अलीकडे लोकोत्तर चमत्कारांसंबंधानें लोकांचा विश्वास उडत चाललेला दिसतो कारण आधुनिक शास्त्रनियमाप्रमाणें असले चमत्कार घडणें मुळीं शक्यच नाहीं असें ह्मणतात व चमत्कारांचा व साधुत्वाचा तर मुळींच संबंध नाहीं असेंही ह्मणतात. आतां, जर असले चमत्कार घडणें केवळ अशक्यच आहे ह्मणावें तर योगशास्त्राच्या योगानें अर्वाचीन काळींही पुष्कळ चमत्कार दाखविले जातात. दुसरें असें कीं कोणत्याही धर्मातला पाहिजे तो सत्पुरुष घ्या, त्याच्या चरित्रांत, त्यानें केलेला एक तरी चमत्कार दिलेला आढळतो. बुद्ध, शंकराचार्य, खिस्त व महमद या चारही धर्मसंस्थापकांचीं चरित्रें, त्यांनीं केलेल्या लोकोत्तर चमत्कारांनीं भरलेलीं आहेत व असे चमत्कार करण्याची त्यांच्या अंगीं शक्ति होती ह्मणूनच एवढ्या मोठ्या लोक-समूहावर त्यांना आपली यथास्थित छाप बसवितां आली. केवळ विद्वत्तेच्या किंवा सुशीलतेच्या जोरावर कोणी धर्मसंस्थापना करीन ह्मणेल तर ती गोष्ट किती अशक्य आहे हें अर्वाचीनकालिक समाजस्थापकांच्या चरित्रांवरून दिसून येईल. कोणी नीतीनें व आचरणानें फार चांगला असला तरी तेवढ्यानें तो समाजावर आपली छाप बसवून त्यास पाहिजे तिकडे वळविण्यास कधींही समर्थ होणार नाहीं. कदाचित्, जेवढे लोक त्यास ओळखीत असतील, तेवढे मात्र त्याच्या ह्मणण्यास मान देतील व इतर लोकांपेक्षां त्याची मानमान्यता अधिक होईल, परंतु सामान्य जनावर त्या । एकदम अंमल बसावयास त्याच्या अंगीं कांहीं तरी चमत्कार करण्याचें सामर्थ्य असलें पाहिजे व आजपर्यंत आपल्या देशांत जे साधुपुरुष होऊन गेले त्यांस, जी गोष्ट, नुसत्या उपदेशानें, वर्षांची वर्षेंही घडणें अशक्य वाटत होतें, ती गोष्ट, त्यांनीं एका लोकोत्तर चमत्कारानें एका क्षणांत घडवून आणिली.

आतां साधुत्वाचा आणि चमत्कारांचा संबंध नाहीं हें ह्मणणें वाजवी आहे. कारण चमत्कार करील तोच साधु अशी साधुत्वाची व्याख्या करणें अविचाराचें होईल. ज्याला फक्त आपली स्वतःची उन्नति करून घ्यावयाची असेल त्याला चमत्कार करून दाखविण्याचें बिलकुल प्रयोजन नाहीं. परंतु समाजास हातीं धरून, एखादें मोठें धर्मकार्य किंवा देशकार्य करावयाचें असेल तर लोकांचें चित्त एकदम आपल्याकडे वेधून घेतां येईल असें कांहीं तरी अलौकिक सामर्थ्य अंगीं असणें आवश्यक आहे. वामन पंडित व मोरोपंत हे दोन्ही साधु होते व विद्वानही होते. त्यांचें आचरणही कित्ता घेण्यासारखें असून त्यांनीं आपलें आयुष्य केवळ ईश्वर

गुणवर्णनांत घालविलें, तथापि रामदास व तुकाराम यांनीं फारशी विद्वत्ता अंगीं नसतांही, तत्कालीन लोकसमूहावर जशी आपली एवढी छाप बसविली, तशी वरील दोघांही कविवरांना बसवितां आली नाहीं; आणि याचें कारण, लोकांचीं मनें एकदम वेधून जातील असे अलौकिक चमत्कार करून दाखविण्याची शक्ति त्यांच्या अंगांत नव्हती, हें होय. यावरून या चमत्कारांची, धर्मसंस्थापक किंवा धर्मोद्धारक सत्पुरुषांना, किती आवश्यकता असते हें दिसून येईल. असो.

जयरामस्वामी काशींत असतां, तेथें अनंतदेव या नांवाचे कोणी कृष्णभक्त सत्पुरुष रहात असत. त्यांस एके दिवशीं, त्यांच्या शिष्यांनीं, जयरामस्वामी या नांवाचे एक मोठे साधु येथें आले आहेत ते फार चांगलें कीर्तन करितात, असें सांगितलें. दुसरे दिवशीं अनंतदेव यांचे मठांत जन्माष्टमीचा उत्सव व्हावयाचा होता; तेव्हां उत्सवाप्रीत्यर्थ होणारें कीर्तन जयरामस्वामीकडूनच करवावें अशीही त्या शिष्यांनीं आपली इच्छा प्रदर्शित केली. मग अनंतदेव यांनीं स्वतः जयरामस्वामीच्या बिऱ्हाडीं जाऊन प्रेमपुरस्सर त्यांची भेट घेतली व ' उद्यां आमच्या मठांत जन्माष्टमीचा उत्सव व्हावयाचा आहे तरी कीर्तन आपलेकडून व्हावें अशी विनंति आहे ' असें सांगितलें. अनंतदेवांची विनंति जयरामस्वामींनीं मोठ्या आनंदानें मान्य केली. मग दुसरे दिवशीं रात्रौ अनंतदेवांनीं जयरामस्वामीस आणण्याकरीतां आपले शिष्य पाठविले, त्यांजबरोबर स्वामी अनंतदेवांच्या मठांत आले व कीर्तनास उभे राहिले. त्यांनीं आपल्या गुरूंच्या चरित्रावर निरूपण चालविलें असतां श्रोते मंडळीच्या समाधि लागून कोणासही देहभान राहिलें नाहीं. इतक्यांत स्वामीच्या खांद्यावर श्रीकृष्णाची पंचवर्षात्मक बालमूर्ति बसलेली अनंतदेवांच्या दृष्टीस पडली. त्यावेळीं ही श्रीकृष्णमूर्ति आहे हें न ओळखतां अनंतदेव स्वामीस ह्मणाले कीं, मूल खांद्यावर घेऊन कीर्तन करूं नये. ' परंतु तें ऐकल्या न ऐकल्यासारखें करून स्वामींनीं अधिक प्रेमभरांत येऊन कीर्तन पुढें चालविलें. अनंतदेवांस, त्यावेळीं, शामसुंदर पीतांबरधारी कृष्णमूर्ति. स्वामीच्या खांद्यावर विराजमान झालेली स्पष्ट दिसूं लागली. तें प्रत्यक्ष भगवत्स्वरूप अवलोकन करितांच, अनंतदेवांच्या स्वतःच्या कृष्णभक्तिविषयक गर्वाचें एकदम निरसन होऊन त्यांनीं जयराम स्वामीच्या पुढ्यांत साष्टांग नमस्कार घातला व विनयपूर्वक ह्मणाले कीं, ' आह्मी आजपर्यंत जन्माष्टमीचा उत्सव करीत आलों. परतु आज प्रत्यक्ष श्रीकृष्णाचा जन्म झाला. ' अनंतदेवांच्या डोळ्यांतून त्या वेळीं प्रेमाश्रूंच्या धारा वाहूं लागल्या. मग स्वामींनीं ती श्रीकृष्णमूर्ति अनंतदेवांच्या

पदरांत घातली व त्यांस नमस्कार करून ते खालीं बसले. मग अनंतदेव यांनीं 'आजपासून, हा जन्माष्टमीचा उत्सव आपण पुढें चालवावा,' अशी स्वामीस विनंति केली, तेव्हांपासून सदर उत्सव वडगांवीं होऊं लागला. वडगांवीं होत असलेला जन्माष्टमीचा उत्सव, परंपरेनें चालत आलेला आहे.

नंतर स्वामी तीर्थयात्रा करीत करीत वडगांवीं आले. नित्य प्रातः काळीं सद्गुरुची कांकड आरती करावी व स्नान केल्यावर पुनः गुरुदेवतेची यथासांग पूजा अर्चा करून बारा घटिका दिवस येईपर्यंत गुरूचें भजन करावें असा स्वामींचा नित्यक्रम होता. ते भजन करीत असतां देवाच्यांतील मुरलीधराची मूर्ति नृत्य करीत असे, असें सांगतात.

असा क्रम चालत असतां एकेदिवशीं श्रीशंकराचार्यांची स्वारी वडगांवच्या वेशीपाशीं आली आणि चौकशी केली कीं 'या गांवांत ब्राह्मणांचीं घरें कितीं आहेत.' तेव्हां लोकांनीं सांगितलें कीं एक ग्रामजोशी यांचें घर व एका सत्पुरुषाचा मठ येथें आहे. मग आचार्यांनीं शिष्यांस सांगितलें कीं त्या मठांत आपणांस जावयाचें आहे. याकरितां मठाधिपति सत्पुरुष तेथें आहेत किंवा नाहींत याची चौकशी करा. शिष्य वडगांवांत आले व त्यांनीं, लोकांस, 'जयरामबुवा कोठें आहेत' म्हणून विचारिलें. लोकांनीं सांगितलें कीं ते आपल्या गुरूच्या समाधीपाशीं भजन करीत बसले आहेत. मग ते शिष्य समाधीपाशीं आले तों भजनाचा मोठा घोष सुरू असलेला त्यांच्या कानीं पडला. परंतु जयरामस्वामी भजनानंदनिमग्न झालेले असल्यामुळें त्यांचें लक्ष्य या मंडळीकडे मुळींच गेलें नाहीं. मग त्या शिष्यांनीं येऊन आचार्यांस सांगितलें कीं 'बुवा मठांत आहेत. परंतु ते कांहीं न बोलतां भजन करीत आहेत.' मग आचार्यांनीं आपल्या चार शिष्यांस बोलावून असें सांगितलें कीं 'तुम्ही आतांच जाऊन जयरामबुवांस सांगा कीं शंकराचार्य तुमच्या गांवाच्या वेशीपाशीं आले आहेत. ते जगद्गुरु व तुमचेही गुरु आहेत. तरी हें माजविलेलें ढोंग टाकून देऊन, आचार्यांची पूजा करा, नाहींतर तुम्हांस दंड द्यावा लागेल.' आचार्यांच्या आज्ञेप्रमाणे ते चारी शिष्य स्वामींच्या मठांत आले व त्यांनीं आचार्यांचा निरोप त्यांस सांगितला. त्यावेळीं जयरामस्वामी भजन संपवून गुरुदेवतेची आरति वगैरे करून स्वस्थ बसले होते. आचार्यांच्या शिष्यांच्या पायांवर मस्तक ठेवून 'आपला काय हेतु आहे?' असा स्वामींनीं त्यांस प्रश्न केला. तेव्हां ते शिष्य रागावले व शंकराचार्यांची पूजा न करितां, भक्तिमार्गाचें ढोंग

माजविल्याबद्दल त्यांनीं स्वामीची व त्यांच्या गुरूंची निंदा केली. स्वामींनीं त्यांस विचारिलें कीं ' शंकराचार्यांचें आह्मीं काय घेतलें आहे ? आह्मांवर दंड कशासाठीं बसवितात हें समजलें पाहिजे. ' मग ते शिष्य स्वामीस ह्मणाले कीं ' शंकराचार्यांचें शिखासूत्र व यज्ञोपवित हीं आपल्यापाशीं आहेत; तीं आह्मांकडे द्यावीं ह्मणजे आह्मीं जातों.' स्वामींनीं आपली शेंडी कापून ती व यज्ञोपवित तात्काळ त्या आचार्यशिष्यांच्या स्वाधीन केल्यावर त्यांनीं येऊन आचार्यांस मठांत घडलेली इत्थंभूत हकीकत निवेदन केली. परंतु आचार्यांच्या मानावर याचा कांहींच परिणाम झाला नाहीं. ते आपल्या शिष्यवर्गासह नदीवर स्नान करावयास निघाले. वाटेंत सर्वांनुमतें असा बेत टरला कीं 'जयराम गोसावी भ्रष्ट झाला आहे; त्यास कोणी पंक्तीस घेऊं नये. ' अशा अर्थाचीं पत्रें गांवोंगांव पाठवावीं. मग नदीवर आल्यावर, पाण्यांत बुड्या मारून, स्नान करून वर येतात व शेंडी झाडावयास जातात तों मस्तकीं शेंडी नाहीं व गळ्यांत यज्ञोपावेतही नाहीं. अशी त्यांची स्थिति झाली ! सर्व मंडळी एका क्षणांत शिखानष्ट व यज्ञोपवितभ्रष्ट होऊन गेली. मग एक दुसऱ्यास ह्मणतो ' कायहो ? यज्ञोपवितें गेलीं तीं नवीं घालितां येतील परंतु आतां नव्या शेंड्या कुठें मिळतील ? " मग तो शिष्यसमुदाय आचार्यांपाशीं आला तों सगळी मंडळी संन्यासी झालेली पाहतांच आचार्यांस मोठें आश्चर्य वाटलें. मग ' असा प्रकार कशामुळें झाला " हें जाणण्याकरितां आचार्यांनीं समाधी लाविली त्यावेळीं जयरामस्वामींचे गुरु कृष्णाप्पास्वामी यांनीं समाधींत आचार्यांस सांगितलें कीं ' तुमच्या शिष्यांनीं माझा शिष्य जयराम याचा छळ केला त्याबद्दल तुमच्या शिष्यांस ही शिक्षा मिळाली आहे. तरी आतां वडगांवीं जाऊन, शिखामंत्रानें जयरामाच्या मस्तकावर त्याची शिखा स्थापून त्याचें यज्ञोपवित तुह्मीं आपल्या हातानें त्याच्या गळ्यांत घाला व त्याची क्षमा मागा ह्मणजे तुमच्या मंडळीच्या शेंड्या व यज्ञोपवितें नष्ट झालीं आहेत तीं पुन: उत्पन्न होतील. मग आचार्यांनीं समाधिविसर्जन करून, शिष्यांस सांगितलें कीं ' आज आपल्या हातून मोठा अन्याय घडला आहे. ' नंतर आचार्य आपल्या शिष्य वर्गासह वडगांवीं जयरामस्वामीपाशीं आले व त्यांस साष्टांग नमस्कार घालून त्यांनीं त्यांचे बळकट पाय धरिले. हें पाहतांच स्वामी शंकराचार्यांस साष्टांग नमस्कार करून ह्मणाले कीं ' मी आपला सर्वस्वी अपराधी व आपली पदवीही मोठी असें असतां आपण मला

१ ह्याचा अर्थ काय ?

नमस्कार करितां हें योग्य नाहीं.' मग आचार्यांनीं आपल्या शिष्यांच्या शेंड्या व यज्ञोपवितें नष्ट झाल्याची सविस्तर हकीकत स्वामीस निवेदन केली, व शिष्य मंत्र व यज्ञोपवित मंत्र ह्मणून आपल्या हातानें स्वामीच्या गळ्यांत यज्ञोपवित घातलें. मग स्वामी सर्व मंडळीस ह्मणाले, ' तुह्मीं आमच्या गुरुंची निंदा केली त्याचा हा परिणाम आहे याकरितां माझ्या गुरुंच्या चरणांचें पावन तीर्थ आहे त्यामध्यें सर्वांनीं स्नानें करावीं." मग सर्वांनीं स्वामींच्या आज्ञेप्रमाणें पावन तीर्थांत स्नान केल्यावर सर्वांस, पूर्ववत् शेंड्या व यज्ञोपवितें प्राप्त झालीं. मग आचार्यांसह सर्व मंडळीनें स्वामीस भक्तिपूर्वक साष्टांग नमस्कार केला व कृष्णाप्पास्वामींच्या समाधीसही नमस्कार करून ते ह्मणाले कीं ' जयरामस्वामी हे ईश्वराचे अवतार आहेत." मग स्वामींनीं आचार्यांस चार दिवस ठेऊन घेतलें. दररोज भोजन झाल्यावर स्वामी कीर्तन करीत व आचार्य मोठ्या प्रेमभावानें तें ऐकत असत. स्वामींनीं ह्या वेळीं "अपरोक्षानुभव" नामक ग्रंथ लिहिला होता तो पाहून आचार्यांस फार समाधान वाटलें. नंतर आचार्य स्वामींचा निरोप घेऊन स्वाश्रमीं गेले.

एकनाथ जयराम वगैरे सत्पुरुष हे त्या त्या काळचे सुधारक होत. नाथांनीं जनसमाजाविरुद्ध अनेक कृत्यें केलीं व त्याबद्दल लोकांकडून त्यांस त्रासही पुष्कळ झाला; तथापि आपल्या अलौकिक साधुत्वाच्या व सहनशीलतेच्या जोरावर तो सर्व त्रास व कष्ट निमूटपणें सहन करून उलट त्यांनीं समाजावर आपली पूर्ण छाप बसविली. धर्मसुधारणेचें ओझें अंगावर घेण्याइतकी योग्यता अंगीं आल्यावर समाजापासून विलग न होतां धिमेपणानें सुधारणाप्रदेशाकडे पावलें टाकीत कसें जावें हें सांप्रतच्या सुधारकांनीं या सत्पुरुषांच्या चरित्रांवरून शिकावें. एकनाथ, जयराम किंवा ईश्वर होणें हें सामान्य पुरुषांच्या नशिबीं नाहीं; त्याला असामान्य धैर्य, पूर्ण सहनशीलता व अलौकिक मनोनिग्रह हे सद्गुण अंगीं असावे लागतात. थोड्याशा छळास भिऊन अंग काढणें व वाहत्या गंगेंत हात धुवून घेणें हीं जशीं खऱ्या सुधारकांचीं लक्षणें नाहींत तशींच जातिभेदाचा तिटकारा करून त्याचा त्याग करणारांनीं, आपल्या पूर्वधर्मीय ज्ञातिबांधवांनीं दिलेल्या मानपत्रांचें व केलेल्या पानसुपारीचें लब्धप्रतिष्ठितपणानें ग्रहण करणें व पुनः स्वज्ञातियांबद्दल अभिमान प्रदर्शित करणें हीं सुधारणेचीं लक्षणें नाहींत. कायद्याच्या जोरावर सुधारणा घडवून आणण्याची इच्छा धारण करणें हें तर मानसिक दुर्बलतेचें व मूर्खपणाचें लक्षण होय. एकनाथ सुधारक होता ह्मणून त्यास आपल्या पक्षांत ओढणारांनीं

एकनाथाचा सुधारणेचा मार्ग कोणता होता तो शोधून काढून त्या मार्गाचें अवलंबन केलें पाहिजे. समाजास अजिबात सोडून देऊन, वेगळें राहून, मनास मानेल तसें अद्वातद्वा वर्तन करणें व निरनिराळे पंथ आणि समाज स्थापन करून, परमेश्वरानें आपणांस ज्या धर्मांत जन्म दिला त्या धर्माच्या नांवानें खडे फोडीत राहणें व त्याची कुटाळकी करणें ही सुधारणा नव्हे, तर बंधुद्रोहाचें आणि धर्मद्रोहाचें महापातक होय ! ज्या अद्वैतत्त्वावर, शंकराचार्य व एकनाथ अशांसारख्या महापुरुषांनीं, दुसऱ्यांवर अवलंबून न राहतां, स्वतःच्या सामर्थ्यानें योग्य सुधारणा घडवून आणिल्या 'त्या अद्वैततत्त्वानें आमचें आजपर्यंत फार नुकसान केलें' अशी हाकाटी करून त्यास नांवें ठेवणाऱ्या सांप्रतच्या मतलबी सुधारकांस 'एकनाथ हा आमच्याचसारखा एक सुधारक होता' असें ह्मणावयास शरम वाटत नाहीं काय ? ज्या अद्वैततत्त्वाचें एकनाथानें एवढें समर्थन केलें आहे त्या अद्वैततत्त्वानें आमचा देश बुडविला असें ह्मणणाऱ्यांस, एकनाथास, तो साधु असला ह्मणून, आपल्या पंक्तीस ओढण्याचा काय अधिकार आहे ? सांप्रतच्या सुधारकांनीं हातीं घेतलेल्या महत्त्वाच्या सुधारणांपैकीं एकनाथानें कोणत्या सुधारणा घडवून आणिल्या ? डोमकावळ्यांनीं बलात्कारानें जरी एखाद्या राजहंसास नेऊन आपल्या पंक्तीस बसविलें तरी जोंपर्यंत वर्ण व स्वभाव यांत साधर्म्य उत्पन्न होऊं शकत नाहीं तोंपर्यंत डोमकावळा तो डोमकावळा आणि राजहंस तो राजहंसच राहणार. त्यासंबंधानें वाद करण्याची बिलकुल आवश्यकता नाहीं. एकनाथस्वामींनीं, आपल्या मुलानें अत्यंत श्रम सोसून आणिलेल्या गंगोदकानें, उन्हांत तडफडणाऱ्या गाढवास आंघोळ घातली हीच जर सुधारणा असेल तर आमचे सांप्रतचे सुधारक वीर त्या गंगोदकाचा उपयोग याच्याहीपेक्षां वाईट कामाकडे करून एकनाथावर ताण करूं शकतील ही गोष्ट खरी आहे परंतु एकनाथाच्या अंगांत असलेली भूतदया हे कोठून आणूं शकतील ? जयरामस्वामींनीं शंकराचार्यांस विशेष महत्त्व दिलें नाहीं हीच जर सुधारणा असेल तर सांप्रतचे सुधारक, शंकराचार्यांची, वर्तमानपत्रांतून आणि प्रसंग पडल्यास भरसभेंतही, फटफजिती उडवून, जयरामस्वामींनीं उभारिलेल्या सुधारणेच्या लहानशा ध्वजापेक्षां किती तरी मोठा असा आपला सुधारणाध्वज फडकवूं लागतील; परंतु जयरामस्वामींची गुरुभक्ति आणि तिचा प्रताप हीं ते कोठून आणूं शकतील ? शंकराचार्यांनीं आपल्या असामान्य विद्वत्तेच्या जोरावर तत्कालीन कर्ममार्गाचें एकदम खंडन केलें त्याप्रमाणें सांप्रतचे सुधारकही लेखणीच्या एका

फटकाऱ्याबरोबर किंवा सामाजिक परिषदेंतील एका ठरावानें, आजकाल समाजांत चालू असलेल्या भयंकर रूढींना कदाचित् एका क्षणांत नायनाट करून टाकितील (?) परंतु आचार्यांनीं लिहिलेल्या एका वाक्यांत जो अर्थ आहे तो आपल्या कित्येक वर्षांच्याही बडबडींत नाहीं याबद्दल त्यांस काय वाटेल ? पाहिजे त्याला जर लूथर होतां येऊं लागलें तर लूथरची किंमत काय राहिली ? तर तात्पर्य काय कीं, खरी सुधारणा, जी आमच्या परमपूज्य सत्पुरुषांनीं आपल्या लोकप्रिय अलौकिक सद्गुणांनीं घडवून आणिली ती आणि सांप्रतची नकली व तामसी सुधारणा यांत जमीन अस्मानाचें अंतर आहे. सांप्रतच्या सुधारकांनीं जर नकळत एखादें सत्कृत्य केलें असेल तर तें, ख्रिस्ती धर्माच्या प्रसारास त्यांनीं केलेला थोडासा अडथळा हें होय. सुधारकांनीं ख्रिस्ती धर्माच्या वाढीस कसा प्रतिबंध केला असा येथें प्रश्न उत्पन्न होतो तर त्याचें उत्तर असें कीं ख्रिस्ती आणि सनातनधर्माभिमानी लोक या दोहोंच्यामध्यें सुधारक हा एक नवीन वर्ग निघाला आहे. धार्मिकदृष्ट्या पाहिल्यास या वर्गांतील लोकांचा धर्म आर्यधर्मच आहे परंतु त्यांची वर्तणुक पाहिल्यास ती मात्र ख्रिस्ती धर्मानुयायी मंडळींचें अनुकरण आहे. म्हणजे, आपला धर्म तर सुटूं नये व परधर्मीय लोकांच्या चोंचल्यांचा उपभोग तर सुखानें घेतां यावा अशी ज्यांची उत्कट इच्छा असेल त्यांस हा सुधारकपंथ फार सुखकर आहे; व यामुळें बरेच लोक, जे ख्रिस्ती व्हावयाचे, ते न होतां, सुधारक बनून राहिले आहेत. तर या दृष्टीनें, त्यांजकडून परधर्मप्रसारास नकळत थोडासा प्रतिबंध होत आहे. एकंदरींत सुधारकांनीं बजाविलेली ही कामगिरी तरी कांहीं कमी महत्त्वाची नाहीं. ! असो. सुधारणा ही स्वाभाविक आहे व ती सर्वांस इष्ट आहे परंतु योग्य औषधाचा उपयोग करावयास जसा वैद्य लागतो, तसा, देशकाल वर्तमानाकडे लक्ष्य देऊन, सर्व समाजास रुचेल अशा मार्गानें ती घडवून आणण्यास लोखंडाचे चणे खाऊन नाचणारा कोणी तरी सत्पुरुष लागतो व असा सत्पुरुष जोंपर्यंत निर्माण होत नाहीं तोंपर्यंत, सुधारणेच्या मोडक्या खटारा खांद्यावर घेऊन, पाहिजे तर, सांप्रतच्या सुधारकांनीं पडत झडत असेंच मार्गक्रमण करावें, परंतु आमच्याबरोबर एकनाथाच्या किंवा दुसऱ्या एखाद्या सत्पुरुषाची विनाकारण तुलनेची अपेक्षा करूं नये अशी त्यांस माझी नम्र विनंति आहे.

धार्मिक सुधारणेच्या बाबतींत, सांप्रत, थिऑसफिस्टांनीं चालविलेला उद्योग स्तुत्य आहे परंतु असल्या गोष्टी हातीं घेणारांच्या अंगीं जें एक प्रकारचें विशेष सामर्थ्य

असावें लागतें त्याचा त्यांजपाशीं अभाव असल्यामुळें व सनातन धर्माच्या ग्रंथांचा अर्थ सांगतांना तो एका विशेष प्रकारानेंच सांगण्याची त्यांना संवय असल्यामुळें केव्हां केव्हां खऱ्या अर्थाचा विपर्यास करावा लागतो यामुळें त्यांचा प्रयत्न व्हावा तसा फलद्रूप होईलसें दिसत नाहीं. कृष्ण, अर्जुन वगैरे पुराणप्रसिद्ध पुरुष हे कविकल्पनासागरांतील तरंग होत, हें जरी कदाचित् खरें असलें तरी अनधिकारी लोकांपुढें असल्या गोष्टींचें व्याख्यान करणें ह्मणजे स्वधर्मावर असलेली त्यांची श्रद्धा नष्ट करण्यासारखें होय; हें तत्त्व या लोकांनीं विसरतां कामा नये. सर्व धर्म, भिन्न कालीं, भिन्नदेशीय धर्मसंस्थापकांनीं स्थापन केलेले असतां, त्यांची एकवाक्यता करूं पाहणें कितपत शक्य आहे याचा बळकट संशय वाटतो. हे लोक, आमच्या सत्पुरुषांनीं नांवारूपास आणिलेल्या भागवतधर्माचें व भक्तिमार्गाचें अवलंबन करून जर त्या मार्गानें प्रयत्न करितील तर त्यांस खात्रीनें यश येईल असें वाटतें. " सूर्य व चंद्र यांच्या मध्यें पृथ्वी आली असतां चंद्रास ग्रहण लागतें हें भास्कराचार्यांस जरी कळून चुकलें होतें तरी ग्रहणाच्या दिवशीं ते अन्न ग्रहण करीत नसत हें या लोकांनीं मुद्दाम लक्ष्यांत ठेवावें. असो. प्रसंगानुसार झालेल्या विषयांतराबद्दल प्रिय वाचकांची नम्रपणें माफी मागून मुख्य विषयाकडे वळतों.

जयरामस्वामीसंबंधानें, त्यांच्या बखरकारांनीं खालील आख्यायिका दिली आहे. त्या आख्यायिकेंत ज्या बादशहाचा उल्लेख आहे तो बादशहा कोण होता याचा उलगडा होत नाहीं. कदाचित तो विजापुरकरांचा एखादा सरदार असून बखरकारांनीं त्यास बादशहा असें चुकीनें ह्मटलें असावें, असेंही असण्याचा संभव आहे ही आख्यायिका अशी:—एके दिवशीं प्रातःकाळीं, हातांत खराटा घेऊन कृष्णाप्पास्वामीच्या समाधीसभोंवतालचा कचरा जयरामस्वामी लोटून काढीत असतां, बादशहानें पाठविलेला एक कारकून पालखीसह तेथें आला. त्यानें स्वामीस नमस्कार करून सांगितलें कीं आपणांस बादशहानें बोलाविलें आहे. स्वामीनीं विचारिलें, बादशहाचें मजपाशीं काय काम आहे?". कारकुनानें सांगितलें कीं, दररोज कोणातरी सत्पुरुषाचें दर्शन घेतल्याशिवाय अन्नग्रहण करावयाचें नाहीं असा बादशहाचा नियम आहे. सरकारस्वारी सध्यां चितळी येथें आहे, तरी आपण येऊन त्यांस दर्शनाचा लाभ द्यावा. स्वामीनीं प्रश्न केला कीं बादशहास आमची माहिती कोणीं दिली ? कारकुनानें सांगितलें कीं चितळी येथें आल्यावर 'येथें जवळपास कोणी सत्पुरुष आहे काय ?' अशी बादशहानें चौकशी केली. तेव्हां लोकांनीं येथून चार कोसांवर वडगांवीं जय-

रामस्वामी या नांवाचे एक भगवद्भक्त आहेत, ' असें सांगितलें. त्यावर बादशहानें आपणास घेऊन येण्याची मला आज्ञा दिल्यावरून मीं येथपर्यंत आलों आहें, तरी या पालखींत बसून आपण निघावें अशी विनंति आहे. मग स्वामी कृष्णाप्पास्वामींच्या समाधीस नमस्कार करून व हातांतील खराटा पालखींत ठेवून, बादशहाकडे जावयास पायींच निघाले. स्वामी चितळीस येतांच, बादशहा आपल्या प्रधानासह त्यांस सामोरा जाऊन आपल्या तंबूंत घेऊन आला. तेथें बादशाहानें, स्वामीस, आपण पालखींत न बसतां आंत खराटा ठेवला याचें कारण काय? असें विचारलें. स्वामी हाणाले कीं, आमच्यापेक्षां या खराट्याची योग्यता अधिक आहे. कारण कीं त्याचें शरीर समाधीच्या सभोंवतालचा कचरा लोटतांना जसें झिजलें तसें आमचें झिजत नाहीं. हें उत्तर ऐकतांच जयरामस्वामींच्या गुरुभक्तीचें बादशहास मोठें आश्चर्य वाटलें. तथापि त्यांची आणखी परीक्षा पाहण्याच्या इराद्यानें बादशहानें आपल्या नोकरांस सांगितलें कीं रुप्याच्या ताटांत मांस वाढून वर साखर घालून स्वामीपुढें आणून ठेवा. त्याप्रमाणें नोकरांनीं ताट आणिल्यावर बादशहानें स्वामीस विचारलें कीं या ताटांत काय आहे तें सांगावें. परंतु जयरामस्वामी कांहींच बोलले नाहींत. परंतु लागोपाठ बादशहानें तोच प्रश्न तीन वेळ केल्यावर स्वामी हाणाले ' या ताटांत तुळशी व नानाप्रकारचीं पुष्पें आहेत. " हें ऐकतांच बादशहानें ताटावरील वस्त्र काढून पाहिलें तों स्वामींनीं सांगितलेले पदार्थ दृष्टीस पडले. हा चमत्कार पाहून बादशहास व सर्व लोकांस मोठें आश्चर्य वाटलें. नंतर बादशहानें जयरामस्वामींच्या पायांवर मस्तक ठेवून हात जोडून विनंति केली कीं मला कांहीं शास्त्रार्थ समजून घ्यावयाचा आहे तो कृपा करून आपण सांगावा. आह्मीं, पुष्कळ शास्त्री व पंडित यांस विचारिलें परंतु आमचा संशय कोणाकडूनही दूर झाला नाहीं. नंतर स्वामी, बादशहास एकांतीं घेऊन गेले व तेथें त्याची संशयनिवृत्ति केल्यावर, त्याचा निरोप घेऊन वडगांवीं आले.

कृष्णाप्पास्वामींनीं समाधी घेतल्यापासून ४९ वर्षें जयरामस्वामींनीं, कृष्णकीर्तन व तीर्थयात्रा करण्यांत व रामदासादि सत्पुरुषांच्या समागमांत घालविलीं. श्रीकृष्णजन्माचा व गोपाळकाल्याचा उत्सव करून अनेक जडमूढांचा उद्धार केला व गुरुभक्तीचा महिमा जगांत प्रकट केला. मग स्वामींचा समाधिकाल समीप आला. त्यावेळीं रामदास, रंगनाथ, आनंदमूर्ति, केशवस्वामी, शेखमहंमद वगैरे संतांस स्वामींनीं आमंत्रणें पाठवून वडगांवीं आणविलें. समाधीची सर्व तयारी झाल्यावर, शके

१५९४ भाद्रपद वद्य एकादशीचे दिवशीं, स्वामी, नित्यनेमाप्रमाणें समाधीची पूजा करून, आसन घालून पूर्वाभिमुख बसले. त्यावेळीं रंगनाथस्वामी त्यांस ह्मणाले कीं आज, आपल्या देहास विकृति दिसते. मीं कोण आहें हें आपल्या ध्यानांत आलें काय ? त्यावेळीं स्वामी ह्मणाले 'माझी अवस्था विचारशील तर मी कृष्ण-नामाचें कीर्तन व गुरुचरणांचें स्मरण करीत स्वस्थ बसलों आहें. देहप्रकृतीची भावना विचारशील तर देहास सहस्र विंचू चावल्याच्या वेदना होत आहेत. विकार काय झाला ह्मणशील तर हातास राजफोड झाला आहे. 'मी कोण' असें विचारिलेंस तर त्याचा मी फार विचार करितों परंतु "मी कोण ? तूं कोण ? हें मला कांहींच समजत नाहीं. कां समजत नाहीं ह्मणशील तर दृश्य वस्तु होती तीच द्रष्टा झाली. मग रंगनाथस्वामी ह्मणाले 'अशी पूर्णावस्था कशानें झाली !' जयरामस्वामींनीं सांगितलें कीं सद्गुरुदाता दयाळू झाला व श्रीकृष्णाची कृपा झाली, त्याचा हा परिणाम होय. मग स्वामीनीं सर्व मंडळीस सांगितलें कीं 'माझ्या गोपाळास घेऊन या.' हे गोपाळस्वामी जयरामस्वामीचे एकनिष्ठ शिष्य होते. ते जयरामस्वामीच्या घोड्याची सेवा करून गुरुसमागमांत कालक्षेप करीत असत. जयरामस्वामी आज समाधि घेणार हें वृत्त त्यांस मुळींच माहित नव्हतें. स्वामीनीं सांगितल्याप्रमाणें गोपाळस्वामीस त्यांजपुढें आणून उभें केल्यावर, स्वामीच्या समाधीची तयारी पाहून तो गुरुभक्त सच्छिष्य मोठ्यानें हंबरडा फोडून रडूं लागला. स्वामीनीं त्यास विचारिलें कीं तूं असा दुःखी कां होतोस ? गोपाळस्वामी ह्मणाले 'आपल्या घोड्यावर आतां कोण बसेल ? आणि मी स्वामी ह्मणून कोणास हाक मारावी ? "जयरामस्वामीनीं त्यांस सांगितलें कीं माझ्या घोड्यावर आतां गोपाळ जयराम बसेल' ' मग स्वामीनीं गोपाळस्वामीच्या गळ्यांत आपली जपाची माळ घातली व सर्वांस विनंति केली कीं आमचे गुरु कृष्णाप्पास्वामी यांच्या पुण्यतिथीस सर्वांनीं वडगांवीं अवश्य येत असावें. नंतर श्रीकृष्णनामाचा दीर्घ उच्चार करून, रामदासादि महापुरुषांच्या देखत, स्वामी सत्स्वरूपीं मिळून गेले. मग रंगनाथस्वामीनीं सर्वांस सांगितलें कीं "आजपासून जयराम असा जो भाव तो लोपला." नंतर गोपाळस्वामींचें सर्वांनीं शांतवन केलें व जयरामस्वामीची समाधि बांधून तेथें एक वर्ष मोठा कीर्तनोत्सव सुरु ठेविला.

येथें जयरामस्वामींचें चरित्र संपूर्ण झालें. जयरामस्वामीच्या नंतर गोपाळस्वामी, १५९४ पासून १६१२ पर्यंत, विठ्ठलस्वामी शके १६१२ पासून १६४१ पर्यंत, मुनीश्वरस्वामी १६४१ पासून १६६८ पर्यंत, व महादेव बावा शके १६६८ पासून,

१७२७ पर्यंत, इतकी शिष्यमंडळी वडगांवच्या गुरुपरंपरेंत होऊन गेली. हे सर्व सत्पुरुष मोठे तेजस्वी व साक्षात्कारी होते; त्या सर्वांची विस्तृत चरित्रें, त्यांनीं केलेल्या चमत्कारांसह ‘ जयरामस्वामीची बखर ’ या पुस्तकांत दिलेलीं आहेत.

आतां जयरामस्वामीच्या काव्यांकडे वळतों. त्यांच्या बखरकारानें ‘ भागवताच्या दशमस्कंधावर प्राकृत टीका, सीतास्वयंवर, अपरोक्षाअनुभव व पुष्कळ पदें व अभंग, इतकी कविता स्वामींनीं लिहिली असा उल्लेख केला आहे. याशिवाय जयरामस्वामींनीं ‘ पंचीकरण ’ या नांवाचा ओवीबद्ध ग्रंथ केलेला असून तो छापून प्रसिद्ध झालेला आहे. जयरामस्वामींचीं थोडींशीं पदेंही उपलब्ध आहेत. त्यांची वाणी फार प्रेमळ व गोड असून प्रसादपूर्ण आहे. नमुन्यासाठीं मला मोठ्या प्रयत्नानें प्राप्त झालेलीं दोन तीन पदें व त्यांच्या अपरोक्षानुभव ग्रंथांतील कांहीं वेंचे येथें देऊन हें त्या महापुरुषाचें अल्प चरित्र पुरें करितों.

श्रीक्षेत्र पंढरपुरासंबंधानें जयरामस्वामी ह्मणतात:—

### अभंग

“ क्षेत्र पंढरी पावन धन्य ॥ विठ्ठल ओळला आनंदघन ॥ १ ॥
हरिकृपेचा हरिचंद्र वारा ॥ नामें घातला सरळ धारा ॥ २ ॥
भर वैराग्य तडके भारी ॥ बोध प्रताप गर्जना करी ॥ ३ ॥
अति वृष्टि हें निर्वाण ज्ञान ॥ घन लोपलें चैतन्यघन ॥ ४ ॥
संतसज्जनीं पेरणी केली ॥ क्षेत्र पंढरी पिकासि आली ॥ ५ ॥
कृष्णकृपेचा सुकाळ झाला ॥ दास जयराम भाग्यासि आला ॥ ६ ॥

### पद. ( ताल दादरा )

परती सर, गोंवळा रातलिसी ॥ ध्रु० ॥
न करिसी कामधाम ॥ न धरीसी रूप नाम ॥ अरूपा भाळलीसी ॥ १ ॥
घरधणी मी । मज टाकुनि जासी । तूं मदें मातलीसी ॥ २ ॥
वससी ब्रह्मारण्यीं । गोवळ होउनी । जयराम कृष्णदासी ॥ ३ ॥

### पद ( लंकेहूनि अयोध्ये. या चा. )

हातीं पांवा मोहरी काठी । माथां दधीचोणें वाटी ॥
चालतां गाईचे पाठीं । घालिती डोहो ॥ १ ॥
सखा गोपाळ ज्यांचा । महिमा अपार त्यांचा ॥

आनंदें खेळे जयांचा । गोपाळ गडी ॥ २ ॥
मांडीया थापटिती । भोई फक फोडिती ॥
हमामा तो घालीती । होति माघारे बळी ॥ ३ ॥
लाखी रंगी घोंगडी । संवगडे गोपाळ गडी ॥
देखोनि यमुनेची थडी । आनंद बहु ॥ ४ ॥
पूर्ण तृप्त झाल्या गाई । बैसल्या कळंबा छाई ॥
शिदोऱ्या आणारे भाई । सांवळा म्हणे ॥ ५ ॥
सम खडकावरी । घोंगडी पसरोनि बरी ॥
मध्यें बैसले हरी । भोंवते सखे ॥ ६ ॥
दहींभात शिदोरी । लोणचीं अंगोळ्या करीं ॥
चाखोनी ह्मणती हरी । गोड तें घेईं ॥ ७ ॥
अवघे ह्मणती सांवळ्यास । आधीं घेईं आमुचा ग्रास ॥
कान्होबा तुझाही ग्रास । घालीं तूं आह्मां ॥ ८ ॥
स्वानंदें खेळती । वांकुल्या दाविती ॥
स्वर्गींचे देव टाकिती । उच्छिष्ट ज्याचें ॥ ९ ॥
गुरखे ह्मणाल जरी । देव न पवती सरी ॥
ब्रह्मा वंदितो शिरीं । चरणधुळी ॥ १० ॥
जयराम कृष्णदास । सेवुनी तयांचें शेष ॥
निवाला सावकाश । स्वानंदें खेळे ॥ ११ ॥

वरील पदांत, श्रीकृष्णाच्या बालक्रीडेचें व गोपाळांच्या कृष्णभक्तीचें किती उत्कृष्ट परंतु साधें वर्णन केलें आहे ?

## अभंग.

तुझाची खातसें भात । तुझेंचि गातसें संगीत ॥
तुजची अर्पिलें चित्त । पंढरीराया ॥ १ ॥
सर्वही सोडुनी आस । धरियेली तुझी कास ॥
ठाव नाहीं मीपणास । पंढरीराया ॥ २ ॥
कृष्णदास जयराम । तुवांचि ठेविलें नाम ॥
नामें पूर्ण काम । पंढरीराया ॥ ३ ॥

जयरामस्वामीच्या ' अपरोक्षानुभव ' ग्रंथांतील पुढील वेच्यांवरून त्यांचें अध्यात्म-विषयप्रावीण्य सहज दिसून येतें:—

ओंव्या

' अज्ञाना सुबद्ध विषयासक्ती । बुडाले सुबुद्ध आवर्ती ।
पुण्यक्षेत्रें तयांप्रति । संस्कार चित्तीं चित्तशुद्धि ॥ ९४ ॥
मोक्ष इच्छा धरवुन । देवद्विज गुरू प्राज्ञ ।
भजतां हरिकृपेनें । मोक्ष पूर्ण पावती ॥ ९५ ॥
ऐसें बोलताहे पुराण । मार्गीं लाविले अज्ञान ।
भक्ति लागलिया अनन्य । कृपा पूर्ण देव करी ॥ ९६ ॥
हरि कृपाळु जाला । सद्गुरुरूपें भेटी आला ।
अज्ञान भ्रम निसरला । मोक्ष दिधला निजज्ञानें ॥ ९७ ॥
एवं अज्ञान निरासेंविण । मोक्ष न घडे सत्यप्रमाण ।
उद्धव अर्जुन भक्तजन । ज्ञानें श्रीकृष्णें उद्धरिले ॥ ९८ ॥
उमे सारिखे आपण । जन्म घेतले ज्ञानेंविण ।
शिवें दिधलें निजज्ञान । तेव्हां पूर्ण निजप्राप्ति ॥ ९९ ॥
मा तीर्थव्रतीं मोक्षप्राप्ती । केवळ घडे कैशा रीती ।
व्हावी अज्ञान निवृत्ति । ह्मणोनि प्रवृत्ति नेमिली ॥ १०० ॥
हृदयग्रंथीं जें अज्ञान । त्यांत वासना विपरीत ज्ञान ।
त्यांत क्रिया देहाभिमान । दृढबंधन प्राणिया ॥ १ ॥
तीर्थ व्रतें नेम करून । तेणें लागे हरिभजन ।
हरिभजनें निजात्मज्ञान । निरसे अज्ञान जीवाचें ॥ २ ॥
पिता शिकवी पुत्रासी । वोर वोनामा जरी लिहिसी ।
बरी खासी आणि जेविसी । सुखें नांदसी संसारीं ॥ ३ ॥
असो, सद्गुरुकृपें निजात्मज्ञान । प्रकटतां निरसे अज्ञान ॥
निरसोनियां विपरीत ज्ञान । देहाभिमान हारप ॥ ४ ॥
एवं हृदयग्रंथि जें अज्ञान । निरसे त्यातें मोक्षसदन ॥
सज्ञान स्वयें स्वानंदघन । मोक्ष बंधन स्पर्शेना ॥ ५ ॥
आतां ग्रंथाच्या उपसंहारीं । शेवटील श्लोक निजनिर्धारीं ॥
शंकराचार्य गर्जना करी । दावी बरी संतहरणी ॥ ६ ॥ अपरोक्षानुभव, प्र. १२

हा अपरोक्षानुभव ग्रंथ मूळचा संस्कृत असून तो श्रीमत् शंकराचार्यप्रणित आहे. याचीं बारा प्रकरणें असून, जयराम स्वामींनी त्यांतील प्रत्येक संस्कृत श्लोकावर सुबोध व विस्तृत मराठी टीका केली आहे. हा ग्रंथ ठाणें येथील, 'महाराष्ट्र कवि, मासिक पुस्तकांत प्रसिद्ध झालेला असून तो एकवार वाचून पाहण्याची मी माझ्या प्रिय वाचकांस शिफारस करितों.

'महाराष्ट्रकवि' मासिक पुस्तकांत, रा. भावे यांनीं जयरामस्वामीचें संक्षिप्त चरित्र दिलें आहे त्यांत जी नवी माहिती आढळली, तिचा येथें संग्रह करून, हें चरित्र पूर्ण करितों.

'कृष्णाप्पा स्वामीची भेट होण्यापूर्वीच जयरामस्वामींनीं संस्कृताचें ज्ञान संपादन केलें होतें. कृष्णाप्पा स्वामीची कृति हल्लीं फारशी उपलब्ध नाहीं, परंतु मराठी ग्रंथांवर त्यांचें प्रेम फार होतें. समाधि घेतांना 'ज्ञानेश्वरीचा नववा अध्याय समाधीति पुढें ठेवून नंतर यांनीं आसन मांडिलें अशी आख्यायिका प्रसिद्ध आहे. कृष्णाप्पांचे गुरु शांतलिंगप्पा हे लिंगाईत जंगम होते, तथापि ते अद्वैतमताचे पूर्ण अभिमानी होते. शिखरशिंगणापुर येथें यांचें स्थान आहे. तेथें, अद्यापिहि, एकाच सभामंडपांत शिव व विष्णु यांच्या मूर्ति असून, त्यांची पूजा अर्चा यथास्थित चालते.

कृष्णाप्पास्वामी हे मानदेशांतील राहणारे, ह्यांचें आडनांव अभ्यंकर. कृष्णाप्पास्वामीचा अनुग्रह मिळाल्यावर जयरामस्वामी भजनपूजन करून केवळ उदासीन वृत्तीनें राहात असत; परंतु रामदासांच्या सांगण्यावरून, पुढें त्यांनीं आपला संप्रदाय वाढविला. म्हसवडकर माने, कुरलेकर राजे, औंधचे प्रतिनिधि ही मंडळी स्वामीच्या शिष्यवर्गांत होती.

जयरामस्वामी शरीरानें बळकट व तेजःपुंज असून त्यांचा वर्ण गोरा होता. त्यांच्या स्वरूपासंबंधानें व समाधीसंबंधानें पुढील दोन श्लोक प्रसिद्ध आहेत.

गौरा यस्य तनुर्महोदर उदासोऽयं सुकौपीनधृक् ।
श्रीकृष्णेति वदन्समाधिनिरतो नित्यस्वरूपेस्थित : ।।
ब्रह्मानंदमयः सतामभयदोऽभीष्टप्रद: शंकरः ।
सोऽयं श्रीजयरामसद्गुरुवरः पायादपायात्सदा ।।
शालीवाहनके विरिंचिमुखतो भक्ति प्रपंचोऽब्दके ।
तत्र श्रीपरिधाविवत्सरवरे दाक्षिण्यमार्गेरवौ ।।

मासे प्रोष्ठपदे शिते हरिदिने जीवाव्हये वासरे ।
सोऽयं श्रीजयराम योगितिलको ब्रह्मस्वरूपो बभौ ॥

स्वामींचे पुढील ग्रंथ वडगांवच्या मठांत आहेत:—

| | | |
|---|---|---|
| १ श्रीमद्भागवत दशमस्कंध टीका. | ३ सीतास्वयंवर. | ५ शांतिपंचीकरण. |
| २ रुक्मिणीस्वयंवर. | ४ ज्ञानिभक्तसंवाद. | ६ अपरोनुभव. |

ह्यांपैकीं शेवटचे दोन ग्रंथ मात्र छापले आहेत, बाकीचे छापावयाचे आहेत. जयरामस्वामीच्या परंपरेपैकीं कृष्णाप्पास्वामीचीं कांहीं पदें मात्र आढळतात.

जयरामस्वामींची परंपरा ( संप्रदायिक ).

श्रीशांतेश्वर महाराज.

श्रीकृष्णाप्पास्वामी ( समाधि श. १५४५ माघ शुद्ध १५. )




या चरित्रांत दिलेल्या माहितीपेक्षां, जयरामस्वामींसंबंधानें बरीच माहिती उद्धवसुत व आत्मारामबोवा यांच्या रामदासचरित्रांत दिली आहे, ती जिज्ञासूनीं त्या ग्रंथांत पहावी.

# वामन.

'नमिला साष्टांग श्रीपतिभक्तिरसज्ञ वामनस्वामी ।
रसभवना तत्कवना मानी या तेंवि त्रास न करा मी ॥ १ ॥

सन्मणिमाला—मोरोपंत.

जैसा चंडांशु सतेज व्योमीं । तैसाचि केवळ वामनस्वामी ॥
ज्याची श्लोकरचना ये भूमीं । मंडळावरी अपूर्व पा ॥ १ ॥

रामविजय—श्रीधर

आमचे बहुतेक कवि साधु होते व त्यामुळें बहुतेक मराठी कविता साधी व परमार्थपर झाली आहे. परंतु निबंधमालाकारांनी म्हटल्याप्रमाणें ज्यास खरा विद्वान् किंवा पंडित म्हणतां येईल, असा मराठी कवि वामनच होय. हे वामनस्वामी मोठे विद्वान् व पहिल्यानें मराठी भाषेला केवळ तुच्छ मानणारे होते, परंतु कांहीं कारणामुळें त्यांस मराठी भाषेत कविता करण्याची प्रेरणा होऊन नंतर त्यांनीं आपल्या आयुष्याचा, विद्वत्तेचा व कवित्वशक्तीचा उपयोग याच सत्कार्याकडे केला, अशी लोकोक्ति आहे व ती सत्य असल्यास, ही गोष्ट महाराष्ट्र भाषेच्या इतिहासांत मोठ्या महत्त्वाची होय, यांत संशय नाहीं.

परंतु, येथें एक मोठा वादाचा प्रश्न उपस्थित होतो, तो असा कीं, महाराष्ट्रांत 'वामन' या नांवाचे कवि आजपर्यंत किती होऊन गेले? रा. रा. बाळकृष्ण अनंत भिडे बी. ए., काव्यसंग्रहाचे संपादक यांनीं, 'सरस्वतीमंदिर' मासिक पुस्तकांत, या विषयावर एक बराच मोठा लेख लिहून, निरनिराळे पांच 'वामन' होऊन गेले, असें सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे, परंतु तो प्रयत्न केवळ तर्कशास्त्राच्या जोरावर केला असल्यामुळें, त्यास फारसें महत्त्व देतां येत नाहीं. रा. भिडे यांच्या या लेखाचें परीक्षण, मी स्वतः ज्ञानप्रकाश पत्रांत केलें होतें व त्याच्याच आधारानें, पुनः येथें, माझें या बाबतींत काय मत आहे, तें महाराष्ट्र वाचकांपुढें मांडण्याची परवानगी घेतों.

रा. भिडे यांनीं स्थापन केलेले पांच वामन येणेंप्रमाणें:—

१ यथार्थदीपिकाकार वामन. २ शांडिल्यगोत्री वामन.

३ वासिष्ठगोत्री वामन.
५ यमक्या वामन.
४ शृंगारप्रिय वामन, व

या वामनांपैकीं दोन वामन मला खरे वाटतात; ते कोणते ह्मणाल तर, ( १ ) **वासिष्ठगोत्री यथार्थदीपिकाकार शृंगारप्रिय वामन** व ( २ ) **शांडिल्यगोत्री लक्ष्मीनृसिंहसुत यमक्या वामन.** पहिले ' वामनस्वामी ' या नांवानें ओळखिले जातात परंतु ते महापंडित होते, यामुळें त्यांस ' पंडित ' असेंही ह्मणतात. दुसऱ्याचें आडनांवच पंडित होतें. या दोन वामनांसंबंधानें अधिक खुलासा व्हावा, यासाठीं येथें पहिल्यानें, सगळ्या वामनी ग्रंथांची यादी देतों:—

( माझ्या समजुतीप्रमाणें ) **प्रसिद्ध वामनपंडिताचे ग्रंथ, प्राकृत वेदांत व भक्तिपर**

१ यथार्थदीपिका.
२ समश्लोकी गीता.
३ निगमसार.
४ अपरोक्षानुभूति ( टीका )
५ भगवद्दास्य.
६ ब्रह्मस्तुति.
७ कर्मतत्त्व.
८ नामसुधा.
९ पार्थभाग्य.
१० शुकाष्टक.
११ ध्यानमाला.
१२ विष्णुध्यान.
१३ भक्तिमहिमा.
१४ गंगालहरी.
१५ बोधपर वगैरे स्फुट श्लोक.
१६ चरमगुरुमंजरी.
१७ प्रियसुधा
१८ राजयोग.
१९ चतुःश्लोकी भागवत.
२० मातंगकेसरी.
२१ गीतार्णवसुधा.
२२ चित्सुधा.
२३ योगवासिष्ठ.
२४ उपादान.
२५ तत्त्वमाला.

## पौराणिक काव्यें.

२६ रामजन्म.
२७ अहल्योद्धार.
२८ सीतास्वयंवर.
२९ भरतभाव.
३० लोपामुद्रासंवाद
३१ नृहरिदर्पण.
३२ गजेंद्रमोक्ष.
३३ वामनचरित्र.
३४ " " ( धनाक्षरी )
३५ भागवतरामायण.

३६ कृष्णजन्म.
३७ मृत्तिकाभक्षण.
३८ रासक्रीडा.
३९ कंसवध ( नवरस )
४० द्वारकाविजय.
४१ रुक्मिणीपत्रिका.
४२ रुक्मिणीविलास.
४३ कंसवध ( घनाक्षरी )
४४ भामाविलास.
४५ राधाविलास.
४६ राधाभुजंग.
४७ रंभाशुकसंवाद.
४८ नीतिशतक.
४९ वैराग्यशतक.
५० शृंगारशतक.
५१ बालक्रीडा ( प्रथम )
५२ वनसुधा.
५३ वेणुसुधा.
५४ कात्यायनीव्रत (प्रथम)
५५ दशावतार चरित्र.
५६ हरिविलास.
५७ यज्ञपत्न्याख्यान.
५८ पदें.

संस्कृत ग्रंथ.

५९ अनुभूतिलेश.
६० सिद्धांतविजय.

ज्यांचें कर्तृत्व संशयास्पद आहे अशीं काव्यें.

१ वामनी मनाचे श्लोक.
२ मुकुंदविलास.
३ भूगोलवर्णन.
४ बालक्रीडा ( द्वितीय )
५ गोपीवस्त्रहरण ( सवाया )
६ रसनास्तुति ( सवाया )
७ विराटपर्व.
८ जयद्रथवध.
९ दंपत्यचरित्र.
१० भीष्मप्रतिज्ञा.
११ भीष्मशरपंजर.
२१ स्थालीपाक.
१३ तुकारामस्तुति.
१४ सिद्धांत सवाया.
१५ व्याधाख्यान.
१६ बालक्रीडा ( सवाया )
१७ उपदेशमाला.

वरील यादीपैकीं कित्येक काव्यांचे शेवटीं तेच तेच श्लोक आलेले आढळतात, याचें कारण लेखकप्रमाद नसून, मोरोपंती रामायणाचे शेवटीं जसा एकच ठरावीक श्लोक आढळतो, त्याप्रमाणें वामनपंडितांनीं आपल्या बहुतेक पौराणिक काव्यांचे शेवटीं, एकाच अर्थाचे श्लोक घातले आहेत; व कित्येक ठिकाणीं तर एकाच

श्लोकाची पुनरावृत्ति केलेली आढळते. आतां कित्येक ठिकाणीं, ह्मणजे जीं काव्यें मुख्य वामनाचीं नव्हत अशा काव्यांत, त्यांच्या अस्सल काव्यांतील अखेरीचे श्लोक घुसडून दिलेले आढळतात, ही गोष्ट खरी आहे; परंतु अशा घुसडाघुसडीनें हीं काव्यें त्याचींच—मुख्य वामनाचीं—आहेत, असें कोणी समंजस मनुष्य मानील असें वाटत नाहीं. इंग्लंडांत यमकमय काव्यरचनेची पद्धति पहिल्यानें प्रचारांत आणणारा कवि जो पोप त्याच्या वेळीं, त्याचेंच अनुकरण करून, आपल्या कवितेनें साधारण लोकांत भ्रम उत्पन्न करणाऱ्या यमक्या कवींचा जसा सुळसुळाट झाला होता, तसाच पंडितांच्या वेळींही महाराष्ट्रांत झाला असावा, असें अनुमान करण्यास आज चांगला बळकट पुरावा आहे. यथार्थदीपिकाकार वामनांनीं आपल्या कुलगोत्राचा, आपल्या एकाही ग्रंथांत स्पष्ट उल्लेख केलेला नाहीं. फक्त सिद्धांतविजयांतील—

‘ अहो देही जातो रघुकुलगुरोर्गोत्रजलधौ ।
शुक श्रीव्यासाद्या मुनय इह यत्पूर्वजतमाः ॥
स्वनाम्ना यद्दासौ हरिपदरजो वामन इति ।
श्रियः कान्तः कर्तापिच स्वकृतसिद्धांतविजयः ॥ १ ॥

या श्लोकांत, आपला जन्म वासिष्ठ गोत्रांत झाल्याचा त्यांनीं उल्लेख केला आहे. यावरून वामन हे वासिष्ठ गोत्री होते असें ह्मणण्यास हरकत नाहीं. वामनपंडितांनीं एक संस्कृत आरती केली आहे, तिची, अनुभूतिलेशाची व ह्या सिद्धांतविजयाची संस्कृत भाषा फारशी भिन्न दिसत नाहीं.

वर दिलेल्या काव्यांच्या यादींत, प्रथम जीं ६१ काव्यें दिलीं आहेत, त्या सर्वांचा कर्ता एकच यथार्थदीपिकाकार प्रसिद्ध वामन—असावा, असें माझें ठाम मत आहे. कारण त्या सर्व काव्यांतील विचार, सहजयमकरचना, भाषाप्रभुत्व, कोटिक्रमपद्धति, शृंगारवेदांतमिश्रण, वर्णनशैली, ह्या सर्व गोष्टी त्या काव्यांच्या कर्त्यांचें एकरूपत्व उघडपणें सिद्ध करितात. विषय निराळे आहेत, परंतु विचार भाषा व रचना हीं एकसारखीं आहेत. शिवाय पंडितांच्या काव्यांत एक विशेष आहे तो असा कीं, ग्रंथारंभीं गणेशसरस्वतींचीं नांवें नसावयाचीं, तर काव्यांत जें कथानक वर्णन केलें असेल त्याचा सारांश आरंभींच्या श्लोकांत मोठ्या खुबीनें गोंवून दिलेला असावयाचा. तसेंच, ‘ तांडव ’, ‘ पार्थसारथी,’ ‘ कैटभारी हे जे वामनस्वा-

मीचे आवडते शब्द ते त्यांच्या वरील यादींत दिलेल्या बहुतेक काव्यांत आढळतात. या दृष्टीनें पाहतां, मी दिलेली यथार्थदीपिकाकार वामनाच्या प्रसिद्ध ग्रंथांची यादी अगदीं बरोबर असावी असें वाटतें. ह्या वामनाच्या कांहीं काव्यांतील आरंभीचे श्लोक पुढें दिले आहेत:

'करुनि नमन सीतावल्लभाच्या पदांतें।
कथिन पदरजाच्या कीर्तिच्या संपदांतें ॥
जड शिळ तनु झाली जे अहल्या मतीची।
निजचरणरजें ते उद्धरू राम तीची ॥ १ ॥

अहल्योद्धार.

'श्रीस्वयंवर वधू नवराहो। तो अखंड मनिं राघव राहो ॥
भग्न जो करि धनुष्य भवाचें। बीज तो हरु अनादि भवाचें ॥ १ ॥

सीतास्वयंवर.

'करुनि वंदन जानकिनायका। भरतभाव निरोपिन आयका ॥
जननि टाकुनि रामपदीं निघे। सुकृत तो मति हे समजोनि घे ॥ १ ॥

भरतभाव.

'वंदूनी श्रीराम संसारसाक्षी। ज्याचे अंकीं जानकी सारसाक्षी ॥
लोपामुद्रेशीं तिशीं शब्दमाला। झाल्या; अर्पू त्याचि सर्वोत्तमाला ॥ १ ॥

लोपामुद्रासंवाद.

करुनि नमन एका देवदेवा हरीतें। भवभय अवघेंही नाश ज्याचें हरीतें ॥
हरिविण इतरांतें सेवितां बद्ध होतो। कथिन चरितरूपें व्यासभावार्थ हो तो॥ १ ॥

कृष्णजन्म.

वर ज्या काव्यांच्या आरंभीचे श्लोक दिले आहेत, तीं काव्यें यथार्थदीपिकाकार वामनाचीं नव्हत, असें रा. भिडे ह्मणतात; पण मला तें सयुक्तिक वाटत नाहीं. कारण वरील सर्व काव्यांची रचना, सौलभ्य व प्रसाद हीं, रा. भिडे यांनीं, यथार्थदीपिकाकार वामनाचीं ह्मणून ठरविलेल्या २२ काव्यांतील त्या त्या गुणांशीं सहज बरोबरी करूं शकतील. आतां 'भीष्मयुद्ध' व 'जयद्रथवध' हीं काव्यें यथार्थदीपिकाकारांचीं नव्हत, याबद्दल, रा. भिडे यांशीं माझी एकवाक्यता आहे. हीं दोन काव्यें विराटपर्वकर्त्या वामनाचीं असावीं, असें मला वाटतें. परंतु ही शंका बरोबर

आहे असें मानिल्यास यथार्थदीपिकार हे '**वामन पंडित**' नसून फक्त '**वामन**' होते असें ह्मणणें भाग पडणार आहे. कारण भीष्मयुद्ध काव्याच्या शेवटीं '**ताताभिधा नृहरिपंडित माय लक्ष्मी**' असा कवीनें आपल्या मातापितरांचा उल्लेख केला आहे. अर्थात् बापाचें जें आडनांव तेंच पुत्राचेंही असणार. अशा स्थितींत भीष्मयुद्ध काव्य जर यथार्थदीपिकाकार वामनाचे नव्हे असें ह्मणावें—आणि त्या काव्याच्या रचनेवरून तें त्याचें काव्य नसावें असें वाटतें.—तर त्याचें आडनांव पंडित नसून भीष्मयुद्ध, जयद्रथवध, विराटपर्व इत्यादि काव्यांचा कर्ता जो दुसरा वामन त्याचें तें आडनांव होतें असें ह्मणणें ओघानेंच प्राप्त होतें. बरें हें काव्य यथार्थदीपिकाकार वामनाचें आहे ह्मणावें तर, त्यांस वासिष्ठ गोत्रांतून काढून शांडिल्य गोत्रांत घालावें लागतें. एकंदरींत या मुद्द्याचा पूर्ण विचार करून, योग्य निर्णय देणें फार कठिण आहे, यांत संशय नाहीं व यासाठीं, मी, तें काम भविष्यकालीन महाराष्ट्रकविचरित्र-कर्त्याकडे सोंपवितों. तथापि येथें एक मोठा महत्वाचा मुद्दा, विचारांत घेणें रास्त आहे, तो हा कीं, यथार्थदीपिकाकारांसंबंधानें लिहितांना मोरोपंत, महिपति, उद्धवसुत व श्रीधर या चारी कवींनीं त्यांस 'वामनपंडित' न ह्मणतां 'वामनस्वामी' असें ह्मटलें आहे. वामनाचा शिष्य जो साम्राज्य वामन त्यानें वामनास 'वामनस्वामी' असेंच म्हटलें आहे. यावरून असें अनुमान होतें कीं, यथार्थदीपिकाकार वामन हे जरी मोठे पंडित होते, तरी त्यांच्या पारमार्थिक योग्यतेकडे पाहून, एकनाथांप्रमाणें तत्कालीन लोक त्यांस 'वामनस्वामी' ह्मणत असतील; व नरहरि पंडितांचा मुलगा व विराटपर्वाचा कर्ता जो वामन त्यास वामन पंडित ह्मणत असतील. 'यमक्या वामन' ह्मणून रामदासस्वामी ज्याची थट्टा करीत असत तो हाच वामनपंडित असावा. याच्या कवितेवरून, हा खरा पंडित नसून, वामनस्वामीच्या यमकरचनेचें अनुकरण करणारा कोणी तरी चांगला संस्कृतज्ञ व मध्यम प्रतीचा कवि असावा, असें वाटतें. बाळाजी आणि कंपनीनें प्रसिद्ध केलेल्या वामनचरित्रांत या वामनासंबंधानें असेंच संशयप्रदर्शन केलेलें आहे. शद्बांचीं अशुद्ध रूपें, 'रे,' 'हो' इत्यादि शब्दांचा, यमकपूर्तीसाठीं वरचेवर केलेला उपयोग, वेदांतज्ञानाचा व पांडित्याचा अभाव, गणेशसरस्वतीवंदन, इत्यादिकांवरून या वामनाची कविता, यथार्थदीपिकाकारांच्या कवितेपासून तात्काळ निवडून काढितां येते. तथापि, मुकुंदविलास, दंपत्यचरित्र, भीष्मप्रतिज्ञा, इत्यादि कांहीं काव्यें अशीं आहेत कीं, त्यांची रचना थेट यथार्थ-दीपिकाकारांच्या काव्यरचनेसारखी आहे.

रा. रा. विश्वनाथ काशीनाथ राजवाडे यांनीं, प्रस्तुत विषयावर ‘ सरस्वतीमंदिर ’ मासिकपुस्तकांत एक लेख लिहिला आहे, त्यांत त्यांनींही अशींच कांहीं विलक्षण अनुमानें केलीं आहेत. त्यांनीं वामनासंबंधानें पुढील माहिती दिली आहे. ‘ कोल्हापुरच्या उत्तरेस सहा कोसांवर वारणेच्या तीरीं वडगांव व कोरेगांव असे उत्तरदक्षिण तीरांवर समोरासमोर दोन गांव आहेत. पैकीं उत्तर तीरावरील जें कोरेगांव त्याला शीगांव कोरेगांव अशी संज्ञा इतर कोरेगांवांपासून ओळखण्याकरितां देतात. सदर कोरेगांवीं वामनस्वामींच्या पादुका व वृंदावन हीं आहेत. शोध करितां वामनासंबंधानें खालील हकीकत मिळाली. वामन मूळचा राहणारा विजापुरचा. ऋग्वेदी, वासिष्ठ गोत्री-उपनाम शेष. बापाचें नांव नरसिंह व आईचें लक्ष्मी. लक्ष्मीचें माहेरचें गोत्र शांडिल्य, स्त्रीचें नांव गिराबाई, याला फारशी भाषा उत्तम येत असे. याचा विद्याभ्यास काशीस झाला. याचा गुरु सच्चिदानंद. मूळपंथ माध्व. कुटुंबमत द्वैत. गुरूपदेशानंतर अद्वैत. हा प्रवास करीत करीत कोरेगांवीं वारणातीरीं आला व तें गांव त्यास पसंत पडून त्यानें तेथें नारायणाचें एक देऊळ व मठ बांधिला. कोरेगांवचे कुळकर्णी याचे शिष्य होत. पैकीं पहिला शिष्य विश्वात्मक गोसावी. वामन तीर्थयात्रेस महाबळेश्वराकडे जात असतां, वाईच्या पश्चिमेस गुन्हेघर येथें समाधिस्थ झाला. गुन्हेघर भूगांवच्या समोर आहे व दोन्ही गांवांच्या मध्यें कृष्णानदी वाहत आहे. तेव्हां महादेव ऊर्फ विश्वात्मक गोसाव्यानें वामनस्वामींची समाधि भूगावीं कृष्णातीरीं खडकावर बांधिली. नंतर कोरेगांवीं वृंदावन बांधिलें. वामन शके १६१७ त समाधिस्थ झाला. भूगांवची जी कृष्णा तीच पांडववाडीची कृष्णा आहे. भूगांवास वामनाची समाधि आहे, व शीगांव कोरेगांवास वामनाचें वृंदावन आहे. ही हकीकत राजाराम प्रासादीकृत भक्तमंजरीमालेंतही आहे. गैर माहितीनें दोन्ही स्थलीं समाधि आहेत, असें आजपर्यंत कित्येक लोक मानीत आले, यापलीकडे कांहीं नाहीं. दोन समाधि असल्यामुळें वामनही दोन असावे, असा ग्रह प्रचलित झाला. ’

वरील हकीकत बरीच विश्वसनीय आहे, असें मानण्यास हरकत नाहीं. रा. राजवाडेही, वामनास ‘ वामनपंडित ’ ह्मणत नसून, ‘ वामनस्वामी ’ ह्मणत आहेत, हें लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे. वामनाचें आडनांव ‘ शेष ’ होतें, अर्थात् ‘ पंडित ’ हें त्याचें आडनांव नव्हे, हें उघडच झालें. वामनाचें गोत्र ‘ वासिष्ठ ’ होतें, असें रा. राजवाडेही ह्मणतात. एकाच वामनाचीं, ‘ समाधि ’ व ‘ वृंदावन ’ हीं कशीं असूं शकतील, याचा खुलासा रा. राजवाडे यांनीं केला नाहीं. ग्रंथमालेंतील मुक्तेश्वरा-

वरील आपल्या निबंधांत रा. राजवाडे यांनीं अशीच चुकी केली आहे. वरील समाधि एका वामनाची व वृंदावन दुसऱ्या वामनाचें, असा प्रकारही असूं शकेल. श्री राजाराम छत्रपतींकडून विश्वात्मक गोसावी यांस मिळालेल्या सनदेंत फक्त कोरेगांव येथील वृंदावनाचा उल्लेख आहे, गुन्हेगांवच्या समाधीचा उल्लेख नाहीं, यावरून ह्याच तर्क बरोबर असावा, असें, वाटतें. आतां, सदर सनदेंत ज्याअर्थी पुण्यतिथीचा उल्लेख आहे, त्या अर्थी वामनांनीं आपल्या वृद्धदशेंत संन्यासदीक्षा घेतली असली पाहिजे, असें ह्मणणें भाग आहे. तथापि हीं सगळीं अनुमानें आहेत, सिद्धांत नव्हत, हें रा. राजवाडे यांनींही कबूल केलें आहे, हें लक्ष्यांत ठेविलें पाहिजे. 'वामनाच्या आईच्या बापाचें गोत्र शांडिल्य होतें,' या आपल्या विधानाच्या समर्थनार्थ रा. राजवाडे यांनीं पुढील श्लोकांतील शेवटच्या शब्दाची जी व्यर्थ ओढाताण केली आहे, ती कोणासही मान्य होईल असें वाटत नाहीं:—

'ताताभिधा नृहरिपंडित माय लक्ष्मी ।
जे सर्वदा सुगुणयुक्त उदार लक्ष्मी ॥
शांडिल्य गोत्र कुळदेव नृसिंह ज्याचा ।
दासानुदास निज वामन हो अज्या ( जा ) चा ॥

या श्लोकांत वामनानें आपलें गोत्र 'शांडिल्य' व आडनांव 'पंडित' आहे, हें स्पष्टपणें नमूद येलें आहे. कोरेगांवीं वृंदावन असलेल्या यथार्थदीपिकाकार वामनाचें आडनाव पंडित नसून, 'शेष' होतें व गोत्र 'वासिष्ठ' होतें, अर्थात् वरील श्लोक या वामनाचा नसून, दुसऱ्या वामनाचा आहे, हें अगदीं स्पष्ट होत आहे. 'दासानुदास निज वामन हो अज्या ( जा ) चा' या चरणाचा अर्थ, रा. राजवाडे यांनीं 'वामन हा आपल्या आजाचा दासानुदास' असा केला आहे. वास्तविक पाहतां, मूळ शब्द 'अज्याचा' नसून अजाचा' आहे व त्याचा अर्थ 'परमेश्वराचा वामन हा दासानुदास आहे' असा आहे; असें असतां, आपल्या अनुमानजन्य विधानाच्या समर्थनार्थ, रा. राजवाडे यांच्यासारख्या विद्वानानें त्या शब्दास भलतेंच स्वरूप देण्याचा प्रयत्न करावा, हें चमत्कारिक नाहीं काय ? असो.

वर ज्या सनदेचा उल्लेख आला आहे ती सनद येणेंप्रमाणें:—




स्वस्तिश्री राज्याभिषेक शक २५ बहुधान्य नाम संवत्सरे फाल्गुण शु ॥ १३ त्रयोदसी क्षत्रियकुलावतंस श्री राजाराम छत्रपति यांणीं राजश्री विश्वात्मक गोसावि यांसि दिल्हे इनामपत्र ऐसेजे:—







तुम्हीं कील्ले पनाळेचे मुकामीं स्वामींसंनिध येऊन विनंति केली कीं आपले गुरु बहुत थोर सत्पुरुष यांणीं वैकुंठवास केला. त्यांचा मठ व वृंदावन मौजे कोरेगांव कर्यात वडगांव प्रांत पनाळे येथें आहे. त्याची पूजाऊर्जा व पुण्यतिथीचा महोछाह चालिला पाहिजे. याकारितां राजश्री रामचंद्र पंडित अमात्य यांणीं मौजे मजकूरपैकीं नूतन जमीन चावर येक पूर्वी दिधला आहे, त्याप्रमाणें इनाम चालता आहे. तरी स्वामींनीं आपले मुद्रेनिसी इनामपत्र करून चालवायाची आज्ञा केली पाहिजे. त्यावरून मनास आणितां, गोसावी सत्पुरुष बहुत थोर होते. त्यांणीं वैकुंठवास

केला. त्यांचा मठ वृंदावन मौजे मचकुरीं आहे. तेथें मठाची पूजाऊर्जा पुण्यतिथीचा महोछाह चालिला पाहिजे या कारणें पंडित मशारनिलेनीं येक चावर जमीन मौजे मजकुरपैकीं पूर्वीं इनाम दिधली आहे. तेणेंप्रमाणें स्वामींनीं मौजे मजकूरपैकीं जमीन चावर १ एक करार केला असे. तरी मौजे मजकूरपैकीं एक चावर जमीन दुमाला करून घेतली आहे, त्याची कीर्दी करून जें उत्पन्न होईल त्याचा व्यय गोसावी यांच्या या समाधिस्थळीं तुह्मी व पुढें शिष्यपरंपरेनें करून प्रतिवर्षीं यथासांग महोछाह करीत जाणें. निदेशसमक्ष.




वरील सनदेचा काल, शके १६२० बहुधान्य संवत्सर, हा आहे. या पूर्वीं तीन वर्षे ह्मणजे शके १६१७ त रामचंद्रपंत अमात्य यांनीं, वामनाच्या पुण्यतिथिप्रीत्यर्थ एक चावर जमीन इनाम दिली होती; त्यावेळीं त्यांनीं दिलेली सनदही रा. राजवाडे यांस उपलब्ध झाली आहे, असें समजतें. एकंदरींत रा. राजवाडे यांच्या शोधकपणामुळें वामनासंबंधाची बरीच विश्वसनीय माहिती पुढें आली याबद्दल त्यांचे आभार अवश्य मानिले पाहिजेत.

रा. भिडे यांचीं विधानें खोडतांना रा. राजवाडे यांनीं जे कांहीं मुद्दे पुढें आणले आहेत, ते मलाही बहुतांशीं मान्य असल्यामुळें, येथें, त्यासंबंधाचें विवेचन करण्याची आवश्यकता नाहीं.

वर ' ज्यांचें कर्तृत्व संशयास्पद आहे ' या सदराखालीं जीं १६ काव्यें दिलीं आहेत, तीं या दुसऱ्या वामनपंडिताचीं असावीं, असा बळकट संशय येतो. कदाचित्, हा कवि, साम्राज्य वामन, विश्वनाथ वामन, बापू वामन ह्यांच्याप्रमाणें, यथार्थदीपिकाकार वामनस्वामीचा शिष्य असण्याचा संभव आहे. या वामनानें आपल्या विराटपर्वांत आपल्या यमकरचनाचातुर्याचा मोठ्या प्रौढीनें उल्लेख केलेला असून,

मागें लिहिल्याप्रमाणें, रामदासस्वामीचा यमक्या वामन तो हाच होय असें ह्मणण्यास आतां मुळींच हरकत नसावी. एकंदरींत बाळाजी कंपनीनें व काव्यसंग्रहानें प्रसिद्ध केलेल्या वामनी ग्रंथांत जी कविता छापून निघाली आहे; ती या दोन वामनांची होय. या दोन वामनांपैकीं, यथार्थदीपिकाकार वामन हा जसा महापंडित होता, तसाच तो भगवद्भक्त असल्यामुळें त्यास 'वामनस्वामी' ह्मणत व दुसऱ्याचें आडनांव पंडित असल्याळें त्यास वामनपंडित ह्मणत असत. यथार्थदीपिकाकार वामनाचें खरें आडनांव काय होतें, याचा जेव्हां खुलासा होईल, तेव्हां या वादाचा आपोआप निकाल लागेल. 'सुश्लोक वामनाचा' हें वाक्य 'वामनस्वामीच्या' ह्मणजे यथार्थदीपिकाकार वामनाच्या श्लोकांस अनुलक्षून आहे; कारण दुसऱ्या वामनाच्याः—

'नाहीं कवित्वरिति लौकिकरंजनाची ।
आहे मला निवळ चाड निरंजनाची ॥
मी पायधूळ दयसागर यादवाची ।
वाचीन कीर्ति शमदायक या भवाची ॥ १ ॥

विराटपर्व, अध्याय ६ श्लोक २००

अशा प्रकारच्या श्लोकांस 'सुश्लोक' ह्मणतील इतके रामचंद्र बडवे अरसिक होते, असें विधान करण्यास मी समर्थ नाहीं. 'भीष्मशरपंजर' हें काव्य मी संशयास्पद काव्यांच्या यादींत दाखल केलें आहे, परंतु त्याच्या शेवटींः—

'काशीस नाम जननी जनकाभिधानी ।
श्री विश्वनाथ, मम दैवत कृष्णवेणी ॥
श्रीमन्महेश अघमर्षण जो उपायीं ।
दासानुदासचि तरे दव तो सुपायीं ॥ १ ॥

हा श्लोक असून त्यांत वामन हें नांव नसल्यामुळें हें काव्य, तिसऱ्याच एकाद्या कवीचें असावें, असें वाटतें. भर्तृहरीच्या शतकत्रयाच्या भाषांतरासंबंधानें रा. भिडे यांनीं जो संशय प्रदर्शित केला आहे, तो व्यर्थ आहे. कारण त्या शतकांत, वामनस्वामींनीं जरी आपल्या नांवाचा उल्लेख केलेला नसला, तरी त्यांची रचनाच असें सांगते कीं, तीं वामनाच्याच लेखणींतून मराठींत आलीं आहेत.

---

१ कै० रा. ओकांनीं या बाबतींत अगदीं मौनधारण केलें आहे, हें आश्चर्य होय.

रा. भिडे यांस जे हे पांच वामन प्रस्थापित करावे लागले ह्याचें कारण, यथार्थदीपिकाकारांसारखा वेदांती कवि, इतर शृंगारिक व पौराणिक काव्यें लिहिणार नाहीं, अशी त्यांची समजूत झाली आहे, हें होय. पण या समजुतीमुळें, आपण केवढा घोंटाळा केला आहे, याची त्यांस कल्पनाही झाली नसेल. गजेंद्रमोक्षांतील ' नसे ठावा ब्रह्मा न शिव अथवा श्रीपति हरी । हरी जो तापातें उचलुनि कृपासिंधु लहरी ॥ हरी वाटे काळा करिस विपती मृत्यु भुजगा । जगाचा तूं ऐसा धनि कवण तो पाव मजगा ॥ ' हा श्लोक, व रासक्रीडेंतील ' माळाकार परस्परें ' या शब्द समुच्चयानें प्रारंभित होणारा श्लोक, हे दोन श्लोक आज २५० वर्षे प्रसिद्ध सुश्लोककार वामनाचे ( यथार्थदीपिकाकारांचे ) ह्मणून लोकप्रिय होऊन बसले आहेत. व असल्याच कवित्वप्रचुर श्लोकांवरून, ' सुश्लोक वामनाचा ' हा सिद्धांत व वामनाची प्रसिद्धि, हीं अस्तित्वांत आलेलीं आहेत, परंतु रा. भिडे यांनीं भीत भीत, जीं २०।२१ काव्यें यथार्थदीपिकाकाराचीं ह्मणून ठरविलीं आहेत त्यांत वरील दोन सर्वमान्य व लोकप्रिय श्लोक ज्यांत आहेत, त्या गजेंद्रमोक्ष व रासक्रीडा या दोन काव्यांचा समावेश केलेला नसल्यामुळें, वामनाचें अग्रेसरत्व व लोकप्रियता, हीं रा. भिडे यांनीं आपण होऊनच काढून घेतल्यासारखीं दिसतात. वास्तविक पाहतां, रासक्रीडा, राधाभुजंग, राधाविलास इत्यादि सगळीं शृंगारिक काव्यें वामनस्वामींचीं ( यथार्थदीपिकाकाराचीं ) आहेत हें त्यांच्या रचनासादृश्य व भावसादृश्यावरून कोणाच्याही सहज लक्षांत येण्यासारखें आहे; व रा. भिडे हे स्वतः कवि असतां, ही गोष्ट त्यांच्या लक्षांत आली नसावी, असें ही ह्मणतां येत नाहीं. तर हा चमत्कार असा आहे कीं, पूर्वी सांगितल्याप्रमाणें, यथार्थदीपिकेसारखे वेदांतग्रंथ लिहिणाऱ्या महापंडिताच्या हातून, रासक्रीडा, राधाभुजंगासारखे शृंगारिक ग्रंथ बाहेर पडतील, असें ह्मणण्यास रा. भिडे यांस धैर्य होत नाहीं, परंतु, रा. भिडे यांचा हा तर्क आणि समज अगदीं चुकीचे आहेत हें पुढील विवरणावरून वाचकांच्या लक्ष्यांत येईल.

खुद्द यथार्थदीपिकेंत पुढील ओवी आहे.

**व्रजीं चरितां गायीं । कुचकुंकुमें गोपिकांचीं पायीं ।**
**तदंकित तृणे कृतार्थ ठायीं ठायीं । बल्लवस्त्रिया पढलिया त्या काय ? ॥ १ ॥**

या ओवींत, रा. भिडे यांस, शृंगाराचा अतिरेक झालेला मुळीच आढळत नाहीं काय ? त्याचप्रमाणें ज्ञानेश्वरींत

'वेश्याभोगीं कवडा वेंचे । मग दारही चेपूं नये तियेचें ।'

असे, श्रीज्ञानेश्वरांनीं एके ठिकाणीं उद्गार काढिले आहेत; एवढ्यावरून ते ब्रह्मचारी नसून, कोणी तरी व्यसनी मनुष्य होते असें, किंवा ही ओवी दुसऱ्या कोणी तरी दुष्टाचार्यांनीं ज्ञानेश्वरींत घुसडून दिली असावी असें ह्मणतां येईल काय? तसेंच पांडवप्रतापादि ग्रंथांचे कर्ते श्रीधरस्वामी नाझरेकर ह्यांनीं आपल्या वयाच्या चौदाव्या वर्षी संन्यासदीक्षा ग्रहण केली हें सुप्रसिद्ध आहे; असें असतां त्यांनीं एके ठिकाणीं 'पशुसुतजाया धनधामीं प्रीति मोठी' असें, स्वतःस अनुलक्षून ह्मटलें आहे, तेवढ्यावरून ते संन्यासी नसून प्रापंचिक होते असें सिद्ध करितां येईल काय? एकनाथस्वामी ह्मणजे केवढे वेदांती व भगवद्भक्त; असें असतां आपल्या भागवतांतील पिंगलाख्यानांत त्यांनीं शृंगारवर्णनाची जी कमाल केली आहे, तेणेंकरून त्यांच्या कीर्तीस कांहीं कमीपणा आला आहे, असें कोणी ह्मणूं शकेल काय? तर मग वामनासारख्या प्रेमळ सगुणोपासकानें आपल्या उपास्य दैवताच्या कांहीं पौराणिक कथांचें शृंगारपर वर्णन केलें तर त्यांत एवढें काय बिघडलें? व तीं वर्णनें वामनस्वामीनींच लिहिलीं असतां तीं त्यांचीं आहेत असें ह्मणण्यास, रा. भिडे यांस लाज कां वाटावी? कवि हे निरकुंश व दुनियेची फारच थोडी पर्वा करणारे असतात, हें सर्वत्र प्रासिद्ध आहे. ते आपल्या काव्यौघांत एकदां वाहवत सुटले, ह्मणजे भक्तिरससमुद्रांतून वेदांतमहासागरांत, वेदांतमहासागरांतून वीररस सागरांत, वीररससागरांतून शृंगारसरोवरांत, याप्रमाणें कोणीकडे जातील आणि कोणीकडे जाणार नाहींत, याचा नेम काय सांगावा? शिवाय वेदांताची चर्चा करणाऱ्या कवीनें शृंगारिक कविता लिहूं नये, किंवा लिहिली नाहीं, असें येडेंच आहे? ज्या एकनाथांनीं भागवत लिहिलें त्यांनींच रुक्मिणीस्वयंवरही लिहिलें. मध्वमुनीश्वरांनीं, 'निजलीस काय गे। होई जागी तमाखू खाय गे ॥' हें एक हास्यरसोत्पादक पद लिहिलें आहे; व तेंही एका स्त्रीस अनुलक्षून लिहिलें आहे, पण ह्मणून, तेवढ्यावरून, त्यांच्या साधुत्वास कसा काय बाध येतो? दुसरें असें कीं, एकाद्या कवीनें शृंगारवर्णनाचा अतिरेक केलेला असला, ह्मणजे त्याच्या कवित्वास हीनत्व येतें, असें जर रा. भिड्यांसारखी मंडळी ह्मणूं लागली, तर काय काय चमत्कार होतील, याचा त्यांनीं विचार केला आहे काय? शंकराचार्यांनीं अमरुशतक लिहिलें असें ह्मणतात, ह्मणून त्यांस आचार्यपदावरून खालीं ओढावें लागेल, कालिदासांनीं शाकुंतलासारखीं शृंगाररसप्रधान नाटकें

लिहिलीं ह्मणून त्यांस अनीतिमान् ह्मणावें लागेल. शेक्स्पीयरनें, ' ह्यामलेट, अथेल्लो' सारखीं नाटकें लिहून सगळ्या जगाची नैतिक शुद्धता कलुषित करण्याचा प्रयत्न केला, ह्मणून त्याचें थडगें उकरून त्याच्या प्रेतास महादीच्या प्रेतास मिळालेली शिक्षा देण्याकरितां, आमच्या इंग्रजसरकारास एखाद्या किचनेरची रवानगी करावी लागेल ! व्यासांनीं किंवा शुकाचार्यांनीं, रासाध्यायी व रंभाशुकसंवाद यांत केलेल्या शृंगारपर वर्णनाबद्दल त्यांस पवित्र ऋषिमंडळांतून हद्दपार करावें लागेल; इतकेंच नव्हे तर कडकडीत ब्रह्मचर्याबद्दल आज हजारों वर्षें गाजत असलेल्या शुकाचार्यांस, अत्यंत व्यभिचारी लोकांच्या वर्गांत ढकलावें लागेल ! महाराष्ट्रकविमुकुटमणि मुक्तेश्वर यांनीं, दुष्यंत शकुंतलाख्यान, पांडुनिधन, रंभाशुकसंवाद व कीचकाख्यान, ह्या प्रकरणांत ओतिलेल्या शृंगार रसाबद्दल, त्यांस सगनभाऊ तुरेवाल्याच्या पंक्तिस आणून बसवावें लागेल ! व मोरोपंतांनींही आपल्या बृहद्दशमांतील रासपंचाध्यायींत वामनाचेंच अनुकरण केलें आहे, यासाठीं पंतांचे गोडवे गाणारे हंस, चिपळूणकर, पांगारकर, कै. ओक, परशुरामपंत तात्या, बापूसाहेब कुरुंदवाडकर यांस व बहुतेक महाराष्ट्रीयांस वाळींत टाकावें लागेल ! तर असा अनर्थ उडवून देण्यास कारणीभूत होण्यापेक्षां जी वस्तुस्थिति आहे, तीच प्रामाणिकपणें पुढें ठेविली , तर तें अधिक हितकर नाहीं काय ? एकाच कवीनें अनेक रसयुक्त काव्यें लिहिलीं तरी त्यांतील रचनासादृश्य भाषासादृश्य व कल्पनासादृश्य ओळखण्याची मनुष्याची शक्ति जोंपर्यंत अजिबात विलय पावली नाहीं, तोंपर्यंत तरी रासक्रीडा, राधाभुजंग, राधाविलास, गजेंद्रमोक्ष हीं काव्यें व भर्तृहरीच्या तिन्ही शतकांचीं मराठी भाषांतरें, हीं यथार्थदीपिकाकार वामनकृत नव्हेत, असें ह्मणण्याचें धाष्टर्य, रा. भिड्यांशिवाय दुसरा कोणी मार्मिक गृहस्थ करील असें मला खात्रीनें वाटत नाहीं. जो भर्तृहरी राजा होता असें ह्मणतात, तोच भर्तृहरी योगी होता, कवि होता, वैयाकरण होता व शृंगारशतकही त्यानेंच लिहिलें. परंतु, ह्मणून, राजा असणारा भर्तृहरी निराळा, भर्तृहरीनाथ या नांवानें प्रसिद्ध असलेला योगी भर्तृहरी निराळा, संस्कृत व्याकरणाच्या कारिका लिहिणारा भर्तृहरी निराळा व शृंगारशतक लिहिणारा रंगेल भर्तृहरी निराळा असें कोणी प्रपादूं लागल्यास त्याची कशी काय संभावना होईल हें येथें सांगितलें पाहिजे काय ? नको, तथापि, तें समजून घेण्याची कोणास अत्यंत जिज्ञासाच उत्पन्न झाल्यास त्यानें ही गोष्ट स्वतःच अनुभवून पहावी ह्मणजे झालें ! असो. तर याप्रमाणें, यथार्थदीपिकाकारांनीं रासक्रीडा लिहिली, भर्तृहरीच्या शतकांचें भाषांतर केलें, जगन्नाथ पंडितांची गंगा-

लहरी मराठींत आणिली व आचार्यांच्या अपरोक्षानुभूतीवर समश्लोकी टीका लिहिली. शिवाय येथें एका महत्त्वाच्या गोष्टीचा विचार केला पाहिजे; ती गोष्ट ही कीं रा. भिड्यांनीं निर्माण केलेले पांच सहा वामन, महाराष्ट्रांत जर खरोखरच होऊन गेले असते, तर पंतांनीं आपल्या सन्मणिमालेंत एकाच वामनाचा ( वामनस्वामीचा ) उल्लेख न करितां सर्वांचाही केला असता; परंतु वस्तुस्थिति मुळीं तशी नसल्यामुळें, व एकाच कवीच्या निरनिराळ्या काव्यांतील साम्य जाणण्याची पंतांची तारतम्यशक्ति जागृत असल्यामुळें, यथार्थदीपिकाकर्त्या वामनाचीच यमकरचनेबद्दलही त्यांनीं तारीफ* केली आहे. शिवाय कै. हंस व ओक यांसारख्या मराठी भाषेच्या मर्मज्ञास व अधिकारी पुरुषांस ज्या गोष्टीची कधीं शंकाही आली नाहीं, ती गोष्ट रा. भिडे यांनीं आपल्या कल्पनांतरंगावरून सरस्वतीमंदिरांत आणावी, हें विलक्षण नसलें तरी चमत्कारिक ह्मटलें पाहिजे. यासंबंधानें, विहारीकर्त्यांनीं, रा. भिडे यांस जो प्रश्न केला होता, त्याचाच मी येथें अनुवाद करितों. विहारीकर्ते ह्मणतात, मासिक मनोरंजनांतून प्रसिद्ध होणाऱ्या रा. भिड्यांच्या कवितेहून, विनोदीमित्रांत जी त्यांची कविता प्रसिद्ध झाली आहे, तिचें स्वरूप सर्वस्वीं भिन्न आहे; एवढ्यावरून, हे कोणी तरी दोन कवि असले पाहिजेत असें जर एखादा चिकित्सक प्रतिपादूं लागला तर रा. भिडे त्यास काय उत्तर देतील ? ' अस्तु.

रा. भिडे यांनीं, वासिष्ठगोत्री वामनाच्या कवितेवर पुढील अभिप्राय दिला आहे:— " या सर्व प्रकरणांची भाषा बरीच शुद्ध, श्रवणमधुर व शब्दार्थालंकारमंडित आहे. वर्णनांतून स्वभावोक्ति चांगली वठली आहे. ठिकठिकाणीं ध्वनि व अर्थ यांची मोहक रीतीनें साजेशी सांगड कवीनें घातली आहे. तेव्हां, या वामनाची कविता एकंदरींत चांगलीच हृदयंगम व रसाळ आहे. " आतां त्यांच्या शृंगारप्रिय वामनाच्या कवितेवरील त्यांचा अभिप्राय पहा:— यांतील रचना फारच गोड, कोमल, मनाला भुलविणारी आहे. यमकानुप्रास ओतप्रोत खचले असून, छंदही उद्दिष्ट रसाला पूर्णपणें अनुकूल असेच निवडले आहेत. रचनेंत तरतरी, मृदुता, चमत्कारिकत्व व सरळता, प्रौढता व विनोद, यांचें फारच चटकदार मिश्रण झालेलें आहे; आतां या दोन अभिप्रायांत कितीसें अंतर आहे, याचा विचार वाचकांनींच करावा. त्यांत जें कांहीं थोडेंसें अंतर दिसतें, त्याचें कारण त्या काव्यांचे

* मोरोपंती वामनस्तुति पहा.

विषय अगदीं भिन्न आहेत हें होय. एकाच वामनाचे यथार्थदीपिकाकार वामन, शृंगारप्रिय वामन, व वासिष्ठगोत्री वामन असे तीन वामन रा. भिडे यांनीं आपल्या आवडीप्रमाणें केले खरे; परंतु त्यांच्या निरनिराळ्या विषयांवरील व निरनिराळया रसांनीं युक्त अशा काव्यांवर निरनिराळे अभिप्राय देतांना त्यांस जवळजवळ सारख्याच शब्दांचा उपयोग करावा लागला व त्यामुळें झालें काय कीं रा. भिड्यांच्या कल्पनाकाशांतून खालीं उतरलेले हे तीन्ही वामन पुनः एकरूप झाले व अशा प्रकारें रा. भिडे यांचा सर्व खटाटोप पाण्यांत गेला! डोळ्यांत बोट घालून, एकाद्या वस्तुकडे पाहिलें असतां, एका वस्तूच्या ठिकाणीं दोन वस्तु दिसतात व बोट काढून पुनः पाहिलें असतां, एकच वस्तु दिसते, तद्वतच हा प्रकार झाला ह्मणवयाचा! असो. येथपर्यंत वामन हें नांव धारण करणाऱ्या कवींचा व त्यांच्या काव्यांचा यथाशक्ति विचार केला; आतां साम्राज्यवामन, बापूवामन व विश्वनाथ वामन या नांवांचे आणखी तीन 'वामन कवि झालेले आहेत; परंतु ते वामनस्वामीचे शिष्य होत व ह्या गोष्टीचा उल्लेख त्यांनीं आपापल्या काव्यांत केलेला आहे. एकाजनार्दन, शिवदिनकेसरी, हीं जशीं गुरुशिष्य बोधक प्रसिद्ध नांवें आहेत तशींच ' साम्राज्यवामन, बापू वामन, हींही नांवें होत; हें वाचकांच्या लक्षांत येईलच. शेवटीं, यथार्थदीपिकाकारांच्या काव्यांत व त्यांच्या नांवावर कांहीं उपद्व्यापी लोकांनीं दडपन दिलेले श्लोक व सवाया आढळतात, हें रा. भिडे यांचें ह्मणणें खरें आहे, एवढें सांगून, आतां मुख्य विषयाकडे वळतों.

वरील विवेचनावरून, माझ्यामतें, मुख्य वामन कवि दोन ठरतात; यथार्थ दीपिकाकार व सुश्लोककार वामन व विराटपर्वकर्ता वामन. प्रस्तुत चरित्र हें, यांपैकीं पहिल्या वामनाचें होय व त्यांचा उल्लेख, मी ' वामनस्वामी ' व पंडित या दोन्ही नांवांनीं केला आहे, हें लक्ष्यांत ठेवून वाचकांनीं आपलें वाचन सुरू करावें; अशी विनंति आहे.

मोरोपंत, श्रीधर, उद्धवसुत, महिपति, अशांसारख्या महापुरुषांनीं ज्यांची एवढी महति गायिली आहे त्या वामनाचें मूळ ठिकाण कोणतें, त्यांचें जन्म कधीं झालें, इत्यादि हकीकत अनुपलब्ध असावी, ही दुःखाची गोष्ट होय. महाराष्ट्र संतचरित्रकार महिपतिबावा यांनीं किंवा कोणी अन्य लेखकानें वामनस्वामींचें चरित्र कसें लिहिलें नाहीं याचें मोठें नवल वाटतें. बाळाजी आणि कंपनीनें प्रसिद्ध केलेल्या वामनचरित्रांत या शंकेचें पुढीलप्रमाणें समाधान केलें आहे. " वामनपंडित

ह्मणजे सामान्य हरिभक्त होते असें नाहीं. ते निस्सीम भक्त असून, भक्तीचें व आत्मज्ञानाचें लग्न लावून देणारे पहिले मराठी ग्रंथकार हेच होत. त्यांच्या सर्व ग्रंथांत तत्वज्ञास जशी भक्तीची अत्यंत अवश्यकता प्रतिपादन केलेली पदोपदीं दृष्टीस पडते तशी अन्य ग्रंथांत नाहीं. ते प्रेमळ जीवन्मुक्त हरिभक्त होते; परंतु त्यांच्या हातून एकही अद्भुत चमत्कार झाला नाहीं ह्मणूनच त्यांना साधुमालिकेंत ओंविलें नसेल तर कोण जाणे. किंवा ते सत्यप्रिय व निस्पृह असल्याकारणानें त्यांनीं श्रीमद्भगवद्गीतेवर टीका करितेवेळीं कितीएक शब्दांचा अर्थ अन्य टीकाकारांस समजला नाहीं, असें स्पष्ट सांगितल्याबद्दल इतर टीकाकारांच्या अनुयायांचा त्यांजवर रोष झाला असावा, व ते संतमालिकेंत ओंवण्याजोगे साधु नव्हत, यास्तव त्यांस त्या चरित्राच्या हद्दपार करावें, असें त्यांनीं मनांत आणिलें असावें." हीं विधानें सर्वस्वी खरीं नाहींत, तथापि त्यांत बराच सत्यांश आहे यांत संशय नाहीं. महिपतिबावा हे विठ्ठलोपासक व वारकरी असल्यामुळें, इतर दैवतांच्या उपासकांसंबंधानें त्यांनीं क्वचित् ठिकाणीं औदासीन्याचा स्वीकार केलेला दृष्टीस पडतो. उदाहरणार्थ रामदासस्वामींचें चरित्र घ्या. रामदास हे केवळ रामासच भजत असत, विठ्ठलास ते देव मानीत नसत असा वारकरीलोकांचा समज आहे. ज्या समर्थांनीं, सर्व विश्व ब्रह्ममय पाहिलें, 'जगीं वावरे जो अणूरेणु कांहीं, रिता ठाव या राघवावीण नाहीं' असे परमेश्वरस्वरूपासंबंधानें ज्यांनीं उदात्त उद्गार काढिले आहेत व त्याप्रमाणेंच दत्त, कृष्ण, मार्तंड, देवी, इत्यादि सनातनधर्मांतर्गत अनेक देवतांचीं ज्यांनीं स्तुतिस्तोत्रें गाइलीं आहेत, त्या रामदासांच्या मनांत राम आणि विठ्ठल यांविषयीं द्वैत होतें हें ह्मणणें अर्वाचीन नामधारी वैष्णवांच्या (वारकऱ्यांच्या) पक्षाभिमानांधत्वाचें निदर्शक होय. समर्थांनीं खुद्द विठ्ठलावर लिहिलेले कित्येक अभंग आहेत. असें असतां वारकरी लोकांनीं रामदासाचा अभंग भजनांत ह्मणूं नये यास दुराग्रहाशिवाय दुसरें कांहीं कारण दिसत नाहीं. हे वैष्णव वारकरी आपणास ज्या सत्पुरुषांचे अनुयायी ह्मणवितात, त्यांच्या मतांचा त्यांनीं विपर्यास करून, अद्वैताच्या ऐवजीं द्वैत माजविण्यास प्रवृत्त व्हावें, हें अगदीं अप्रशस्त होय. वामनाच्या बाबतींतही असाच प्रकार झाला असावा. हा शुष्क पक्षाभिमान महीपतीसारख्या प्रेमळ हरिभक्तासही थोडासा बाधला होता कीं काय कळत नाहीं. कारण भक्तविजय, भक्तलीलामृत, संतविजय व संतलीलामृत हे चार भक्तचरित्रात्मक प्रचंड ग्रंथ लिहून, जरी त्यांनीं आह्मां महाराष्ट्रीयांवर अगणित

उपकार करून ठेविले आहेत, तरी त्या चारी ग्रंथांत, त्यांनीं बहुतेक वैष्णवांचींच चरित्रें विस्तारपूर्वक दिलेलीं असून इतर पंथीय साधूंच्या चरित्रांचा वरील ग्रंथांत फारसा प्रवेश झालेला नाहीं, असें ह्मणणें भाग आहे. वैष्णवांशिवाय गाणपत्य, देवीउपासक किंवा शैवसंप्रदायी असे जे सत्पुरुष त्या कालीं होऊन गेले त्यांची वरील ग्रंथांत हाणण्यासारखी माहिती दिलेली नाहीं. प्रसंगविशेषीं कित्येक वैष्णवेतर संतांचा उल्लेख करणें जरी त्यांस भाग पडलें आहे, तरी वैष्णव तुकारामाचें चरित्र वर्णन करण्यास जेथें ३० अध्याय लिहावे लागले, तेथें रामदासासारख्यांच्या चरित्रांच्या वांट्यास फारसे अध्याय आलेले नाहींत. तुकारामाच्या वेळीं, शिवदास गोसा ( काशीखंडाचा कर्ता ) या नांवाचा प्रख्यात शिवभक्त शिखरशिंगणापुर येथें होऊन गेला, परंतु त्याची माहिती महिपतींच्या ग्रंथांत आढळत नाहीं. कदाचित् ती माहिती त्यांस मिळाली नसेल. तसेंच, चिंचवड येथील मोरयादेव धरणीधर यांच्या वंशांत अनेक सत्पुरुष होऊन गेले आहेत परंतु ते गाणपत्य असल्यामुळें त्यांच्या चरित्रांचा समावेश महीपतींच्या ग्रंथांत झाला नाहीं कीं काय कोण जाणे. तथापि, महिपतीवर असला पक्षाभिमानांधत्वाचा आरोप करणें बरेंच धाडसाचें काम आहे; हें विसरतां कामा नये. कारण, रामदास, वामन, चिंतामणि देव, इत्यादि वारकरी नसणाऱ्या संतांसंबंधानेंही त्यांनीं ठिकठिकाणीं आपला पूज्यभाव व्यक्त केला आहे. एकंदरींत, काय असेल तें असो, पण वामनस्वामीचें साग्र चरित्र कोणत्याही जुन्या ग्रंथांत दिलेलें नाहीं ही गोष्ट खरी आहे.

आतां, रा. भिडे यांनीं " वामनपंडितांची जी इतकी प्रसिद्धि आहे, ती त्यांच्या मंजुळ, प्रौढ, रसाळ व यमकानुप्रासप्रचुर श्लोकरचनेवरून आहे, परंतु साधु किंवा भगवद्भक्त या नात्यानें त्यांची मुळींच प्रसिद्धि नाहीं,' असें जें म्हटलें आहे, तें मात्र खरें नाहीं. याला प्रमाणें:—

वामनस्वामी चतुर पंडित । जो वेदांत शास्त्रीं निपुण बहुत ॥
त्याहीवरी प्रेमळ भक्त । कविता अद्भुत जयाची ॥ १ ॥ महिपती.

---

१ ह्या गाणपत्य साधूंचीं चरित्रें, 'गणेशभक्तविजय' नामक एका अप्रसिद्ध ग्रंथांत दिलेलीं आहेत, असें प्रसिद्ध गाणपत्य ह. प. सीतारामबुवा इसलामपुरकर यांनीं मला सांगितलें.

याशिवाय, मोरोपंतांनीं, सन्मणिमालेंतील वामनावरील आर्येशिवाय, एकनाथस्तुति, रामदासस्तव, ज्ञानेश्वरस्तुति, कबीरस्तुति इत्यादि साधुस्तोत्रांप्रमाणेंच 'वामनस्तुति' ही लिहिली आहे, अर्थात् त्यांनीं ज्ञानदेव, रामदास, एकनाथ यांच्या मालिकेंत वामनाची योजना केली आहे, हें उघड होतें. वरील ओवींत, महिपतीसारख्या भगवद्भक्तानें वामनास 'प्रेमळभक्त' म्हटलें आहे. दुसऱ्या एका ठिकाणीं त्यांनीं त्यास 'व्यास अवतार कलियुगीं' असें म्हटलें आहे; व व्यास हे जसे मोठे कवि, तत्त्ववेत्ते व भगवद्भक्त होते तसेच वामनस्वामीही होते, असें ध्वनित केलें आहे. शिवाय हे एकट्या महिपतींचेच उद्गार नसून ते, तत्कालीन भागवतांचे व प्रेमळ हरिभक्तांचे उद्गार महिपतींच्या तोंडांतून बाहेर पडले आहेत, हें विसरतां कामा नये. याशिवाय, शिवराम, रंगनाथ, उद्धवसुत, देवदास व उद्धवचिद्घन यांनीं ज्या संत-मालिका लिहिल्या आहेत, त्यांतील बहुतेकांत वामनाच्या नांवाचा उल्लेख आढळतो; तथापि पंडितांच्या भगवद्भक्त या नात्यानें असलेल्या प्रसिद्धीसंबंधानें जर याहूनही अधिक पुरावा कोणास पाहिजे असेल तर त्यानें 'उद्धवसुतकृत रामदासचरित्र' हा ग्रंथ पहावा. त्यांत समर्थ, रंगनाथ, जयराम, तुकाराम व वामन यांचीं नांवें दिलेलीं असून वामनाच्या वेदांतज्ञानाबद्दल समर्थांनीं त्यांची फार स्तुति केली असें स्पष्ट म्हटलें आहे; व अशा प्रकारें समर्थांसारख्या महान् सत्पुरुषांपुढें कीर्तन करून त्यांच्या स्तुतीस पात्र होण्यास केवढी भगवद्भक्ति व केवढा अधिकार अंगीं असणें अवश्यक आहे, हें कोणाच्याही लक्ष्यांत येईल. तेव्हां, वामनस्वामी हे कवि ह्मणून जितके प्रसिद्ध होते, तितकेच ते साधु ह्मणूनही प्रसिद्ध होते हें सिद्ध झालें. आतां येथें कोणी असा आक्षेप घेतील कीं, त्यांचें चरित्र, इतर साधु पुरुषांच्या चरित्रांप्रमाणें प्रसिद्ध कां नाहीं, तर याचें उत्तर पूर्वीं दिलेंच आहे कीं, एक तर महिपतींच्या ग्रंथांत सगळ्याच सत्पुरुषचरित्रांचा समावेश झालेला नाहीं; व दुसरें असें कीं, वामनांनीं एकही चमत्कार करून दाखविला नसल्यामुळें, त्यांचें [१] साधुचरित्र, भाविक प्राकृत लोकांस रुचेल कीं नाहीं, याबद्दल महिपतींस संशय उत्पन्न झाला असावा.

आतां, पंडित हे एवढे मोठे प्रेमळ हरिभक्त असतां व त्यांनीं आपल्या सर्व पांडित्याचा व कवित्वशक्तीचा उपयोग वेदांतासारखे गहन विषय, आपल्या महाराष्ट्र

१ ही हकीकत याच लेखांत पुढें सविस्तर रीतीनें दिली आहे.

बांधवांस आपल्या सुबोध वाणीनें समजून देण्याकडे केला असतां, त्यांच्या कवितेसंबंधानें जुन्या पंडित मंडळींत तसेंच नव्या शिक्षित वर्गांत बहुतेक एक नमुन्याचेंच औदासीन्य आढळतें; असें जें रा. भिडे यांनीं म्हटलें आहे, तें यथार्थ आहे. परंतु, रा. भिडे यांस माझा असा प्रश्न आहे कीं, जुन्या पंडित मंडळींत आणि नव्या शिक्षित वर्गांत कोणत्या मराठी कवींसंबंधानें औदासीन्य आढळत नाहीं? ज्ञानेश्वरी, एकनाथी भागवत, दासबोध हे ग्रंथ वाचणाऱ्या लोकांत तरी जुने पंडित आणि अर्वाचीन शिक्षित कितीसे सांपडतील? पंडितांचा सगळा भर काय तो घटपटादि खटपटीवर, फार झालें तर काव्य नाटकांवर; आणि नव्या शिक्षितांचा भर आंग्ल कवितेवर! मुक्तेश्वर कोणाचा कोण होता आणि मोरोपंतानें काय काय काव्यें लिहिलीं आहेत, हें नव्या शिक्षितांपैकीं कांहीं थोडे अपवादात्मक शिक्षित शिवाय करून, इतरांस ठाऊक असेल कीं नाहीं याचीच शंका! उत्तम मराठी ग्रंथकार ह्मणून नावाजलेल्या माझ्या एका परिचित पदवीधरानें, अद्याप ज्ञानेश्वरींतून एकही ओवी वाचलेली नाहीं! कारण काय तर ज्ञानेश्वरींत कठीण शब्दांचा भरणा फार!! जणूं काय चासर, स्पेन्सर, मिल्टन् यांची सगळी कविता अगदीं बालबोध भाषेंतच लिहिली आहे! असो; तर वास्तविक पाहतां, आमच्या बिचाऱ्या जुन्या कवींच्या ग्रंथांसंबंधानें, नव्या व जुन्या, दोन्ही प्रकारच्या विद्वानांत सारखीच पराङ्मुखता दिसून येते; व वरील ग्रंथांचें जें काय थोडें बहुत वाचन होतें, तें मध्यम प्रतीच्या भाविक लोकांत होतें. आतां, ज्ञानेश्वरी, एकनाथी भागवत व दासबोध, या ग्रंथांसंबंधानें जेवढी वाटाघाट होते, तेवढी वामनाच्या ग्रंथांची होत नाहीं; याचें कारण काय आहे तें पाहूं. ज्ञानदेव व एकनाथ हे अवतारी पुरुष होते, अशी सगळ्या महाराष्ट्राची पूर्वापार समजूत; दुसरें, हे दोन्ही सत्पुरुष, पंढरपुरच्या श्रीविठ्ठलाचे भक्त अर्थात् वारकरी असल्यामुळें व वारकरी अनुयायी महाराष्ट्रांत पुष्कळ असल्यामुळें, त्यांच्यांत वरील दोन्ही सत्पुरुषांच्या ग्रंथांचा फार प्रसार व्हावा, हें अगदीं साहजिक आहे. रा. भिडे यांनीं ज्ञानेश्वरीशीं यथार्थदीपिकेची तुलना करून, पहिलीपेक्षां दुसरी पुष्कळ बाबतींत श्रेष्ठ आहे, असें ठरविण्याचा प्रयत्न केला आहे, तो व्यर्थ आहे. ज्ञानेश्वरी ती ज्ञानेश्वरी आणि यथार्थदीपिका ती यथार्थदीपिका. गेल्या सहाशें वर्षांत, ज्ञानेश्वरीनें जें कार्य केलें आहे, त्याचा विचार केल्यास, ज्ञानेश्वरी ही महाराष्ट्र वाङ्मयाची व साधुसंतांची जननी होय, असें ह्मणणें भाग पडेल. एकनाथ, तुकाराम, जनी, चोखामेळा, श्रीधर, मोरोपंत, अवचितसुतकाशी, व कृष्णदयार्णव

या सगळ्या कवींनीं ज्ञानेश्वरीची स्तुति केली आहे. विशेषतः मुकुंदराजांचे विवेकसिंधु
व परमामृत हे ग्रंथ, नामदेव व त्याचे समकालीन साधु यांचे अभंग, एकनाथी
भागवत व इतर वेदांतप्रकरणें, व तुकाराम व त्यांचे समकालीन कवि यांचे
अभंग, हीं सगळीं ज्ञानेश्वरी मातेचीं बालकें होत. ज्ञानदेवानंतर महाराष्ट्रांत विशेष
नावाजलेले जे जे साधु कवि होऊन गेले, त्यांपैकीं कांहीं विशेष सांप्रदायिक कवि
व साधु शिवायकरून, इतर कवि व त्यांचे ग्रंथ हे ज्ञानदेव व ज्ञानेश्वरी यांचे
अनुयायी व अर्थवाहक होत, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. तर अशाप्रकारें, आज
सहाशें वर्षें, मराठी भाषेंतील ग्रंथवृद्धीस प्रत्यक्षतः व परंपरेनें कारण झालेली,
तुकाराम, कृष्णदयार्णव, यांसारख्या सत्पुरुषांसही मार्गदर्शक होऊन प्रसंगीं क्षुब्ध
झालेल्या मनोवृत्तींस शांतता देणारी, व भागवतधर्म व वारकरी पंथ यांची वेदस्व-
रूपिणी आदिदेवता होऊन बसलेली जी ज्ञानेश्वरी तिचा महिमा माझ्यासारख्या
प्राकृत मनुष्यानें काय वर्णावा ? असें सांगतात कीं,—आणि तें सत्यच असलें पाहिजे—
ज्ञानेश्वरी लिहीत असतां, सच्चिदानंदबाबांनी गीतेंतील श्लोक वाचावा, ज्ञानदेवांनीं
तो ऐकून घेऊन, आपल्या साक्षादनुभवाप्रमाणें त्याचा जो भावार्थ आपल्या तेजो-
मय अंतःकरणांत ध्वनित होईल तो ओवीरूपानें आपल्या प्रसाद, कवित्व
व अनुभवपूर्ण वाणीनें प्रकट करावा व संतसमागमानें पुनीत झालेल्या आपल्या
पवित्र लेखणीनें सच्चिदानंदबाबांनीं तो टिपून घ्यावा, असा प्रकार चालू असे. अशा
रीतीनें द्वापारयुगीं श्रीभगवन्मुखांतून गीर्वाण भाषेंत प्रकट झालेल्या गीतासुंदरीनें,
कलियुगांत श्रीज्ञानदेवांच्या मुखांतून बाहेर पडलेल्या महाराष्ट्र वाणीरूपी अमृतोद-
धींत लक्ष्मीप्रमाणें अवतार धारण करून, संसारतापानें तप्त झालेल्या मूढ जनांवर
शीतल ज्ञानामृताचा वर्षाव केला व तुकारामबुवांसारखे सत्पुरुष निर्माण करून महारा-
ष्ट्रभूमीचे पांग फेडिले. एकनाथस्वामीनीं:—

'ज्ञानेश्वरीपाठीं । जो ओंवी करील मराठी ।
तेणें अमृताचे ताटीं । जाण नरोटी ठेविली ॥ १ ॥

अशा रीतीनें, ज्या ज्ञानेश्वरीस अमृताचें ताट ह्मटलें, त्या ज्ञानेश्वरीशीं, महाराष्ट्र
भाषेंतील किंबहुना खुद्द भगवद्गीतेशिवाय संस्कृत भाषेंतील दुसऱ्या कोणत्याही ग्रंथाची
तुलना करूं पाहणें किंवा करण्याचा प्रयत्न करणें, ह्याच अगोदर वेडेपणा होय.
ज्यावेळीं हल्लींच्याप्रमाणें विद्यासंपादनाची सोय बिलकुल नव्हती, हल्लींच्याप्रमाणें
लोकांना स्वस्थता नव्हती, जगाचें ज्ञानसंपादन करून, आकुंचित विचारसृष्टीस विस्तृत

विश्वाचें स्वरूप देण्यास देशकालस्थिति अनुकूल नव्हती, अशा काळीं अठराविशी-च्या भर तारुण्यांत ज्या पुरुषाच्या हातून ज्ञानेश्वरीसारखा ज्ञाननिधि निर्माण झाला, त्याच्याशीं आपली बरोबरी व्हावी, अशी इच्छा धारण करणारा महाराष्ट्र कविमंडळांत कोणता कवि आहे ? कमलवनांत राहून चिखलावर निर्वाह करणारा बेडूक, शीतल चंद्रकिरणांनीं त्रस्त होऊन तरुकोटरांत लपून बसणारा कावळा, दुग्धपान सोडून मद्य-गृहाकडे धांव घेणारा मद्यपी, व आपल्या सुशील सुंदर भार्येचा परित्याग करून वेश्यागाराच्या पायरीवर पाय ठेवतांनां न शरमणारा पापात्मा, हे जितके दुर्दैवी होत, तितकेच ज्ञानेश्वरींतील ज्ञानामृताकडे पाठ करून, अश्रद्ध आणि अनधिकारी अर्वाचीन टीकाकारांच्या टीकाग्रंथांतील पांडित्यजलपानानें स्वतःस धन्य मानून घेणारे लोक दुर्दैवी होत. कमलमधूची गोडी जशी भ्रमरानेंच घ्यावी, बेडकाचें तें काम नव्हे, तद्वतच ज्ञानेश्वरींतील ज्ञानरस, नामदेव, एकनाथ, तुकाराम, अशांसारख्या रसज्ञानींच चाखावा, इतरांचें तें काम नव्हे, आणि यासाठींच ज्ञानेश्वरांनीं ह्मटलें आहे:

‘ पाहें पां दूध पवित्र आणि गोड । पाशीं त्वचेचिया पदरा आड ।
परी तें अव्हेरूनी गोचिड । अशुद्धचि सेवी ॥ १ ॥

एकंदरींत, माझ्या दृष्टीनें तर काय, परंतु महाराष्ट्रांतील सर्व महापुरुषांच्या दृष्टीनें जी ज्ञानेश्वरी एक वेळ अमृत ठरली, तिच्याशीं केवळ पांडित्याच्या जोरावर स्पर्धा करूं पाहणाऱ्या कोणत्याही टीकेस व तिच्या अभिमानी अनुयायांस खालीं मान घालावी लागली तर त्याबद्दल कोणास वाईट वाटावयास नको व आश्चर्यही मानण्याचें कारण नाहीं. तर अशा स्थितींत, ज्ञानेश्वरीशीं यथार्थदीपिकेची तुलना कशी करावी, हा मोठा प्रश्न आहे. प्रखर सूर्यकिरणांनीं तप्त झालेला मनुष्य जसा तृषाक्रांत होतो, तद्वत् यथार्थदीपिकेंतील पांडित्यभक्तिमिश्रित रुक्ष वातावरणांत हिंडणारा मनुष्यही तपाक्रांत होतो. परंतु ती त्याची तृषा शांत करण्याचें सामर्थ्य यथार्थदीपिकेंत नाहीं. तर पहिल्या मनुष्यास या कामीं जशी जलाराधना करावी लागेल त्याप्रमाणें दुसऱ्यास ज्ञानेश्वरीचेंच अवलंबन करणें भाग पडेल. नुकताच उदयाचलावर येऊं पाहणारा बालसूर्य ज्याप्रमाणें आनंददायी व विनयशील असतो, व तो जसजसा अधिकाधिक आक्रमण करूं लागला असतां अधिकाधिक ताप उत्पन्न करूं लागतो, त्याप्रमाणें आरंभीं विनयसंपन्नता दाखविणारी यथार्थदीपिका जसजशी इतर टीकाकारांशीं वाद करीत चालली तसतसें तिचें पांडि-

त्यतेज असह्य व प्रखर होत गेलेलें आहे. इतर टीकाग्रंथांवर कोरडे ओढून व त्यांची लोकप्रियता बलात्कारानें हरण करून, सगळ्या लोकांनीं आपल्याच कच्छपीं लागावें अशी थोडीशी इच्छा यथार्थदीपिका धारण करिते. विस्तवाजवळ फार वेळ बसल्यानें नवयुवतींचीं सुकुमार मुखकमलें जशीं कोमेजून जातात, त्याप्रमाणें यथार्थदीपिकें-तील पांडित्यतापानें बिचाऱ्या मुमुक्षूंचीं तोंडें वाळून जातात. एकंदरींत ज्ञानेश्वरी ती ज्ञानेश्वरी व यथार्थदीपिका ती यथार्थदीपिका, असेंच ह्मणणें भाग आहे; अर्थात् ज्ञानेश्वरीइतकी यथार्थदीपिकेची प्रसिद्धि झाली नाहीं, हें सृष्टिनियमाप्रमाणें व्हावयाचें तेंच झालें, असें ह्मणून स्वस्थ बसलें पाहिजे.

आतां तिसरे साधु रामदास यांचाही रामदासी पंथ फार मोठा असल्यामुळें व एकंदरींत त्यांचा दासबोध हा ग्रंथ आटोपसर, सुबोध व प्रापंचिक पारमार्थिकांस सारखाच उपयुक्त असल्यामुळें त्याचें महत्त्व फार वाढलें, तें योग्यच झालें. शिवाय वरील तिन्ही सत्पुरुषांनीं, महाराष्ट्रांत उक्तीनें व कृतीनें ती धर्मजागृति केली, तीही त्यांच्या ग्रंथप्रसिद्धीस पुष्कळ अंशीं कारणीभूत झाली असली पाहिजे. वरील सत्पुरुषांशिवाय, त्यांच्या तोडीचे असे दुसरे सत्पुरुष महाराष्ट्रांत काय थोडे होऊन गेले ? तसेंच गीतेवर महाराष्ट्र भाषेंत आजपर्यंत काय थोडे टीकाग्रंथ झाले ? तर, असें असतां, ज्ञानेश्वरी व दुसरी यथार्थदीपिका या दोनच टीका तेवढ्या प्रसिद्ध असाव्या, आणि दासोपंतांचा गीतार्णव, गीताप्रपा, चित्सदानंदलहरी, रमावल्लभ-दासांची गीतेवरील टीका, इत्यादि टीकाग्रंथ आजपर्यंत केवळ अज्ञातदशेंत असावे, याचें कारण काय आहे हें कोण सांगू शकेल ? शंभर वर्षांपूर्वीं जसे ज्ञानी ग्रंथकार महाराष्ट्रांत होते तसे आतां नाहींत असें ह्मणून खुद्द वामनांनीं अप्रत्यक्षपणें ज्या दासोपंतांची स्तुति केली आहे, त्या दासोपंतांच्या गीतेवरील दोन तीन टीका गुप्त राहून, त्यांच्या नंतर १०० वर्षांनीं वामनाकडून लिहिली गेलेली यथार्थदीपिका पुढें यावी, यावरून आटोपसरपणा, भाषेचा साधेपणा व साधारण जनसमूहास गहन विषय सुलभ करून सांगण्याची हातोटी यांजवर बहुधा ग्रंथाची प्रसिद्धि व लोकप्रियता अवलंबून असते, हें दिसून येईल. व या दृष्टीनें पाहिल्यास, महाराष्ट्रांत, ज्ञानेश्वरीच्या खालोखाल वामनाच्या यथार्थदीपिकेस जो मान दिला जातो, तोच योग्य आहे, असें ह्मणावें लागेल. यथार्थदीपिकेची सुलभ भाषापद्धति व त्यांतील पांडित्य, हीं शिवाय करून, तिची ज्ञानेश्वरीशीं दुसऱ्या कोणत्याही गुणांत बरोबरी होईल असें वाटत

नाहीं. वामनांनीं यथार्थदीपिकेंत आपल्या पांडित्याची अगदीं शिकस्त केली आहे ही गोष्ट खरी, परंतु तें पांडित्य समजण्याइतकी ग्रहणशक्ति सामान्य लोकांपैकीं थोड्याच लोकांस अनुकूल असते, यामुळें ज्ञानेश्वरी, दासबोध, किंवा एकनाथी भागवत यांप्रमाणें यथार्थदीपिका फार लोकप्रिय झाली नसली तर त्याबद्दल कोणास विषाद वाटण्याचें कारण नाहीं किंवा त्यामुळें वामनस्वामीच्या योग्यतेस कोणत्याही प्रकारें कमीपणा येत आहे, असेंही नाहीं. आपण व्यवहारांत नित्य पाहतों कीं, ज्याचे भक्त फार असतात, त्याची प्रसिद्धीही फार असते, तर याच नियमानुसार रामदास, ज्ञानेश्वर, एकनाथ यांचे भक्तांची संख्या मोठी असल्यामुळें त्यांची व त्यांच्या ग्रंथांची महति वाढली व त्या मानानें वामनाची भक्तमंडळी थोडी असल्याकारणानें, त्यांच्या ग्रंथांची, विशेषतः यथार्थदीपिकेसारख्या वेदांतविषयक ग्रंथांची तितकी कमी प्रसिद्धि झाली. अस्तु. येथपर्यंत, वामनस्वामींच्या चरित्राच्या आरंभींच जे अनेक प्रश्न उपस्थित झाले, त्यांचीं यथामति उत्तरें देण्याचा प्रयत्न केला. आतां, खुद्द वामनाच्या चरित्राकडे वळतों.

वामनस्वामींचें वास्तव्यस्थान कोणतें, हें समजण्यास आज कांहींच पुरावा नाहीं. तथापि, कोरेगांव ( सातारा जिल्हा ) हें त्यांचें मूळ ठिकाण होतें, असा लोकप्रवाद आहे; व ज्या अर्थी त्यांचें वृंदावन कोरेगांव येथें आहे, त्या अर्थीं तेंच त्यांचें वास्तव्यस्थान होतें असें मानण्यास हरकत नाहीं. तसेंच वामनाचें जन्म कधीं झालें हेंही टाऊक नाहीं, परंतु ते रामदास रंगनाथादिकांशीं समकालीन होते, हें निर्विवाद आहे. समर्थांपेक्षां वामनस्वामी वयानें लहान असावे, असें वाटतें. त्यांचें लालन-पालन लहानपणीं उत्तमप्रकारें झालें असावें. लाडानें वाढविलेल्या मुलाचे सुखसोहळे पाहण्याची आईस जी नैसर्गिक इच्छा असते, ती पुरविण्यासाठीं वामनस्वामींचा व्रतबंध व त्यांचा गिराबाईशीं विवाहही लहानपणींच करविला असावा. वामन तीक्ष्णबुद्धीचे असल्यामुळें, लहानपणीं, त्यांचा वेदाध्ययनाचा व संस्कृताचा अभ्यास यथायोग्य झाला असावा; व त्यावरूनच शास्त्राध्ययनाची अभिरुचि त्यांस उत्पन्न झाली असावी. नंतर मातापितरें निवर्तल्यावर स्वामी आपल्या पत्नीस बरोबर घेऊन हिंदुधर्मज्ञानाचें मूळपीठ जी काशी तेथें शास्त्राध्ययना-करितां गेले. त्यावेळच्या देशस्थितीच्या मानानें पाहिल्यास काशीसारख्या ठिकाणीं केवळ शास्त्राध्ययनाच्या लालसेनें जावयाचें ह्मणजे जाणारास विद्येची फारच आवड असली पाहिजे. हें उघड आहे.

ही काशीयात्रा स्वामींच्या तारुण्यांतच झाली असली पाहिजे यांत संशय नाहीं, कारण तरुण बायकोस बरोबर घेऊन जाणें हें केवळ ज्वानींत आलेल्या पुरुषाकडूनच होईल, बाल्यावस्थेंत व्हावयाचें नाहीं. शिवाय तेव्हांची महायात्रा आतांच्यासारखी सुखयुक्त नव्हती. जिकडे तिकडे बेबंदशाही आणि झोटिंगपाच्छाई होती व मार्गांत पुष्कळ अडचणी होत्या. यावरून काशीस जातेवेळीं स्वामींचें वय निदान २० वर्षांचें तरी असावें असें वाटतें.

स्वामींनीं, बारा वर्षें, काशीस राहून शास्त्राध्ययन केलें. ग्रंथावलोकनानें व विद्वत्समागमानें त्यांचा बुद्धिप्रभाव वाढत चालला. मोठमोठ्या पंडितांशीं वाद-विवाद करण्याचे प्रसंग त्यांना येऊं लागले, त्यांत त्यांना यश येत चाललें व चहूंकडे त्यांच्या विद्वत्तेची व वादनैपुण्याची कीर्ति पसरली. ज्या महापंडितांपाशीं त्यांचें अध्ययन चाललें होतें त्यांच्या कानांवर हा शिष्याचा सुकीर्तिघोष येऊं लागला व त्याबद्दल त्यांना फार आनंद होऊन पंडितांच्या वादशक्तीचें प्रमाण काढावें अशा हेतूनें एक दिवस स्वतः त्यांनींच त्यांशीं सहजरीत्या वादास प्रारंभ केला. या वादावरून श्रीपरशुराम आणि भीष्माचार्य यांच्या महायुद्धाचा रसिकांस आठवण होईल; असो. वादांत वामन विजयी झाले. गुरुजींनीं या गोष्टीचा संतोष मानून "पुत्रादेके पराजयं, शिष्यादिच्छेत्पराजयं" असें ह्मणून आपल्या प्रतापशाली शिष्योत्तमाचा त्यांनीं फार गौरव केला. नंतर आचार्यांची आज्ञा घेऊन स्वामी स्वदेशीं यावयास निघाले, त्यावेळीं तेथील विद्वान् पंडितांनीं मोठी सभा भरवून त्यांस मानपत्र अर्पण केलें.

बरोबर आपली प्रियभार्या गिराबाई, एक शागिर्द व कांहीं दुर्मिळ संस्कृत ग्रंथ उंटावर लादून घेऊन पंडितांची स्वारी महाक्षेत्रांतून निघाली व देशोदेशीं दिग्विजय करीत व मानपत्रें घेत घेत सुरक्षितपणें दक्षिणेंत इंद्रायणीच्या तीरीं आळंदीस येऊन थडकली. तेथें पोंचण्याच्या पूर्वींच त्यांच्या दिग्विजयाची बातमी सर्व दक्षिणभर पसरली होती, जेथें तेथें त्यांच्या विद्वत्तेची व वादशक्तीची तारीफ होऊं लागली होती, तेणें-करून आळंदी येथील कांहीं नामधारी शास्त्रीबुवांस व दुराग्रही भिक्षुकांस त्यांच्या आगमनाची दहशत पडली असावी असें वाटतें. त्यावेळीं सर्व महाराष्ट्रांत स्वामींशीं वादविवाद करावयास उभा राहण्यासारखा एकही महापंडित नव्हता असें वाटतें.

तो काळ तसाच होता, देशभर मोगलाई माजून राहिली होती, तिची मोडकळीची वेळा जरी समीप येऊन महाराष्ट्र पदपादशाहीचा पाया घालण्यास प्रारंभ झाला

होता तरी शेंकडो वर्षे मुसलमानापासून झालेल्या धर्मोच्छेदाचा परिणाम दक्षिणेवर एवढा झाला होता कीं, सर्व शास्त्र्यांस व त्यांच्या अनुयायी पंडित मंडळीस महायात्रेचीच वाट धरावी लागली होती. राजदरबारीं, न्यायमंदिरीं अथवा धर्मसमाजांत धर्माधर्मकर्माकर्मनिर्णयप्रसंगीं पंडित मंडळींची जरूरी लागावयाची, परंतु राज्यक्रांतीमुळें तशीं स्थळें देशांत राहिलीं नव्हतीं, मग शास्त्री आणि पंडित मंडळीस विचारतो कोण ? दरवडे, मारामारी, हाणाहाणी, धर्मच्छल इत्यादि अनन्वित प्रकार जारीनें सुरू होते. केव्हां कोणावर कसा प्रसंग येईल याचा सुमार राहिला नव्हता. महाराष्ट्रीयांची शांतता अगदीं उडून जाऊन, आतां काय होईल तें होवो असें ह्मणून, हताश होऊन सर्व लोक त्या " धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे " असें ब्रीद बाळगिणाऱ्या परमपुरुषावर हवाला ठेवून स्वस्थ बसले होते. कोणत्याही बऱ्या किंवा वाईट गोष्टींचा अतिरेक झाला कीं फलप्राप्ति जवळ आली ह्मणून समजावें. सूर्य क्षितिजाच्या खालीं गेल्यावर चंद्रोदयापर्यंत जसा काळोख असतो तसा सर्व महाराष्ट्रावर औदासीन्याचा व निराशेचा काळोख पसरला होता. परंतु हा काळोख फार वेळ टिकला नाहीं. जुन्नर येथील शिवनेरीपर्वतशृंगावर शिवाजी बालचंद्र नुकताच उदय पावला होता व त्याचे बालकिरण हळू हळू सर्व महाराष्ट्रभर फांकण्यास सुरुवात झाली होती. तसेच रामदास, तुकाराम, रंगनाथ आदिकरून मोठ मोठे ग्रह व त्यांच्या सभोंवतीं प्रदक्षिणा करणारा शिष्यसमुदाय आकाशांतील ग्रहमालेप्रमाणें, महाराष्ट्रांत चमकूं लागला होता. त्यावेळीं साधुत्वास जसा ऊत आला होता तसा पूर्वीं कधींही आला नसेल. त्यावेळीं साधुमंडळीनें आपल्या स्वभावसौजन्यानें लोकांचीं मनें अगदीं आकर्षित करून टाकिलीं होतीं व त्यांच्या अद्भुत चमत्कारांनीं धर्माचा कायमचा पगडा जसा लोकांच्या मनावर बसवून दिला तसा अन्य कोणत्याही उपायांनीं बसला नसता. लोकांचा विश्वास साधूंवर व त्यांच्या अनुयायांवर एवढा बसला कीं, ते त्यांच्यासाठीं प्राण देण्यासही मागें पुढें पाहिनातसे झाले व नवी मराठी पादशाही स्थापणाऱ्या दूरदर्शी शिवाजीमहाराजांच्या उद्योगास व समर्थांच्या भगव्या झेंड्यास जें कांहीं एकसारखें यश येत गेलें त्याचा बराच भाग या धर्मश्रद्धेचें फल नव्हे असें कोणी ह्मणेल, असें वाटत नाहीं. अहाहा! तो वेळ किती मौजेचा असेल ! ते साधूंचे गोड व भक्तिरसपरिप्लुत उपदेश, तो त्यांच्या भजनाचा मधुर घोष, ते मराठे वीरांचे समरांगणावरील कृतांतासही भय उत्पन्न करणारे व भीषण सिंहनाद, तो महाराष्ट्रीयांच्या धनुष्यांच्या टणत्कार, तो

मावळ्यांच्या तलवारींचा खणखणाट, तो कोंकणांतील हेटकऱ्यांच्या बंदुकांचा कड-कडाट आणि तो शत्रूंच्या सैन्याचा अपजयामुळें होणारा कलकलाट इत्यादिकांनीं ज्यांच्या कानठाळ्या बसून गेल्या असतील ते खरोखर धन्य होत ! तीं त्या साधु-पुरुषांची ईश्वरी प्रेरणेनें प्रकाशित झालेलीं सुप्रसन्न मुखकमलें, ते त्यांचा सदुपदेश श्रवण कारणारे भाविक हिंदु, ते युद्धसामुग्रीनें भरलेले प्रचंड किल्ले, ती श्रीशिवाजी महाराजांची भव्य प्रसन्न मुद्रा, ते मावळे आणि श्रीसमर्थ रामदासस्वामी आज कोठें आहेत ? ' सर्वं यस्य वशादगात्स्मृतिपथं कालायतस्मैनमः ' !

अशा समयीं आळंदीस, ह्मणजे ज्या क्षेत्रास पूर्वीं वेदविद्येचें आदिस्थान ह्मणत असत, तेथें येऊन ठेपलेल्या स्वामीशीं वादविवाद करून क्षेत्राचें नांव राखतो कोण, असें क्षेत्राभिमानी बृह्मवृंदास मोठें संकट पडलें. सांप्रतकालीं, दक्षिणप्रांतीं पंडित उरले नाहींत याविषयींचा खरा प्रकार वामनास सांगून पुढें महाराष्ट्रदेश ह्मणजे त्यांची जन्मभूमी, तेथें वादविवाद करून मानपत्र घेण्याचा आग्रह न धरण्याविषयीं त्यांचें अभिवचन घेऊन या संकटाचें त्या लोकांनीं निवारण केलें असावें किंवा दुरभिमानानें, या संकटाच्या निवारणार्थ, लौकिकांत प्रसिद्ध असलेल्या आख्यायिकेचा उपयोग करण्यांत आला असावा. तेथील ब्राह्मणांनीं, आपल्यामतें ही एक उत्तम युक्ति शोधून काढिली व ती एका धूर्त व लब्धप्रतिष्ठित ब्रह्मणास पढवून, त्यास वामनस्वामीकडे पाठविलें असावें.

स्नानसंध्यादि नित्यकर्मे आटोपून भोजनोत्तर स्वामी चार आळंदकिर ब्राह्मणांशीं गोष्टी बोलत बसले असतां हा ब्राह्मण तेथें गेला. नमस्कारादि शिष्टाचार झाल्यावर त्यानें " मला आपल्याशीं कांहीं एकांतीं बोलावयाचें आहे " अशी स्वामीपाशीं विनंति केली. पंडित आदरातिथ्यांत निष्णात व कोमलांत:करणाचे, त्यांनीं जवळ असलेल्या सर्व मंडळीस दूर करून त्यास " बोला " ह्मणून सांगितलें. तो ब्राह्मण ह्मणाला " पंडितराज, मी ब्रह्मराक्षस आहे. ज्या पिंपळाच्या वृक्षावर मी राहात होतों तो वृक्ष जुनाट झाल्यामुळें मोडून पडला. सांप्रत मला राहण्यास स्थळ नाहींसें झालें आहे. या इंद्रायणी नदीच्या तीरावर एक मोठा अश्वत्थ वृक्ष आहे त्यास तीन खांद्या आहेत. त्यांपैकीं दोहोंवर दुसरे दोन ब्रह्मराक्षस राहतात व तिसरी खांदी रिकामी असल्यामुळें मी तिचा आश्रय करावयास गेलों परंतु ते दोघे मला असें ह्मणाले कीं " या खांदीवर राहण्याची तुझी योग्यता नाहीं. येथें एक

महापंडिताची योजना झाली आहे. तो महापंडित कोण ह्मणून मी त्यांस प्रश्न केला तेव्हां त्यांनीं मला आपलें नांव सांगितलें व आपल्या परवानगीशिवाय तेथें तुला आपण बसूं देणार नाहीं असेंही ते ह्मणाले. याकरितां आपण परवानगी द्याल अशा आशेनें मी आलों आहे. आपण पंडितांबरोबर वादविवाद करून जशीं जयपत्रें घेतां तशीं आह्मीही मनुष्य असतांना घेत होतों व त्यामुळेंच ही ब्रह्मराक्षसाची योनी आह्मांस प्राप्त झाली आहे. ही पापयोनी तर खरीच. परंतु या योनींत त्रिकाल ज्ञान आहे. या आळंदी क्षेत्रांतील शास्त्र्यांशीं वादविवाद करून आपण विजयी व्हालच, परंतु स्थानासाठीं मला मात्र भिक्षाटणास पाठवाल ! परंतु जर आपणास ही पापयोनी चुकवावयाची असेल तर साधुसमागम धरा, मस्तक ठेंगणा करा व ह्या आपल्या अफाट विद्येचा सांप्रत असलेल्या व पुढें होणाऱ्या असंख्य महाराष्ट्र जनांच्या नित्यसुखाकडे सदुपयोग करा, हीच माझी आपल्यापाशीं हात जोडून विनंति आहे."

हें त्या ब्राह्मणाचें युक्तिशास्त्र पंडितांनीं तात्काळ जाणलें. ते ह्मणाले "तुह्मासारखा सत्पथोपदेशक ब्रह्मराक्षस मी आजच पाहिला. आह्मावर हा आपला मोठा अनुग्रहच ह्मणावयाचा ! मला नेमिलेलें स्थळ मी गुरुदक्षिणेदाखल, आपणास अर्पण करितों. तुह्मीं त्या स्थलीं यावच्चंद्रदिवाकरौ वास करावा" स्वामी समजले कीं परशुरामाचे वेळीं पृथ्वी जशी निःक्षत्रिय झाली होती तसाच या राज्यक्रांतीच्या समयास हा प्रचंड महाराष्ट्र देश केवळ निः ंडित झाला असावा व तें छिद्र लपविण्याकरितां येथील ब्राह्मणांनीं हा ब्रह्मराक्षस तयार केला असावा; नाहींतर वामनासारख्या महापंडितास व चतुर पुरुषास हें कोडें उलगडलें नाहीं असें कसें ह्मणावें ? शिवाय ब्रह्मराक्षस ह्मणजे बोलून चालून पिशाच योनी. देहरहित ह्मणजे सूक्ष्मदेही, केवळ वायुरूप अशी ही पिशाच योनी, ही पापयोनी होय. ह्मणजे मनुष्यजन्मांत आचरलेल्या पातकांमुळेंच ती योनी प्राप्त होते; असें असतां त्या पिशाचाला उत्तम व श्रेष्ठ जो मनुष्यदेह तो जर पाहिजे तेव्हां धारण करितां येऊं लागला, तर मग ही पापयोनी कशी ह्मणावी ? ती मनुष्य योनीपेक्षांही श्रेष्ठ मानिली पाहिजे. कारण पिशाचांस मानवदेह धारण करितां येतो असें ह्मणतात एवढेंच नव्हे तर मनुष्यास जें त्रिकालज्ञान दिलें नाहीं, तें त्यांस दिलें आहे असेंही समजतात. हें जर खरें ह्मणावें तर, मनुष्यांपेक्षां पिशाचादिकांस, ऐहिक व पारमार्थिक सुखाचें साधन अधिक सुलभ झालें असतें. एकंदरींत तात्पर्य काय कीं, सृष्टिनियमाप्रमाणें पिशाचास मान-

वदेह धारण करितां येणें शक्य नाहीं, असो. ही गोष्ट घडल्यावर स्वामी तेथून निघून आपल्या गांवीं आले.

वरील आख्यायिका बाळाजी आणि कंपनीच्या वामनचरित्रांतून उतरून घेतली आहे. तिच्या खरेपणासंबंधानें येथें कांहीं लिहितां येत नाहीं. धुळ्याच्या सत्कार्योत्तेजक मंडळीनें प्रसिद्ध केलेल्या भीमस्वामीकृत 'भक्तलीलामृत' ग्रंथांत वामनस्वामींचें संक्षिप्त चरित्र दिलें आहे, त्यांतही ह्या आख्यायिकेचा भिन्न रीतीनें समावेश केला आहे:—

### अभंग

'वामनगोसावी पंडित माहान । कासीयात्रे जाण जात होते ॥ १ ॥
मनांत कासीचे पंडीत जिंकावे । ऐसें मनोभावें असे पहा ॥ २ ॥
क्षेत्राच्या समीप तीन कोसावरी । अश्वत्थाचे पारीं निद्रा केली ॥ ३ ॥
विश्वेश्वरें तेथें नवल दाखविलें । विप्रासी पाहिलें ढाळोढाळीं ॥ ४ ॥
एक विप्र ह्मणे दुजया विप्रासी । त्यां मोठ्या ढाळीसी जाणे आतां ॥ ५ ॥
तो ह्मणे कोणता सांग ब्रह्मग्रह । वृक्षाखालें आहे पाहा वेगीं ॥ ६ ॥
जावोनी कासीस जिंकील सर्वांसी । मग या ढाळीसी येईल तो ॥ ७ ॥
ऐकतांची नेत्रा आले अश्रुपात । अभिमानें सत्य अधोगती ॥ ८ ॥
यात्रात्रयी केली बहु नम्रपणें । मग आले जाण देशाप्रती ॥ ९ ॥
पुढील कथेसी द्यावें अवधान । भक्ती हे गहन भीम ह्मणे ॥ १० ॥

### ( २ )

वामनगोसावी येवोनी गृहासी । पुढें मांवद्यासी आरंभिलें ॥ १ ॥
वैष्णव हे होते ह्मणोनी ब्राह्मण । वैष्णवची जाण बोलाविलें ॥ २ ॥
स्नाना गेले सर्व तेथें एक स्मार्त । आला अकस्मात दशग्रंथी ॥ ३ ॥
एक दिवसाचें होतें उपोषण । क्षुधातुर जाण बहु जाला ॥ ४ ॥
विचारितां तया ह्मणे मी वैष्णव । टिळे लावी सर्व त्यांची ऐसे ॥ ५ ॥
पाठीवरी मात्र आडवा लागला । भोजनासी गेला विप्रासवें ॥ ६ ॥
पात्रेंही वाढिलीं बैसला सन्मानें । तेव्हां अंगावरून वस्त्र पडे ॥ ७ ॥
शेजारी पाहोनी गेला तो उठोनी । राखेसी आणोनी पात्रीं घाली ॥ ८ ॥
वामनगोसावी पाहोन तयाला । उठवोनी नेला एकीकडे ॥ ९ ॥

विप्र ते समर्थी भोजन करोन । तांबूल घेवोन पाहाताती ॥ १० ॥
वामनगोसावी विभूती लावोनी । बैसती भोजनीं तयासहीत ॥ ११ ॥
तयेवेळीं केला श्लोक तोही ऐका ॥ भीम ह्मणे निका प्रसंग हा ॥ १२ ॥

श्लोक

" कंटाळलों मी तुमच्या मतातें । देखोनि सर्वत्र असंमतातें ॥
पाहेन मी माधव सर्वभूतीं । अद्वैतविद्या हरिच्या विभूती ॥ १ ॥ "

वरील अभंगांतली माहिती शके १७१९ तली; ह्मणजे सुमारें ११० वर्षांपूर्वीची आहे; अर्थात् ती अधिक विश्वसनीय मानणें भाग आहे. वरील अभंगांत वामनाचें मूळ ठिकाण, आख्यायिकेंतील गोष्ट ज्या स्थळीं घडली, त्या स्थळाचें नांव, वामनाचें आडनांव किंवा गोत्र, यांसंबंधानें कांहींएक माहिती दिलेली नाहीं. उलट, पंडित दक्षिणेंतून काशीस गेले ते विद्यासंपादनार्थ गेले नसून, तेथील पंडितांस वादांत जिंकण्यासाठीं गेले, असें ह्मटलें आहे. एकंदरींत, या माहितीनेंही वामनचरित्रावर फारसा प्रकाश पडतो, असें वाटत नाहीं. तरी पण 'वामन हे मोठे पंडित होते' इतकेंच भीमस्वामींनीं नमूद केलें आहे; 'त्यांचें आडनांव पंडित होतें' असें ह्मटलेलें नाहीं, हें लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे. सदर अभंगांत तत्कालीन शैववैष्णवांतील बखेड्याचा जो निर्देश करण्यांत आला आहे, त्यावरून वामनपंडितांशीं, थोड्या फार वर्षांनीं समकालीन असणाऱ्या मुक्तेश्वरांच्या पुढील ओंव्यांची यथार्थता अधिकच सिद्ध होते:—

ओंव्या

'काशी विश्वेश्वराचें लिंग । सुवर्णकमळीं पूजिलें सांग ॥
जें पाहतां पावती भंग । कोटी पर्वत पापाचे ॥ १ ॥
तें नूतन पाखांडी वैष्णवां । पाहोनि संताप उपजे जीवा ।
जणूं कां पूर्वजांचा ठेवा । हिरोनि नेला तस्करीं ॥ २ ॥'

रामदास व तुकाराम यांच्या ग्रंथांत, एक दोन ठिकाणीं, 'उंटावरून पोथ्या आणणाऱ्या अज्ञानी पंडितांचा' उल्लेख आढळतो; तो या वामनासंबंधानेंच आहे की काय, हें समजण्यास मार्ग नाहीं. ह. भ. प. श्रीपतिबुवा भिंगारकर यांच्या 'श्रीज्ञानेश्वरमहाराजांचा कालनिर्णय' या सुंदर पुस्तकांत, ज्ञानेश्वरांच्या तीर्थरूपांनी वेळीं, 'उंटांवरून ग्रंथ वाळगिणारा व पंडितांकडून जयपत्रें घेणारा

एक वामनपंडित काशींत होता ' असें लिहिलें आहे व ह्याच वामनाशीं यथार्थदीपिकाकार वामनस्वामीचा बादरायण संबंध जुळवून देण्यांत आला असावा, असा योग्य संशयही प्रदर्शित केला आहे. रा. भिंगारकरबुवांचा हा संशय जर बरोबर असेल तर, ' ब्रह्मराक्षससंबंधाच्या आख्यायिकेंत बरीच अतिशयोक्ति आहे; किंबहुना त्या आख्यायिकेचा प्रस्तुत चरित्रनायकाशीं कोणत्याही प्रकारें संबंध नाहीं असें ह्मणणें भाग पडेल. अस्तु.

या समयास महाराष्ट्रांत, देहूस तुकारामबुवा, कृष्णातीरीं चांफळास राजगुरु श्रीसमर्थ रामदासस्वामी, वडगांवीं जयरामस्वामी, वारणातीरीं बाळस्वामी, ब्रह्मनाळास रघुनाथस्वामी, निगडींत रंगनाथस्वामी व त्यांचे बंधु आत्यास्वामी, नाझरें येथें ब्रह्मानंदस्वामी व आनंदमूर्ति, पाटगांवास मौनीबोवा, पिंपळनेरास निळोबा व त्र्यंबक नारायणाश्रम बोवा, संगमेश्वरीं अचलपुरी गोसावी, धामणगांवांत बोधले बावा, मळगांवीं गोपाळनाथ, भागानगरास केशवस्वामी, पोलादपुरीं परमानंद बोवा व शिवरामस्वामी, चिंचवडास मोरयादेव धरणीधर, दैठणास निंबराज, अनंतसिद्ध व चांभारगोंद्यास शेखमहंमद बावा अशी बरीच संतमंडळी उदयास येऊन त्यांचा सत्कीर्तिसूर्य अगदीं माध्यान्हीं आला होता. राजापासून रंकापर्यंत सर्व लोक या साधूंच्या अंकित झाले होते. कोणाचे पंक्तीस बसून विठोबारखुमाईनीं भोजन केलें तर कोणाचे घरीं गजाननानें मोदकांवर यथेच्छ हात मारिला, कोणी नदीप्रवाहांत गुप्त होऊन सात दिवसांनीं बाहेर पडला तर इतक्यांत कोणी माध्यान्ह कालीं शिधासामुग्री मिळाली नाहीं ह्मणून रेडा मारून खाल्ला व त्यास पुनः जिवंत केलें, कोणी कीर्तनांत समई चालविली तर कोणी थोट्या ताटांनां कणसें आणिलीं, कोणाकरितां विठ्ठलानें स्वतः कीर्तन केलें तर कोणी कीर्तनांत भींतीवरील चित्रांच्या डोळ्यांतून अश्रुपात करविला, कोणी सुंठवडा ह्मणून बचनागाची पुड लोकांस वांटली तरी कोणी मेला नाहीं तर कोणाच्या अभंगांच्या पोथ्या तेरा दिवसांनीं पाण्यावर येऊन तरंगू लागल्या. अशा अद्भुत चमत्कारांच्या बातम्या मोठमोठ्या शहरांतून व खेड्यापाड्यांतून वरचेवर पसरत असत, त्या वामनस्वामींच्या एकांतवासी आश्रमद्वारावर जाऊन प्रहार करूं लागल्या. स्वामी जसे विद्वान् तसेच प्रेमळ विष्णुभक्त होते. भूतदया त्यांच्या हृदयांत पूर्णपणें वास करीत होती. लहानपणापासून हरिभक्तीचा छंद नसेल तर विद्वान् पंडितांचें लक्ष्य मागाहून तिकडे वळणें अशक्य आहे. या अद्भुत चमत्कारांच्या गोष्टी ऐकून त्यांस असें वाटलें कीं, ज्या देशांत पंडितांचा किंवा

शास्त्रज्ञांचा एवढा अभाव त्या देशांत साधुत्वाचा केवढा सुकाळ हा ! वाराणशी-सारख्या महाक्षेत्रांत जेथें तेहतीस कोटी देव, पातक्यांचा उद्धार करण्याकरितां सतत परिश्रम करितात, जेथें हरिपदवाहिनी भागीरथी पातकी जनांचें पापमल धुण्याकरितां रात्रंदिवस वाहात आहे, जेथें शास्त्रीय विषयांच्या कोटिक्रमांनीं महापंडितांचीं ज्ञानभांडारें वेडावून जातात, तेथें ज्या सत्पुरुषांचा दुःकाळ, त्यांचाच स्वदेशीं काय सुकाळ हा !

वामनस्वामींचें लक्ष्य बऱ्याच दिवसांपासून, बौद्ध, जैन, शांकर, माध्व, वल्लभ, रामानुज इत्यादि धर्मपंथांच्या सिद्धांतांच्या विचारांत गुंतलें होतें. तथापि पुढें शांकरमतच श्रुतिस्मृतीस अनुसरून आहे व इतर मतें भेदाश्रित आहेत अशी त्यांची खात्री झाली. उपनिषदांच्या अर्थान्वयें ब्रह्मात्मैक्याविषयीं सच्चिदानंद ब्रह्मलक्षण आत्म्याकडे कसें लागतें, याचें मनन करितां करितां, सत्प्रदानें आत्मा ब्रह्मासारिखाच कालत्रयीं विद्यमान आहे व चित्पदानें तो तसाच ज्ञानरूपही आहे असें त्यांच्या अनुभवास आलें. तथापि या दुःखमय सृष्टींत आत्मा निरंतर आनंदरूप कसा असूं शकेल या शंकेचें निरसन त्यांस होईना. खऱ्या सुखाचा ठेवा जो सच्चिदानंदस्वरूप आत्मा त्याची ओळख कशी होते या विवंचनेंत ते पडले. ही शंका सद्गुरूवांचून दूर होणें कठिण असें जाणून या संतमंडळीचें दर्शन घेऊन त्यांजकडून आपल्या शंकेचें समाधान करून घ्यावें, अशा हेतूनें साधुत्वाचें माहेर जें पंढरपूर तेथें जाण्याचा त्यांनीं निश्चय केला.

वामनस्वामींची आपल्या पत्नीवर फार प्रीति होती. तिचें नांव गिराबाई. गिराबाईकरितां स्वामींनीं एक लहानसा ग्रंथ लिहिला आहे, त्याचें नांव "प्रियसुधा"; त्याचा पहिला श्लोक असा आहे.

"पतिनिमित्त पती तुजला प्रिये । प्रिये असें सहसा ह्मणतां नये ॥
परम आवडि आपुलि आपणा । वळख तूं तुज टाकुनि मीपणा ॥ १ ॥

व शेवटचा श्लोकः—

प्रियसुधा उपदेश गिराप्रती । करुनि वामन तीस ह्मणे सती ॥
परम आवडि आपुलि आपणा । वळख तूं तुज टाकुनि मीपणा ॥ २ ॥

हा आहे. याप्रमाणें आपल्या बायकांस ज्ञानोपदेश करणारे व आपल्या ज्ञानाचा फायदा स्वस्त्रीनिमित्तानें जगास करून देणारे, 'पूर्वकालीं स्त्रियांस शिक्षण मिळत-

नव्हतें ह्मणून आज आमच्या देशाची अवनति झाली, ' असें प्रपादन करणाऱ्या हल्लींच्या विद्वानांत किती गृहस्थ सांपडतील बरें ? असो.

शके १५७१ च्या आषाढी एकादशीच्या उत्सवास पंडित आपल्या प्रियपत्नीसह श्रीपांडुरंगाच्या भेटीस निघून गेले.

याचवेळेस पंढरिनाथानें श्रीसमर्थ रामदासस्वामी यांस, स्वतः विप्रवेषानें चांफळास येऊन, पंढरीस नेलें होतें व चालतांना त्यांच्या पायांत रुतलेले कांटे त्यानें आपल्या हातानें काढिले होते. महिपतिबोवा आपल्या "संतविजय" नामक ग्रंथाच्या दहाव्या अध्यायांत असें लिहितात कीं पहिले दिवशीं वाळवंटावर श्रीतुकारामबुवांचें कीर्तन झालें; दुसरे दिवशीं गरुडपारीं श्रीसमर्थ रामदासस्वामींचें भक्तिरसभरित कीर्तन झालें. वामनस्वामी, निंबराज दैठणकर, माणकोजी बोधले, जयराम गोसावी वडगांवकर, शेखमहमद चांभारगोंदेकर, रंगनाथस्वामी व आत्यास्वामी निगडीकर वगैरे तत्कालीन संतमंडळी या दोन्ही कीर्तनास हजर होती.

वरील साधुमंडळांतील शेखमहंमद हें नांव वाचून पुष्कळांस आश्चर्य वाटण्याचा संभव आहे. परंतु यांत आश्चर्य कांहींच नाहीं; कारण आमच्या भागवतधर्माचा प्रतापच असा आहे कीं, ज्यास खऱ्या ईश्वरी ज्ञानाची अपेक्षा असेल तो ज्ञातीनें किंवा धर्मानें कोणीही असो, त्यानें त्या धर्माचा अवलंब केला कीं, त्याचे सर्व संशय फिटून गेलेच पाहिजेत. वरील सत्पुरुष मूळचा मुसलमान असून शेवटीं आमच्या महाराष्ट्रसंतमालिकेंतील एक दैदिप्यमान् मणी होऊन राहिला, एवढेंच नव्हे तर वेदांतासारख्या गहन विषयावर त्यानें "योगसंग्राम" व "पवनविजय" या नांवांचे दोन उत्कृष्ट ग्रंथ शुद्ध मराठी भाषेंत लिहिले आहेत. या कवीचें विस्तृत चरित्र याच पुस्तकांत दुसरीकडे दिलें आहे. असो. तर अशी ज्या हिंदु धर्माची व मराठी भाषेची योग्यता, त्यांस धाब्यावर बसवून परधर्मीयांच्या अनुकरणांत जी मंडळी सांप्रत दंग झाली आहे, त्यांनीं या गोष्टींचा अवश्य विचार करावा.

महिपतींनीं वामनस्वामीचें, तुकारामाच्या कीर्तनप्रसंगीं असें वर्णन केलें आहे.

" "वामनस्वामी चतुर पंडित । जो प्रेमळ आणि द्वेषरहित ॥
यांनीं दशमस्कंध भागवत । केलें प्राकृत निजबुद्धि ॥

व रामदासकीर्तनप्रसंगीं:—

“ वामनस्वामी चतुर पंडित । जो वेदांतशास्त्रीं निपुण बहुत ॥
त्याहीवरी प्रेमळ भक्त । कविता प्रख्यात जयाची ॥

असें ह्मटलें आहे. पंढरपुरांत वरील संतमंडळीची व वामनस्वामीची प्रथमच गांठ पडली. या नंतर त्या साधुपुरुषांकडून “या महापंडित हरिभक्तास” आपापल्या उपास्य दैवतांच्या जयंत्यांस किंवा गुरूंच्या पुण्यतिथींच्या उत्सवास सन्मानपूर्वक आमंत्रणें येत असत व स्वामी त्या उत्सवांस जात असत. उद्धवसुत नामक एका रामदासांच्या शिष्यशाखेंतील साधूनें समर्थांचें ओंवीबद्ध चरित्र लिहिलें आहे. हा ग्रंथ बराच मोठा असून ओंवीसंख्या ७,४२० आहे. या ग्रंथावरून त्या वेळच्या परिस्थितीची वाचकांस बरीच कल्पना होण्यासारखी आहे. या ग्रंथाच्या ४६ व्या अध्यायांत, श्रीशिवाजीमहाराजांनीं, समर्थांच्या आज्ञेनें, परळी गडावर, लक्षभोजन घातलें त्या प्रसंगीं समर्थांकडून ज्या सत्पुरुषांस आमंत्रणें गेलीं होतीं त्यांत वामनस्वामींचें नांव आहे.—

“ राजा परम उदारचित्त । सामुग्री सिद्ध घरांत ॥
आरंभ केला त्वरित । गुरु आज्ञा करोनियां ॥ १ ॥
गांव गांवींचे ब्राह्मण येती । वेदशास्त्रज्ञ पंडितांप्रती ॥
ब्राह्मण पाठवी नृपती । बोलवावया साक्षेपें ॥ २ ॥
वामनस्वामी, जयराम । रंगोबा स्वामी, तुकाराम, ॥
रंगनाथ, निंबराज, परम । सिद्ध अनंत मौनी ॥ ३ ॥

हीं आमंत्रणें झाल्यावर जे साधु परळी गडावर गेले त्यांत वामनस्वामी होते व तेथें त्यांचें कीर्तनही झालें. सदर ग्रंथकार लिहितात—

“ या उपरी वामनस्वामींचें । अध्यात्म निरूपण पंडितांचें ॥
गीता भागवत पुराणांचें । मतें मतांतर बोलत ॥ १ ॥
तया वामनाचें कीर्तन । श्लोक सुभाषित गहन ।
अर्थप्रमेय काव्य जाण । विद्वज्जन जाणती ॥ २ ॥

यापुढें स्वामींनीं कीर्तनप्रसंगीं ह्मटलेलीं दोन पदें देऊन उद्धवसुत लिहितात—

परम चातुर्याचें बोलणें । संत महंत पंडितां मान्य ॥
स्वामी ह्मणती धन्य धन्य । ज्ञान तुझें वामना ॥ १ ॥

ऐकोनि वामनाचें कीर्तन । सकळ सभा झाली तल्लिन ॥
राजा ह्मणे " परम पावन । नाम वामन जाणिजे " ॥ २ ॥

येथें रामदासस्वामींनीं वामनपंडितांच्या ज्ञानाची, मोकळ्या मनानें धन्यता गाइली आहे व शिवाजी महाराजांनीं वामनाच्या नांवाचा जयघोष केला आहे.

वामनस्वामी जरी एवढे विद्वान् व हरिभक्त होते तरी त्या वेळच्या साधूंपैकीं एकाही साधूकडून त्यांच्या संशयाची निवृत्ति झाली नाहीं. ते कांहीं दिवस रामदासस्वामींच्या समागमांत होते एवढी गोष्ट खरी आहे तथापि या संबंधानें प्रचारांत ज्या बऱ्याच दंतकथा सांगण्यांत येतात त्यांत माझ्यामतें कांहीं तथ्यांश नसून, रामदासस्वामींची महति वाढावी याच हेतूनें त्यांच्या शिष्यवर्गांतील कांहीं कल्पक गृहस्थांनीं त्या समर्थांच्या चरित्रांत घुसडून दिल्या असाव्या; कदाचित् विराटपर्वतकर्त्यां वामनासंबंधाच्या त्या आख्यायिका असतील; कारण रामदासांसारख्या महासाधूकडून वामनासारख्या प्रेमळ व विद्वान् गृहस्थाची थट्टा होईल ही गोष्ट केवळ असंभवनीय होय.

वामनानीं आपल्या " अनुभूतिलेश " नामक संस्कृत ग्रंथांत " या भूतलावर तत्वज्ञान जाणणारा मला कोणी आढळला नाहीं " अशा आशयाचे स्पष्ट उद्गार काढिले आहेत. पंडित ह्मणतात.

" *आचार्यत्वाय बहवः सेविता भूतले मया ।
आत्मोपदेशसमर्थे गुरुत्वेन न मानिताः ॥ १३५ ॥
एवं छांदोग्यवचनैर्जिज्ञासा तु यदोत्थिता ।
तदा ते सेविताः ख्याता ये तत्वज्ञा इतिक्षितौ ॥ १३८ ॥

---

* या अनुभूतिलेशावर पंडितांचे शिष्य " साम्राज्य वामन " यांनीं मराठी समश्लोकी टीका केली आहे, त्यांतून वरील संस्कृत श्लोकांची मराठी समश्लोकी येथें देतों.

" गुरुत्वाकारणें म्यां या भूतळीं बहु सेविले ॥
आत्मोपदेशसमर्थी आचार्यत्वें न मानिलें ॥ १३५ ॥
एवं संस्कृतशास्त्रज्ञाः प्राकृत ग्रंथवित्तमाः ।
बहवः सेवितास्तत्व मद्वैतं ते वदान्त्विति ॥ १४० ॥
संस्कृत ग्रंथकर्त्तारो भाष्यकारादयो भुवि ।
यदुक्त वन्त स्तत्रापि ज्ञानं कुत्रापि न श्रुतम् ॥ १४१ ॥
प्राकृतग्रन्थकर्त्तारो येतु वर्षशतात्पुरा ॥
त्यक्तदेहास्तैर्यथोक्तं न तथा ज्ञानिनोऽधुना ॥ १४२ ॥

या उताऱ्यांत "शंभर वर्षांपूर्वी जसे ज्ञानी प्राकृत ग्रंथकर्ते होते तसे आतां नाहींत," असें स्वामींनीं ह्मटलें आहे. हें त्यांचें ह्मणणें एकनाथस्वामीस अनुलक्षून असावें असे वाटतें. कारण नाथांचें एकनाथी भागवत विक्रमशक १६३० ह्मणजे शालिवाहन शके १४९५ त लिहून संपलें व वामनाचें निगमसार बरोबर १५९५ त लिहून झालें, ह्मणजे वामनाच्या निगमसारापूर्वीं बरोबर शंभराव्या वर्षीं एकनाथांचें भागवत लिहिलें गेलें. यावरून वामनाचें वरील वाक्य एकनाथांसंबंधाचेंच असलें पाहिजे व यावरून ते आपल्या समकालीन ग्रंथकारांच्या ग्रंथांपेक्षां नाथांच्या ग्रंथांस फार मान देत असत असें ह्मणण्यास हरकत नाहीं, असो.

स्वामी पुढें ह्मणतात " परंतु माझ्या या श्रमाचा कांहीं उपयोग झाला नाहीं, तस्मात् ईश्वरप्राप्तीशिवाय जगांत राहण्यापेक्षां मृत्यु चांगला, असा विचार करून मी गंगायमुनेच्या संगमावर प्राणत्याग करण्याचा निश्चय केला. शेवटीं मलयाद्रि देशीं फिरत असतां श्रीविष्णूनें यतिरूपानें प्रकट होऊन मला तत्वोपदेश केला." ही हकीकत पंडितांनीं आपल्या निगमसार ग्रंथाच्या पहिल्याच अध्यायांत सांगितली आहे, ती अशी :—

" श्री सच्चिदानंद गुरु ॥ ब्रह्मविद्येचा कल्पतरु ॥
करुणामृताचा सागरू ॥ वेदांत वेद्य गोविंद ॥ १ ॥
जो भेटला मलयाचळीं ॥ मार्गीं पाक करिते वेळीं ॥
आधीं स्फुरला हृदयकमळीं ॥ सच्चित्पदार्थ विचारितां ॥ २ ॥
ऐसें विचारितां मनीं ॥ तों ऐकों आली हास्यध्वनी ॥
पाहतों जंव परतोनी ॥ वस्त्र भगवें देखिलें ॥ ३ ॥

---

एवं छांदोग्य वचनें जिज्ञासा उठली जयीं ॥
तत्वज्ञ जे क्षितितळीं विख्यात सेविले तयीं ॥ १३८ ॥
एवं संस्कृतशास्त्रज्ञ प्राकृतग्रंथ वित्तम ॥
अद्वैततत्व बोलाया सेविले म्यां बहुत ते ॥ १४० ॥
संस्कृत ग्रंथकर्ते जे भाष्यकारादि पृथ्वित ॥
जें ज्ञान बोलिले तेंही कोठेंच नाहिं देखिलें ॥ १४१ ॥
वर्षशताचिया पूर्वीं प्राकृत ग्रंथकार जे ॥
त्यक्त देही जे यथोक्त न तैसे ज्ञानि प्रस्तुतीं ॥ १४२ ॥

अवलोकिलें मुखा । तंव मस्तकीं नाहीं शिखा ॥
मुखचंद्र देखतां सुखा । भरतें जैसें समुद्रासी ॥ ४ ॥
मस्तकीं ठेवोनि कर । सकळ उपनिषदांचें सार ॥
पंचकोशीं करूनि निर्धार । केला ब्रह्मात्मतेचा ॥ ५ ॥

हें उपनिषदांचें सार पंडितांनीं आपल्या निगमसार नामक ग्रंथांत संग्रहित केलें आहे. वामनपंडितांस गुरूपदेश देणारे वरील सत्पुरुष कोण होते हें समजत नाहीं. येथें कोणाच्या मनांत अशी शंका येईल कीं, त्यावेळीं महाराष्ट्रांत जे तुकाराम रामदासादि साधु होते त्यांस जर वामनाच्या क्षुल्लक शंकेचें समाधान करितां आलें नाहीं तर ते साधु कशाचे ? तर; असें नव्हे. ते खरोखरच महासाधु होते; परंतु पंडितांच्या अगाध विद्वत्तेमुळें त्यांस ज्या वरचेवर शंका येत व विकल्प उद्भवत ते या साधुपुरुषांस दूर करितां येत नसत, कारण ते पंडितांसारखे पंडित नव्हते. मनुष्य जसजसा अधिक विद्वान् व तार्किक होत जातो तसतसे त्याच्या मनांत अधिक विकल्प उद्भवूं लागतात व त्या विकल्पांमुळें ईश्वर दूर जातो. विकल्पी माणसास साधु कंटाळतात. त्यांस, हें असें कां ? आणि तें तसें कां, असले प्रश्न विचारणारे शिष्य नको असतात. त्यांस असा शिष्य पाहिजे असतो कीं, ते जें कांहीं सांगतील, तें त्यानें निमूटपणें ऐकिलें पाहिजे. शिष्य श्रद्धाभक्तिसमन्वित पाहिजे, नुसता पंडित नको. यावरून एक असा लहानसा सिद्धांत काढितां येईल कीं, अतिविद्वत्ता किंवा तर्कवादीत्व हीं ईश्वरप्राप्तीच्या कामीं प्रतिबंधक आहेत. म्हणूनच करितां तुकाराममहाराजांनीं एके ठिकाणीं असें ह्मटलें आहे. "भलां कुणबी केलों ॥ नाहीं तरी दंभेंचि असतों मेलों ॥" दुसरें असें कीं कोणत्याही गोष्टीचा अतिरेक झाला कीं फलप्राप्ति व्हावयास उशीर लागत नाहीं. पंडितांना ईश्वराकडे मनापासून ओढा, त्याकरितां त्यांनीं फार प्रयत्न केला व शेवटीं प्राणही देण्याचा निश्चय केला तेव्हां परमेश्वरानें स्वतः गुरुरूप धारण करून त्यांस तत्त्वोपदेश केला. तस्मात् मुमुक्षूंचा लोखंडाचे चणे खाण्याची जर तयारी आहे, तर मग ब्रह्मपदीं नाचणें कांहीं दुर्घट काम नाहीं, असो.

गुरूपदेश ग्रहण केल्यावर आपली वृत्ति कशी झाली त्याचें पंडितांनीं थोडक्यांत पण अपूर्व रीतीनें वर्णन केलें आहे. ते ह्मणतात—

" क्षणामाजी सचराचर ॥ भासलें मज माझें शरीर ॥
आकार तितुकें निराकार ॥ तेचि समयीं ॥ १ ॥

जैसा उगवतां दिनकर ॥ कांहींच नुरे अंधार ॥
उपदेशाचा बडिवार ॥ ऐसा देखिला ॥ २ ॥

यापुढें वामनस्वामींनीं, गीतेवर यथार्थदीपिकानामक प्रचंड टीका लिहिली; तींत, त्यांनीं आपल्या समजुतीप्रमाणें गीतेचा जो खरा अर्थ, तो सांगितला असून, गीतेच्या इतर टीकाकारांवर कित्येक स्थळीं बरीच कडक टीका केली आहे; पण ती शुद्धभावानें केली आहे; दुष्टपणानें नव्हे. ज्यांनीं विश्वात्मयोगाच्या सिद्धीसाठीं हिंदुस्थानभर प्रवास केला व शेवटीं जे प्राणावरही उदार झाले, त्या महापुरुषाला साधुपणा मिरविण्याची आवड कशी असेल ? तथापि इतर टीकांचे अभिमानी आपल्या टीकेची अवहेलना करितील हें स्वामी पूर्णपणें जाणून होते. ते ह्मणतात—

" वाचोत जे वाचिती । न वाचोत जे वाईट ह्मणती ॥
संतुष्ट होय एक जगत्पती । या यथार्थनिरूपणें ॥ १ ॥

ज्यांस इतर टीकाकारांचे अभिमान । ते न देतील या टीकेस मान ॥
हरिभक्त निर्मत्सर निरभिमान । ते देतील सन्मान या टीकेतें ॥ २ ॥

आणि हा पंडितांचा तर्क अगदीं बरोबर होता. तत्कालीन पक्षपाती लोकांनीं जरी पंडितांस व त्यांच्या ग्रंथांस योग्य तो सन्मान दिला नाहीं तरी, महिपतीबावा, श्रीधर व मोरोपंत या तीन " निर्मत्सर व निरभिमानी " पुरुषांनीं पंडितांची व त्यांच्या ग्रंथांची फार तारीफ केली आहे. महिपतिबावांनीं पंडितांस " व्यास अवतार कलियुगीं " असें ह्मटलें आहे; श्रीधरांनीं पंडितांस " सतेज चंडांशू "ची उपमा दिली आहे आणि पंतांनीं तर १३ आर्या रचून पंडितांचें स्तोत्र गाइलें आहे, त्यांत पंडितांच्या यथार्थदीपिका ग्रंथासंबंधानें त्यांनीं असे उद्गार काढिले आहेत—

" केली श्रीगीतेची व्याख्या बहु भक्ति जींत गाजविली ॥
साजविली साधुसभा भाषाकवि कवनशक्ति लाजविली ॥ १ ॥

आतां पंडितांच्या निंदकांची काय शोभा राहिली ?

यथार्थदीपिकेंत श्रुतिस्मृतिपुराणांतून व उपनिषदें, भारत वगैरे ग्रंथांतून प्रमाणें व आधार देऊन शास्त्रीय पद्धतीनें जें विषयप्रतिपादन केलें आहे, त्यावरून पंडित हे महापंडित होते व त्यांचें ग्रंथावलोकन फार मोठें होतें याविषयीं संशय रहात नाहीं. भगवद्गीतेच्या नवमाध्यायांत राजविद्याराजगुह्य योगाच्या संबंधानें लिहितांना " प्रत्यक्षावगमं धर्म्यं सुसुखं कर्तुमव्ययम्, " गीतेचा जो भक्तिविषयक बारावा अध्याय

त्यांतील शेवटच्या श्लोकांतील " येतु धर्म्यामृतमिदं यथोक्तं पर्युपासते " व अष्टमाध्यायांतील सत्तराव्या श्लोकांत " अध्येष्यतेच य इमं धर्म्यं संवाद मावयोः " या स्थलीं गीताकर्त्यानें धर्म्यपदाची जी योजना केली आहे, तिचा खरा अर्थ कोणीच केला नाहीं, तो सांगतेवेळीं पंडित ह्मणतात " हे परमेश्वरा !

भवद्रुमातें छेदी शस्त्र । ऐसें तुझें गीता शास्त्र ॥
त्याची दाविती पाठ मात्र । धार लपविती ये रीती ॥ १ ॥

हें त्यांचें ह्मणणें प्रख्यात धर्मोद्धारक व गीताभाष्यकार जगद्गुरु श्रीमच्छंकराचार्य यांनासून तद्दत महाराष्ट्र टीकाकार रंगनाथ यांपर्यंत गीतेच्या सर्व टीकाकारांस लागू आहे. या एका " धर्म्य " पदाच्या जोरावर गीतार्थांत सगुणभक्तीचें वर्चस्व स्थापून गीतावचनाची एकवाक्यता करितांना पंडितांनीं पांडित्याची जशी शिकस्त केली आहे तशी महाराष्ट्र ग्रंथांत दुसऱ्या कोठेंही आढळणार नाहीं. अलीकडील कांहीं अर्ध्या हळकुंडानें पिंवळ्या होऊं पाहणाऱ्या लोकांस, इंग्रजीशिवाय इतर भाषा जशा तुच्छ वाटतात तद्वत् पंडित व शास्त्री लोकांस संस्कृताशिवाय इतर भाषा बहुधा तुच्छ वाटावयाच्या असा साधारण अनुभव आहे, असें असतां वामन पंडितांसारख्या महापंडितानें संस्कृत भाषेंत ग्रंथरचना न करितां, मराठी भाषेंत मोठमोठे ग्रंथ लिहिले व ज्या ज्ञानाकरितां ते आपला प्राण देण्यासही तयार झाले होते तें ज्ञान आपल्या महाराष्ट्रीय बंधूंस सुलभ भाषेंत प्राप्त करून द्यावें, या हेतूनें संस्कृत पारिभाषिक शब्दांचा अर्थ, यथार्थदीपिकेंत जेथल्या तेथें देऊन, अपक्व महाराष्ट्र भाषेंत आपल्या गंभीर, प्रेमळ व मधुर वाणीनें अत्यंत गहन असा गीताउपनिषदांसारखा वेदांत विषय अगदीं सोप्या व सरळ भाषेंत सांगितला, यावरून आजकालच्या कांहीं नामधारी विद्वानांसारखा आपल्या विद्वत्तेचा त्यांस काडीमात्रही गर्व नव्हता असें नाहीं का सिद्ध होत? ते स्वतः ईश्वरास ह्मणतातः—

" जी जी देवाधिदेवा ॥ प्राकृत भाषे करितां तुझी सेवा ॥
वेदवाणीस उपजे हेवा ॥ तुझ्या स्वरुपाची ठेवा जीमाजी ॥ १ ॥
मुख्य तुझें नाम गोड ॥ पुरवी सर्वां भाषांचें कोड ॥
तें कानीं मुखीं येतां, मोड ॥ देहीं उपजती प्रेमाचे ॥ २ ॥
काय वेदशास्त्र जाणे व्रज ॥ ज्याची भक्ति देखोनि तुझा आतमज ॥
ब्रह्मा वेदवक्ता शिरीं पदरज ॥ वंदी व्रजनारीनरांचे ॥ ३ ॥

गजेंद्र कोण शास्त्र पढला ॥ बाळ कोण्या पांडित्यें ध्रुवपदा चढला ॥
दासी कुब्जा तिला घडला ॥ काय अभ्यास संस्कृताचा ? ॥ ४ ॥
व्रजीं चारितां गाई ॥ कुचकुंकुमें गोपिकांचीं पाईं ॥
तदंकित तृणें कृतार्थ ठायीं ठायीं ॥ बल्लवस्त्रिया पढलिया त्या काय ? ॥ ५ ॥
अभिमानें बुडाले पंडित ॥ यज्ञपत्न्यांनीं अर्चितां वैकुंठमंडित ॥
न पढतां न वाचितां अखंडित ॥ आनंद भक्तीनें पावल्या ॥ ६ ॥

ज्यांनीं गीतेचा अर्थ केवळ आपल्या मताप्रमाणें केला व खरा अर्थ लपविला, त्या टीकाकारांवर पंडितांनीं ठिकठिकाणीं वाक्शर सोडिले आहेत.—

गीतेंत अर्थवाद ॥ कांहीं न बोले गोविंद ॥
आपुली न मानुनी बुद्धि मंद ॥ अर्थवाद गीतेंत आणिती ॥ ११३४ ॥
ते आपणांस जें जें प्रतिकूल ॥ तें तें योजिती अनुकूल ॥
परी ज्ञान भक्तांचें समूळ ॥ उडविती ॥ ११४३ ॥
कीं ज्ञान झालिया वरी ॥ भक्ति नलगे ऐसी त्यांची वैखरी ॥
ते या गीताशास्त्रावरी ॥ टीकाकार झाले कलियुगीं ! ॥ ११४४ ॥

पंडित स्वतः संबंधानें सांगतात:—

भीड कोणाची नाहीं ॥ विरुद्ध अर्थ नावडे कांहीं ॥
संमत वेदां आणि व्यासादिकांहीं ॥ मूळग्रंथकारातें तें बोलणें ॥ ११४६ ॥

पंडित पुनः ह्मणतात—

हा न्यायसिद्ध ऐसा अर्थ ॥ परंतु निर्गुणोपासनाभिमानी ऐसा सहज यथार्थ ॥
अर्थ न मानुनी अनर्थ ॥ बळेंचि येथें साधिती ॥ १ ॥
समुद्रांत मुक्ताफळें ॥ त्यावरुनी उडती पक्षियांचीं कुळें ॥
परी जळांत मोत्यें निर्मळें ॥ तीं न पाहती ॥ २ ॥
जे नसती निरभिमान ॥ त्यांसी नव्हे गीतार्थाचें ज्ञान ॥
यथामति व्याख्यान ॥ भलता करी ॥ ३ ॥
एणेंच भक्तिमार्गास विलक्षण ॥ निर्गुणोपासनेचें दावावें लक्षण ॥
ह्मणोनि ऐसें बोलती ते विचक्षण ॥ ह्मणवती कैसे ? ॥ ४ ॥
अलीकडे कोणी टीकाकार ॥ करुनी त्या पक्षाचा अंगिकार ॥
ज्ञानियास नलगे सगुण साकार ॥ बोलती ऐसें ॥ ५ ॥

परंतु गीताव्याख्यान ॥ न साहे निर्गुण वादाभिमान ॥
अर्थ केला तरी समाधान ॥ त्या टीकेंत न घडे शोधकांचें ॥ ६ ॥
जे निर्गुणवादाभिमानी ॥ विपरीत सर्व त्यांच्या व्याख्यानीं ॥
कीं भक्त ह्मणतां ऐसा ज्ञानी ।। पोट दुखों लागे तयांचें ॥ ७ ॥

पंडित एवढे विद्वान् परंतु किती निरभिमानी होते पहा—

" तत्त्वता अर्थ ठायीं पडो न पडो । सर्वांस टीका आपुली आवडो ॥
हा भाव असे तरीं झडो । जिव्हाचि हे ॥ १८ १४ ॥

यथार्थदीपिका, अध्याय १२

अक्षरगण वृत्तांत कविता करणाऱ्या महाराष्ट्रकवींत पंडित श्रेष्ठ होत. त्या वृत्तांत कविता करणारे दुसरे पुष्कळ कवी झाले, परंतु पंडितांची बरोबरी त्यांपैकीं एकाच्यानें देखील करवली नाहीं. खालील आर्या तर प्रसिद्धच आहे—

" सुश्लोक वामनाचा, अभंगवाणी प्रसिद्ध तुकयाची ॥
ओंवी ज्ञानेशाची किंवा आर्या मयूरपंताची ॥ १ ॥ "

ही आर्या रचणारे रामचंद्र बडवे काव्याचे खरे मार्मिक व ज्ञाते होते यांत संशय नाहीं, कारण त्यांच्या वरील सिद्धांतास अपवाद उत्पन्न करणारा आजपर्यंत कोणी झाला नाहीं व पुढेंही होईलसें वाटत नाहीं.

पंडितांनीं आपल्या प्रत्येक काव्याच्या आरंभीं, त्या काव्यांत काय आहे, त्याचा सारांश थोडक्यांत सांगितला आहे. तसेंच आपण केवळ दगड असून कवि, काव्य लिहिणारा व सर्व कांहीं करणारा एक परमेश्वर आहे, असे उद्गार त्यांच्या प्रत्येक काव्यांत आढळतात.

पंडितांची महाराष्ट्र भाषेवर पूर्ण सत्ता असून, त्यांची वाणी मधुर, प्रसादयुक्त, अर्थालंकार, शब्दालंकार, प्रास यमकें इत्यादि काव्यगुणांनीं मंडित अशी असल्यामुळें, लेखकप्रमादानें झालेल्या चुक्या किंवा मागाहून कांहीं उपद्व्यापी मंडळीनें केलेली घुसडाघुसड व जांवईशोध हीं तात्काळ ओळखितां येतात.

पंडितांचा आवडीचा विषय अध्यात्म व त्याच विषयावर त्यांची कविता अधिक आहे. गीतेवर एक समश्लोकी टीका लिहूनही समाधान न झाल्यामुळें फिरून त्यांनीं यथार्थदीपिका नांवाची विस्तीर्ण टीका लिहिली ! मोरोपंतांचे चरित्रकार व त्यांचे कवितेचे अभिमानी मराठी भाषेचें स्वामित्व पंतांकडे देतात. वास्तविक पाहिलें

असतां पंत कांहीं कमी विद्वान् होते असें नाहीं परंतु पंतांची गीतेवरील टीका व तिच्या आरंभीं पंतांनीं काढिलेले उद्गार व पंडितांची गीतेवरील टीका यांच्या मधील अंतराचा विचार केला असतां व तत्वज्ञानासारखा गहन व शास्त्रीय विषय अक्षरगण वृत्तांत अस्खलित व आनंददायक रीतीनें प्रतिपादन करितांना वामनपंडितांनीं संस्कृत भाषेचें कितीसें साह्य घेतलें आहे व त्यांच्या मागून पंत ११० वर्षांनीं, पंडितांच्या वेळच्या सामुग्रीच्या दसपट सामुग्रीसह, त्याच रंगभूमीवर प्रविष्ट झाले असतां त्यांनीं भारत रामायणांतील कथानकें सांगतांना संस्कृत भाषेचें किती साह्य घेतलें आहे याचा विचार केला व "संस्कृतप्राकृतामिश्रित यास्तव कोणी ह्मणेल ही कंथा" असे जे पंतानीं प्रांजलपणें उद्गार काढिले आहेत त्यांतील शालीनतेचा भाग वजा करून बाकी जमेस धरून अनुमान काढिलें तर महाराष्ट्र भाषेचें आधिपत्य पंडितांकडेच दिलें पाहिजे हें निर्मत्सर आणि निरभिमानी लेखक कबूल करितील यांत संदेह नाहीं. शिवाय अधिकार व प्रसाद या बाजूनें विचार केला तर पंडितांची योग्यता पंतांपेक्षा कितीतरी अधिक होती हें दोघांच्याही ग्रंथांचें ज्यांनीं अवलोकन केलें असेल त्यांस सांगावयास नकोच. पंतांनीं स्वतः पंडितांच्या कवितेची फार तारीफ केली असून पंडितांच्या ग्रंथांसंबंधानें ते फार पूज्यबुद्धि बाळगीत असत. गीतेवर आर्याबद्ध टीका करितांना, स्वतः गीतेचा अर्थ न करितां, पंडितांच्या समश्लोकी टीकेच्या आधारानें, पंतांनीं आपली गीता लिहिली आहे. ते ह्मणतात—

> "श्रीमद्वामनविरचित गीताटीकोत्तमा समश्लोकी ॥
> आर्या टीका तेचि च्छंद निराळे विचित्र हें लोकीं ॥ १ ॥"

असो.

आतां पंडितांनीं किती कविता लिहिली होती, त्यांतील आज किती उपलब्ध आहे व तिची सद्यःस्थिति कशी आहे याचा थोडासा विचार करून व त्यांच्या काव्योदधींतील थोडेसे मधुर पद्यजलकण येथें देऊन हा लंबायमान होत चाललेला चरित्रभाग आटोपता घेतों.

रामदासचरित्रांत हनुमंतस्वामी यांनीं असें लिहिलें आहे कीं "पंडितांनीं एकंदर १२ लक्ष कविता लिहिली व ती मीं पाहिली आहे;" परंतु आमच्या दुर्दैवानें आज त्यांतील बहुतेक कविता नष्ट होऊन गेलेली आहे. त्यांची उपलब्ध असलेली कविता सुमारें ४०,००० होईल. त्यांनीं लिहिलेले प्रसिद्ध ग्रंथ यथार्थदीपिका, निगमसार,

समश्लोकीगीता, व श्लोकबद्ध फुटकळ प्रकरणें सुमारें ५८ हे आहेत. या शिवाय त्यांचा श्रुतिकल्पलता या नांवांचा एक ग्रंथ असल्याचें प्रसिद्ध आहे परंतु तो अद्याप छापून प्रसिद्ध झालेला नाहीं. "विराटपर्व" हें एक श्लोकबद्ध प्रकरण व इतर कांहीं प्रकरणें वामनीग्रंथ व "काव्यसंग्रह" यांत वामनपंडितांचीं ह्मणून दिलेलीं आहेत, परंतु त्यांची रचना रुकृद्दर्शनीं जरी वामनी पद्धतीची दिसते तरी एकंदरींत त्यांत इतर वामनी ग्रंथांत न सांपडणारे पुष्कळ दोष असून तें काव्य ह्या वामनाचें नव्हे हें मागें सांगितलेंच आहे.

वामनपंडितांचे श्लोक सर्वत्र प्रसिद्ध आहेत. "नसे ठावा ब्रह्मा" हा श्लोक तर आबालवृद्धांच्या तोंडीं असलेला ऐकूं येतो, परंतु त्यांची आर्या कोणी ऐकिली नसेल. पंडितांच्या ४०,००० कवितेंत मला साऱ्या ३ आर्या मिळाल्या. त्या भर्तृहरीच्या शृंगारशतकावरील टीकेंत आहेत. त्यांतील दोन येथें उतरून घेतों:—

"विनयप्रेम विराजे गोडी ज्यामाजि कामही साजे ॥
वनिताऽप असे जे ऐके सुकृती विविक्त पैं सेजे ॥ १ ॥
वरतें पटल घनाचें नर्त्तन करिती महीवरी मोरें ॥
भूतल हिरवें पथिकें सोडावी दृष्टि कोठें रे ॥ २ ॥

पंडितांच्या अंगीं, जो रस घ्यावा, तो चांगला खुलवून दाखवावा, असें सामर्थ्य होतें. त्यांच्या कवितेंत नऊही रस आढळतात. शिवाय दहावा जो भक्तिरस त्याची तर जिकडे तिकडे रेलचेल उडाली आहे. खालीं दिलेला उतारा किती मधुर आहे पहा—

श्लोक

वनीं वाजवी वेणु जेव्हां मुरारी ॥ व्रजीं चित्त कामें स्त्रियांचें थरारी ॥
तया वर्णिती प्राण ठेवूनि कंठीं ॥ वधूवृंद तो संकटें दीस कंठी ॥ १ ॥
अंगवक्र अधरीं धरि पांवा ॥ गोपवेष धरि तोचि जपावा ॥
वामबाहुवरि गालहि डावा ॥ तो ठसा स्वहृदयांत पडावा ॥ २ ॥
वेणु जेंवि अधरीं स्वररंध्रीं ॥ अंगुली स्मरति गोप पुरंध्री ॥
कोमळा सुचपळा अतिलंबा ॥ सतहि स्वररसा अविलंबा ॥ ३ ॥
ऐसिये हरिचिये मुरलीनें ॥ कामततस्मनें स्मरलीनें ॥
मोहिलीं सहवधू त्रिदशांची ॥ आमुचीं न नवलें सदशांचीं ॥ ४ ॥

गायनीं अमर जे अभिमानी ॥ आणि देवललना स्वविमानीं ॥
त्या स्त्रियांसहित दैत्यजनारी ॥ मोहिलें ह्मणति या व्रजनारी ॥ ५ ॥

वेणुसुधा,

वामनपंडितांनीं नाममाहात्म्याचें फार वर्णन केलें आहे. त्यांचा "नामसुधा" या नांवाचा एक स्वतंत्र ग्रंथच आहे. त्यांत वामन ह्मणतात--

" मैत्रेयीप्रति याज्ञवल्क्य निगमीं विस्तार जो बोलिला ॥
कीं ज्यालागिं समस्तही प्रिय असे आत्माच हा आपुला ॥
जो कां आवडतो निमित्त नसतां तो जाणसी जेधवां ॥
कांहींही तुज जाणणेंचि न उरे सर्वज्ञ तूं तेधवां ॥ "

सांकेत जीं निजसुतादि निमित्त नामें ॥ संकेतरूप रचिलीं तरि शुद्धिधामें ॥
गोविंदनाम हरि माधव चक्रपाणी ॥ कोण्या मिषें तरि वदो परि धन्य वाणी ॥
हरि हरि ह्मणुनी हा नाचतो काय वेडा ॥ अज अजित ह्मणनी गर्जतो काय रेडा ॥
मुखिं हरि परिहासें ये अशाही प्रकारें ॥ तरि जळतिल पोरें पापियांचीं अपारें ॥

पडे अडखळे गळे करपदादि भंगे मरे ॥
डसे भुजग अग्निही करुनि जीविता अंतरे ॥
मरेल जरि मारितां तरि न त्या नगा यातना ॥
स्मरेल मरतांच जो विवशही जगत्पावना ॥

कापसाच्या राशीवर एखाद्या लहान मुलाकडून नकळत अग्नीची ठिणगी पडली असतां ज्याप्रमाणें ती कापसाची राशी भस्म होते तद्वत् कोणत्याही निमित्तानें जरी हरिनामस्मरण घडलें तरी पातकें जळून जातात, हा सिद्धांत, अजामिळादिकांच्या उदाहरणांनीं या ग्रंथांत, पंडितांनीं, सांगितला आहे. शिवलीलामृतकार कविराज श्रीधर यांनींही याच अर्थाचे उद्गार काढिले आहेत--

" संकेतें अथवा हास्य करून । भलत्या मिषें घडो शिवस्मरण ॥
नकळतां परीसीं लोह जाण । झगटतां सुवर्ण करी कीं ॥ १ ॥
न कळतां प्राशिलें अमृत । तरी अमर करी कीं यथार्थ ॥
औषध नेणतां भक्षित । तरी रोग हरण करी कीं ॥ २ ॥ "

प्रल्हाद, भीष्म, शुक इत्यादि पुराण सत्पुरुषांचा जो भागवतधर्म त्याचे पंडित मोठे अभिमानी होते. हा धर्म भीष्माचार्यांनीं धर्मराजास असा सांगितला आहे—

" एषमे सर्व धर्माणां धर्मोधिक तमोमतः ॥
यद्भक्त्या पुंडरीकाक्षं स्तवैरर्चेन्नरः सदा ॥ "

यावर पंडितांची टीकाः—

" या धर्मा सकळांत संमत मला तो धर्म हा आगळा ॥
नाहीं त्यासम धर्म आणिक नृपा जो धर्म या वेगळा ॥
जो स्तोत्रें दृढ भक्तिनें प्रतिदिनीं गोविंद हा पूजणें ॥
[ ऐसें कृष्णसमीप भीष्ममुखिचें श्रीभारतीं बोलणें ॥ ]

हा नामसुधा ग्रंथ फारच चांगला असून, मुमुक्षूनीं अवश्य वाचण्यासारखा आहे. कलियुगांत हरिनामस्मरण हेंच संसारसागर तरून जाण्यास उत्तम साधन होय हें, स्वानुभवानें व पौराणिक उदाहरणांनीं, साध्या भाषेंत, पंडितांनीं सांगितलें आहे. या नामस्मरणाचा महिमा पंडितांनीं इतरत्रही वर्णिला आहे—

गाऊनियां मधुर हें हरिनाम नाचा । पाहों मग भ्रम कसा हरिना मनाचा ॥
तत्रापि कीर्तनचि मुख्य कलौ करीतो । होतो तया प्रकट तारक लौकरी तो ॥

पंडितांनीं देवाजवळ मागणें मागितलें आहे—

" दास्य दे हरि तुझ्या चरणाचें । कीर्तन श्रवण आचरणाचें ॥
दे अनन्य हृदयीं स्मरणातें । हें न देसि तरि दे मरणातें ॥ '

अहाहा ! काय हें प्रेम, केवढी भक्ति आणि किती निष्कामबुद्धि ! अशा महात्म्यांनीं देवास आपला ऋणी केला तर त्यांत नवल तें काय झालें ?

पंडितांनीं एके ठिकाणीं ह्मटलें आहे—

' नजाणे कला गीत तालानुरागा । अजी जाणतों गीत नामानुरागा ॥
श्रमें मात्र गातां उगें जें जपावें । अशा लागिंही तो महाराज पावे ॥
मला राम गातां सुखप्राप्ति होते । गमे कीं समस्तांस होते अहो ते ॥
नमो गोड रामास कीं गोड भक्तां । न वाटे न वाटे अभक्तां विभक्तां ॥

यावरून पंडित, मनांतल्या मनांत नामस्मरण न करितां, निर्भीडपणें मोठ्यानें भजन करीत असत असें वाटतें. पंडितांचीं पदें जरी चांगलीं रागातालांत गातां येतात तरी पंडित गायनासंबंधानें अनभिज्ञ होते, असें त्यांच्या खालील उद्गारांवरून ह्मणतां येईल.

' अजी ताल संगीत देतील दृष्टी ॥
तयां रंजवावें न ऐसें अदृष्टीं ॥ '

पंडितांच्या कवितेंत जसे अर्थालंकार फार आहेत तसे शब्दालंकारही फार आहेत. त्यांपैकीं कांहीं "अनेकविद्यामूलतत्वसंग्रह" व "नवनीत" या ग्रंथांत दिलेले बहुतेकांच्या वाचनांत आलेच असतील.

खालील "रासक्रीडेंतील उतारा किती हृदयंगम आहे पहा–

श्लोक

माळाकार परस्परें कर गळां घालोनि गोपांगना ॥
गाती नाचति पाहती अवघिया एका जगज्जीवना ॥
सोन्याचे मणि ओंविले भुजगुणीं गोऱ्या शशांकानना ॥
पाचूचे पदक स्थळीं स्मर मना श्रीदेवकीनंदना ॥ १ ॥
कालिंदीतट वाळुवंट, गगनीं संपूर्ण तारापती ॥
कल्हारीं कुमुदोत्पळीं अलि शरत्काळीं जळीं गुंजती ॥
वारा मंद सुगंध शीतल, फुलें, नाना तरू शोभती ॥
ऐशा यामिनि गोपिका हरिसवें रासोत्सवें क्रीडती ॥ २ ॥
गोपीनायक इंद्रनील मिरवे मुक्ताफळांच्या कळा ॥
गोऱ्या गौळणि रासमंडळिं तशा मध्यें हरी सांवळा ॥
कस्तुरी निढळीं कलिंदतनया श्रीरासमाळा गळां ॥
सौभाग्य व्रज भूमिचें पदरजें त्याच्याचि आलें फळा ॥ ३ ॥

अशा मनोरम अर्थांनें भरलेलीं स्थळें मुक्तेश्वर किंवा रघुनाथपंडित यांशिवाय दुसऱ्या कोणत्याही मराठी कवीच्या काव्यांत मिळणें कठिण.

अहल्योद्धार नामक एका सुरस काव्यांत, श्रीरामचंद्रानीं अहल्यारूपी शिळेस पादस्पर्श करितांच ती पूर्वस्वरूप पावली त्यावेळीं तिची स्थिति कशी चमत्कारिक झाली त्याचें पंडित वर्णन करितात––

" सजल जलदवर्णा दुःखसंसारभंगा । कनकरुचिरवर्णा सूर्यकोटिप्रभंगा ॥
सशर करिं धनू त्या राघवा सानुजातें । स्तवित कमलनेत्रा कुंडलास्यांबुजातें ॥ १ ॥

पदरजा जशि लाधलि दुर्लभा । परमविस्मित गौतमवल्लभा ॥
करुनि मागुति मागुति वंदना । स्तवितसे स्वमुखें रघुनंदना ॥ २ ॥
ब्रह्मादिही हुडकिती पदनीरजाचा । जो रेणु, लाभ मज आजि तया रजाचा ॥
केलें मला परमधन्य जनन्निवासा । नासूनि शाप ननु दुःख अरण्यवासा ॥ ३ ॥
ज्याचें पदाब्जरज धुंडिति वेदवाचा । नाभीस संभव सरोरुहसंभवाचा ॥
घेणार नामरससार पुरारिवाणी । तो रामचंद्र भजतां मज काय वाणी ॥ ४ ॥
या दीनपालन कथा खलशासनाच्या । गाती निरूपिति सभे जलजासनाच्या ।
त्या राघवाविण दुजा कवणा भजावें । सर्वात्मना शरण एक तयास जावें ॥५ ॥
धरूनी स्तनीं लग्न संगीत वीणा । तुतें राघवा गाय वाणी प्रवीणा ॥
कुचाग्रावरी वर्षतें नेत्रपाणी । हृदब्जीं जिच्या राम कोदंडपाणी ॥ ६ ॥ ”

या शेवटच्या पद्यांत तर सरस्वतीच्या हातीं वीणा देऊन आणि भक्तीनें रामगुणगणाचें वर्णन करितांना तिच्या नेत्रकमलांतून निघालेल्या प्रेमाश्रुगंगेचा ओघ तिच्या कुचपर्वतांवर पाडून आह्मां मूढ जनाकरितां, भक्तिरसामृताचा धबधबाच पंडितांनीं उत्पन्न करून ठेविला आहे कीं काय, असें वाटतें.

मिथिलाधिपति जनकराजाच्या मंदिरांतील सभामंडपांत सीतादेवीच्या प्राप्तीकरितां जमलेल्या असंख्य राजेलोकांत श्रीराममूर्तीस अवलोकन करितांच जानकीची स्थिति कशी झाली, हें खालील पद्यांत फार मधुर भाषेनें सांगितलें आहे–

शृंगारशृंगउदयाचल धामचंद्रा । श्रीरंगतुंगहृदया रघुरामचंद्रा ॥
अंगांग सुंदरवरा नवमेघरंगा । रंगांगणीं जनकजा जडि अंतरंगा ॥ १ ॥
शृंगारशृंगालय केसरी हो । सांगा अनंगा नट केसरी हो ॥
कासे विकासे पट केसरी हो । श्री शंकली पंकजकेसरीं हो ॥ २ ॥
अनंगरंगांबुधिच्या तरंगीं । रंगी शुभांगी जडि अंतरंगीं ॥
भंगील हा हो धनु केंवि रंगीं । ह्मणे कुरंगी नयनी सुरंगी ॥ ३ ॥
सूर्यवंशपतिच्या सुकुमारा । देखतां रघुपतीस कुमारा ॥
चाप तें कठिण हा मृदु भारी । हें मनांत भय काम उभारी ॥ ४ ॥
लज्जावती फार तथापि त्याची । शंका न सीता धरि हो पित्याची ॥
ह्मणे अहा ! तात ! अशा पणातें ॥ केलें, तुवां संकट आणणातें ॥ ५ ॥

बहु कठोर ह्मणे धनु जानकी । निपट कांसवपृष्ठसमान कीं ॥
रघुपती तरि हा लघु आपण ॥ अहह ! दारुण तात तुझा पण ॥ ६ ॥

मदनशत्रुशरासन हें महा । मदनमूर्तिच केवळ राम हा ॥
करील सज्ज कसा धनु आपण । अहह ! दारुण तात तुझा पण ॥ ७ ॥

मज नये नवरा दुसरा मना । निजपणीं दृढ हे स्मर कामना ॥
रघुपती तरि हा लघु आपण । अहह ! दारुण तात तुझा पण ॥ ८ ॥

" मज नये नवरा दुसरा मना " या वाक्यानें तर शृंगाररसाची कमाल झाली ! संसारसमुद्रांतून मुक्त होण्याचें मुख्य साधन काय हें पंडितांनीं याच आख्यानांत, एकाच श्लोकांत, अलंकारिक भाषेंत सांगितलें आहे.

" श्रीमद्राघवहस्तपद्मगुण ये कर्णांत हो जेधवां ॥
मोडे हें भवचाप अर्थ इतुका दावी जगीं तेधवां ॥
कीं श्रीरामकरारविंदगुणही कर्णांत येतां स्वयें ॥
मोडे हें भवसायकासन असा भावार्थ हा निश्चयें ॥ १ ॥

या श्लोकाचे दोन अर्थ आहेत ते चतुर वाचकांच्या ध्यानांत आलेच असतील. एकंदरींत, पंडितांचे अंगीं वाटेल तो रस योग्य रीतीनें वठविण्याची जशी शक्ति होती तशी इतर कवींच्या अंगी क्वचितच होती. तथापि येथें एक चमत्कार असा झाला आहे कीं, पंडित हे महा भगवद्भक्त असल्यामुळें कोठें कोठें शृंगारसांत त्यांनीं वेदांत ओतिला आहे. काव्याचें कथानक शृंगारपर, पंडितांनीं काव्य रचावयास प्रारंभ केला तोही शृंगारयुक्त, परंतु शेवटीं काव्याचें पर्यवसान अध्यात्मांत, ह्मणजे, रतिसमयीं वेदपाठ करणाऱ्या ब्राह्मणासारखा प्रकार झाला आहे. उदाहरण, रुक्मिणी-विलास, पद्य ११४

" स्त्रियांचे ते देवा ! नृपति खर कीं बैल कुतरे ॥
अहा ! कोणी बोले वधिति धनराज्यार्थ सुत रे ॥
नवोढांच्या लाथा खरपुरुष सोसूनि रमती ॥
वृषस्कंधीं घेती श्वनर अवमानार्ह कुमती ॥ "

या गौणत्वासंबंधानें प्रसिद्ध विद्वान् लेखक हंस हे आपल्या निबंधांत लिहितात " यथार्थदीपिका, समश्लोकी, ब्रह्मस्तुति इत्यादि आपल्या ग्रंथांत, वामनानें, अनेक-

स्थलीं श्रुतिप्रमाणानें फार चांगला तत्वविचार केला आहे. त्यांतील कांहीं मासला उतरून घेण्यास स्थलावकाश नाहीं. वामनाची अद्वैत शास्त्रावर इतकी अभिरुची होती कीं, शृंगारादि रसांस उद्दीपन करण्याजोगी उत्तम सामुग्री असतांनाही ती एकीकडे ठेवून, तेथें यथेच्छ आत्मज्ञान कथन करण्यास त्यानें मागें पुढें पाहिलें नाहीं. रुक्मिणीविलास या प्रकरणांत, शृंगारस प्रधानत्वेंकरून असावयाचा परंतु त्यांत वेदांत विषयावर पुष्कळ पद्यें आढळतात. याप्रमाणें रुक्मिणीविलासांत रुक्मिणीच्या भाषणांत सर्वत्र वामनानें आत्मज्ञान ओतिलें आहे. यामुळें अर्थात् विषयविडंबन होऊन शृंगारसाचें सरोवर कोरडें ठणठणीत दिसूं लागतें ! काव्यदृष्टीनें पाहिलें तर रुक्मिणीविलासांतील कविता पंडितांच्या नेहमीच्या कवितेप्रमाणें चांगली साधली आहे, यांत शंका नाहीं, परंतु ग्रंथासंबंधानें पाहतां विलासांत विषयविडंबन व आत्मज्ञानकथन किती विरुद्ध आहे हें सांगावयासच नको. आतां, विलासांत कोणत्या गोष्टी असाव्या हें पंडितांस समजत नव्हतें असें ह्मणावयास जागा नाहीं कारण त्यांनींच भामाविलास नांवाचें एक लहानसें प्रकरण गाइलें आहे, त्यांत शृंगार फार खुबीदार व मार्मिक रीतीनें वर्णिला आहे." असो. पंडित हे जीवन्मुक्त होते व आह्मी व हंस हे विषयलोलुप आहोंत, एवढें ध्यानांत आणिलें ह्मणजे या शंकेचें सहज समाधान होणार आहे.

पंडितांची गीतेवरील समश्लोकी टीका फार उत्तम असून सर्वमान्य आहे. या टीकेसंबंधानें पंतांनीं म्हटलें आहे,—

" रीति समश्लोकीची अतुला साधेल काय भव्यास ॥
या सुयशें होईल कां रोमांचव्यासकाय न व्यास ? ॥ "

" नृहरिदर्पण " व " भरतभाव " हीं पंडितांचीं दोन पहिल्या प्रतींचीं काव्यें आहेत. पहिल्यांत नृसिंहावताराचें वर्णन व दुसऱ्यांत भरताच्या रामाच्या ठायीं असलेल्या अप्रतिम प्रेमाचें वर्णन फार गोड भाषेंत केलें आहे. भरतभावांत करुण रसाचें वर्णन इतकें सरस उतरलें आहे कीं, सहृदय वाचकांच्या डोळ्यांतून अश्रुपात झालाच पाहिजे !

अमृताच्या महासागरांतून अमृतच निघावयाचें तद्वत् पंडितांच्या कवितेंत जिकडे तिकडे प्रसाद भरून राहिला आहे. आतां पंडितांचीं एकदोन पदें उतरून घेतों.

पद.

अर्जुना तूं जाणरे ॥ होशिल सुजाणरे ॥
विश्व नाहीं मीच आहें सख्या तुझी आणरे ॥ धृ० ॥
मातीमाजी घटरे ॥ तंतूमाजी पटरे ॥
माती तंतू विचारितां कैंचा घटपटरे ॥ १ ॥
रज्जु सर्पाकाररे ॥ सर्प ना तो दोररे ॥
दोरामाजी सर्प भासे वांझेचें तें पोररे ॥ २ ॥
हेमीं अलंकाररे ॥ पाण्याची ते गाररे ॥
हेम पाणी विचारितां कैंचा तो आकाररे ॥ ३ ॥
तैसें जग हें पाहीं रे ॥ जों रामीं दृष्टी नाहीं रे ॥
रामीं राम झाल्या मग जग कैंचें कायरे ॥ ४ ॥
अंडें कोटी खर्व रे ॥ मजमाजी सर्वरे ॥
न मीं त्यांत न तीं मजमध्यें हें अपूर्व रे ॥ ५ ॥
राजविद्यागुज रे ॥ सांगतसें तूजरे ॥
कलिमाजी वामनासी हेंचि देणें मजरे ॥ ६ ॥

खालील पदांत पंडितांनीं मोठ्या कळकळीनें जनांस उपदेश केला आहे.

पद.

ध्यातां सुतकामिनी ॥ जातां दिन यामिनी ॥
घडीभरी तरी मनीं ॥ आठवा राम ॥ १ ॥
धंदा न सुटे जरी ॥ सुखें असा व्यापारीं ॥
वाचे आणि अंतरीं ॥ आठवा राम ॥ २ ॥
करितां संसारकाम ॥ वाचे असों द्यावा राम ॥
शिवाचें विश्रामधाम ॥ आठवा राम ॥ ३ ॥
दिवस गेला व्यापारीं ॥ निद्रेखालीं रात्रि सारी ॥
गेले दिवस दोनी चारी ॥ आठवा राम ॥ ४ ॥
काळ जातो घडी घडी ॥ मोडितो देहाची घडी ॥
गोष्टी हे सां ऊघडी ॥ आठवा राम ॥ ५ ॥

काया वाचा मनेंकरून ॥ प्रार्थितसे वामन ॥
अहो भावें हें वचन ॥ आठवा राम ॥ ६ ॥

पंडित शके १६१७ त सुमारास निजधामास गेले. पंडितांचे शिष्य बरेच होते, त्यांपैकीं साम्राज्य वामन, विश्वनाथ वगैरे शिष्यांनीं कांहीं उत्तम काव्यें लिहिलीं आहेत. त्यांची कविता अगदीं थेट पंडितांच्या कवितेसारखी आहे.

गिराबाई पंडितांच्या पूर्वीच निवर्तल्या व नंतर पंडितांनीं संन्यास घेतला असावा व ह्मणूनच त्यांना महिपती, मोरोपंत वगैरे मंडळी वामनस्वामी असें म्हणतात, असें कित्येकांचें मत आहे. परंतु प्रपंचांत असतांनाच जो ईश्वरस्वरूप बनून गेला, त्याला मुंडनादि इतर बाह्यसाधनाच्या संन्यासाची कांहीं आवश्यकता होती असें वाटत नाहीं. शिवाय एकनाथ हे गृहस्थाश्रमींच असतां त्यांस एकनाथ स्वामी असें ह्मणण्याचा परिपाठ आहे, तसेंच पंडितांस वामनस्वामी हें नांव मिळालें असावें.

कोणी ह्मणतात, पंडितांचे वंशज काशी येथें असून त्यांजकडे पंडितांच्या पादुका आहेत. असो; येथपर्यंत वामनपंडितांसंबंधानें जेवढी माहिती देतां आली तेवढी दिली. हा निबंध लिहितेवेळीं बाळाजी आणि कंपनीनें छापलेल्या वामन-पंडितांच्या चरित्राचा मला फारच उपयोग झाला, किंबहुना या लेखाचें बरेंच श्रेय त्याच पुस्तकास आहे, एवढें येथें नमूद केल्याशिवाय माझ्यानें राहवत नाहीं.



# रंगनाथस्वामी निगडीकर.[1]

लाजविलेचि निजयशें दुग्धाब्धितरंग रंगनाथानें ।
भक्तिज्ञानें ज्याची मति पोषी जेंवि अंगना थानें ॥ १ ॥

सन्मणिमाला—मोरोपंत.

हे रामदासपंचकांतील[2] प्रसिद्ध साधु होत. हे राजयोगी होते. ह्यांनीं रेडा मारून शिजविला व त्यास पुनः जीवंत करून शिवाजी महाराजांचा आपल्या साधुत्वासंबंधाचा संशय दूर केला, अशी हनुमंतस्वामीकृत रामदासचरित्रांत कथा आहे. तसेंच यांनीं एकदां, बाभळीच्या झाडांत मारिलेला तीर, कितीएक चोरांस काढतां आला नाहीं, यामुळें लाजून ते चोर त्यांचे शिष्य झाल्याची कथा त्याच ग्रंथांत दिली आहे. ह्यांच्या घोड्यासंबंधाची एक गोष्ट जयरामस्वामी वडगांवकरांच्या चरित्रांत दिलीच आहे. ह्यांचें संक्षिप्त चरित्र येथें देतों.

रंगनाथांच्या पूर्वजांचें मूळ आडनांव खडके असें होतें; हें नांव यांचे पूर्वज पूर्वी खडकी येथें रहात असत, त्यावरून पडलें. खडकी हें गांव मोंगलाईंतील चौसाळें महालांत आहे. खडकी येथून पंधरावे शतकाच्या सुमारास राघोपंत खडके हे श्रीक्षेत्र पंढरपुराजवळ नाझरें या गांवीं राहण्यास गेले. राघोपंतांची शिपाईगिरी व अश्वविद्यानैपुण्य पाहून, लोक त्यांस विनोदानें खडके याच्या ऐवजी घोडके असें ह्मणूं लागले व तेव्हांपासून त्यांचें आडनांव घोडके असें पडलें; हल्लीं त्यांचे वंशजही हेंच आडनांव लावितात.

राघोपंतांनीं नाझरें येथील देशपांडेपणाची वृत्ति विजापूर सरकारांतून संपादन केली; ती वंशपरंपरेनें ह्याच घराण्याकडे चाळत आली. घोडके हे माध्यंदिन शाखेचे वासिष्ठगोत्री ब्राह्मण. राघोपंताच्या मुलाचें नांव चंद्राजीपंत; ह्यांस दोन पुत्र होते, थोरल्याचें नांव नागेश व धाकट्याचें दत्तात्रय. दत्तात्रयानें आपल्या उत्तर वयांत

---

१ ‘निगडीकर’ ह्मणण्याचें कारण, दुसरे पठणकर रंगनाथ होते, हें होय.

२ या पंचकांत रामदास, केशवस्वामी, आनंदमूर्ति, जयराम आणि रंगनाथस्वामी यांचा समावेश होतो.

सन्यास घेतला होता. दत्तात्रयास पुत्र एक, रंगोपंत; त्यास (१) रामाजी (२) बोपाजी (३) कृष्णाजी व (४) दत्तात्रय असे चार पुत्र होते; त्यांपैकीं बोपाजी हे रंगनाथ स्वामींचे तीर्थरूप. रंगनाथांच्या आईचें नांव बयाबाई. बोपाजीपंतांनीं कलबुर्ग्याजवळील कल्याणमठचे श्रीपूर्णानंदस्वामी यांचा अनुग्रह घेतला होता. त्यांस फार दिवस पुत्रसंतान नव्हतें; पुढें पूर्णानंदाच्या प्रसादानें त्यांस (१) यादव ( जन्म शक १५३१ ) (२) रंगनाथ ( ज. श. १५३४ ) (३) विठ्ठल ( ज. श. १५३८) असे तीन पुत्र झाले.

रंगनाथांचा जन्म शके १५३४, मार्गशीर्ष शु. १० रविवार, या दिवशीं झाला. यांस लहानपणापासून दांडपट्टा, बोथाटी, तिरंदाजी वगैरे मर्दानी खेळांची फार आवड असे; व घरची श्रीमंती असल्यामुळें त्यांचे हे लाड सहज पुरले जात. हे सोळा वर्षांचे झाले, त्यावेळीं ह्यांच्या आईबापांनीं, त्यांच्या लग्नाची सर्व तयारी केली होती, परंतु रंगनाथांनीं लग्न न करण्याचा हट्ट घेतला. आईबाप आपलें ऐकणार नाहींत असें पाहून, त्यांनीं घर सोडलें व तेथून अशनूर, निरानरसिंगपूर, वगैरे गांवांवरून शेवटीं ते बदरिकाश्रमीं गेले. तेथें कांहीं दिवस राहून, त्यांनीं योगसाधन केलें व पुढें तेथून परत स्वदेशीं येण्यास निघाले. घर सोडल्यापासून यांचा थाट संन्याशासारखा असे; परंतु हे स्वदेशीं येत असतां वाटेंत तेहरी ( मध्य हिंदुस्थानांत एक संस्थान आहे. ) येथील राजानें त्यांचा अनुग्रह घेऊन, त्यांस अश्व, हत्यारें, मंदील इत्यादि अलंकार अर्पण केले. त्या वेळेपासून, रंगनाथ हेच अलंकार लेवून मोठ्या थाटानें राहूं लागले. महाराष्ट्रांत आल्यावर ते पंढरपुरास गेले असतां, तेथें त्यांच्या आईबापांनीं त्यांस पाहिलें व त्यांस नाझरें येथें घरीं घेऊन आले. कांहीं काल प्रापंचिक सुखांत घालविल्यावर, आतां चतुर्थाश्रम घ्यावा असें बोपाजीपंतांच्या मनांत आलें. त्याप्रमाणें, त्यांनीं कुटुंबांतील सर्व माणसांची अनुमति घेतली व रंगनाथांसह ते कल्याणमठीं श्रीपूर्णानंदस्वामींकडे गेले, तेथून त्यांच्या अनुमोदनानें कृष्णातटाकीं कऱ्हाडक्षेत्रीं येऊन तेथें त्यांनीं संन्यास घेतला व 'निजानंद' नांव धारण केलें. पुढें रंगनाथस्वामींनीं व त्यांच्या बंधूंनीं त्यांचाच अनुग्रह घेतला. यापुढें पित्यानेंच पुत्रास उपदेशदीक्षा देण्याचा क्रम या घराण्यांत सुरू झाला. नंतर हे पितापुत्र तीर्थयात्रेस निघाले; हिंडतां हिंडतां कऱ्हाड येथें कृष्णा व कोयना यांच्या प्रीतिसंगमावर आले असतां, 'लौकिक वाढून या जड जगाची कुंठित होतें व परमेश्वरच्चिंतनांत अंतर पडतें,' या कारणानें निजानंदस्वामींनीं

आपल्या पुत्रांच्या अनुमतीनें, त्या पवित्र जलप्रवाहांत जीवंत जलसमाधि घेतली ! ही गोष्ट शके १५६४ मार्गशीर्ष वद्य ३० या दिवशीं घडली.

वडील कैवल्यवासी झाल्यावर, रंगनाथस्वामी, घरीं न जातां, तीर्थयात्रा करीत हिंडूं लागले. एकेवेळीं ते कृष्णातीरीं जाण्यास निघाले असतां, कोरेगांवच्या वाटेवर निर्गुंडीचें वन लागलें. त्या वनांत, एका ओढ्याचे कांठीं स्वामीच्या घोड्याचा पाय रुतला; व घोडा पुढें चालेना. हीच परमेश्वराची आज्ञा असें समजून रंगनाथांनीं तेथेंच मुक्काम केला व पुढें त्याच ठिकाणावर आपला मठ बांधिला. या मठास निगडीचा मठ असें ह्मणूं लागले, व त्या स्थानास निर्गुणपुर अथवा निगडी असें ह्मणण्याचा संप्रदाय पडला. या निगडी गांवापैकीं रंगनाथांचे वंशजांस, सालीना पंधराशें रुपयांचें उत्पन्न अद्याप चालू आहे.

" श्रीरंगनाथ अल्पवयांतच बदरिकाश्रमास निघून गेले होते, हें वर सांगितलेंच आहे. ते तेथें तप आचरित असतां, त्यांस व्यासोनारायण यांनीं दर्शन देऊन सांगितलें कीं, त्वां घरीं जावें, कारण घरीं तुझीं मातापितरें तुझी वाट पहात आहेत. जातांना वाटेंत 'तेहरी' येथील पहाडी राजाची भेट घे. तो तुला एक घोडा व सरंजाम देईल, तो स्वीकृत कर, आणि त्या घोड्याचीं पावलें ज्या ठिकाणीं खडकावर रुतून घोडा अडकून राहील, तेथेंच आश्रम करून रहा. इत:पर इकडे येण्याचें कारण नाहीं. त्या ठिकाणींच तुला भगवत्साक्षाकार होऊन, जडजीवांचा उद्धार करावयास तूं समर्थ होशील.' त्याप्रमाणें निर्गुणपुर ( निगडी ) येथें त्यांचा घोडा ओढ्यांत खडकावर एकाएकीं पाय रुतून अडला, त्यावेळीं व्यासांनीं सांगितलेली खूण पटून, रंगनाथांनीं तेथेंच कायमचा मुक्काम केला. त्यांनीं आपल्या घोड्याचें नांव 'मनोहर' ठेविलें होतें. कविवर्य विठोबाअण्णा दप्तरदार यांनीं, आपल्या सुश्लोक लाघवांत ह्या घोड्याचें वर्णन येणेंप्रमाणें केलें आहे:—

'शूरकुलालंकारं विबुधाताहृतपदांबुजद्वितयम् ।
निगडीकृतसंस्थानं कविनाथं रंगनाथमविलंबे ॥ १ ॥
यस्य मनोहरनामा हरि: सहायो नरोऽस्य नीलांग: ।
अरिवर्गं विजितवतो द्रुततरसद्गतिद: कोनु विवदेत ॥ २ ॥

ह्याप्रमाणें बाह्यत्वें ह्या प्रत्यक्ष वस्तु देऊन व्यासांनीं रंगनाथांस ही पारमार्थिक खूण दिली होती, हें चतुर तज्ज्ञ वाचकांच्या लक्ष्यांत येईलच. रंगनाथांचा योगाभ्यास अद्यापि पूर्ण व्हावयाचा होता, आणि त्यांस परंपरागत ज्ञान प्राप्त व्हावयाचें होतें. परंतु तें प्राप्त होण्यापूर्वीं त्यांची तयारी असणें जरूर होतें. ह्मणून व्यासांनीं ही खूण ह्मणजे ज्या ठिकाणीं ( मनोभूमीवर ) पूर्वोक्त अश्वरूप आत्मा प्रजापति रुतून[1] राहील तेथेंच तूं रहा, अशी गुप्त खूण दिली होती. त्याप्रमाणें खूण पटल्याबरोबर रंगनाथ हे अर्थात् ( निर्गुणपुर ) निगडी येथें, गीतेंत सांगितल्याप्रमाणें ' निस्त्रै-गुण्य ' होऊन कायमची वस्ती करून राहिले; व पुढें इतकी पूर्तता झाली तेव्हां त्यांस श्रीक्षेत्र पंढरपुर येथें कीर्तनप्रसंगीं मातापितरांची गांठ पडली. ( पंढरपुर येथेंच मातापितरांची गांठ पडली हा सर्व संबंध लक्ष्यांत ठेवण्यासारखा आहे. ) पुढें, ईश ( दत्त ) त्यांजपासून शिष्य सदानंद, त्यांपासून रामानंद, त्यांपासून अम-लानंद, त्यांपासून पूर्णानंद व त्यांपासून रंगनाथांचें वडील निजानंद या परंपरेनें आलेला निजानंद रंगनाथांस प्राप्त झाला. ( निजानंद हा योग्यावांचून इतरांस प्राप्त होत नाहीं. )

( सोहिरोबाकृत पारमार्थिक पदसंग्रह भाग १ ला, पृष्ठ ८६–८७ टीपा )

रंगनाथांस लहानपणापासून शिपाईगिरीचा पेशा फार आवडत असे, व शेवटपर्यंत त्यांचा थाट एखाद्या सरदारासारखा असे. या थाटामुळेंच, शिवाजी महाराजांस त्यांच्या साधुत्वासंबंधानें संशय उत्पन्न झाला होता व समर्थांच्या सूचनेवरून तो रंगनाथांनीं कसा दूर केला हें या चरित्राच्या आरंभीं सांगितलेंच आहे. रामदास-स्वामी रंगनाथांस ' रंगाबा ' ह्मणत असत. रंगनाथांस कोठेंही जावयाचें असलें तरी,

---

१ ' रुतला ' हा शब्द अशा ठिकाणीं कोणत्या अर्थानें घ्यावयाचा हें सोहिरो-बांच्या पुढील उक्तीवरून वाचकांच्या लक्षांत येईल:—

' सोहिरा तुझ्या नामेंचि रुतला । प्रेमयुक्त तेथेंचि गुंतला ।
परमामृत सेवुनिया शांत झाला । ज्याचे दृष्टीं भव हा विकंतला रे ॥ '

आपल्या ' निळ्या ' घोड्यावर बसून, कमरेला तलवार व बरोबर लंगोटबंद शिष्य-समुदाय, अशा थाटानें ते जात असत. शिवाजी महाराज प्रथम त्यांच्या भेटीस गेले, त्यावेळीं ते भगवीं वस्त्रें परिधान करून पलंगावर पहुडले होते. ' तंव स्वामींनीं भोजन सारून । तांबुल भक्षिला असे जाण । मंचकावरी केलें शयन । पदसंवाहन होतसे ॥ उभयतां शिष्यिणी दोघीजणी । ' भागम्मा ' ' चंदम्मा लावण्यखाणी । पाय रगाडिती प्रीति करोनी । जन्मांतरींच्या मेदिनी अप्सरा त्या ॥ असा स्वामींचा विलक्षण थाट पाहून महाराज फार विस्मित झाले. तेव्हां, स्वामींनीं, जरी आपण हे भोग भोगतों तरी त्यांनीं आपण बद्ध झालेलों नाहीं, अशी महाराजांची खात्री करून दिली. ही आख्यायिका अशी आहे कीं, आपलें बाह्याचरण पाहून, छत्रपतींच्या मनांत विपर्यास उत्पन्न झाला आहे, हें रंगनाथांनीं अंतर्ज्ञानानें जाणलें, व त्यांस एकांतांत बोलावून नेलें. नंतर एक मोठें घंगाळ आणवून, स्वामींनीं योगबलानें त्यांत वीर्यस्खलन केलें, त्यानें सगळें घंगाळ भरून गेलें. नंतर एका काडीनें त्यांतला एक थेंब घेऊन महाराजांच्या तळहातावर ठेवला, त्याबरोबर लागलाच तेथें फोड उठला ! तेव्हां स्वामी ह्मणाले ' बाबा ! पहा. अरे ! हें ब्रह्मरेत आहे, हा प्रत्यक्ष अग्नीच होय. ह्या रेतास जिंकून आह्मी स्वाधीन करून ठेवलें आहे. पण आह्मी उर्ध्वरेते आहों, हें अज्ञजनांस कळत नाहीं. आतां चमत्कार पहा. ' असें ह्मणून स्वामींनीं पुनः तें सर्व रेत गुह्येंद्रियद्वारेंच आकर्षण करून घेतलें व हा चमत्कार पाहून छत्रपतींचा सगळा संशय दूर झाला.

---

१ हीच आख्यायिका श्रीसमर्थांसंबंधानेंही प्रसिद्ध आहे. वेणू व अक्का या दोघी स्त्रिया समर्थांच्या शिष्यिणी होत्या, हें प्रसिद्धच आहे. त्यांच्यासह समर्थ, एकदां, तंजावरास गेले असतां, तेथील राजे व्यंकोजी यांचे कारभारी रघुनाथपंत हणमंते, यांस समर्थांच्या साधुत्वासंबंधानें संशय उत्पन्न झाला. त्यावेळीं, समर्थांनीं असाच चमत्कार करून दाखवून, रघुनाथपंतांचा संशय दूर केला, अशी हकीकत हनुमंत-स्वामीकृत रामदासचरित्रांत सांगितली आहे.

हनुमंतस्वामीकृत रामदासचरित्रांत रंगनाथांसंबंधानें बरीच माहिती दिली आहे. समर्थांचे वेळीं, सज्जनगडावर रामनवमीचा मोठा उत्सव होत असे, त्यांत इतर संतांबरोबर रंगनाथांचींही कीर्तनें होत असत, त्यासंबंधानें, रामदासचरित्रांत उद्धवसुत ह्मणतातः—

ओंवी.

' यावरी रंगाबास्वामी कीर्तनासी । उभे ठाकले सद्भावेंसी ।
त्या कीर्तनाची महिमा कैसी । सांगिजे आतां ॥ १ ॥ '

यापुढें रंगनाथस्वामींचीं दोन तीन पदें देऊन, उद्धवसुत ह्मणतात:

' ऐसें रंगाबास्वामींचें कीर्तन । जालें परमसमाधान ॥
धन्य धन्य साधुसज्जन । गुण वर्णिती तयाचे ॥ १ ॥

रंगनाथ आपले वयाचे ७२ वे वर्षी शके १६०६ रक्ताक्षी संवत्सरीं मार्गशीर्ष वद्य १० भौम प्रातःकाळीं समाधिस्थ झाले; त्यासंबंधानें पुढील श्लोक प्रसिद्ध आहे:—

' शाके तर्कखशास्त्रचंद्र सुमिते रक्ताक्षिसंवत्सरे ।
मार्गे कृष्णदिशातिथौ रविदिने प्रातःसतामग्रणी ॥
श्रीकृष्णातटसन्निधौ सुसमये श्रीनिर्गुणाख्येपुरे ।
कैवल्यं गतवानकुंठित गतिःश्रीरंगनाथःसुधीः ॥ १ ॥

संप्रदाय व गुरुपरंपरा यांसंबंधानें रंगनाथांचे पुढील श्लोक प्रसिद्ध आहेत.

' श्रीविष्णूविधि अत्रि दत्त नमुनी भावें सदानंद हा ।
रामानंद तथाऽमला प्रणमुनी गंभीर ज्ञानी पहा ॥
ब्रह्मानंद अवाप्त काम सहजानंदान्वयें पूर्ण तो ।
वंदूं श्रीनिजरंग या जगनगीं दैदीप्य नित्स्वर्ण तो ॥ १ ॥
आनंदाख्यपरंपरा गुरु नमूं श्रीदत्त दीगंबरा ।
मुद्रा खेचरि सिद्ध आसन मठोर्ध्वाम्नाय हा साजिरा ॥
बाला मुख्य उपासना, गुरुमठा कल्याण हें नांव हो ।
संच्छिष्यासि सुपूज्यहंसपिठिका श्रीरंग विश्राम हो ॥ २ ॥

ही रंगनाथांची गुरुपरंपरा येणेंप्रमाणें:—

विष्णु
|
विधि
|
अत्रि
|
दत्त
|

| | | |
|---|---|---|
| सदानंद | समाधिस्थान | कृष्णातीरीं निंब येथें. |
| रामानंद | ,, | काशीस. |
| अमलानंद | ,, | पेंबरी. |
| गभीरानंद | ,, | रामेश्वर. |
| ब्रह्मानंद | ,, | पंढरपुर. |
| सहजानंद | ,, | कलबुर्ग्याजवळ. |
| पूर्णानंद | ,, | गोंडवण. |
| निजानंद | ,, | कऱ्हाड. |
| रंगनाथ | ,, | निगडी. |

प्रसिद्ध मराठी कवि श्रीधरस्वामी नाझरेकर यांचे तीर्थरूप ब्रह्मानंद हे रंगनाथस्वामींचे चुलतबंधु होते. रंगनाथांचा उल्लेख श्रीधरस्वामींनीं आपल्या ग्रंथांत, दोन ठिकाणीं केला आहे. पुढील ओंवी पहा:—

'ब्रह्मानंदस्वामींचा बंधु सत्य । नाम तयाचें श्रीरंगनाथ ॥
ज्याची कविता समस्त । अपार जन उद्धरिले' ॥ रामविजय अ. १ ला.

## रंगनाथस्वामींचा वंशवृक्ष.

राघोपंत.
- नागेश
- दत्तोपंत
  - रंगोपंत
    - रामाजीपंत
    - बोपाजी (समाधी श. १५६४)
      - यादवराव (श. १६०६)
        - मनोहर
          - काशीबा (स. १७८२)
      - रंगनाथ (श. १६०६) (ब्रह्मचारी साधु व कवि)
      - विठ्ठल ऊर्फ आत्यास्वामी (श. १६२७)
        - काशीराज (श. १६६६) (श. १७१२)
        - योगीराज (श. १६६४)
          - विठ्ठल
            - माणकेश
              - नरसिंह (श. १७६०)
                - अण्णाबोवा (श. १७८२)
                  - सखाराम (विद्यमान)
            - बोपाजी (१७३८)
              - दाजीबा
                - वामन
                  - दत्तात्रय
            - दत्तात्रय (१७१०)
              - रामचंद्र (१७७५)
                - विष्णु (१७९१)
                  - गणेश (१८१८)
                    - अनंत (विद्यमान)
    - कृष्णाजीपंत
    - दत्तात्रयपंत
      - ब्रह्माजीपंत (ब्रह्मानंद)
        - श्रीधरस्वामी (कवि) (यांचा वंश नाझरें येथें आहे.)

रंगनाथांचे विद्यमान वंशज आपलें कुलदैवत दत्त असें सांगतात व श्रीधरांचे वंशज, आपलें कुळदैवत 'विठ्ठल' असें सांगतात. रंगनाथाची रामदासस्वामींचे ठायीं फार पूज्यबुद्धि असे, हें त्यांनीं समर्थांवर लिहिलेल्या एका पदावरून व्यक्त होतें. हें पद पुढें दिलें आहे. समर्थांनीं आपल्या आचरणानें व उपदेशानें ज्या चेतनेचा संचार महाराष्ट्रांत केला, ती चेतना रंगनाथांच्या काव्यांत पदोपदीं दृष्टीस पडते. रंगनाथ-स्वामी मोठे पंडित असावे, असें त्यांच्या कवितेवरून दिसतें. त्यांचीं पदें, गीता व उपनिषदें यांतील रहस्यानें भरलेलीं आहेत. त्यांची वाणी फार प्रासादिक, संस्कृत, शुद्ध आणि अधिकारयुक्त अशी आहे. त्यांच्या पदांचें पुस्तक छापून प्रसिद्ध झालेलें आहे. याशिवाय, गुरुगीता, रामजन्म, गजेंद्रमोक्ष, निजानंदसाधनें, सुदाम-चरित्र, शुकरंभासंवाद, पंचीकरण, मिथ्यामायास्वरूप, एकाखडी ओंव्या, बद्धमोक्ष-विवरण, स्फुट पदें व अष्टकें इतकी त्यांची कविता ठाणें येथील 'महाराष्ट्रकवि' मासिकपुस्तकांत प्रसिद्ध झाली आहे. याखेरीज, बृहद्वाक्यवृत्ति हा ग्रंथ स्वामींनीं लिहिला, असें सांगतात, पण तो उपलब्ध नाहीं. दुसरे, भानुदासचरित्र व योग-वासिष्ठसार हे स्वामींचे दोन ग्रंथ प्रसिद्ध आहेत. परंतु योग्यवासिष्ठसाराच्या प्रत्येक प्रकरणाच्या अखेरीस व ग्रंथाच्या शेवटीं निगडीकर व मोगरेकर ( पैठणकर ) या दोन्ही रंगनाथांचीं नांवें असून, प्रत्येकाची गुरुपरंपराही दिलेली आहे. पुढील ओंव्या पहा:—

'सहजपूर्ण निजरंगाचा । ग्रंथ बोलेन रसाळ वाचा ।
जो संवाद श्रीवसिष्ठाचा । परब्रह्मेसी ॥ ३६ ॥
सहजपूर्ण निजरंगास । सर्वाविषयीं होये उदास ।
तेंचि वैराग्य सावकाश । विषयलेश नाभिलाषिजे ॥ ११३३ ॥
वैराग्य प्रकरण.

सहेजीं सहज पूर्ण तेथ । निजानंदें जो डुल्लत ।
रंगूनियां साधिला अर्थ । कृपे वसिष्ठ रघुनाथें ॥ ४६४ ॥
जगन्मिथ्या प्रकरण.

सहजीं सहज पूर्णानंदू । सर्वभावें सेवोनि एकांतु ।
निजानंदें रंगूनि स्वार्थू । निरालसपणें जोडिला ॥ ५४६ ॥

सद्गुरूचा ह्मणे रंगनाथु । सर्वभावें सेवूनि एकांतु ।
मनोनाश करावा हा कलितार्थु । साधावा स्वार्थु आलस्यत्यागें ॥
मनोलय प्रकरण.

ग्रंथाच्या शेवटीं कांहीं प्रतींत मोगरेकर रंगनाथांची व कांहीं प्रतींत निगडीकरांची गुरुपरंपरा आढळते. मोगरेकर रंगानाथांनीं सदर ग्रंथांत दिलेली आपली गुरुपरंपरा, वास्तव्यस्थान व ग्रंथसमाप्तीचा काल हीं त्यांच्याच चित्सदानंदलहरी ग्रंथाच्या शेवटीं दिलेल्या त्याच माहितीशीं शब्दशः जुळतात. दोन्ही ग्रंथांचा समाप्तिशक एकच आहे. भाषेच्या दृष्टीनें पाहतां, हा योगवासिष्ठसार ग्रंथ मोगरेकर रंगनाथांचा असावा असें वाटतें. ग्रंथाच्या आरंभींच्या कांहीं ओंव्या तीन यमकी असून, पुढील सगळ्या ओंव्या चार यमकी आहेत. एकंदरींत, या ग्रंथाचें कर्तृत्व कोणाकडे द्यावें, हा मोठा विचारणीय प्रश्न आहे. योगवासिष्ठसाराच्या प्रस्तावनेंत वे. शा. सं. गोविंद नारायण शास्त्री दातार यांनीं, या प्रश्नाचें उत्तर येणेंप्रमाणें दिलें आहे. " रामदासपंचायतनांतील निगडीकर रंगनाथ व मोगरेकर रंगनाथ असे रंगनाथ या नांवानें दोन कवि प्रसिद्ध आहेत. त्यांपैकीं कोणत्या रंगनाथानें ही टीका केली हें ठरविणें बरेंच कठिण आहे. कारण प्रस्तुत ग्रंथ दोघांच्याही नांवावर प्रसिद्ध आहे. मुख्य प्रतिपाद्य विषय दोन्ही ग्रंथांतील अक्षरशः एकच आहे. क्वचित् पाठभेदही आहेत. फक्त स्वनामनिर्देश जेथें झाला व गुरुपरंपरेचा संबंध आला तेथील ओंव्या प्रत्येकाच्या निराळ्या आहेत. प्रत्येक प्रकरणाच्या आद्यंतीं हा फरक स्पष्ट दिसून येतो. दोघेही वेदांतमतानुयायीच असल्यामुळें प्रत्येकाच्या ग्रंथाच्या अंतरंगावरून ग्रंथकर्तृत्व कोणाकडे येईल हें ठरविणें दुरापास्त आहे. तेव्हां जो काय विचार करावयाचा, तो बाह्यांगावरून करावयाचा. दोन्ही कवित्वा-संबंधानें प्रसिद्ध आहेत, व उभयतांचें काव्यही आज उपलब्ध आहे. त्यांतील भाषा-सरणीवरून विचार केला असतां, या ग्रंथाचें कर्तृत्व मोगरेकर रंगनाथांकडे जाऊं पहातें. मोगरेकर रंगनाथांची चित्सदानंदलहरी या नांवाची श्रीमद्भगवद्गीतेवरील टीका उपलब्ध आहे. या टीकेंतील भाषासरणी व प्रस्तुत ग्रंथांतील सरणी या अगदीं सारख्या आहेत. निगडीकरांचें ओंवीबद्ध काव्यं पहाण्यांत नाहीं. तथापि त्यांचीं पद्यें

१ रा. देव यांची आवृत्ति ( इ. स. १९०५ ). २ हल्लीं निगडीकरांच्या ओंव्या प्रसिद्ध झाल्या असून, त्यांची भाषा योगवासिष्ठाच्या भाषेपेक्षां सोपी आहे.

व श्लोक यांवरून पाहतां प्रस्तुत योगवासिष्ठाची भाषा त्यांची दिसत नाहीं. असा तर्क आहे कीं, मोगरेकर रंगनाथकृत योगवासिष्ठ निगडी येथील मठांत वाचण्याचा तेथील शिष्यवर्गानें ज्या वेळीं उपक्रम केला, त्यावेळीं, तें आपल्या गुरूचेंच आहे असें भासविण्याकरितां त्यांनीं ओंव्या बदलण्याचा खटाटोप केला असावा, या शिवाय दुसरें योग्य कारण दिसत नाहीं. एकाच ग्रंथाचें कर्तृत्व निरनिराळ्या दोन एकाच नांवाच्या व्यक्तींकडे असावें, ही फार आश्चर्याची गोष्ट आहे. असा प्रकार क्वचितच पाहण्यांत येईल. ”

वरील उताऱ्यांत रा. दातारशास्त्र्यांनीं लढविलेला तर्क बराच सयुक्तिक दिसतो. शिवाय, या तर्कास बळकटी आणणारें एक प्रमाण मला आढळलें आहे, तें हें कीं, ‘ चित्सदानंदलहरी ’ ग्रंथाच्या शेवटीं, मोगरेकर रंगनाथांनीं, आपण ‘ योगवासिष्ठ ’ लिहिल्याचा स्पष्ट उल्लेख केला आहे. पुढील ओंवी पहाः—

‘ हें वाशिष्ठसाराचें निरूपण । जालें असे पैं संपूर्ण ।
त्याउपरी ग्रंथराज निर्माण । गीतानामें संपूर्ण जाला असे ॥ ”

आतां, एकाच वर्षांत वासिष्ठसार व चित्सदानंदलहरी हे दोन प्रचंड ग्रंथ मोगरेकरांनीं कसे लिहिले असतील, याचें आश्चर्य वाटतें. वासिष्ठसाराच्या ओंव्या ६,१३७ असून, चित्सदानंदलहरीच्या १२,१६६ आहेत ! आजपर्यंत, रंगनाथ पैठणकर व रंगनाथ निगडीकर हे एकच रंगनाथ समजले जात असत. खुद्द काव्यसंग्रहकर्त्यांसही, त्यांच्या वृत्तासंबंधानें माहिती नव्हती; व ह्मणूनच पंतांच्या सन्मणिमालेंतील या लेखाच्या आरंभीं दिलेल्या आर्येवरील टीपेंत, चित्सदानंदलहरी या गीतेवरील टीकेचें कर्तृत्व त्यांनीं निगडीकर रंगनाथांकडे दिलें आहे. वरील कवितेशिवाय रंगनाथस्वामींची आणखीही बरीच कविता असावी असा निगडीकरांचा तर्क आहे, परंतु दोन तीन अग्निप्रळयांमुळें निगडी येथील मठांतील बरेच कागदपत्र जळाले, त्यांत ही सर्व कविता जळून गेली.

आतां, रंगनाथांच्या कवितेंतील कांहीं वेंचे येथें देऊन, हा चरित्रलेख संपवितों.

---

१ ह्या बदललेल्या ओंव्या, त्यांच्या अर्थहीन व ओढाताणीच्या रचनेमुळें तात्काळ ओळखितां येतात. तथापि कित्येक ओंव्यांची रचना व अर्थ हीं दोन्ही सरळ आहेत.

२ काव्यसंग्रह, मोरोपंती स्फुट प्रकरणें, भाग १ ला, पृष्ठ १२, ११ वी टीप पहा.

रंगनाथांनीं गुरुभक्तीचा महिमा वर्णिला आहे:—

ओंव्या.

'गुरुकृपाप्रसादें । निजात्मदर्शन स्वानंदें ।
पावोनियां पूर्णपदें । पेलती दोंदें मुक्तीसी ॥ ६२ ॥
आब्रह्मस्तंभपर्यंत । स्थावरजंगमादि पंचभूतें ।
सच्चिदानंदद्वय अव्यक्त । अच्युतानंत सद्गुरु ॥ ६३ ॥
परात्परतर ध्यान । नित्यानंद सनातन ।
हृदयीं सिंहासनीं बैसवून । चित्तीं चिंतन करावें ॥ ६४ ॥
अगोचर अगम्य सर्वगत । नामरूप विवर्जित ।
निःशब्द जाण निभ्रांत । ब्रह्म सदोदित पावती ॥ ६५ ॥
अंगुष्ठमात्र पुरुष । हृदयीं ध्यातां स्वप्रकाश ।
तेथें स्फुरती भाव विशेष । निर्विशेष पार्वती ॥ ६६ ॥
ऐसें ध्यान करितां नित्य । तादृश होय सत्य सत्य ।
कीटकी भृंगीचे निमित्य । तद्रूप झाली ते जैशी ॥ ६७ ॥
अवलोकितां तयाप्रति । सर्वसंग विनिर्मुक्ति ।
एकाकी निस्पृहता शांति । आत्मस्थिति रहावें ॥ ६८ ॥
लौकिक कर्म तें हीन । तेथें कैचें आत्मज्ञान ।
गुरुभक्तासी समाधान । पुण्यपावन ऐकतां ॥ ७२ ॥

गुरुगीता.

रंगनाथस्वामीच्या ओंव्या, एकनाथी ओंव्यांप्रमाणें साडेतीन यमकांच्या आहेत. रंगनाथस्वामींचे श्लोकही सरस आहेत; व त्यांच्या काव्यांत बऱ्याच निरनिराळ्या वृत्तांचा उपयोग केलेला आढळतो. वसिष्ठांच्या सांगण्यावरून दशरथ राजा आपल्या तिन्ही राण्यास काय काय डोहळे होतात, हें विचारण्यासाठीं, त्यांच्या मंदिरांत गेला असतां, त्यांनीं जीं उत्तरें दिलीं, ती कथा येणेंप्रमाणें:—

श्लोक.

"शोभे सगर्भ बहु कैकयि राजकांता । राजा पुसे, प्रिय तुतें वद सांडिं चिंता ' ॥
'माझेंचि राज्य इतरांसि वनासि धाडा । हा आवडे बहुत राजनिधी पवाडा ॥ ३७ ॥

वाटे वसिष्ठसह कष्टहि भूपतीला । यावीण आणिक दुजें न धरीं मतीला ॥
भेदे उरीं वचन लक्षणपूर्ण भाला । 'हा ! हा! ' वदे 'कवण येउनि लाभ झाला' ॥ ३८ ॥
गेला वसिष्ठसह जेथ असे सुमित्रा । जे पीयुषापरिस गोड शशांकवक्त्रा ॥
धांवे धरेवरि समर्पित सर्व गात्रा । आलिंगिली दशरथें प्रियपद्मनेत्रा ॥ ३९ ॥
तोषोनियां पुसत तीस ' अवो ! सुमित्रे ! । संतुष्ट मीं तुज, अभीष्ट वदें पवित्रे ॥
हांसे, वदे ' वडिल सर्वहि मी तयांची । होईन दासि- पदसेवन निश्चयाची ॥ ४० ॥
प्राणापरीस मज वाटत गोड सेवा । याहून आन नलगे प्रभु देवदेवा ॥
वेदांतशास्त्र मुखसंमत जे प्रतिष्ठा । ते पाळिजे अतिसुखावह एकनिष्ठा ॥ ४१ ॥
वंदूनि पाय मग मौन धरूनि राहे । संतुष्टचित्त पदपंकज लक्षिताहे ॥
ठेवोनियां अभयहस्त शिरीं सतीतें । देती अशीर्वचन इष्ट वसिष्ठ तीतें ॥ ४२ ॥
विचित्रें पवित्रें अशीं ब्रह्मपुत्रें । ऋषीराजयें लक्षिलीं पद्मनेत्रें ॥
ह्मणे ' ईश्वरी आकळे केविं माया । जिणें लाविलें विश्व काळक्रमा या ॥ ४३ ॥
धरुनि कर करें हो चालती सत्वरें हो । तंव अभिनव लीला दाविली ईश्वरें हो ।
नृपति दशरथाची ज्येष्ठ कांता मृगाक्षी । रघुवर उदरीं जो, तोचि बाहीर लक्षी ॥ ४४ ॥
न साहे कौसल्ये सदन अथवा मंचक मनीं । सुवस्त्रापुष्पाचे निकर उपभोगासि नमनीं ॥
करी निद्रा जेथें जनपद नसे, पादपतळीं । धरी मुद्रा मौनी हृदयकमळीं राम कवळी ॥ ४५ ॥
नृपाळें ते काळीं अतिनिकट जाऊनि नयनीं । विलोकी तो जाया अति सुखभरें भूमिशयनीं ॥
ह्मणे 'वो कौसल्ये, प्रिय परम उद्गार मज दे ' । निरीक्षी भूपाळा परि वचन कांहींच न वदे ४६
अत्यादरें धरुनि हस्तक हस्तकीं हो । लावोनियां विमल मस्तक मस्तकीं हो ॥
बोले ' प्रिये न वदसीच असोनि जागी । त्यागीन मी सकळ वैभव तूजलागीं ॥ ४७ ॥

कौसल्येचा हेतु रामीं बुडाला । ' मी ' ' माझें ' हा भाव सर्व उडाला ॥
अंतर्बाह्यीं दाटला रामराणा । तर्केना जो वेदशास्त्रां पुराणां ॥ ४८ ॥
' कैंची कांता कांत मिथ्या उपाधी । राया वायां कां तुतें आधि बाधी ? ॥
मारी वैरी काम लोभादि भारी । विद्वत्संगें आपुलें रूप सारी ॥ ४९ ॥
कर्णीं वाणी ऐकतां लोकपाळें । मानी ऐसें मांडिलें कां कपाळें ? ॥
मोठी झाली भूतबाधा प्रियेतें । कैसा हा हो मानवी धर्म ईतें ॥ ५० ॥
वदे राय ' मी पातलों कोण कार्या ? । पुसें डोहळे प्रीय मानूनि भार्या ॥
अभिप्राय तो दूरि टाकूनि मागें । वृथा कां कथा बोलसी या विरागें ? ॥५१॥

तुझें लग्न तें रावणें विघ्न केलें । असो, तेंचि ओघासि आलें, भुकेलें ॥
पुढें काय होईल ? चर्या कळेना । मतिभ्रंश मातें तुझा आकळेना ॥ ५२ ॥
आकर्णितां रावणमात कर्णीं । यथाक्रमें राघवकीर्ति वर्णी ॥
' आला मुनी कौशिक पुण्यखाणी । ज्या वानिती देव मुनी पुराणीं ॥ ५३ ॥
द्विजां दुर्बळांच्या गृहीं दुग्ध नाहीं । तदां आणिली धेनु मोल्येंचि पाहीं ॥
अकस्मात ते कामधेनूच झाली । गृहा क्षीरसिंधूच घेवोनि आली ॥ ५४ ॥
प्रसंगें तसा विप्र कौशीक आला । करूं दास्यभावा अती शीघ्र चाला ॥
पुढें भासती कार्यसंभार नाना । ऋषी वाल्मिकें गाइला जो तनाना ॥ ५५ ॥
धांवा सवेग शरकार्मुक शीघ्र आणा । संतोषवूं ऋषिगणां सकळांसि जाणा ॥
सत्कीर्ति शौर्य निजभूषण राजयाचें । यावीण तें धिक जिणें सहसा तयाचें ॥ ५६ ॥
स्पर्शे सुरेंद्र कपटें वधु गौतमाची । झाली शिळा जडतनू निबिडा तमाची ॥
ते उद्धरूं पदरजें, स्वपदासि जाया । होईल योग्य ऋषिराजपदें भजाया ॥ ५७ ॥ ।
अमित्राचा बंधू शरण इतरां एकचि गती । करूं राजा लंके बिभिषण, वदों आणिक किती ? ।
सखा तो प्राणाचा अनुज विजयी साह्य मजला। किती कैसें कोणी कपिकटक नाहीं समजला५८
स्थापूं सुरां निजपदीं, असुरांसि दंडूं । पाषांड बंड अतिलंड कुमत्त खंडूं ॥
सत्कर्म धर्म हरिभक्ति विरक्ति जोडूं । संमोहशोक अविवेकसमूह तोडूं ॥५९॥
सत्यासि छत्र धरवूं दुरितासि जाळूं । गोब्राह्मणा विनत होऊनि पूर्ण पाळूं ॥
दीनें अनाथ गतिहीन तयां कृपाळू । देऊनि अन्नधन कांचन आर्ति टाळूं॥ ६०॥
राजा वदे ग्वळते वधु ईस फांटा । आली असेल विवसीच अघात मोठा ॥
आतां उपाय मज काय ?' पुसे वसिष्ठा । त्या लागली परमपावन पूर्ण काष्ठा ६२
आक्रंदतां नृप, गुरू उघडोनि डोळे । डोले सुखें 'सुदिन आजि विशेष' बोले॥
' राया तुझें परम भाग्य अतर्क्य पाहीं । ब्रह्मादि देव निगमाप्रति गम्य नाहीं ६५
साक्षात्परब्रह्म मुसावलें कीं । पतिव्रतेलागिं ठसावलें कीं ॥
समाधि शेजेसि विराजताहे । लोकत्रयीं दुंदुभि वाजताहे ॥ ६६ ॥
येथें नसेचि विवसी अणि भूत राया । भूभार वारुनि जगत्रय उद्धराया ॥
नामेंकरूनि भवसिंधु जनां तराया । आला परेश तवसंकट निस्तराया ॥७१ ॥

रामजन्म—अध्याय २

रंगनाथांचे श्लोक, मुक्तेश्वरी रामायणांतल्या श्लोकांसारखे दिसतात. रंगनाथांचें हें रामजन्म काव्य बरेंच मोठें असून, वाचण्यासारखें आहे.

द्वारकेचें व श्रीकृष्णाचें वर्णनः—

ओंव्या

' रत्नखचित सुवर्णशिखरें । वरी नाचती हंस मयोरें ॥
कोकिळा कूजती पंचमस्वरें । गगनीं गोपुरें झळकती ॥ ३३ ॥
दिव्य पताका फडकती । गुढिया तोरणें शोभती ।
वेद बंदीजन गर्जती । वाखाणिती कृष्णमहिमा ॥ ३४ ॥
चित्रविचित्र मंडप । ठायीं ठायीं रत्नदीप ।
रविकिरणां देती वोप । तेज अमूप प्रकाशें ॥ ३५ ॥
कुंकुमकेशरचंदन सडे । परिमळ उधळती चहूंकडे ।
गंधर्वगायन इडें पाडें । सुस्वर पवाडे गर्जती ॥ ३६ ॥
नाना वाद्यांचिये ध्वनी । अमर बैसून विमानीं ।
वरुषताती दिव्य सुमनीं । घोष गगनीं न समाये ॥ ३७ ॥
वृक्ष लविन्नले अमृतफळीं । सरोवरें भरलीं शीतळ जळीं ।
वसंत फिरे महीमंडळीं । सुवर्णकमळीं सुगंध ॥ ३८ ॥
श्रीद्वारकेचें वर्णन । करितां शिणला चतुरानन ।
तेथ मंदमति हीन दीन । काय महिमान अनुवादे ? ॥ ३९ ॥
नगर दृष्टीं पाहतां पाहीं । सुदामा बुडाला स्वानंदडोहीं ।
कौतुक पहावें ऐसा कांहीं । उरला नाहीं संशय ॥ ४० ॥
परब्रह्म पूर्णावतार । राधारमण शारङ्गधर ।
मनमोहन यादववीर । सगुण सुंदर देखिला ॥ ४३ ॥
अनंत ब्रह्मांडनायक । वसुदेवकुलतिलक ।
शरणागत प्रतिपालक । निजसुखदायक श्रीहरी ॥ ४४ ॥
किरीट कुंडलें वनमाळा । पीतांबरधारी घनसांवळा ।
अनंत विजेचा मेळा झाला । एकवळा हरिरूपीं ॥ ४५ ॥
रखुमाई आणि राई । चामरें ढाळिती दोहीं बाहीं ।
सोळासहस्र लवलाहीं । सेवेसि पाहीं तिष्ठती ॥ ४६ ॥
नारदतुंबर विणे वाहती । विष्णुपदें गीतीं गाती ।
सनकादिक ध्याती । कृष्णमूर्ति सर्वदां ॥ ४७ ॥

सुदामचरित्र

रंगनाथ देवास अनुलक्षून, देहासंबंधानें ह्मणतात:-

पद

अवघा तूंचि तूं, मी नाहीं ॥ ध्रु० ॥
लहरी तरंग उदधि । तैसी ही जीव उपाधि । आत्मा अखंड निरवधि ॥ १ ॥
सांडुनि देह ममता । तवपदिं नित्य रमतां । मग कैंची विषमता ॥ २ ॥
आत्मत्वें पाहतां देवा। श्रुति वदति एकमेवा। **निजरंगीं रंग** कैंचा दावा॥ ३ ॥

सकृद्दर्शनीं विलक्षण दिसणारें, पण वेदांतज्ञानानें भरलेलें पुढील पद पहा:-

पद

तो एक निजयोगी निजयोगी । परदारा स्वयें भोगी ॥ ध्रु० ॥
निशंक मात्रागमनीं । भक्षी अभक्ष्य शंका न मनीं ॥ १ ॥
गोवध घडला ज्याला । नित्य सुरापान जो प्याला ! ॥ २ ॥
**निजरंगीं रंगेला** । अपुले उगमीं संगम जाला ॥ ३ ॥ तो० ॥

ढोंगी लोकांसंबंधानें रंगनाथांचें मत :—

पद.

बापा तें नोहे तें नोहे । व्यर्थचि श्रमि कां व्हावें ॥ ध्रु० ॥
साधुनि आसन मुद्रा । शद्बज्ञाना बोलति क्षुद्रा ॥ १ ॥
नवरस करूनि कवि । पोटासाठीं सोंगें दावी ॥ २ ॥
ह्मणती काळें पिवळें । दाबुनि धरिती बळकट डोळे ॥ ३ ॥
बळेंचि शिष्य करिती । विशाळ यंत्रांतें पसरिती ॥ ४ ॥
व्यर्थचि टिळाटोपी । समाधि ह्मणुनी जाती झोंपीं ॥ ५ ॥
**निजरंगीं रंगलें** । रंगुनि **रंग**पणा मावळलें ॥ ६ ॥

रामदासांवर रंगनाथांनीं लिहिलेलें पद:-

रामदास चतुराक्षरि मंत्र जप वारंवार ।
दुस्तर भवभयसागरतारक सच्चित्सुखसार ॥ ध्रु० ॥
रामदास द्वय नामीं अखंड गोडी शर्करा ।
राहटी परिमळ भुवनीं हातीं कर्पुरा ॥
राजस वर्तुळ त्यापरी त्या जीवनाचि गारा ।
राजाधिराज अवतरलासे या जगदुद्धारा ॥ १ ॥

मनुष्यरूपें विलसे परि हा परिपूर्णकाम ।
मकराकृति कुंडलें पाहतां स्वतःसिद्ध हेम ॥
मंडन संतसभेचें साधक जनां विश्राम ।
मस्तकमणि हा शतकोटीचा निजगुजविश्राम ॥ २ ॥
दास तो उदास सेवुनी परमामृतकंदा ।
दाता स्वात्मसुखाचा निरखुनि विषयाचा धंदा ॥
दानवपट्कुळवैरि मर्दुनी तारिति मतिमंदा ।
दाराद्रव्य त्यजुनि सत्वर सद्भावें वंदा ॥ ३ ॥
सद्गुरुराज विराजित करुनी सज्जनगडिं वास ।
सत्यसनातन श्रीगुरुसमर्थ मुनिमानसहंस ॥
सद्भावेंसी शरण रिघावें धरूनियां कास ।
सहज पूर्ण **निजरंगिं रंगलों** तारक विश्वास ॥ ४ ॥

या पदांतील प्रत्येक चरणाचीं आरंभींचीं व शेवटचीं अक्षरें घेतलीं असतां ' रामदास ' हें नांव निष्पन्न होतें.

तुकारामबुवा सदेह वैकुंठास गेले, अशी आख्यायिका आहे, पण हल्लींच्या विद्वानांचा तिजवर विश्वास नाहीं. तरी त्यांनीं, तुकारामबुवांशीं समकालीन असणाऱ्या रंगनाथांच्या पुढील पदाचा अवश्य विचार करावा.

पद

जडदेहा घेउनि वरणी गेला ती ऐका वाणी ॥ ध्रु० ॥
घट फोडुनि जनकादिक ते अनुभविते झाले माती ।
हा नोहे तुकया तैसा घट राखुनि धरिला चित्तीं ॥ १ ॥
इतर ते वारुनि दुग्धा परिणामक घेती पाणी ।
हा नोहे तुकया तैसा पय राखुनि चाखी लोणी ॥ २ ॥
इतरें तें फोडुनि कोहं, मग चाखियला तो सोहं ।
हा नोहे तुकया तैसा अच्छेद्य पचविला कोहं ॥ ३ ॥
इतरें त्या मिश्र पुटातें, देउनियां जड टाकियलें ।
तो नोहे तुकया तैसा, परिसानें हेमचि केलें ॥ ४ ॥
जडबुद्धि अहं या देहा, निजस्वरुपीं वाहुनि गेला ।
**निजरंगीं** रंग पहाया रंगानें निश्चय केला ॥ ५ ॥

या बोला साराचि कथितों । दिसणें तें हाचि जन्म ॥
अदृश्य मरण योग्यांचें । निजरंगीं अघटित धर्म ॥ ६ ॥

यावरून योग्यांच्या मृत्युसंबंधाचें गूढ उकलितां येईल तर पहावें.

रंगनाथांचा पारमार्थिक निश्चय :—

पद.

आतां वसुधातळहीं बुडो । वरि हें नभमंडळहीं पडो ॥ ध्रु० ॥
निश्चय कीं निजराम स्मरावा हा सहसा न खुडो ॥ १ ॥
शेवटील पाळी येणें गोड करूं समूळीं ।
आन उपाय नसे या काळीं ध्यावा वनमाळी ॥ २॥
जन ह्मणो वेडें परि मी न पाहें त्याच्याकडे ।
साधन तें साधावें ऐसें, परम पद जोडे ॥ ३ ॥
असेल प्रारब्धीं तरि हें न चुके कर्म कधीं ।
मृगजलास्तव कृशी होणें विषम हे बुद्धि ॥ ४ ॥
उरलें असेल करणें, भजनीं लावावीं करणें ।
लक्ष चौऱ्यांशीं जन्माचें येथें संकट निस्तरणें ॥ ५ ॥
सहजपूर्णनिजरंगा मजवरि करिं गा अनुकंपा ।
पूर्ण कृपे अवलोकुनियां मज पावन पथ सोपा ॥ ६ ॥

वाचकहो! असा निश्चय करण्याचा अधिकार आमचा आहे काय ?

धर्मबाह्य आचरण करणाऱ्या लोकांवर रंगनाथस्वामीचा केवढा कटाक्ष होता पहा:—

पद[1] ( दादरा )

' गृहा नका जाऊं त्याचें तोंड नका पाहूं ॥
भेटी झाल्या सचैल्य स्नानावीण नका राहूं ॥ धृ० ॥
वेदबाह्य क्रियानष्ट परपीडक अंगें । संतुष्ट विषयभोगें ।
निर्दय काळ कामत असत्संगें ॥ गृहा० ॥ १ ॥
निजानंदीं रंगे चित्त, रंगेंचिना ज्याचें । तोंड पाहूं नका त्याचें ॥
सिद्धांत वर्णायासी भय काय त्याचे बाचें ॥ २ ॥

---

१ हें पद बरेंच अपूर्ण असाव, असें वाटतें.

# तुकारामबाबा वर्दे.

' जयन्ति ते सुकृतिनो रससिद्धाः कवीश्वराः ।
नास्ति तेषां यशः काये जरामरणजं भयम् ॥

भर्तृहरी.

प्रापंचिक अडचणीमुळें संसारसुखासंबंधानें औदासीन्य व निराशा उत्पन्न झाल्यावर, परमार्थ साधण्याचा निश्चय केलेले साधुसंत पुष्कळ दृष्टीस पडतात. आणि तसल्या व्यक्तींत जरी मूळचाच ईश्वरी अंश आहे असें मानिलें, तरी प्रापंचिक दुःखें त्यांस अधिक वैतागवून परमार्थाकडे वळविण्यास कारणीभूत होतात, असें ह्मटल्यास मोठेंसें विसंगत दिसत नाहीं. परंतु गौतमबुद्ध, गोपीचंद, भर्तृहरी व अमृतराय इत्यादि प्रपंचसुखसंपन्न मनुष्यांस त्या सुखाचा तिटकारा येणें व त्यांच्या मनानें परमार्थाकडे धांव घेणें, हें मात्र अमळ चमत्कारिक दिसतें व त्यामुळें ' सुख पाहतां जवापाडें । दुःख पर्वताएवढें ॥ या तुकारामबुवांच्या उक्तीचा खरेपणा स्पष्टपणें दिसून येतो. संसारांतील अनेक अडचणीमुळें उद्विग्नचित्त झालेल्या माणसांचें लक्ष परमार्थाकडे वळणें हें शक्य व साहजिक आहे, परंतु, ज्यांस प्रपंच-सुखाची सर्वप्रकारें अनुकूलता आहे, अशा लोकांनीं त्या सुखास विमुख होऊन, परमार्थसुखाच्या आशेनें, आपले देह कष्टविण्यास प्रवृत्त होणें हें असामान्य ह्मणजे कारण नसतां होणाऱ्या कार्यासारखें दिसतें, व त्यामुळें अशा लोकांचीं चरित्रें सामान्य जनांस मोठीं आश्चर्यकारक होत असतात. अशा असामान्य पुरुषांच्या चरित्रमालिकेंत ओंवण्यास योग्य असें तुकारामबाबा वर्दे यांचें चरित्र आहे, तें संक्षेपरूपानें येथें देतों.

गोवें प्रांतांत गोमांचल तीर्थापासून चार मैलांवर, जुवा या नांवाचें एक लहानसें बेट आहे; तेथें अमृतराव वर्दे या नांवाचे एक सारस्वत ब्राह्मण गृहस्थ रहात असत. त्यांचें कुटुंब पाहल्यापासून फार मोठें असून खाऊनपिऊनही चांगलें सुखी होतें. शेतवाडी, जमीनजुमला इत्यादि प्रपंचास आवश्यक असणाऱ्या अनेक साधनांची त्यांस चांगली अनुकूलता होती. याप्रमाणें अमृतरावजींची स्थिति जरी इतर प्रकारें चांगली होती तरी पोटीं पुत्रसंतति नसल्यामुळें त्यांस व त्यांच्या कुटुंबांतील इतर

माणसांस एकप्रकारची उदासीनता वाटत असे. याप्रमाणें वरींच वर्षे गेल्यावर, अमृतरावजींची कुलदेवता श्रीशांतादुर्गा हिच्या प्रसादानें शके १४९३, इसवी सन १५७१ या वर्षी, त्यांस एक पुत्ररत्न झालें. अमृतरावजींनीं पुत्राचें नांव ' तुकाराम ' असें ठेविलें. याच वेळेच्या सुमारास महाराष्ट्रांत अनेक साधु पुरुष निर्माण झाले होते व त्यांपैकीं तुकारामबुवा देहूकर यांची कीर्ति सर्वत्र पसरत चालली होती, यामुळें, आपल्याही पुत्राचें नांव ' तुकाराम ' ठेवावें, अशी अमृतरावजींस इच्छा होणें साहजिक होतें. असो. हेच ' तुकारामबाबा वर्दे ' या चरित्राचे नायक होत. गोंवें प्रांतांतील हिंदु लोकांच्या रिवाजाप्रमाणें थोरपणाचें उपपद जें ' बाबा ' तें त्यांच्या नांवापुढें लावून लोक त्यांस ' तुकारामबाबा ' या नांवानें संबोधित असत. तुकारामबाबांचा स्वभाव बाळपणापासून सात्विकवृत्तिप्रधान असून आईबापांचे सद्गुण पूर्णपणें त्यांच्यांत प्रतिबिंबित झाले होते. त्या काळाच्या मानानें बाबांचें मराठी व संस्कृत अध्ययन बरेंच होऊन, शिवाय थोडेंसें वेदाध्ययनही झालें होतें. लहानपणापासूनच तुकारामबाबांची चित्तवृत्ति ईश्वरनिष्ठ असून प्रापंचिक व्यवसायांकडे त्यांची पराङ्मुखता दिसे. अमृतरावजींच्या मनांत आपल्या एकुलत्या एका मुलानें कर्ता सवरता व्हावें, प्रपंचभार शिरीं घेऊन, वृद्धपणीं आपणांस सुख द्यावें व सरकारदरबारांत नांव गाजवून पूर्वजांनीं संपादिलेल्या कीर्तीत भर घालावी, असें होतें. परंतु तुकारामबाबा चांगले वयांत आले तरी त्यांच्या हातून तसें घडेना. त्यांचें मन, पूर्वसंस्कारामुळें, ईश्वरभजनीं रंगून गेलेलें असल्यामुळें, ते ऐहिक विषयांसंबंधानें केवळ उदासीन असत. त्यांचें मन प्रपंचांत गुंतवावें, या हेतूनें, अमृतरावजींनीं एका श्रीमंत घराण्यांतील सुस्वरूप मुलीशीं बाबांचें लग्न करून दिलें. बाबांच्या या पत्नीचें ' दुर्गाबाई ' असें नांव ठेवलें होतें.

शके १५१५, इ. स. १५९३ या वर्षी, म्हणजे तुकारामबाबांच्या वयाच्या बाविसाव्या वर्षी त्यांचीं आईबापें, थोड्याच दिवसांच्या अंतरानें, एकामागून एक अशीं मरण पावलीं, अशा या आकस्मिक दुःखास्पद प्रसंगामुळें बाबांचें चित्त प्रपंचांतून अगदींच उडालें. अशा स्थितींत त्यांची पत्नीही वारली ! व तेव्हांपासून बाबांस प्रपंचाचा भार अगदीं असह्य होऊं लागला. पुढें दुसरें लग्न करून घेण्याविषयीं आप्तेष्टांनीं व गांवांतील शिष्ट लोकांनीं त्यांस बहुत आग्रह केला, परंतु बाबांनीं तिकडे मुळींच लक्ष दिलें नाहीं. त्यांनीं आपली सर्व संपत्ति दीनदुबळ्यांस देऊन टाकिली व आपण मोठ्या आनंदानें श्रीक्षेत्र कैवल्यपूर ( कवळें ) येथें जाऊन राहिले.

तेथें त्यांची कुलस्वामिनी श्रीशांतादुर्गा इच्या सेवेंत त्यांनीं बहुत काळ घालविला. याच वेळीं त्यांची कवित्वशक्तीही उदय पावली. पुढें आपल्या उत्तर वयांत तुकारामबाबा काशीयात्रेस निघून गेले. तेथें आयुष्याचे राहिलेले दिवस सत्समागमांत व श्रीविश्वेश्वराच्या भजनांत त्यांनीं घालविले. यापुढील त्यांचा वृत्तांत बरोबर समजत नाहीं.

तुकारामबाबांच्या अंगीं उत्तम कवित्वशक्ति वास करीत होती. त्यांची कविता रसाळ व प्रसादपूर्ण अशी आहे. त्यांनीं केलेलीं भक्तीपर पदें वगैरे पुष्कळ कविता गोमांतकांत व बाहेरही कोठें कोठें लोकांच्या तोंडीं आहे, परंतु ती त्रुटित व अपुरी आहे. त्यांच्या कवितेपैकीं संपूर्ण सांपडलेलें असें काव्य ह्मटलें ह्मणजे भर्तृहरीच्या शतकत्रयाचें समश्लोकी भाषांतर हें होय. ह्या शतकत्रयांतील नीति व वैराग्य शतकाच्या श्लोकदशकाला निरनिराळीं नांवें ठेवून त्यांतील श्लोक त्या त्या सदराखालीं येतील असा श्लोकानुक्रम राखिला आहे. नीतिशतकांत, अशा व्यवस्थेनें १० पद्धति झाल्या आहेत, त्या येणेंप्रमाणें:—१ अज्ञपद्धति २ विद्वत्पद्धति ३ शौर्यपद्धति ४ अर्थपद्धति ५ दुर्जनपद्धति ६ सज्जनपद्धति ७ परोपकारपद्धति ८ शीलपद्धति ९ दैवपद्धति १० आणि कर्मपद्धति.

शृंगारशतकांत पांच विंशति कल्पिलेल्या असून त्यांचीं नांवें अनुक्रमें स्त्रीप्रसंग, कामिनीप्रशंसा, कामिनीगर्हण, कामिविगर्हण व षड्ऋतुवर्णन अशीं आहेत. वैराग्य-शतकांत, आशादूषणपद्धति, संसारपरित्यागपद्धति, कालमहिमापद्धति, भोगाऽस्थैर्यपद्धति, संसारपरित्यागपद्धति, नित्यानित्यविचारपद्धति, शिवार्चनपद्धति, आणि अवधूतचर्या-पद्धति याप्रमाणें दहा दशकें असून, त्या त्या विषयाला अनुसरून, त्यांतील श्लोकानु-क्रम फारच मार्मिकतेनें साधिला आहे, आणि त्याप्रमाणें प्रत्येक शतकांत बरोबर शंभर श्लोकांची भरती होत आहे. वामनाचीं जीं शतकें प्रसिद्ध झालीं आहेत त्यांत अनुक्रमें ९४—८७—९७ अशी श्लोकसंख्या आढळते. कित्येकांत कांहीं अधिक भरती करून, ही संख्या शंभरांवर नेलेली आढळते. महाबलकृत टीकेच्या शतकत्रयांत तर बरेच प्रक्षिप्त श्लोक आढळतात. एकंदरींत, व्यवस्थित अशी एकही प्रत मिळत नाहीं. वस्तुतः, शतक ह्मटलें ह्मणजे, त्यांत नियमानें शंभर श्लोकच असले पाहिजेत; कमी अधिक असणें शक्य नाहीं व त्याप्रमाणें बाबांच्या प्रतींत ही श्लोकसंख्या अगदीं बरोबर आढळते. तसेंच या शतकत्रयास 'सुभाषितरत्नावली' हें अन्वर्थक नांव

अगदीं प्राचीन काळापासून चालत आलेलें बाबांच्या प्रतींत व श्रीमन्महेश्वरभट्ट यांच्या सटीक प्रतींत आढळतें.

समश्लोकी या नांवास शोभण्यासारखा, वामनाच्या शतकत्रयाहून बाबांच्या शतकत्रयांत एक विशेष आढळला. वामनी शतत्रयांत पंडितांच्या रसभरित व अर्थपूर्ण प्रतिच्छायेंत यद्यपि कांहींच कमी नाहीं, तथापि तुकारामबाबांनीं आपली महाराष्ट्र प्रतिच्छाया मूळांतील अर्थास ईषन्मात्रही न सोडतां जशी मूळ वृत्तांतच उतरली आहे, तसें पंडितांनीं केलेलें नाहीं. कोठें स्रग्धरेस मंदाक्रांता, तर आर्येस वंशस्थ आणि शार्दूलविक्रीडितास हरिणी असा वृत्तविपर्यास पंडितांच्या शतकत्रयांत आढळतो, पण बाबांनीं तसें कांहींही होऊं न देतां अगदीं त्या त्या वृत्तांतच आपल्या गंभीर आणि अर्थपूर्ण वाणीनें हुबेहुब प्रतिच्छाया उतरलेली आहे. यावरून, बाबांना कवितावधू कशी वशंवद होती, हें मार्मिक वाचकांच्या लक्षांत येईल.*

हें भाषांतर गोवेंप्रांतीं कुंभारजुवें येथें प्रसिद्ध होणाऱ्या ' सत्संग ' नामक मासिक पुस्तकांत छापून प्रसिद्ध झालेलें असून, त्यांतील कांहीं सुरस वेंचे येथें देतों:—

श्लोक ( अनुष्टुप )

देशकाल नसे रूप ज्ञानदेह अनंत तो ।
शांत श्रीस्वप्रकाशात्मा नमस्कार असो तया ॥ १ ॥

पृथ्वी

निघेल मणि काढितां मकरवक्त्र दाढांतला ।
समुद्र तरुं ये सुखें भुजबळेंच हो मातला ।
सकोप फणि मस्तकीं सुमनसाच ये बांधितां ।
सुसाध्य क्षणही न मूर्खजनचित्त संबोधितां ॥ २ ॥

शा. वि.

नागा सान सरोजतंतुनिच जो बांधावया उल्लसे ।
वज्रा छिद्र करूं शिरीषकुसुमें ऐशा हठानें बसे ।
आणाया मधुबिंदुनें मधुरता क्षारार्णवा इच्छितो ।
नेऊं संतपथीं खलासि अमृतश्राव्योक्तरीं वांछितो ॥ ३ ॥

---

१ ही अन्वयबंध टीका बेळगांव येथील सारस्वतभूषण प्रेसांत छापली आहे.

* सत्संग मासिकपुस्तक, पुस्तक २ अंक ११ पहा.

पृथ्वी.

निघेल पिळितां सुतैल बहु साहसें वाळवें ।
पिऊनि मृग तोयिंचें सलिलही तृषा टाळवे ॥
मिळेल भलते वनीं शशकशृंगही शोधितां ।
सुसाध्य क्षणही न मूर्खजनचित्त संबोधितां ॥ ४ ॥

उपजाति.

स्वाधीन एकांत बरें विधीनें ।
हे निर्मिलें झांकण अज्ञतेला ॥
विशेष सर्वज्ञजना समोरीं ।
सुशोभवी मौन अपंडिताला ॥ ५ ॥

शिखरिणी.

कळे थोडें तेव्हां मदगज तसा त्या मदबळें ।
ह्मणे मी सर्वज्ञ स्वमनिं, जनिं कोणास नढळें ॥
अभिज्ञाला सेवूं हळु हळुच गेल्या मग जसा ।
तदा अज्ञानत्वा कळुनि मद गेला, ज्वर तसा ॥ ६ ॥

शा. वि.

शास्त्रोत्पादित शब्द सुंदर गिरा शिष्यांप्रती द्यावया ।
ख्यातींचे कवि निर्धनाढ्य असती, देशीं जयाच्या तया ॥
देशेशास उणीव ते, बुध तसे अर्थाविणें ईशते ।
रत्नाला कुपरीक्षकीं उणवितां, रत्नेंच तीं ! तुच्छ ते ॥ ७ ॥

मालिनी

परमपदपदस्थां पंडितांतें अशा हे ।
तृणवत लघु लक्ष्मी मोह घालूं न पाहे ॥
अभिनव मदगंडोद्दाह त्या वारणाला ।
मृदुल कमलतंतू तो नव्हे वारणाला ॥ ८ ॥

शा० वि.

बाहू भूषण भूषवी न पुरुषा, ना मुक्त हारावली ।
स्नानार्थ, न चंदनार्थ, न फुलें, ना मूर्द्ध केशावळी ॥

वाणी एकच शोभवीत पुरुषा, जे संस्कृती रंगली, ।
जाती नाशुनि भूषणें सकलही वाग्भूषणावेगळीं ॥ ९ ॥
दक्षत्व स्वजनीं, दया परजनीं, शाठ्यत्व ते दुर्जनीं ।
प्रेमा साधुजनीं, नय नृपजनीं, मोक्षार्थिता सज्जनीं ॥
शौर्य स्वारिजनीं, क्षमा गुरुजनीं, नारीजनीं धूर्तता ।
जे ऐसे नर सत्कलाकुशल ते लोकीं गुरू वर्तती ॥ १० ॥

### वसंततिलक.

दुर्बुद्धि सर्व हरितो मृदु बोलवीतो ।
दिङ्मंडळीं भरुनि कीर्ति यशास देतो ॥
पापास निस्तरुनियां बहुमान वीतो ।
सत्संग काय न करी वद, मानवा तो ॥ ११ ॥

### अनुष्टुप्.

असती कीं सुकवि ते, रससिद्ध कवीश्वर ।
कीर्तिदेही नसे त्याला, वार्धकीं मृत्युचें भय ॥ १२ ॥

### शा. वि.

क्षुत्पीडेन अशक्त वृद्धहि महा दीनत्वही पावला ।
नाना व्याधि-उपाधि-पीडित जरी प्राणांत काळांकिला ॥
हस्ती-मस्त-शिरस्थ मांस-नियम-ग्रासींच इच्छा धरी ।
तो जीर्णतृण काय खाइल ? महा अग्रेसरी केसरी ॥ १३ ॥

### गीति.

जरि रविकांत अचेतन, रविपदघातेंच होय प्रज्वलित ।
तेजस्वी पुरुष कसा, साहिल ? अपमान सांग इतरकृत ॥ १४ ॥

### शिखरिणी.

बरा पक्षच्छेद प्रमद-शचिभर्ता करिल तो ।
प्रहारें वज्राच्या धरणितल रक्तें भरिल तो ॥
हिमाद्रीच्या पुत्रा अहह ! जनकक्लेशसमर्यी ।
पडावें तें सिंधूजळिं उचित नोहे अघमर्यी ॥ १५ ॥

गीति.

बालक सिंहाचा घे उडि गजमस्तक विलोकुनी पुष्ट ।
श्रेष्ठ प्रकृति अशी हे, तेज वयावरि न राहतें तुष्ट ॥ १६ ॥

शा. वि.

जावो जाति रसातला, गुणहि त्या खालीं पडो आघवे ।
शीलत्वा गिरिपात हो, स्वजन हो भस्माग्निच्या वैभवें ॥
वैरी शौर्य मरोच वज्रहतनें, एकार्थ हो आमुतें ।
ज्या एकाचविणें समस्त गुण हे काडीपरी खालते ॥ १७ ॥

शिखरिणी.

मणी शाणोत्कर्षी, रणविजयि घायाळ झुजला ।
मदत्यागी हस्ती, शरदसरिता अल्पसलिला, ॥
कलाब्धी बीजचा, परिरत मृदू बालयुवती ।
सुलीनत्वें शोभा गलितविभवातें विभवती ॥ १८ ॥

वसंततिलक.

खोटी खरी कटुर अप्रिय गोड बोली ।
हिंस्त्रा दयालु धन्यधान्ययशा उदाळी ॥
वेंची अखंड मिळवी धन नित्य कांहीं ।
वेश्येअशीच नृपनीतिहि एक नाहीं ॥ १९ ॥

शा. वि.

ब्रह्मयानें अढळ स्थळींच लिहिलें जें वित्त थोडें बहू ।
भाळीं तें नर पावतोच, न पवे मेरूस गेल्या बहू ॥
तूं हो धीर नको करूं कृपणता वित्तार्थ लोकीं अहा ! ।
पाणी तो घट सांठवील सम तें आडीं समुद्रीं पहा ॥ २० ॥

लोभीं दुर्गुण कायसा, पिशुनता तैं पातकें कायसीं ।
सत्यातें तप कायसें, शुचि मनीं, तीर्थें तया कायसीं ॥
मैत्र्यीं आप्तज कायसें, स्वमहिमा, त्या भूषणें कायसीं, ।
विद्यार्थी धन कायसें, अपयशीं, मृत्यूभयें कायसीं ॥ २१ ॥

### अनुष्टुप.

मत्सरें ग्रासिलें बुद्धां विस्मयें दूषिले प्रभू ।
येर अज्ञान ते, अंगीं जिरालें कीं सुभाषित ॥ २१ ॥
सर्प क्रूर खल क्रूर, क्रूर सर्पांत रे खल ।
मंत्रौषधें शमे सर्प, कोणें कैसा शमे ? खल ॥ २३ ॥

### वसंततिलक.

अत्युद्धटा अतिखलास अनर्गलाला ।
पूर्वील कर्म अधमाधम विस्मृताला ॥
दैवेंच लब्ध विभवास सुदुर्गुलाला ।
नीचासि सेवुनि कुणा सुखलाभ झाला ? ॥ २४

### द्रुतविलंबित.

अपदिं धैर्य, पदीं बसतां क्षमा । चपळ वाणि बुधीं, रणिं विक्रमा ॥
अवढि कीर्तियशीं श्रवणीं रती । प्रकृति हे सुजनीं जनिं आयती ॥ २५ ॥

### शा. वि.

लोखंडावरि तापल्या जळ पडे, त्याचें नुरे नामही ।
मोत्याच्या परि तेंच पंकजदलीं शोभेस ये सर्वही ॥
स्वातीचे उदधींत शुक्तिपुटकीं मोतींच होतें स्वयें ।
ऐसे हे गुण; नीच, मध्यम, बरे, जीवांस संगान्वयें ॥ २६ ॥

### उपजाति.

श्रोत्र श्रुतत्वेंच न कुंडलानें । पाणीहि दानेंच न कंकणानें ॥
तनू विराजे करुणाकरांची । परोपकारेंच न चंदनानें ॥ २७ ॥

### वसंततिलक.

भानू विकासवित पद्म सरोवरीं तें ।
उत्फुल्लवी शशि कुमुद्वतिमंडलातें ॥
तृष्णा नसे, तरिहि मेघ जलास देती ।
संत स्वयें परहितार्थ तनू वहाती ॥ २८ ॥

### शा. वि.

दुग्धानें जळ आपणा मिसळिलें तें दुग्ध केलें जळें ।
दुग्धीं ताप विलोकितां अपणियां अग्नीमुखीं अर्पिलें ।।
आला ऊत दुधास, अग्नित पडे पाहूनि मित्रापदा ।
त्याही शिंपुनि शांतवी जळ पुन्हा; सन्मित्रता हे बुधा ।। २९ ।।

### शिखरिणी

शशिज्योत्स्नीं रात्रीं धवलित तटाकीं भलतिया ।
स्थलीं स्वर्गंगेच्या ध्वनि हलुहळू जैं निघतिया ।।
सुखें केव्हां बैसूं ! शिवशिवशिवेत्युच्चसुरवें ।
भवीं भोग त्रासें गळत नयनानन्द असवें ।। ३० ।।
कधीं काशीवासी सुरनदितटाकीं करपुटें ।
शिरोत्तंसीं ऐसीं करुनि धृतकौपीनसुपटें ।।
' अहो, गौरीनाथा ! त्रिपुरहर ! शंभो त्रिनयना ।
प्रसन्ने या क्रोशें निमिषवत उल्लंघिन दिना ।। ३१ ।।

### शा. वि.

ती रम्या नगरी, महानृपति तो, मंत्रीसभा ते घना ।
भार्गी त्या उभयीं सुवेत्रधरते, त्या चंद्रबिंबानना ।।
ते उन्मत्तचि फार राजसुत ते, बोभाटती कीर्तनें ।
ज्याला वश्य असे समस्तहि नमो त्या काळजीकारणें ।। ३२ ।।

तुकाराम बाबांच्या शतकत्रयावरील टीकेचे सर्वच श्लोक चांगले असून, वर दिलेल्या श्लोकांवरून त्यांची योग्यता व यथार्थता हीं वाचकांस सहज कळून येतील. वामन पंडितांच्या शतत्रयांतील श्लोकांशीं बाबांचे वर दिलेले श्लोक ताडून पाहण्याची वाचकांस शिफारस करितों. पंडित आणि तुकाराबाबा हे समकालीन असून, बाबांचे श्लोक पंडितांच्या श्लोकांपूर्वींचे असावेत असें वाटतें.

---

# शेखमहमदबावा.

तारिति न कीर्तिच्या जो नलचे त्या मुसल मानवा नावा ॥
हर्षें शेखमहंमद भगवज्जन मुसलमान वानावा ॥ १ ॥

सन्मणिमाला, मोरोपंत.

"महाराष्टकविचरित्र" या पुस्तकांत शेखमहंमद हे नांव पाहतांच, कांहीं वाचकांस, आश्चर्य वाटण्याचा संभव आहे. परंतु यांत कांहींच आश्चर्य नाहीं. सुमारें दोनशें वर्षांपूर्वी महाराष्ट्रांत जी भागवतधर्माची प्रचंड लाट उसळली होती तिच्या तडाक्यांत सांपडून जी मंडळी संसारसमुद्राच्या पार जाऊन साधुत्वाच्या किनाऱ्यास लागली त्यांपैकींच शेखमहंमदबावा हे एक होत. आमचा धर्म वाईट, आमच्या ईश्वर-विषयक कल्पना चुकीच्या, मूर्तिपूजा हें थोतांड आहे, असें मानणाऱ्या सांप्रतच्या धर्मविचारपराङ्मुख मंडळीस, हें शेखमहंमदबावांचें चरित्र एकवार वाचण्याची विनंति करितों. हें चरित्र मी, योगसंग्राम या नांवाचा या कवीचा जो एक ग्रंथ छापून प्रसिद्ध झाला आहे, त्याच्या आरंभीं रा. सा. शिवराम सीताराम वागळे यांनीं शेखमहंमदबावांचें लहानसें चरित्र दिलें आहे, त्याच्या आधारानें लिहितों.

शेखमहंमदबावा हे धर्मानें मुसलमान होते हें त्यांच्या नांवावरूनच समजणार आहे. परंतु पूर्व संचितामुळें ह्मणा किंवा हिंदु समाजाच्या सान्निध्यामुळें ह्मणा, त्यांचें लक्ष्य भागवत धर्माकडे ओढलें गेलें. आपल्या सनातन धर्मांत ईश्वरप्राप्तीचे अनेक मार्ग सांगितलेले आहेत, त्यांत भक्तिमार्गाइतका सुलभ मार्ग दुसरा नाहीं. या मार्गानें महाराष्ट्रांत फार मोठें धर्मकार्य केलेलें आहे. राजापासून रंकापर्यंत आणि ब्राह्मणापासून अंत्यजापर्यंत, वाटेल त्यानें या मार्गाचा अवलंब करून स्वतःचा उद्धार करून घेण्यास व इतरांचा ही उद्धार करण्यास, कोणतीही अडचण नाहीं. सेना न्हावी, गोरा कुंभार व नामदेव हे शूद्र, चोखामेळा व रोहिदास चांभार हे अतिशूद्र, कबीर, कमाल, सुलतान अल्ली व शेख महंमद हे मुसलमान, परंतु भक्ति-मार्गास लागल्यामुळें शेवटीं ते ब्रह्मत्वाप्रत पोहोंचून खरे ब्राह्मण कसे झाले, त्या वेळच्या कर्ममार्गी मंडळीनें त्यांचा एवढा छळ केला असतांही शेवटीं तेच त्यांच्या भजनीं कसे लागले, जाती किंवा धर्म हीं ईश्वरप्राप्तीच्या आड कशीं

येऊं शकत नाहींत, सद्गुण आणि सत्कर्म यांनीं सामान्य मनुष्य कसा श्रेष्ठत्व पावतो हें कोडें, या भागवत धर्माचा अभ्यास केल्यास सहज उलगडतां येईल. जसे ब्राह्मण, शूद्र, व म्लेंच्छ हे एकाच नौकेंत बसून नदी ओलांडून जातात, तसेच ते भक्तिमार्गनौकेंतून या संसारसमुद्राच्याही पार जाऊं शकतात. जातीनें कोणीही असो. एकवेळ त्याचें साधुत्व कसोटीस उतरलें कीं, हिंदूंनीं त्याला आपलाच ह्मटला आहे. याच न्यायानें महाराष्ट्र कविवर्य मोरोपंत, यांनीं आपल्या सन्मणिमालेंत, महिपतींनीं भक्तविजयांत, व हनुमंतस्वामींनीं श्रीरामदासस्वामीच्या चरित्रांत शेखमहंमदबावांस जागा दिली आहे. अहमदनगर जिल्ह्यांत श्रीगोंदें ऊर्फ चांभारगोंदें हें तालुक्याचें गांव आहे. या गावीं चांभार जातींत गोविंद या नांवाचे भगवद्भक्त होऊन गेले. त्यावरून श्रीगोंद्याला चांभारगोंदे हें नांव प्राप्त झालेलें आहे, असें ह्मणतात. तेथून सुमारें आठ कोसांवर रुई वाहिरें या नांवाचें एक लहानसें खेडें आहे. तेथें शेखमहंमदबावा रहात असत. तेथें त्यांच्या घराण्याकडे मुलाणकीची वृत्ती होती. या वृत्यनुरूप महंमदबावा १५–१६ वर्षांचे असतांना एके दिवशीं बापाच्या आज्ञेवरून बकरें कापण्यासाठीं गेले. असलें हिंसाकर्म करण्याचा हा त्यांचा पहिलाच प्रसंग होता. त्यामुळें हातांत सुरी घेऊन ते बकऱ्याजवळ उभे असतां त्या गरीब प्राण्याच्या ओरडण्यानें त्यांचें कोमल अंतःकरण द्रवून गेलें. जातीचा मुसलमान, तशांत खाटकाचा मुलगा, वंशपरंपरेचा निर्दयपणा त्याच्या आंगांत खिळलेला असावयाचा, असें असतां शेखमहंमदाच्या हृदयास पाझर फुटला हें त्याच्या पूर्वसंचिताचेंच फळ नव्हे असें कोण ह्मणेल? कापण्याचें दुःख कसें होतें हें पाहण्याकरितां त्यांनीं हातांतील सुरीनें आपलें स्वतःचें बोट थोडेसें कापून पाहिलें त्याबरोबर त्यांना परम वेदना झाल्या. तेव्हां जरासें बोट कापल्यानें जर इतके क्लेश होतात तर या बिचाऱ्या मुक्या प्राण्याची मान सुरीनें कापल्यास त्यास किती दुःख होईल हा विचार त्यांच्या कोमल अंतःकरणांत मूर्तिमंत उभा राहून त्यांनां आपल्या वृत्तीचा फार अनुताप झाला. व तात्काळ, यानंतर प्राण गेला तरी हिंसाकर्म करावयाचें नाहीं अशी शपथ वाहून त्यांनीं हातांतील सुरी लांब भिरकावून दिली. या प्रसंगाची आठवण शेखमहंमदबावांना बळकट राहिली होती असें दिसतें कारण त्यांनीं आपल्या निष्कलंकप्रबोध ग्रंथांत एके ठिकाणीं ह्मटलें आहे.

अभंग

पडताळुनी सुऱ्या ॥ पशु विदारिती ॥
रडें बोंबा मारिती ॥ कापितां बोट ॥ १ ॥
मेल्या रांडा पोरें ॥ रडती परोपरी ॥
नेणती अविचारी ॥ परावें दुःख ॥ २ ॥
अहिंसा विज्ञान ॥ दुःखीं सुख कळलें ॥
आत्मज्ञान फळलें ॥ शेखमहंमदा ॥ ३ ॥

याशिवाय त्यांनीं आपल्या योगसंग्राम ग्रंथांत हिंसेसंबंधानें बरीच टीका केली आहे. त्यांतील वेंचे प्रसंगवशात पुढें दिले जातील.

याचवेळीं शेखमहंमदबावांस उपरती होऊन ते भगवत्प्राप्तीच्या मार्गास लागले, परंतु त्यांना भगवत्प्राप्ती कशी झाली यासंबंधानें खात्रीलायक माहिती मिळत नाहीं. पुढें औरंगजेब बादशहा दक्षिणेंत आला होता तो या प्रांतांतून जात असतां त्याच्या लोकांनीं महमदबावांना इतरांबरोबर जबरीनें धरून त्यांच्या डोकीवर बिगार दिली. बिगार घेऊन जात असतां, असा चमत्कार झाला कीं, ती बावांच्या डोकीवर न राहतां सव्वाहात वर अधांत्रीं चालली. तेव्हां हे कोणीतरी अवलिया आहेत अशी अवरंजेबाच्या लोकांची खात्री होऊन त्यांनीं त्यांस सोडून दिलें, तेव्हांपासून बावांची विशेष प्रसिद्धि होत चालली. पुढें ते श्रीगोंदें येथें मठ करून राहिले. त्यांच्या गुरूचें नांव " चांद बोधले " किंवा " चंद्रबोधले " असें होतें. संतमालिकांतून चांगबोधले या नांवाचा बऱ्याच ठिकाणीं उल्लेख केलेला आढळतो. याचवेळीं रामदास तुकारामादि अनेक साधु आपल्या रसाळवाणीनें, महाराष्ट्रांत, भागवत धर्माचा प्रसार करीत होते. या संतमंडळापैकीं तुकाराम, जयरामस्वामी वडगांवकर व शेखमहंमद या तिघांचा विशेष स्नेह होता. श्रीगोंद्यापासून चार मैलांवर एक स्थान आहे त्या ठिकाणीं तुकारामबुवा व शेखमहंमद यांच्या भेटी होत असत असें सांगतात. महंमदबावाही देहूस व पंढपुरास जात असत. जयरामस्वामी हे फक्त एकदांच श्रीगोंद्यास आले होते ( यांचें चरित्र याच ग्रंथांत दुसरीकडे दिलें आहे ) त्यावेळीं त्यांचा व महंमदबावांचा जो प्रसंग झाला तो ' चरित्रभाग ' ह्मणून एक लहानसें चोपडें आहे त्यांत वर्णन केला आहे. उभयतां सत्पुरुष तीन दिवस एकांतांत होते. शेखमहंमदबावांनीं:—

" एकांताचे ठायीं नवलाव केलें ॥
जानवें दाविलें चिरुनि खांदा ॥ १ ॥
मुळींचे ब्राह्मण आलों याचि ठाया ॥
दावियलें तया यज्ञोपवित ॥ २ ॥
सदा शिवलिंग अक्षय मस्तकीं ॥
देखिलें कवतुक जयरामांनीं ॥ ३ ॥ "

जयरामस्वामी वडगांवास जाण्यास निघाले त्यावेळीं, तुमच्या समाधीच्या वेळीं मी येईन, असें महंमदबावांनीं त्यांनां सांगितलें, व समाधीचा काल अडीच वर्षांनीं येईल असेंही सांगितलें. हा काल येऊन ठेपला. वडगांवीं जयरामस्वामींच्या मठांत समाधीची सर्व तयारी होऊन राहिली. समर्थादि संतमंडळ येऊन थडकलें. मंडळीची अतिशय गर्दी झाली. जयरामस्वामींनीं मोठ्या उत्कंठेनें वरचेवर तपास घ्यावा, परंतु महंमदबुवा आल्याची खबर लागेना. तेव्हां बावा आतां येत नाहींत असें वाटून स्वामी समाधीच्या तयारीस लागले. इतक्यांत जमलेल्या मंडळींत कांहीं गलबला झालेला ऐकून, " काय आहे " ह्मणून स्वामींनीं विचारलें. मंडळी ह्मणाली कीं आमच्यामध्यें एक यवन पायांतले जोडे न काढितां येऊन बसला आहे. तो कधीं व कसा आला हें कोणालाच कळेना पण यवनस्पर्शानें विटाळ झाला असें मानून कर्मठ ब्राह्मणमंडळी फारच रागावली व त्या यवनाला धक्का-बुक्की करून हांकून देण्याच्या बेतांत आली; परंतु जयरामस्वामी तर त्या यवनाचीच वाट पहात होते. त्यांनीं त्याचें अभिवंदन केलें, व बोलल्याप्रमाणें आपण आलां, याचा मला मोठा संतोष वाटतो, असें ह्मणून त्यांनीं समाधि घेण्यास सुरुवात केली.

भाविक लोक शेखमहंमदबावांस कबीराचा अवतार असें मानितात. " ज्ञान्याचा एका, नाम्याचा तुका व कबीराचा शेखा " असें ह्मणण्याचा वारकरी लोकांत प्रघात आहे. पण कबीर व शेखमहंमद हे दोघेही मुसलमान होते, व महंमदबावा कबीर पंथी होते एवढ्यावरूनच हा समज झालेला दिसतो. कारण त्या ह्मणण्याला कांहीं आधार नाहीं. नामदेवांनीं शतकोटी अभंग रचण्याची प्रतिज्ञा केली होती ती तुकारामांनीं सिद्धीस नेली, यावरून तुकाराम हे नामदेवांचा अवतार होत, असें ह्मणणें थोडें तरी साजेल पण शेखमहंमदबावांसंबंधानें तेवढाही आधार नाहीं. उलट " मुळींचे ब्राह्मण आलों याचि ठाया " असें चरित्रभागांत बावांच्या मुखानें वदविलें आहे. व अन्यत्रही बावांनीं ह्मटलें आहे कीं :—

" पूर्वी तपाच्या राशी योगश्रेष्ठें केल्या ॥
संचितें फळा आल्या म्लेंच्छदेहीं ॥ "

यावरून महंमदबावा पूर्वदेहीं म्लेंच्छ नव्हतें असें मानण्यास जागा आहे.

साधूनें कांहींतरी चमत्कार केल्यावांचून लोकांत त्याची प्रसिद्धि होत नाहीं. किंबहुना त्याला साधुपदच मिळत नाहीं. शेखमहंमदबावांनीं केलेले कित्येक चमत्कार ऐकिवांत आहेत पण त्यांपैकीं खरे किती व भाविक लोकांच्या दृढतम श्रद्धाबलानें उत्पन्न केलेले किती हें सांगणें कठिण आहे. त्यांपैकीं एक चमत्कार भक्तविजयांत सांगितला आहे. हें वर्णन ओंवीबद्ध असल्यामुळें मी त्याचा सरळ अर्थ येथें देतों.

"चांभारगोंदें येथें शेखमहंमद या नांवाचे प्रसिद्ध सत्पुरुष होते. त्यांना सप्रेम कीर्तन करण्यांत मोठा आनंद वाटे व हरिनामाचा रात्रंदिवस छंद असे. ते एके दिवशीं कीर्तन करीत असतां, मोठे मोठे पंडित व विद्वान् असे ब्राह्मण व इतर वर्णांचे लोक यांची कीर्तन ऐकण्यास एकच गर्दी उडून गेली होती. सत्पुरुषाचें कीर्तन, त्याचा महिमा काय वर्णन करावयाचा आहे ? कीर्तनाला असा अद्भुत रंग आला होता कीं पाखांडीसुद्धां माना डोलवूं लागले. तो अकस्मात् बावांनीं उडी मारून मंडप चोळिला. हें पाहून लोकांस मोठें आश्चर्य वाटलें. मग जे पुढें बसले होते त्यांनीं विनंति केली कीं आतां उडी मारून मंडप चोळिला तो कां ? तेव्हां बावा ह्मणाले " वैष्णवांत शिरोमणि असा जो तुकाराम तो देहू गांवांत कीर्तन करीत आहे. अशा वेळीं मंडपास अकस्मात् हिलाल लागून तो जळूं लागला हें पाहून मी येथूनच मंडपास लागलेला अग्नि विझवून टाकिला. हें बावांचें भाषण कोणासच खरें वाटेना. ते ह्मणाले " अहो ! देहू गांव येथून किती तरी दूर आहे असें असतां तेथें घडलेली गोष्ट तुह्मांस येथें कशी समजली ? बरें कदाचित् समजली असेल; तरी पण तेथें मंडपास लागलेला विस्तव विझविण्यास कोणी श्रोतेमंडळी नव्हतीच काय ? " मग शेखमहंमद ह्मणाले बाबांनो, तें तुकारामाचें कीर्तन, तें ऐकणारांस देहभान रहात नाहीं, हरिनाम आणि हरिरूप यांजकडे त्यांच्या चित्ताची एकतानता होऊन जाते. अशा देहातीत झालेल्या श्रोत्यां वक्त्यांला मंडपाला लागलेली आग दिसावी कशी ? " यावर श्रोत्यांनीं बावांस प्रश्न केला " असें ह्मणतात कीं तुकारामाच्या कीर्तनांत प्रत्यक्ष पंढरिनाथ असतात, तर मग हें संकट त्यांनीं कां बरें निवारण केलें नाहीं ? " बावा ह्मणाले " त्यांची स्थिति तर

विचारूं नका. तो प्रेमानें वेडा होऊन गेला असेल. कीर्तनप्रसंगीं ज्याला आपल्या देवपणाचा विसर पडतो तो लोकांचें संकट काय निवारण करणार ? भक्त भक्तपणा व देव देवपणा विसरून एकस्वरूप झाल्यावर भेदाभेदच मावळला, तेथें आपपर हा भावच राहिला नाहीं. इतकेंही सांगितल्यावर जर अद्याप तुम्हांस या गोष्टीबद्दल संशय वाटत असेल तर देहूस मनुष्य पाठवून येथील समाचार आणवा." हें ऐकून श्रोत्यांनीं, 'रात्रीं तुकारामबावांचें कीर्तन चाललें असतां जर कांहीं कौतुक पाहिलें असेल तर कृपा करून लिहून पाठवावें' अशा मजकुराचें देहूच्या पाटलास पत्र देऊन, एक सांडणीस्वार पाठविला. दुसरे दिवशीं उत्तर आलें कीं "रात्रीं कीर्तनाचा अगदीं गजर चालला असतां मंडपावर अकस्मात् हिलाल उडून तो जळूं लागला. मंडपास दोडहात व्यासाचें छिद्र पडलें, परंतु कीर्तनरंगांत दंग झाल्यामुळें कोणाचेंही ध्यानांत हा प्रकार आला नाहीं. सकाळीं उठून पाहतां, छिद्र दृष्टीस पडलें. त्यावेळीं मोठें आश्चर्य वाटलें." हें पत्र वाचून मंडळीची खात्री झाली, व ते शेखमहंमदबावांच्या पायीं लागले.

महंमदबावा पूर्णज्ञानी असून अद्वैतमतवादी होते, हें त्यांच्या योगसंग्राम ग्रंथावरून उघड होतें. ते अन्यत्र ह्मणतात:—

अभंग.

" वस्त्राआड नग्न काष्ठाआड अग्न । द्वैताआड निर्गुण देखिलें भावें ॥ १ ॥
जवं मृत्तिका ठायीं तवं भिंति पैं नाहीं । कर्तव्याचे पायीं द्वैत जालें ॥ २ ॥
जैसा लोहार्ता जंग तैसें द्वैत सांग । कल्पनेचा ढंग विषयरूप ॥ ३ ॥
द्वैत अद्वैत गोळा रविरश्मि कळा । करितां निर्वाळा माझाचि मज ॥ ४ ॥
भजक भजन दिसे भासे एक । महंमदीं शेख एकमकत्वें ॥ ५ ॥

आणि पुनः—

अभंग.

" स्वयें ब्रह्म असोन मी देह ह्मणती ॥ त्रिगुणाची भ्रांति अविद्या पडली ॥ १ ॥
साधुसंग धरा अंतर शुद्ध करा ॥ कल्पना मन मुरा ज्ञानविवेकें ॥ २ ॥
तरंग साकारे उदकाचेनि अंगें ॥ तैसा मनुष्य सांगें परब्रह्मीं ॥ ३ ॥
सुवर्णाचे नग भांगार हीण डाके ॥ तेंवि ब्रह्म निकें देहकल्पनेवीण ॥ ४ ॥
देहकल्पना विज्ञानें जाळिली ॥ वैराग्यपुरीं घातली शेखमहंमदें ॥ ५ ॥

निष्कलंकप्रबोध.

शेखमहंमदबावा निर्गुणोपासक होते. मूर्तिपूजेचा त्यांनीं आपल्या ग्रंथांतून निषेध केला आहे. त्याचप्रमाणें अंतर शुद्ध झाल्याविना तीर्थें हिंडून मुक्ति मिळत नाहीं असें त्यांनीं स्पष्ट सांगितलें आहे.

"इंद्रायनी बीजें काशीतटीं लावीं ।। गोड झाल्या स्वभावीं नष्टा मुक्ति खरी ।। १ ।।
अनेक जलचरें काशींत वसती ।। स्वभाव न टाकिती सुसरी किरवीं ।। २ ।। "

तथापि मूर्तिपूजा करणें हें पाप आहे, ती केली असतां देवाची थट्टा केली असें होतें, असें मात्र त्यांचें मत नव्हतें. त्यांचा कटाक्ष इतकाच दिसतो कीं निर्गुण उपासना ही मूर्तिपूजेपेक्षां श्रेष्ठ आहे. त्या उपासनेचा अधिकार अंगीं येण्यास मूर्तिपूजा ही पहिली पायरी अथवा " ओनामा " आहे. ही पायरी फक्त मूढजनांकरितां आहे. पण मनुष्याला ज्ञान झाल्यावर, सर्वभूतीं परमेश्वर हें तत्त्व पूर्णपणें जाणून तदनुरूप वर्तन सुरु झाल्यावर, त्याला मूर्तिपूजेची जरूर नाहीं. याविषयीं ते आपल्या निष्कलंकप्रबोध ग्रंथांत ह्मणतातः—

" प्रतिमा दूषिल्याचा राहिला अन्वय ।। ते सांगेन सोय सभे श्रोत्यां ।।
ओनामा एका खडी आधीं मांडिती धडे ।। मग मोडिसी पाडे अभ्यासिती ।।
खांजण्या भांजण्या हिशोब लिहिती ।। मग व्यापारी होती राजेंदर ।।
तैसी तीर्थप्रतिमा ओनाम्याचे धडे ।। स्वहिता धडफुडे सेवा संत ।। "

आणखीः—

खुळखुळा देवुनि बाळ रिझविलें ।। काहडून घेतलें मातेनें आपणा ।।
सोनें देतां बाळा घेतां खुळखुळा ।। तें करी तळमळा आंग घाली ।।
तैसें ते जना निजगुज देती ।। अज्ञानें सळिती प्रतिमा हिरतां ।।
शहाणें झाल्या बाळ टाकी खुळखुळा ।। मागे द्रव्यगोळा शेखमहंमदा ।।
तैसें होणें शाधुसंत सांगती ।। प्रतिमाभक्ति टाका खुळखुळा ।।

प्रतिमापूजनासंबंधानें इतर बहुतेक साधुसंतांचेही असेच अभिप्राय आहेत. मूर्तिपूजा बावांस जर इतकी अप्रिय असती तर ते पंढरपुरास विठोबाच्या दर्शनास गेले नसते. परंतु महिपति ह्मणतातः—

" ऐकोनि रुक्मिणीचें वचन ।। अवश्य ह्मणती जगज्जीवन ।।
तों दर्शनासी आले संतजन ।। नामाभिधानें ऐका ।। ८५ ।।

शेखमहंमद आणि गणेशनाथ ॥ संतोबा पोवार जगद्विख्यात ॥
बोधला निंबराज, वैष्णवभक्त ॥ आले त्वरित दर्शना ॥ ८६ ॥

भक्तविजय अ० ५१

व महंमदबावांचाही एक अभंग असा आहे कीं,

" धन्य पंढरपुर । पुण्याचें नगर । नांदे सौदागर । पांडुरंग ॥ ध्रु० ॥
चित्तकरुनि वोरासारा । शीघ्र चला पंढरपुरा । पाहों रखुमाईच्या वरा "

रामदासस्वामी पंढरपुरास गेले होते तेव्हां तेथें शेखमहंमदबावाही होते असें श्रीरामदासस्वामीचें चरित्र या ग्रंथांत सांगितलें आहे. तथापि एक श्रीहरिशिवाय इतर क्षुद्र दैवतांची पूजा करणें त्यांस संमत नव्हतें. ते ह्मणतः—

ओंव्या.

" या देवतांच्यानें सुख लागे भोगणें । तरी त्यांनीं कां सोसिले बंदिखाने ॥
देवपणाचें सामर्थ्य कोठें गेलें नेणें । रावणाचे सत्तेपुढें ॥ ८१ ॥
ज्याचा शेंबुड त्यास न फिडे । त्याच्या दास्यत्वें काय प्राप्ति जोडे ॥
ऐकोनि निर्गुणीं धडफुडे । भजापां तुह्मीं श्रोते हो ॥ ८५ ॥
पैशाच्या गुरुळें होय समाधान । भीक मागे भक्तांच्या खांद्यावर बसून ॥
तो पूजितां केवि तुटे बंधन । पुजारियांचें ॥ २३ ॥ "

तुकारामाप्रमाणें महंमदबावांनाही पोकळ कर्ममार्गाचा तिटकारा होता. आणि खरोखर पाहिलें तर कर्मठ ब्राह्मणाचें व भगवद्भक्तांचें कधींही जमलेलें नाहीं. याचें कारण महंमदबावांनीच सांगितलें आहे.

वैदिकांचें खरें तें संतांचें लटिकें.

अक्षरें वाचूं शिकले । हृदयीं वाचूं चुकले । या गुणें हरिसी मुकले । शास्त्रांगणहे ॥ध्रु॥
संस्कृत वंदिती । प्राकृताला निंदिती । गुह्यार्थ नेणती । परमार्थाचा ॥ ३ ॥
जे जे बोलती बोल । नकळे सखोल । तोडिलें मोल । वाचिल्याचें ॥ २ ॥

असें असल्यामुळें तुकारामाप्रमाणें महंमदबावांनीं कर्मठ भटांची निर्भर्त्सना केली आहे. भटांविषयीं ते असें लिहितातः—

दाटून दिल्या दान घेत नव्हते भट ॥ आतां झाले फळकट लुलुसपणें ॥
तोंडें बोलती वेद । नेणती त्याचा भेद ॥ करिती जगीं बोध । पाखांडाचा ॥

बोलति एक । आचरती अनेक ।। नेणति विवेक । निजतत्वाचा ॥
आपले आपण बद्ध । आपले आपण मुक्त ।। पोटिस्तें बहुत । पर्वण्या भटांच्या ॥
वासना आसर । कल्पना मुरदार ॥ त्या गुणें आचार । सांडवले ॥
महाराज दाते । ह्मणती उन्मत्ताला ।। नातरी त्या भुताला । कोण मानी ॥

याशिवाय अनेक ठिकाणीं त्यांनीं भटांच्या कर्मकांडावर चांगलाच कोरडा ओढला आहे. तथापि खरे ब्राह्मण त्यांना वंद्यच होते. पण त्यांच्या ह्मणण्याप्रमाणें "ब्रह्म जाणे तोचि ब्राह्मण." ब्रह्मकुलांत केवळ उत्पन्न झाल्यानें ब्राह्मण होणें शक्य नाहीं. ते ह्मणतात:—

ब्राह्मण विचार ऐका गाढा॥ द्वारीं क्षमा दयेचा सडा ॥
घेतला अविद्येचा शिंतोडा ॥ मनापासुनी ॥ २ ॥
भक्तिची त्रिकाळ संध्या करी ।। श्वास उच्छ्वास माळा फेरी ॥
हृदयीं हरिनाम उच्चारी ।। वासना सोवळी करूनियां ॥ ३ ॥
धन्य ते ब्राह्मण, ईश्वरपरायण ॥ नेणती महिमान ब्रह्मादिकही ॥ ४ ॥
ते शुच ना ओंवळे, ब्रह्मानंदें ओसंडले ।। नित्य चरणीं रुळे, वाराणसी ॥५॥

असेंच आणखी एके ठिकाणीं त्यांनीं ह्मटलें आहे "जे ब्रह्म जाणतात ते ब्राह्मण, अशा ब्राह्मणांला मी वंदन करितों"

अभंग

"भुदेव ते ब्राह्मण सकळवर्णी श्रेष्ठ ॥ ते सांगेन चोखट श्रोतियांला ॥
धोतर टिळे जानवीं नव्हेती ब्राह्मण ॥ हृदयीं शुचपण तोचि ब्राह्मण ॥
शेंडी मोन्चे कडदोरे ब्राह्मण नव्हेती ॥ कल्पना मुंडिती ते ब्रह्मरूप ॥
आचारें नव्हे ब्राह्मण नेणती विचार ॥ अनाभिकाचार केल्या ब्राह्मण नव्हे ॥
आंघोळ संध्या त्रीकाळ । ब्राह्मण नव्हे खरा ॥ हृदयीं निर्मळ बरा । तो ब्राह्मण ॥
पन्नास कोटी मंत्र । गायत्री वेद चतुर ॥ योग होम थोर । ब्राह्मण नव्हे ॥
अनुष्ठान जपतप । नव्हे ब्राह्मण पूर्ण ॥ तत्वेंशीं विज्ञान । ब्राह्मण विरक्त ॥
सडा संमार्जन । तुळशी वृंदावन ॥ विधी कर्मबंधन । नव्हे ब्राह्मण ॥
निबंध उपनिषद । हा पहावा मोक्षा ।। नयेतां गाही ओजा । शद्ब ग्रंथ दुषावा ॥
शेखमहंमद, ब्राह्मणाला वंदी ॥ अब्राह्मणा निंदी । ब्रह्मविज्ञानें ॥"

निष्कलंकप्रबोध.

या महंमदबावांच्या व्याख्येप्रमाणें पाहूं गेल्यास आजकाल जसा खरा क्षत्रिय सांपडणें कठिण, तद्वतच खरा ब्राह्मणही मिळणें दुरापास्त. अस्तु. मनुष्याला त्याच्या कर्माप्रमाणें अनेक जन्म घ्यावे लागतात हें तत्त्व महंमदबावांना संमत होतें. ' अंते मतिःसागतिः ' या श्रीमद्भागवतांतील तत्वाचा व " यंयं वाऽपि स्मरन्भावंत्यजंत्यंते कलेवरम् । तं तमेवैति कौन्तेय सदातद्भाव भावितः " ( तेंवि जितेनि अवसरें । जें आवडोनि जिवीं उरे । तेंचि मरणाचिये मेरे । फार हों लागे ॥ ७४ ॥ आणि मरणीं जया जें आठवे । तो तेचि गतीतें पावे । ज्ञानेश्वरी, अध्याय ८ ) या श्रीकृष्णोक्तीचा त्यांनीं आदर केला होता. त्यांनीं ह्मटलें आहेः—

जैसा जैसा कामनेचा विकार । तैसेंच धरणें लागे शरीर ।
हें तुह्मीं ऐकावें जी उत्तर । शहाण्णव कुळांनीं ॥ २८॥

योगसंग्राम, प्रकरण ११.

" कर्मानें उत्पत्ती कर्मकल्पें क्षेव । देता घेता देव नव्हे कदा ॥ "

कर्म करण्यासंबंधानें " सर्वकर्मफलत्यागं ततः कुरु यतात्मवान् । ( " आणि जेणें जेणें वेळे ॥ घडती कर्मे सकळें । तयांचीं तियें फळें । त्यजित जाय ॥ " ज्ञानेश्वरी ) असा भगवंतांनीं अर्जुनास गीतेच्या बाराव्या अध्यायांत उपदेश केला आहे, तोच महंमदबावांनीं आपल्या एका अभंगांत उतरला आहे.

" जें जें करावें कर्म । सांडावा त्याचा हेत ॥
मग सांचे संचित । मोहळ माशांचें जैसें ॥
जोडल्या मधाचा मक्षिकां नाहीं हेत ॥
मग तो सांचत मोहोळीं कांदा ॥

सर्व साधुसंतांप्रमाणें महंमदबावांचेंही सांगणें आहे कीं:—

" सद्गुरूवांचोनी नाहीं आत्महित "

याप्रमाणें महंमदबावांच्या चरित्राचें व मतांचें थोडक्यांत दिग्दर्शन केलें. त्यांचे योगसंग्राम, निष्कलंकप्रबोध व पवनविजय असे तीन ओंवीबद्ध व अभंगबद्ध ग्रंथ आहेत. त्या सर्वांत योगसंग्राम मोठा आहे. महंमदबावांना भगवद्गीता चांगली परिचित असून भागवतादि ग्रंथांचेंही श्रवण होतें असें त्यांच्या ग्रंथांवरून दिसतें. महंमदबावांच्या वेळीं श्रीगोंद्यांत आणखी तीन सत्पुरुष होते. प्रल्हादबावा, राऊळबावा व गोधडबावा. यांपैकीं प्रल्हादबावा व महंमदबावा हे गृहस्थाश्रमी होते.

त्याचे वंशज अद्याप श्रीगोंद्यांत आहेत. फाल्गुन शुद्ध नवमी हा महंमदबावांच्या पुण्यतिथीचा दिवस आहे. त्या दिवशीं रात्रीं त्यांच्या कबरीच्या एका अंगास मुसलमान व एका अंगास ब्राह्मण व इतर हिंदु उभे राहून कबरीला अबीर चढवीत असतात. हा प्रसंग पाहून प्रेक्षकाच्या*मनाची वृत्ति घटकाभर चमत्कारिक होते व जें राजाज्ञेनेंही होणें शक्य नाहीं तें संतांच्या स्वभावसौजन्यानें होऊं शकतें असें मनांत येऊन हा संसार क्षणभंगुर वाटूं लागतो. " अविंधाची वाणी। नायकावी कानीं॥ " हें ज्यांचें व्रत, " न नीचो यवनात्परः ॥ " ही ज्यांची मीमांसा, ज्यांना वेदोक्त कर्ममार्गाचा इतका ताठा, त्या कर्मठ ब्राह्मणांनीं यवनाच्या खांद्याला खांदा लावून, त्यांच्यांतील एकाच्या कबरीजवळ पूज्यभावानें उभें रहावें हा लहानसहान चमत्कार नव्हे. महंमदबावांनीं दुसरे कोणतेही चमत्कार केलेले नसले तरी ही एकच गोष्ट त्यांच्या साधुपणाची व अधिकाराची निरंतर साक्ष देईल. त्यांच्याविषयीं लोकांत इतकी पूज्यबुद्धि आहे कीं " ज्ञानदेव तुकाराम " याप्रमाणें, " चांग बोधले शेखमहंमद तुकाराम " हाही एक भजनाचा प्रकार या प्रांतीं प्रचारांत आहे.

' भागवतधर्मानें व विशेषतः टाळकुट्या वारकरी पंथानें महाराष्ट्राचें मोठें नुकसान केलें, ' असे उद्गार काढून, आमच्या साधुसंतांस ' संताळें ' ह्मणून त्यांची टर उडविणाऱ्या अर्वाचीन गृहस्थांनीं, शेखमहंमदबावांच्या चरित्राचें एकवार अवश्य मनन करावें. आज इंग्रज सरकारासारख्या सुधारलेल्या व जातिभेदास महत्त्व न देणाऱ्या सरकारच्या अंमलाखालीं, सुधारणेस अत्यंत अनुकूल अशा कालीं, व मोठमोठ्या समाजसुधारकांच्या दीर्घप्रयत्नांनीं जो जातिद्वेष नष्ट न होतां, उलट वाढत चालला आहे, हिंदुमुसलमानांची एकवाक्यता होणें दुरापास्त वाटत आहे, तो जातिद्वेष आमच्या वारकरी साधुसंतांनी, दोन अडीचशें वर्षांपूर्वी, कसा हद्दपार करून टाकला होता व हिंदु व मुसलमानी ह्या परस्परविरोधी धर्मांतल्या लोकांची आमच्या भागवतधर्मानें कशी एकवाक्यता केली होती, हें चोखामेळा, तुकाराम, गोराकुंभार, शेखमहंमद

*ही हकीकत, रा. सा. शिवराम सीताराम वागळे बी. ए. एल्. एल्. बी, हे श्रीगोंद्यास सबजज्ज असतां, त्यांनीं स्वतः आपल्या अनुभवानें लिहिली आहे. हें चरित्रही त्यांच्याच शोधकपणाचें फल होय. सरकारी नोकरींत बंधन पावलें असतांही आपल्या अंगांतील शोधकपणा व रसिकता इत्यादि गुण कसे प्रकट करितां येतात, याचें हें एक उत्कृष्ट उदाहरण आहे.

या संतांची चरित्र व विजापुरकर व भागानगरकर या म्लेंच्छधर्मीय राजांनीं हिंदुधर्मीय साधुसंतांच्या वंशजांस करून दिलेलीं इनामपत्रें, यांच्या अवलोकनानें कोणाच्याही लक्षांत येईल. तर, राष्ट्राचा राजकीय बाबतींत उद्धार होण्यास मुख्य साधन जें ऐक्य, तें घडवून आणणाऱ्या साधुसंतांवर पंगुत्वाचा आरोप करणें किती अनुदारपणाचें आहे बरें ?

महंमदबावांनीं कवि या नात्यानें आपल्या ग्रंथांच्या वाचकांस विनम्रभावानें विनंति केली आहे.–

" मी जातीचा मळीण वंश ॥ संस्कार नेणें मऱ्हाटीस ॥
नाहीं पाहिलें शास्त्र पुराण ॥ बोलों नाहीं शिकलों साळसूद वचन ॥

आणि खरोखरच बकरीं कापून उदरनिर्वाह करणारांच्या वंशांत जन्म पावून ज्या सत्पुरुषानें योगसंग्रामासारखे ग्रंथ रचले त्याची वाणी प्रासादिक आहे असें ह्मणणें भाग आहे. आतां त्यांच्या योगसंग्राम ग्रंथांतले एक दोन चांगलेसे उतारे देऊन हा भाग आटोपतों.

भाषा भिन्न भिन्न असल्या तरी ईश्वरस्मरणाचा मार्ग एकच आहे हें महंमदबावा सांगतात:––

" इकला इलाहा इल्लाल्ला ॥ हजरत महंमद रसुलल्ला ॥
या दोहीं चरणांत पाहिजे ओळखिला ॥ ईश्वर विश्वरूपें ॥ ६६ ॥
लाइला याची टीका अवधारा ॥ नामरूपा वेगळा ईश्वरा स्मरा ॥
तेणें शीघ्र भवनदीचा फेरा ॥ चुकेल बापा ॥ ६७ ॥
मुसलमान कहे जिकिर बुखानद ॥ मराठे ह्मणती कथेचा आनंद ॥
परी दोहीं भाषांचा भेद ॥ ईश्वर अल्ला जाणे ॥ ६८ ॥
ईश्वर ह्मणजे विश्वंभर ॥ दगडाचा नव्हे ओळखा जाहिर ॥
ज्यापासून असंख्य अवतार ॥ रामकृष्णादि जन्मले ॥ ६९ ॥

शेवटीं, पुढील काळीं काय होईल तें महंमदबुवा सांगतात:–

" हा निर्गम सांगों आगम विचारू ॥ घरोघरीं पाप होईल थोरू ॥
पाषांडभेणें निजयोगेश्वरू ॥ मौनें लपतील ॥

राजे सांडितील परमार्थ धर्मनीति ॥ पर्जन्यकाळीं पिकें सांडवेल क्षिती ॥
आचार भ्रष्टोन अठरा पगड जाती ॥ एकवट जेविती परियेसा ॥
कर्म चांडाळाची होईल मान्यता ॥ हरिभक्तांस पाहों न शकती तत्वता ॥
श्रवणीं पवित्र वार्ता ॥ साधु जनाची ॥ "

महंमदबावा महाज्ञानी होते. त्यांचा योगसंग्राम हा ग्रंथ फार उत्तम असून केवळ निगुर्णोपासनाभिमानी व अद्वैतमार्गी आहे. त्यांत विविध प्रकारची माहिती असून शेवटच्या अध्यायांत, भविष्यकाल किती भयंकर येणार, यासंबंधानें जी विस्तृत माहिती दिली आहे, ती मुद्दाम वाचण्यासारखी आहे, एवढें सांगून व महंमदबावांच्या स्वर्गस्थ आत्म्यास सप्रेम वंदन करून मी त्यांचें हें अल्प चरित्र येथें पुरें करितों.



# गोपाळनाथ मळगांवकर.

सत्पुरुषकथा अद्भुत रसदा ह्मणतों इलाच सुरभी मी ॥

मोरोपंत.

इसवीसनाच्या सतराव्या शतकांत देशावर जसे तुकाराम रामदासादि अनेक साधु व कवी निर्माण झाले तसेच कोंकणांतही झाले, परंतु महाराष्ट्रसाधुचरित्रकार महिपतिबावा हे देशावर राहणारे असल्यामुळें कोंकणपट्टींत होऊन गेलेल्या साधूसंबंधाची माहिती त्यांस उपलब्ध झाली नाहीं व त्यांच्या प्रसिद्धीस दुसरें कांहीं साधन नसल्यामुळें असे साधु व कवी आजपर्यंत अप्रसिद्ध राहिले. अशा साधु व कवींपैकीं गोपाळनाथ गोसावी मळगांवकर हे एक होत. त्यांचें चरित्र मी येथें देतों. हें चरित्र मी, त्यांच्या वंशजांकडून मिळालेली माहिती, खुद्द माझ्या गांवांत त्यांनीं केलेल्या एका चमत्काराची तिकडील प्रांतीं सुप्रसिद्ध असलेली आख्यायिका, तत्संबंधीं कवीचे स्वतःचे उद्गार व कवीचे उपलब्ध ग्रंथ यांच्या आधारानें लिहितों.

कोंकणांत मालवणापासून तीन कोसांवर परुळें या नांवाचा एक बराच मोठा गांव आहे. सुमारें अडिचशें वर्षांपूर्वी त्या गांवांत एक गौड ब्राह्मण रहात असे. हा गृहस्थ, त्याची बायको व एक मुलगा एवढींच कायतीं कुटुंबांतील तीन मनुष्यें; परंतु घरची अत्यंत गरिबी असल्यामुळें या लहानशा कुटुंबास आपले दिवस फार संकटानें घालवावे लागत. अशा स्थितींत कोंकणप्रांतीं मोठा दुष्काळ पडला. या दुष्काळानें त्या प्रांताचें फार नुकसान केलें असें सांगतात. आधींच अठरा विश्वे दारिद्र्य त्यांत भयंकर दुष्काळ, मग काय विचारतां ? केवळ अन्नान्न दशा होऊन वरील गृहस्थास हा मृत्युलोक सोडून जावें लागलें. मग त्या राहिलेल्या दोन मनुष्यांचें पालन पोषण अशा दुष्काळाच्या दिवसांत कोण करणार ? वेळेवर अन्न मिळालें तर मिळालें, नाहीं तर नाहीं, अशा रीतीनें कांहीं दिवस लोटले असतां कार्तिकाचा महिना आला. कार्तिकी एकादशीच्या उत्सवास पंढरपुरास जाणारे शेंकडों वारकरी लोक रात्रीच्या वेळीं भजन करीत, वरील गांवांतून जाऊं लागले असतां आईस असें वाटलें कीं मुलास घेऊन आपण या लोकांबरोबर पंढरीस जावें. मुलासही तो बेत पसंत पडतांच तीं दोघेंही वारकरी लोकांमागून चालूं लागलीं. एक

स्त्री व दुसरा लहान मुलगा, जवळ पैसा नाहीं, अशांची काळजी कोण घेणार ? परंतु त्या वारकऱ्यांत जे कोणी दयाभूत अंत:करणाचे होते त्यांनीं आपल्याबरोबर यांचीही व्यवस्था ठेविली. त्यावेळीं आतांच्यासारखीं प्रवासाचीं सुखकर सुलभ साधनें नव्हतीं. लांबचा प्रवास ह्मणजे बहुधा पायींच व्हावयाचा. तशांत देशस्थिति स्थिर नसल्यामुळें पेंढारी, ठग वगैरे लोकांपासून वाटसरू लोकांस फार उपद्रव होत असे. अशा लोकांपासून त्रास न व्हावा ह्मणून वारकरी, यात्रेकरू वगैरे लांब लांबचा प्रवास करणारे लोक मोठमोठे जमाव करून जात असत. असो. मजल दर मजल करीत आमचे वारकरी पंढरपुरास जाऊन पोंचले. महाक्षेत्र तें, त्याचा महिमा काय वर्णन करावा ? जिकडे तिकडे पताका फडकताहेत, टाळ, मृदंग, वीणा इत्यादि वाद्यांच्या तालावर हरिनामाचा घोष चाललेला आहे, प्रेमानें दंग होऊन नाचत असतां संतमंडळीची देहभानें उडून गेलीं आहेत, श्रीचंद्रभागेच्या पवित्र उदकांत स्नान करून शेंकडों भक्त श्रीपांडुरंगाच्या दर्शनास धांवत जात आहेत, गरुडपारांत तुकाराम रामदासांसारख्या सत्पुरुषांच्या कीर्तनरंगाची झांगड उडून राहिली आहे. कोणी एकमेकांचे हात धरून प्रेमभरानें रंगशिळेवर नाचत आहेत. पहावें त्याच्या गळ्यांत तुळशीची माळ आणि कपाळीं बुक्याचा मळवट भरलेला दिसत आहे, ब्राह्मण आणि धेड हे श्रेष्ठकनिष्ठ आणि आपपर हे प्रापंचिक भाव विसरून जाऊन, नको नको ह्मणत असतां एकमेकांच्या पायां पडत आहेत व एकंदरींत “ सुखासाठीं करिसी तळमळ ॥ तरि तूं पंढरेसी जाई एक वेळ ॥ ” या नामदेवांच्या अभंगांत वर्णिलेल्या खऱ्या सुखाचा प्रत्यक्ष अनुभव सर्व लोक घेत आहेत असा देखावा पाहून आमच्या गोपाळाच्या (हें त्या मुलाचें नांव होतें) मनावर फार चांगला सात्विक संस्कार झाला असावा यांत संशय नाहीं.

त्यावेळीं पंढरपूर ह्मणजे भूलोकींचें केवळ वैकुंठ बनलें होतें. तुकाराम, बोधलेबावा, वामन अशांसारखे महान् साधु तेथें आले होते. त्यांपैकीं बोधलेबावांचा आणि आमच्या चरित्रनायकांचा विशेष संबंध असल्यामुळें त्यांची थोडीशी माहिती येथें देणें योग्य दिसतें. पंढरपुरापासून १० कोसांवर धामणगांव ह्मणून एक गांव आहे. तेथें बोधलेबावा रहात असत. ते संसारांत असूनही केवळ विदेही वृत्तीनें राहून हरिभजनांत व इतर सत्कर्मांत आपला कालक्षेप करीत असत. त्यांना श्रीपांडुरंगाचा साक्षात्कार होत असे व त्यांनीं चमत्कारही पुष्कळ केले. त्यांपैकीं “जोंधळ्याच्या थोड्या

ताटांना कणसें आणिल्याचा चमत्कार" तर आबालवृद्धांस माहित आहे. खुद्द तुकाराम महाराजांनीं एका ठिकाणीं ह्मटलें आहे—

"भक्तांमध्यें भक्ति पहा त्या बोधल्यानें केली ॥ थोंड्या ताटांनां कणसें आलीं ॥"

एकंदरींत तात्पर्य काय कीं त्या वेळच्या साधुमंडळांत बोधलेबावा चांगले मान्य होते. त्यांच्या संबंधानें कोणास अधिक माहिती पाहिजे असेल तर त्यानें भक्तविजय ग्रंथ पहावा. बोधलेबावांची वाणी किती प्रासादिक आणि रसाळ आहे, हें, मला मिळालेल्या खालील दोनच पद्यांवरून वाचकांस कळून येईल:—

पद.

सांगड बांधारे भक्तीची ॥ रघुनाथनामाची ॥ ध्रु० ॥
संसारसागर सागर ॥ भरला जातो पूर ॥ १ ॥
लाटा उसळती विषयाच्या ॥ बहुत प्रपंचाच्या ॥ २ ॥
नरहरि बोधला, बोधिला ॥ हरिनामीं रंगला ॥ ३ ॥

अभंग.

देगा देवा तुझ्या चरणाची आवडी ॥ हेची कल्पकोडी जोड माझी ॥ १ ॥
नामाची हे प्रीति देई अखंडित ॥ तेथ माझें चित्त बैसो सदां ॥ २ ॥
नामावांचोनयां हित कांहीं दिसेना ॥ मन हें बैसेना आणिके ठायीं ॥ ३ ॥
बोधला ह्मणे देवा नाम तुझें सोपें ॥ दिधलें मायबापें कृपा करुनी ॥ ४ ॥

असो. कोंकणच्या वारकऱ्यांपैकीं एकाची बोधलेबावांशीं ओळख होती. त्यानें गोपाळासंबंधाची सर्व हकीकत त्यांस सांगितली. ती ऐकतांच बावांस त्याची फार दया येऊन, जातेवेळीं गोपाळास व त्याच्या आईस ते धामणगांवीं घेऊन गेले. बावांच्या सान्निध्यांत असल्यामुळें गोपाळास लिहितां वाचतां येऊं लागलें व हरएक कामांत त्याची बुद्धि चलाख व ओढा परमार्थाकडे असल्यामुळें बावांची त्याजवर पूर्ण कृपा असे. एके दिवशीं, आपणांस उपदेश द्या अशी त्यानें बावांस विनंति केली. बावांनीं जाणलें कीं उपदेश घेण्यास हा आतां योग्य झाला. मग त्यांनीं त्यास नाथसांप्रदायाप्रमाणें उपदेश देऊन साक्षात् पांडुरंगाची भेट करविली. या भेटीसंबंधानें बऱ्याच चमत्कारिक गोष्टी सांगण्यांत येतात. जनार्दनस्वामींनीं एकनाथस्वामीस श्रीदत्तात्रयाचें दर्शन करविलें त्यावेळीं दत्तात्रयांनीं ज्याप्रमाणें प्रथम यवनरूपानें प्रगट होऊन एकनाथांस संदेह उत्पन्न केला व नंतर आपलें खरें स्वरूप

दाखविलें तद्वत् पांडुरंगानें गोपाळनाथांस पहिल्यानें व्याघ्ररूपानें भिवविलें व नंतर आपलें खरें स्वरूप दाखविलें अशी आख्यायिका आहे. आतां गोपाळाचे गोपाळनाथ झाले.

कांहीं दिवसांनीं बावांनीं गोपाळनाथांस आज्ञा केली कीं आतां तुह्मीं आपल्या जन्मभूमीस जाऊन, लग्न करून प्रपंच करा, व जडमूढांचा उद्धार करून भक्तिमार्गाचा महिमा प्रगट करा. सद्गुरूंची आज्ञा शिरसा वंदन करून नाथ आपल्या मातेसह कोंकणप्रांतीं यावयास निघाले. जातेवेळीं बोधलेबावांनीं नाथांस एक विठ्ठलाची पालखी व पादुका देऊन सांगितलें कीं दरवर्षीं आषाढी एकादशीस पंढरीची वारी करीत असावें. तेथें तुमची, माझी व इतर संतांची भेट होईल. सद्गदित अंतःकरणानें बावांचा निरोप घेऊन नाथ निघाले ते पहिल्यानें पंढरीस आले. तेथें पांडुरंगाचें दर्शन घेऊन पुढें निघाले. नाथ, त्यांची मातुश्री व पालखीचे दोन भोई इतकी मंडळी सावंतवाडीस येऊन पोंचली. शहरांत एक मोठा तलाव आहे त्याच्या कांठीं या मंडळीनें मुक्काम केला.

ते पावसाळ्याचे दिवस होते. आर्द्रानक्षत्र गेलें तरी पाऊस पडावा तसा न पडल्यामुळें पिकें वाळत चाललीं होतीं व कोंकणांतील लोकांस दुष्काळ पडेल कीं काय अशी भीति पडली होती. सावंतवाडीचे राजेसाहेब श्रीमंत खेमसावंत यांनीं, शहरांत तलावाचे कांठीं, पर्जन्य पडावा ह्मणून शेंकडों ब्राह्मण अनुष्ठानास बसविले होते व शिवमंदिरांतून शंकरावर अभिषेक सुरु केला होता. हा प्रकार अवलोकन करून गोपाळनाथांनीं, राजेसाहेबांनीं त्या कामावर नेमिलेल्या अधिकाऱ्यास विचारलें "हें अनुष्ठान किमर्थ चालविलें आहे?" अधिकाऱ्यानें नाथांस सर्व हकीकत सांगितली. ती ऐकून नाथ ह्मणाले "या कर्ममार्गानें काय व्हावयाचें आहे? सर्व विश्वाचें नियमन करणारा जो परमेश्वर, ज्याच्या आज्ञेनें सूर्यचंद्र उगवतात, तो जर संतुष्ट होईल तर आतांच पर्जन्यवृष्टि होईल; तरी भक्तिपुरःसर त्याच्या नामाचा घोष करा." हें ऐकतांच "हे कोणीतरी सत्पुरुष असावे" असा तर्क करून अधिकाऱ्यानें हें नाथांचें भाषण राजेसाहेबांस कळविलें. राजेसाहेब सत्पुरुषांचे फार भुकेले असत. हें वृत्त कानीं पडतांच ते आपल्या सर्व अधिकाऱ्यांसह त्या ठिकाणीं प्रविष्ट झाले व त्यांनीं नाथांस साष्टांग नमस्कार घातला. नाथांनीं राजास आशीर्वाद देऊन "या अनुष्ठानानें पर्जन्य पडणें संभवनीय नाहीं. जर शहरांतील सर्व लोक येथें येऊन श्रीपांडुरंगनामाचा घोष करितील तर आतांच पर्जन्य पडेल" असें सांगितलें. राजे-

साहेबांनीं तात्काल अनुष्ठान बंद करण्याचा हुकूम केला व नाथाज्ञेप्रमाणें सर्व लोक जमवून नाथांबरोबर हरिभजनाचा मोठा कडाका चालविला. हा प्रकार सुरू होऊन दोन तास झाले नाहींत तोंच आकाशांत, एका मागून दुसरा, याप्रमाणें काळे भोर मेघ येण्यास प्रारंभ झाला व कांहीं वेळानें इतका पाऊस पडला कीं त्यामुळें सर्व तलाव पाण्यानें अगदीं भरून गेला व सर्वत्र पाणीच पाणी होऊन दुष्काळाची भीति अगदीं नाहींशी झाली.

हा चमत्कार पाहतांच राजेसाहेबांच्या मनांत नाथांसंबंधानें फारच पूज्यबुद्धि उत्पन्न झाली व त्यांनीं नाथांस पालखींत बसवून वाड्यांत आणिलें. राजेसाहेबांनीं नाथांच्या पायीं मस्तक ठेवून विनंति केली कीं आपला सविस्तर वृत्तांत ऐकावा अशी आमची इच्छा आहे. राजेसाहेबांची भक्ति पाहून नाथांस फार समाधान वाटलें व आशीर्वादपूर्वक त्यांनीं आपला सर्व वृत्तांत त्यांस निवेदन केला. राजेसाहेबांनीं, तत्क्षणींच, सावंतवाडीपासून एक कोसावर मळगांव या नांवाचा एक गांव आहे तेथील निम्मे उत्पन्नाची जमीन वंशपरंपरेनें उपभोगून, राज्यास क्षेम चिंतून, हरिभक्ति वाढवावी " अशा अर्थाची सनद नाथांस लिहून दिली व बरोबर कारकुन देऊन मळगांव मुक्कामीं नाथांची सर्व व्यवस्था लावून दिली. तेथें नाथांनीं आपलें लक्ष केलें व पांडुरंगाचें एक देवालय बांधून, कीर्तन व कविता यांच्याद्वारें कोंकणप्रांतांतील लोकांनीं लक्ष्य हरिभक्तीकडे वळविण्याचा प्रयत्न सुरू केला. त्यांनीं केलेले एक दोन चमत्कार येथें देतों.

आपल्या राज्यांत एक साधुपुरुष रहात आहे याबद्दल सावंतवाडीच्या राजेसाहेबांस मोठा आनंद वाटे. एके दिवशीं, राजवाड्यांत नाथांचें कीर्तन करवावें असें त्यांच्या मनांत आलें व त्याप्रमाणें त्यांनीं नाथांस निरोप पाठविला. पूर्वींच्या सत्पुरुषांस आतांच्या नामधारी हरिदासांप्रमाणें, बिदागी काय मिळेल, शिधा मिळेल किंवा नाहीं असली आशाबद्धत्वाची चौकशी करावयाची नसे. पैसा घेऊन हरिकीर्तन करणें हें महापातक होय असें ते समजत. तुकाराम महाराजांनीं तर एकेठिकाणीं स्पष्ट सांगितलें आहे:—

अभंग

जेथें कीर्तन करावें ॥ तेथें अन्न न सेवावें ॥ १ ॥

तुका म्हणे नये भाळा ॥ माळ घालूं नये गळां ॥ २ ॥

तट्टा वृषभासी दाणा ॥ तृण मागों नये जाणा ॥ ३ ॥

तुका ह्मणे द्रव्य घेती ॥ देती तेही नरका जाती ॥ ४ ॥

तर असें ह्मणणारे पूर्वींचे हरिदास कोणीकडे आणि आतांचे द्रव्यलंपट व विषयलंपट ' उदर भरणाचे बहुरूपी ' कथाकार कोणीकडे ? असो.

राजेसाहेबांचा निरोप पोंचतांच नाथांनीं " ठरविलेल्या वेळीं आह्मीं येतों " असा उलट निरोप पाठविला.

इकडे सावंतवाडीस, आज सत्पुरुषाचें कीर्तन होणार ह्मणून, राजवाड्यांत शेंकडो लोक जमले होते व फक्त नाथांच्याच आगमनाची सर्वजण वाट पहात होते. " तुह्मीं पुढें चला, मीं मागाहून येतों " असें सांगून कीर्तनप्रसंगीं आपल्यामागें उभें राहणाऱ्या मंडळीस नाथांनीं वाडीस पाठवून दिलें व आपण स्वानंदसुखाच्या भ्रमांत, कीर्तनास जावयाचें विसरून वाटेंतच एका झाडाखालीं भजन करीत बसले. इकडे राजवाड्यांत, नाथ आतां येतील, अंमळशानें येतील असें सांगून पुढें गेलेल्या त्यांच्या शिष्यमंडळीनें बराच वेळ काढिला परंतु " ब्म्हानंदीं लागली टाळी ॥ कोण देहातें सांभाळी ॥ " अशी ज्यांची स्थिति झाली होती ते नाथ कसचे येतात ? जर नाथ आले नाहींत तर आतां राजेसाहेबांचा खात्रीनें रोष होतो अशा काळजींत त्यांची शिष्यमंडळी दरवाजाकडे डोळे लावून बसली असतां, नाथ आले. कीर्तनास प्रारंभ झाला, व तें इतकें रसभरित झालें कीं, तें संपेपर्यंत श्रोतेमंडळी केवळ देहभावविरहित होऊन राहिली होती. कीर्तन संपल्यावर मंडळी घरोघर गेली व नाथ गुप्त झाले. शिष्य पाहतात तों नाथ नाहींत. ते इतक्यांत कोठें गेले याचा त्यांस कांहींच उमज पडेना. आसपास शोध केला परंतु नाथांचा पत्ता न लागल्यामुळें त्यांनीं मळगांवची वाट धरिली. गांवांत येऊन पाहतात तों झाडाखालीं नाथांची स्वारी भजनानंदांत निमग्न होऊन बसली आहे. हे इतक्यांत येथें कसे आले याचें शिष्यमंडळीस मोठें कोडें पडलें. त्यांनीं नाथांस विचारिलें कीं, आपण कीर्तनास यावयास फारच वेळ लाविला तेव्हां आह्मांस असें वाटलें कीं आपण आतां येत नाहीं, परंतु शेवटीं आपण आलां व कीर्तनही झालें; परंतु इतक्या थोड्या वेळांत आपण येथें कसे आलां याचें आम्हांस आश्चर्य वाटतें. हें शिष्यांचें भाषण ऐकतांच नाथ देहभानावर आले व " कीर्तन झालें ह्मणतां तर तें कोणी केलें ? " असें त्यांनीं शिष्यांस विचारिलें. शिष्य ह्मणाले कीं आपण केलें, दुसरा कोण करणार ?

नाथ ह्मणाले "तुह्मीं खोटें सांगतां. मी पंढरीनाथाची शपथ वाहून सांगतों कीं मी कीर्तनास येण्याकरितां ह्मणून घरून निघालों, परंतु बुद्धिभ्रंश होऊन, येथेंच बसलों तो हा अद्याप तसाच बसलों आहे." हें नाथाचें भाषण ऐकतांच शिष्य मोठ्या बुचकळ्यांत पडले. झालेला प्रकार काय होता तें कोणाच्याच ध्यानांत येईना. परंतु खरा प्रकार असा होता कीं कीर्तन करणारे गोपाळनाथ नसून पंढरीनाथ होते. श्रोत्यांस व शिष्यांस गोपाळनाथच आहेत असें दिसलें. परंतु ते खरे गोपाळनाथ नसून, ते वेळेवर न आल्यास राजेसाहेब कदाचित् रागावतील या भीतीनें, त्यांची लाज राखण्याकरितां पांडुरंगानें नाथांच्या रूपानें राजवाड्यांत कीर्तन करून आलेला प्रसंग टाळला व आपण अदृश्य झाला.

हा प्रकार बऱ्याच वेळानें ध्यानांत आल्यावर 'पंढरीनाथा ! माझ्याकरितां तुला श्रम सोसावे लागले ना ? शिव ! शिव !' असें ह्मणून नाथ ढळढळां रडूं लागले. कीर्तन करणारे गोपाळनाथ नसून पंढरिनाथ होते ही बातमी हां हां ह्मणतां सर्वत्र पसरून नाथांच्या साधुत्वाची फार प्रख्याति झाली.

सावंतवाडीपासून पांच कोसांवर समुद्रतीरीं आजगांव या नांवाचा एक गांव आहे. तेथें कोणी सोनार जातीचा श्रीमंत गृहस्थ रहात असे. या गृहस्थाचे घरीं प्रतिवर्षीं ललितापंचमीचा मोठा उत्सव होत असे. प्रत्येक वर्षीं देवीपुढें कीर्तन करावयास कोणीतरी नवा हरिदास आणावयाचा असा तेथें परिपाठ असल्यामुळें व नाथांच्या साधुत्वाची विशेष प्रख्याति झालेली असल्यामुळें यावर्षीं त्या गृहस्थानें कीर्तन करण्याविषयीं नाथांस विनंति केली. नाथ मोठ्या आनंदानें आले व श्री उपांगललितेची पूजा, आरत्या, मंत्रपुष्प व पग[illegible] प्रकार झाल्यावर म[illegible] [illegible] [illegible] ताप्रकारी, त्यांच्या सुमारास कीर्तनास उभे राहिले. [illegible] [illegible]नाचा विषय "अवघें पोटासाठीं सोंग । येथें कीर्तनाचें वर्णन कोण कर[illegible] [illegible] हा तुकाराममहाराजांचा अभंग होता. मंगलाचरण झाल्यावर [illegible]चा पा[illegible] [illegible] [illegible] अभंग ह्मणून नाथांनीं एकदम भागवत[illegible] एकादश स्कंधांतील:—

"सएषजीवो विवर [illegible] [illegible]णन घोषेण गुहां प्रविष्टः ।
मनोमयं [illegible] मुपेत्यरूपं । मात्रा स्वरावर्ण [illegible]तिर[illegible]निष्ठः ॥ १ ॥"

या श्लोकाच्या आधारानें अ[illegible] [illegible]ंगावयास प्रारंभ केला. [illegible] तें श्रोते मंडळीस काय होय ? त्यांत [illegible] [illegible]तेक तरुण व अशि[illegible] असल्यामुळें त्यांना

असलें अध्यात्म नको होतें. त्यांचा समज असा होता कीं, नाथ, करमणुकीकरितां कांहीं हास्यरसोत्पादक चुटके सांगतील व एखादें मनोरंजक आख्यान लावितील. परंतु त्यांची अगदींच निराशा झाली ! नाथांचें लक्ष्य श्रोत्यांकडे मुळींच नव्हतें. त्यांच्या अध्यात्माचा ओघ जो एकदां सुरू झाला तो तसाच चालला होता. कांहीं वृद्ध मंडळींचें मात्र तिकडे चित्त वेधून राहिलें होतें. आतां तर वरील तरुण मंडळी खरोखरच रागावली. कारण, त्यांची आतां अशी स्थिति झाली कीं, मध्यरात्रीपासून उजाडेपर्यंत जर हें अध्यात्म असेंच चालू राहिलें तर करमणूकही नाहीं व झोंपही नाहीं. बरें दुसरा एखादा हरिदास उभा करावा तर एकदां उभा राहिला, त्याला मध्येंच " पुरे कर " म्हणून सांगावें तर तेंही अप्रशस्त. मग आतां याला उपाय काय करावा याची भवति न भवति झाल्यावर नाथांची पुरी खोड मोडण्याकरितां, शेवटीं, सर्वानुमतें एक युक्ति पसंत ठरली. युक्ति ही कीं जेव्हां पहांटेस कीर्तन संपल्यावर कांकडे आरतीचा वेळ येईल तेव्हां यजमानानें मुळीं उठूंच नये. तोंपर्यंत सर्वांनीं झोंप घेत स्वस्थ पडावें, मग पाहूं यांचें हें अध्यात्म किती वेळ [illegible] तें. हा बेत ठरल्यावर, वरील मंडळींतील कित्येकांनीं, बसले होते तेथेंच पाय लांब केले, कित्येक उठून बाहेर गप्पा छाटीत बसले व कित्येक वृद्ध मनुष्यांच्या भिडेसाठीं निरुपायानें तेथेंच बसले.

नाथांनीं इकडे कीर्तनाचा पूर्वरंग संपवून उत्तररंगास प्रारंभ केला व आतां कीर्तन पुरें करावें असें वाटतांच रीतीप्रमाणें " हेंचि दान देगा देवा " हा अभंग म्हणून कांकडे आरती म्हणावयास प्रारंभ केला. सध्यांचे हरिदास यजमानाच्या मर्जीप्रमाणें कीर्तन करितात व तो सांगेल तेव्हां तें पुरें करितात. नाथांचें तसें नव्हतें, इतकेंच नव्हे, [illegible] म्हणतों खरी परंतु आरती घ्यावयास यजमान उठले आहेत किंवा नाहींत याचीही [illegible] चौकशी केली नाहीं. नाथ तर आरती म्हणत आहेत व यजमान तर आरती ओंवाळ[illegible] असें झाल्यावर नाथांना ठर उठविण्याकरितां [illegible] पडात बसलेली मंडळी तेथें येऊन दाखल झाली. परंतु कुत्सितांची गोष्ट सर्वांच्या [illegible] इच्छा कांहीं पूर्ण झाली नाहीं. कारण, चमत्कार असा झाला कीं देवीच्या पुढल्या [illegible] होती, ती आपोआप आपली जागा सोडून, हळूहळू चालत नाथांपर्यंत आली व [illegible] थोडा वेळ उभी राहून, पुनः [illegible] फिरून स्वस्थानीं जाऊ[illegible]भी राहिली. त्यावेळीं नाथांनीं खालील पद म्हणून हरिनामाचा गजर केला:—

पद.

पंढरिरायें समई चालविली ॥ ध्रु० ॥
रत्नाकरसिंधूतीरीं ॥ आजग्रामामाझारीं ॥
अग्निशिखयाचे घरीं ॥ कौतुक डोळां दाविलें ॥ १ ॥
आश्विनमासीं शुक्रवारीं ॥ कथेमाजी चतुःप्रहरीं ॥
* * * ॥ उपांग ललितेपुढें ॥ २ ॥
टवळें फिरे वरचेवर ॥ गमन करी स्थिर स्थिर ॥
पाहोनियां नारीनर ॥ ह्मणती कौतुक देवाचें ॥ ३ ॥
आकळे न कळे हें कोणा ॥ करितो पंढरीचा राणा ॥
गोपाळबोध लागे चरणा ॥ विठ्ठल ह्मणा स्वानंदें ॥ ४ ॥

हा चमत्कार पाहतांच जे वृद्ध व भाविक होते त्यांचीं अंतःकरणें प्रेमानें उचंबळून जाऊन, नेत्रांतून प्रेमाश्रूंच्या धारा वाहूं लागल्या व नाथांबरोबर त्यांनींही विठ्ठलनामाचा मोठा गजर चालविला. यावेळीं वरील कुटाळ मंडळींची स्थिति कशी झाली, त्याची कल्पनाच केली पाहिजे. त्यांस आपल्या कृत्याचा इतका पश्चात्ताप झाला कीं ते नाथांच्या पायीं लोळण घेऊन, त्यांची क्षमा मागूं लागले. परंतु नाथांनीं त्यांना असें सांगितलें कीं, यांत माझा कांहींच संबंध नाहीं. कर्ता करविता श्रीपांडुरंग समर्थ आहे. याकरितां तुह्मी त्याची क्षमा मागा. मी पामर तुह्मांस कशाची क्षमा करूं ? असें सांगून व देवीचा प्रसाद घेऊन नाथ आपल्या गांवीं निघून गेले.

यानंतर एकाच वर्षाचे आंत वरील सोनारास अत्यंत दारिद्र्यावस्था प्राप्त होऊन शेवटीं कांहीं रोगानें त्याच्या कुटुंबाचा समूळ नाश झाला. आतां या गोष्टीचा संबंध वरील गोष्टीशींच लावावयाचा, असें मी ह्मणत नाहीं; तथापि तिकडील लोकांचा समज असा आहे कीं, सत्पुरुषास छळल्यामुळें, ईश्वरी कोप होऊन त्या गृहस्थाचा असा नाश झाला असावा; एवढेंच नव्हे तर तेव्हांपासून हा कालपर्यंत त्या गांवांत एकही सोनार थोडे दिवससुद्धां सुखानें नांदूं शकत नाहीं असा प्रत्यक्ष अनुभव आहे.

गोपाळनाथ कोणत्या वर्षीं समाधिस्थ झाले याची माहिती मला मिळाली नाहीं. ते समाधीपर्यंत, गुर्वाज्ञेप्रमाणें प्रतिवर्षी पंढरीची वारी करीत असत व त्यांचे बरोबर, कोंकणपट्टींतून, शेंकडो लोक पंढरपुरास जात असत. नाथानंतर त्यांचा वंश बराच वाढला व त्यामुळें हल्लीं, मळगांवांत नाथांच्या वंशजांचीं पांच सहा घरें झालीं

आहेत. त्यांच्यांत अद्याप पंढरीची वारी चालू असून, पालखीबरोबर, दरवर्षी, शेंकडो लोक जातात. हे नाथांचे वंशज शेती करणारे असून कोणाची मराठी तिसरी इयत्ता पुरी झाली आहे तर कोण चवथ्या इयत्तेंत होता, इतकें त्यांना शिक्षण मिळालें आहे, परंतु हातीं फक्त वीणा घेऊन, त्यांच्यांतील एखादा पंधरा वर्षांचा मुलगा जरी कीर्तन करूं लागला तरी रंगदेवता अशी उभी राहते कीं श्रोते कितीही विद्वान् असोत, डोलूं लागलेच पाहिजेत. मळगांवीं नाथांची समाधि असून भाविक लोक, आषाढमासीं तेथें गोपाळकाल्याचा मोठा उत्सव करितात.

येथपर्यंत गोपाळनाथांच्या चरित्राचें कथन झालें. आतां त्यांनीं कवी या नात्यानें मराठी भाषेची जी सेवा केली आहे, तिचें येथें दिग्दर्शन करितों. गोपाळ-नाथांनीं लिहिलेली अशी, स्कंदपुराणांतर्गत पांडुरंगमाहात्म्य, अध्याय ५ ओंवीसंख्या सुमारें ६००; प्रकाशबोध या नांवाचा एक वेदांतपर ग्रंथ, ओंवीसंख्या २०२, बालक्रीडा, ओंवीसंख्या २५० व इतर पदें, अभंग, भूपाळ्या वगैरे फुटकळ कविता बरीच आहे. इतर जुन्या महाराष्ट्र कवींप्रमाणें यांची कविता पूर्ण प्रासादिक असून तींत फारसे कठिण शब्द नाहींत. ज्याप्रमाणें एकनाथांनीं आपल्या कवितेंत आपला व आपल्या गुरूचा "एकाजनार्दन" या नांवानें उल्लेख केला आहे त्याचप्रमाणें गोपाळनाथांनीं "गोपाळबोध" किंवा "बोधगोपाळ" या नांवानें आपला व आपल्या गुरूंचा उल्लेख केला आहे. "बोध" हें पद बोधलेबावांचें निदर्शक होय हें वाचकांच्या ध्यानांत आलेंच असेल. आतां मासल्याकरितां त्यांच्या कवितांतील थोडेसे वेंचे येथें देऊन हा लेख संपवितों.

आईबापांची सेवा न करितां तीर्थयात्रेस जाणाऱ्या पुंडलिकासंबंधानें नाथ आपल्या पांडुरंगमाहात्म्यांत लिहितात:—

ओंव्या.

थुंकुनी सांडी अमृत ॥ मृगजलापाठीं धांवत ॥
नवनिधी असतां घरांत ॥ भिक्षा इच्छित अभागी ॥ ५४ ॥
मातापिता गंगाकाशी ॥ ज्येष्ठबंधु तीर्थराशी ॥
गुरुस्वामी प्रयागासी ॥ पूर्वजांसी उद्धरणें ॥ ५५ ॥
सत्य बोलावें, शुद्ध स्नान ॥ अतित अभ्यागत देवतार्चन ॥
पूजितां गो ब्राह्मण ॥ तीर्थें जाण घरिंच्या घरीं ॥ ५६ ॥

सर्व भूतीं समदया ॥ अन्नदान घडे जया ॥
घरीं तीर्थे त्याचीया ॥ विसावया येतील ॥ ५७ ॥
भावार्थ धरूनी अंतरीं ॥ रामनाम जपे वैखरी ॥
मातेसमान परस्त्री ॥ तो एक संसारीं तीर्थराज ॥ ५८ ॥

पांडुरंगमाहात्म्य, अध्याय ३

खऱ्या तीर्थयात्रेची किती उदात्त व्याख्या ही ! नाथ सत्पुरुषांचा महिमा वर्णन करितातः—

साधुआश्रम तो पुण्यपावन ॥ साधुआश्रम तो वैकुंठभुवन ॥
साधुआश्रमीं होय समाधान ॥ जोडे निधान परत्रींचें ॥ ६१ ॥
अनंत जन्मींचें जोडे पुण्य ॥ तरी होय साधूचें दर्शन ॥
साधुदर्शनें होय उद्धरण ॥ पूर्वजांसी जाण स्वर्गवास ॥ ६२ ॥
विनवितसे गोपाळबोधु ॥ धन्य तो सद्गुरुराज साधु ॥
पूर्ण करी मनासि बोधु ॥ तोडी भवकंदु जन्मांतरींचा ॥ ६३ ॥

पां. मां., अध्याय ३.

नाथ पतिव्रतेचा धर्म सांगतातः—

स्त्रियांचा पतिव्रताधर्म ॥ भ्रतार तोची परब्रह्म ॥
देव तीर्थ दुजें कर्म ॥ न घेती नाम वैखरी ॥ ९ ॥
भ्रताराविणें तयांसी ॥ दुजा देव तीर्थ नाहीं परियेसीं ॥
ते पतिव्रता उद्धरी जगासी ॥ तिचे भेटिसी तीर्थे येती ॥ १० ॥

**पां. मा. अध्याय ४**

जोंपर्यंत आपलें मन हातीं आलें नाहीं तोंपर्यंत जपतपादि कर्मे केवळ निरर्थक होत हें नाथ सांगतात—

" नाहीं स्वरूपाची ओळखण ॥ आणि डोळे झांकुनी करिती ध्यान ॥
तें ध्यानची झालें नागवण ॥ रोकडी हानी आयुष्यासी ॥ २९ ॥
हाता आलें नाहीं निजमन ॥ वरपांग करिती ध्यान ॥
तें ध्यानची झालें विघ्न ॥ होय नागवण स्वहितासी ॥ ३० ॥

खालील भगवद्भाषण मनन करण्यासारखें आहे—

एक चंद्र पुरे सृष्टी ॥ काय कीजे उडुगणें कोटी ॥
एक सुपुत्र उद्धरी सृष्टी ॥ इतर गोष्टी काय काज ॥ ३७ ॥
एक पुरे पतिव्रता ॥ काय कीजे इतर लक्ष वनिता ॥
एक साधु जगाच्या हिता ॥ इतर वार्ता काय काज ॥ ३८ ॥
काय कीजे चोराची नगरी ॥ आत्मघातकी दुराचारी ॥
भक्तांविणें संसारीं ॥ कीर्ति चराचरीं माझी नव्हे ॥ ३९ ॥
भक्त माझें निधान ॥ भक्त माझें पावन ॥
भक्त माझे जीवप्राण ॥ करीं निंबलोण मी त्यांसी ॥ ४० ॥
भक्त माझ्या जीवाचे जीव ॥ भक्त माझ्या देवाचे देव ॥
भक्तांविणें वस्तीसि ठाव ॥ सर्वदा पहा हो मज नाहीं ॥ ४१ ॥

पंढरीच्या माहात्म्यासंबंधानें नाथ ह्मणतात—

हे मुक्तिची नगरी ॥ अनुपम महिवरी ॥
निर्माण केली साजिरी ॥ तारक पंढरी तिहीं लोकीं ॥ ५४ ॥
हें संतांचें जीवन ॥ पतितांचें पावन ॥
मोक्षाचें हें निधान ॥ हें जगज्जीवन पंढरपूर ॥ ५५ ॥
जन्मासि आलिया मेदिनी ॥ एकवेळ पहावी नयनीं ॥
सायुज्याची निशाणी ॥ लाविली होय त्याणें ॥ ५६ ॥

पांडुरंग मा०, अध्याय ५.

ज्याप्रमाणें वामनपंडित वगैरे इतर सत्पुरुषांनीं, आपण लिहिलेली कविता ही आपली स्वतःची नसून परमेश्वरानें ती आपल्याकडून लिहविली, असें ह्मटलें आहे, त्याप्रमाणेंच नाथही ह्मणतातः—

गोपाळबोध विनवी संता । मी अज्ञान नव्हे कर्ता ॥
पुरातन हे आदिकथा । लिहिता सांगता पांडुरंग ॥ ६० ॥

पांडु. मा० अ० ५

गुरूंनीं उपदेश दिला तेव्हां, आपली कशी स्थिति झाली त्याचें वर्णन नाथ करितात–

पद.

नवल अद्भुत मोठें वाटे विस्मय ।
निजात्म कळाजोतिप्रभा सांगतां नये ॥ ध्रु० ॥
देहबुद्धि विराली ज्ञानेंद्रियें दचकलीं ।
उदयो ना अस्तु पूर्ण कळा फांकली ॥ १ ॥
नव्हे चांद चांदणें उष्णातीत शीतळ ।
तेजाचें निजतेज कोटी रवी कल्लोळ ॥ २ ॥
सद्गुरुकृपेनें हें सुख प्राप्त जाणा ॥
गोपाळबोध शरण सद्गुरुचरणा ॥ ३ ॥

नाथ पूर्ण अद्वैतमतवादी होते. खऱ्या देवासंबंधानें लिहितांना, त्यांनीं आपल्या प्रकाशबोध ग्रंथांत, ब्रह्मा, विष्णु व शंकर यांच्याही पलीकडे तो आहे, असें स्पष्ट ह्मटलें आहे–

ब्रह्मा करी सृष्टीकर्म ॥ प्रतिपादी आचारधर्म ॥
तरी तयासी हें दुर्गम ॥ वस्तु नाम न घेववे ॥ २५ ॥
जो कां आदिविष्णु आपण ॥ करी सृष्टीपालन ॥
तयासी वस्तुचें परीक्षण ॥ करावया सामर्थ्य नसे ॥ २६ ॥
जो कां सदाशिव तापसी ॥ संहार करी सृष्टीसी ॥
तया परीक्षा तेथींची ॥ सांगावया सामर्थ्य नसे ॥ २७ ॥
अनंत ब्रह्मांडें रोमाग्रीं ॥ ते आदिमाया अवधारीं ॥
पहातां शिणलीं नेत्रीं ॥ परी निजस्वरूप लक्षेना ॥ २८ ॥
ज्याचेनी सत्तामात्रें ॥ चंद्रसूर्य उजळे समग्र ॥
जो कां सर्वांगीं अगोचर ॥ सांगतां नये ॥ २९ ॥
जें कां शुद्ध ब्रह्म जाण ॥ चैतन्य इच्छा तयापासोन ॥
तें अगम्य सर्वांसी आपण ॥ लक्षितां संपूर्ण अलक्ष्य ॥ ३० ॥

# देवदास.

" मज दास करीं त्याचा ।
संतदासाच्या दासाचा ॥ १ ॥ "

तुकाराम.

देवदास हे श्रीसमर्थ रामदासस्वामीचे एक शिष्य होत. यांचा मठ देगांव येथें आहे. हे समर्थांच्या पश्चात् कांहीं वर्षें हयात होते. देवदास यांस 'देवीदास' ह्मणण्याचा संप्रदाय आहे, परंतु हल्लीं यांचे कांहीं मराठी व हिंदुस्थानी श्लोक मिळाले आहेत, त्यांचे शेवटीं त्यांनीं आपलें नांव 'देवदास' असें दिलें आहे व ज्याअर्थीं ते कोणत्याही देवीचे भक्त असल्याचा कोठेंही उल्लेख नसून, त्यांचा कुलदेव गिरीचा व्यंकटेश होता त्याअर्थीं देवदास हेंच त्यांचें खरें नांव असावें असें वाटतें. यांचा काळ अमुकच असें स्पष्ट लिहितां येणें तूर्त तरी अशक्य आहे. तथापि ते समर्थांशीं समकालीन असून त्यांनीं आपल्या 'करुणामृत' स्तोत्रांत दिलेल्या संवत्सरावरून, ते शके १६०८ ह्मणजे इ. स. १६८६ च्या सुमारास विद्यमान होते, असें समजण्यास हरकत नाहीं. कविचरित्रांत लिहिलें आहे कीं कवितेच्या रचनेवरून व भाषापद्धतीवरून देवदास हे मुक्तेश्वरांशीं समकालीन होते असें वाटतें; परंतु यांनीं लिहिलेल्या 'करुणामृत किंवा संतमालिका' नामक स्तोत्रांत, ज्या अर्थीं मुक्तेश्वरांचें व त्या नंतर होऊन मेलेल्या साधूंचींही नांवें आलीं आहेत त्या अर्थीं हे मुक्तेश्वरांनंतर बऱ्याच वर्षांनीं होऊन मेले असावे हें उघड होतें. माझे मित्र रा. रा. पांगारकर यांस तळेगांव येथें या कवीच्या व्यंकटेशस्तोत्राची, शालीवाहन शके १६५५ या वर्षी लिहिलेली एक प्रत मिळाली आहे. या कालाच्या पूर्वीं फार तर ४०।५० वर्षें तें स्तोत्र रचण्यांत आलें असावें असा विद्वानांचा तर्क आहे. हें स्तोत्र ज्यानें वाचिलें नाहीं असा मनुष्य मराठी भाषा बोलणारांत विरळाच सांपडेल. हें पराकाष्ठेचें मधुर, प्रेमळ व भक्तिरसपूरित आहे. इंग्रजींतल्या National Psalms प्रमाणें मराठी स्तोत्र रत्नाकर कोणी केला तर त्यांत हें शिरोभागीं ठेविलें पाहिजे. या स्तोत्रांत भगवंताला करुणारवानें आळवून, इतक्या साध्या मागण्या मागितल्या आहेत कीं, त्या साधेपणामुळेंच त्याला विलक्षण माधुर्य आलें आहे. हें स्तोत्र फार लोकप्रिय आहे, इतकेंच नव्हे

तर मराठी भाषेंतील उत्तम कवितेचा तो एक मासला आहे. या स्तोत्राच्या आजवर कित्येक आवृत्ति निघाल्या आहेत त्यांत या स्तोत्राची ओवीसंख्या १०८ आहे. परंतु एका जुन्या दप्तरांत या स्तोत्राची एक हस्तलिखित प्रत मला आढळली, तींत १०९ ओंव्या असून त्यांतील शेवटच्या ओंवीचा शेवटचा चरण, ' भास्करसुत विनंति करीतसे ' असा आहे. छापील व्यंकटेशस्तोत्रांत १०८ ओंव्या आहेत, तळेगांवीं मिळालेल्या प्रतींत १०७ आहेत व मला मिळालेल्या प्रतींत १०९ आहेत. यामुळें, या स्तोत्राची मूळ ओंवीसंख्या काय आहे हें ठरविणें कठिण झालें आहे. परंतु वरील चरणावरून देवदास यांच्या तीर्थरूपांचें नांव भास्कर होतें, असें साधारणपणें अनुमान करावयास हरकत नाहीं. या व्यंकटेशस्तोत्राचा महाराष्ट्रांतील पुष्कळ भाविक लोक नित्यपाठ करितात. जुनीं १०० दप्तरें सोडून पाहिल्यास त्यांतील ५० दप्तरांत तरी हें स्तोत्र खचित आढळेल. या स्तोत्राची जी प्रत तळेगांवीं मिळाली ह्मणून वर लिहिलें आहे, ती प्रत तुकारामहाराजांचे १४ पट्ट शिष्यांपैकीं एक संताजी तेली जगनाडे यांच्या मुलाच्या हातची आहे. एकंदरींत हें व्यंकटेश स्तोत्र, महाराष्ट्राचें राष्ट्रीय स्तोत्र ह्मणण्यास हरकत नाहीं.

या कवीचा दुसरा ग्रंथ ह्मटला ह्मणजे, ' संतमालिका अथवा करुणामृतस्तोत्र ' हा होय. या स्तोत्रांत देवदासांनीं, आपल्या पूर्वीं होऊन गेलेल्या पौराणिक व अर्वाचीन सत्पुरुषांची नामावळी दिलेली आहे. अशीं नांवें, या स्तोत्रांत, सुमारें १३० असून त्यांत बहुतेक ऐतिहासिक सत्पुरुषांचीं ~~नांवें आलेलीं आहेत, तथापि एकनाथांचे~~ गुरु जनार्दन, दासोपंत, भानुदास वगैरे कांहीं सत्पुरुषांचीं नांवें या नामावळींत आढळत नाहींत. हें स्तोत्र व्यंकटेशस्तोत्राइतकें जरी प्रसिद्ध व लोकप्रिय नाहीं तरी एकंदरींत त्याचीही रचना फार सरस आहे. या स्तोत्राच्या ओंव्या १४६ आहेत.

या दोन स्तोत्रांशिवाय, या कवीचे कांहीं मराठी व हिंदुस्थानी श्लोक व कांहीं पदें, एवढी कविता उपलब्ध आहे. देवदास हे मोठे भगवद्भक्त होते व त्यांस श्रीव्यंकटेशाचा साक्षात्कार होत असे, असें सांगतात.

व्यंकटेशस्तोत्रांतील खालील ओंव्यांत करुणरस कसा भरून राहिला आहे !

' लक्ष्मी तुझे पायांतळीं । आह्मी भिक्षेसि घालेनि झोळी ।
येणें तुझी ब्रीदावळी । राहील कैसी गोविंदा ? ॥ १ ॥
कुबेर तुझा भांडारी । आह्मां फिरविसी दारोदारीं ।
यांत पुरुषार्थ मुरारी । काय तुजला पैं आला ! ॥ २ ॥

द्रौपदीसी वस्त्रें अनंता । देत होतासी भाग्यवंता ।
आह्मांलागीं कृपणता । कोठुनी आणिली गोविंदा ? ॥ ३ ॥
समर्थांचे घरींचें श्वान । त्यास सर्वही देती मान ।
तैसा तुझा ह्मणवितों दीन । हा अपमान कवणाचा ॥ ४ ॥

' संतमालिका ' स्तोत्रांत एक ओंवी अशी आहे:—

' काशियासी दिधलें लक्षघर । आई आदिपुरुषा दिधला वर ।
मोरेश्वराचा बडिवार । वाढविला त्वां गोविंदा ॥ १ ॥ '

या ओंवींतील, ' आई आदिपुरुष ' या नांवावरून पंत प्रतिनिधी यांच्या ऐतिहासिक पत्रव्यवहाराच्या शिरोभागीं ' श्री आई आदिपुरुष ' असें जें नांव आढळतें, त्याची आठवण होते. असें वाटतें कीं, पंत प्रतिनिधीच्या वंशांत ' आई आदिपुरुष ' या नांवाचे कोणी सत्पुरुष होऊन गेले असावेत किंवा त्यांच्या वंशातील कोणी पुरुषानें, त्या नांवाच्या सत्पुरुषापासून उपदेशग्रहण केलें असावें.

मुक्तेश्वरांनीं ' भारतटीका ' लिहिल्याचा, या करुणामृत स्तोत्रांत, देवदासांनीं उल्लेख केला आहे. या स्तोत्राच्या शेवटीं कवि परमेश्वरास अनुलक्षून ह्मणतातः—

' ऐसे गुण कोठें अपार । न वर्णवे तुझा पार ।
महिमा अगोचर । देवा तुझी सर्वथा ॥ १२१ ॥
दीनानाथ तूं श्रीहरी । काय वर्णूं तुझी थोरी ।
भक्तालागीं चराचरीं । इच्छेसारिखा तूं होसी ॥ १२२ ॥
कोण्हास होऊन गुरुरूप । ब्रह्मस्थितीचा करिसी साक्षेप ।
कोण्हास लाऊनि ज्ञानदीप । प्रकाश करिसी परिपूर्ण ॥ १२३ ॥
कोण्हास दाखविसी स्वरूपस्थिती । कोण्हाची फेडिसी अज्ञानभ्रांति ।
कोण्ही एका सगुण मूर्ति । होऊनियां प्रगटलासी ॥ १२४ ॥
कोण्हास दाखविसी भजनसंभ्रम । कोण्हास ह्मणसी ह्मणा नाम ।
कोण्हा एकासी वैकुंठधाम । वस्तीलागीं देतोसि ॥ १२५ ॥
भक्तालागीं अनंत अपार । अनंतरूपीं तूं साचार ।
गिरीवरी निरंतर । व्यंकटेशरूपी विलससी ॥ १२६ ॥
पंढरीस होऊनि पांडुरंग । धरिला पुंडलिकाचा संग ।
तोची शेषाचळीं श्रीरंग । भक्तांलागीं रक्षिसी ॥ १२७ ॥

या ओंव्यांपैकीं ' कोण्हास होऊन गुरुरूप । ब्रह्मस्थितीचा करिसी साक्षेप । ' ही ओंवी, देवदासांनीं वामनपंडितांस अनुलक्षून लिहिली असावी, असें वाटतें. देवदास हे वामनाशीं समकालीन असून, वामनास प्रत्यक्ष भगवंतानें गुरूपदेश दिला ' या आख्यायिकेच्या सत्यत्वास, देवदासांच्या वरील ओंवीमुळें बळकटी येते, हें लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे. असो. या कवीच्या वर दिलेल्या दोन्ही स्तोत्रांची भाषा, उपोद्धात व उपसंहार, अगदीं एकसारखे आहेत. दुसऱ्या स्तोत्राच्या उपसंहारांत, सांगितल्याप्रमाणें, संतचरित्रांच्या वाचनानें काय फायदे होतात यासंबंधानें काव्येतिहाससंशोधनपटु रा. रा. वि. का. राजवाडे लिहितात: ' थोर पुरुषांचीं ह्मणजे संतांचीं चरित्रें वाचल्यानें विपन्न प्राण्यांना मोक्ष अथवा मुक्ति प्राप्त होते असें देवदास ह्मणतो. थोर पुरुषांवर आलेलीं संकटें, त्यांतून मुक्त होण्यासाठीं त्यांनीं केलेले प्रयत्न व त्यांत असतांना त्यांनीं दाखविलेलें धैर्य हें पाहून व मनन करून, कोणता प्राणी बंधमुक्त होणार नाहीं? संतचरित्रें मनन केल्यानें मानसिक आधि तर नाहींशा होतातच, परंतु शारीरिक व्याधींच्या वेदनाही कमी होतात असा कवीचा अभिप्राय आहे. ह्या शेवटच्या विधानाच्या समर्थनार्थ पूर्वेकडील व पश्चिमेकडील प्राचीन व अर्वाचीन इतिहासांतून शेंकडो दाखले साक्षेपी वाचकांस आढळतील. '[१]

व्यंकटेशस्तोत्र हें महाराष्ट्राचें जसें राष्ट्रीय स्तोत्र होय तसेच देवदास हे महाराष्ट्राचे राष्ट्रीय कवि होत. संभाजी व राजाराम यांच्या काळीं या कवीनें काढिलेले त्वेषाचे उद्गार जरी आज महत्त्वाचे नाहींत तरी ते तत्कालीन महाराष्ट्रजनांच्या वृत्ति दर्शविणारे असल्यामुळें, त्यांतील कांहीं उद्गार येथें देतों:—

### भुजंगप्रयात.

' अहा रे ! अहा ! तूं मुसल्मान वेडा । मसीदींत जावूनि कां हाक फोडा ॥
हका मारितां ऐकतो काय अल्ला ? । मुलाना उगा वडवडोनि मेला ! ॥ १ ॥
अहा व्यर्थ तुर्का ! कळेनाचि मूर्खा । तुह्मी पांच वेळां जिकिर्ते करा कां ? ॥
नमस्कार कां रे ! दिशा पश्चिमेसी । तिन्हीही दिशा ओस झाल्या तुह्मांसी ॥ २ ॥
अरे ऐक तुर्का ! जिबेका करीतां । जिता जीव तो गाय मारोनि खातां ॥
अह्मांसारिखें अन्नही भक्षितां रे । तरी कां तुह्मी जीवहत्या करा रे ? ॥ ३ ॥

१ ग्रंथमाला, वर्ष १० अंक ३ ( जून १९०३ ).

मुसल्मान तूं सांग, सुंता करी कां ? । कळेना तुह्मां, इंद्रिय कापितां कां ? ॥
मुळीं जन्मला जो जधीं काय होता । विटंबूं नका रे ! वृथा कष्टवीतां ॥ ४ ॥
अहा ! काय तुर्कीमधें बंध नाहीं ! । स्वजाती विजाती पहानाचि कांहीं ! ।
सुखें बैसती जेवती एक होती । नसे नेम कांहींच रे ! नीच याती ॥ ५ ॥

देवदासांचे हिंदुस्थानी श्लोक कसे आहेत ते पहा:—

' कही बात येही सही बह्मनकी । अछीसी भली है रहा बी इनोकी ॥
तुमारा हमारा खुदा येक भाई । कहे देवदासो नहीं बे जुदाई ॥ ६ ॥
हमारे गुरूनें अकल्सें बताया । निराकार अल्ला मुजोमें मिलाया ॥
तनोमे नियाराम बोसें किया है । कहे देवदासा इलायी सही है ॥ ७ ॥
न तारे मुजे तै गया ब्रीद तेरो । नछोड्ड कबोही पगोसे उघारो ॥
न जावू मयी जाय गा नाम तेरा । कहे देवदासा बडो राम मेरा ॥ ८ ॥
अकल्से बडी बस्त भाई नही रे । अकल् क्याहि बाताल्हि जो दिल्ल मोरे ॥
अकल्बिन् चलेसो अग्यानी सही रे । कहे देवदासा अकल्सें चलो रे ! ॥ ९ ॥

वर दिलेल्या मराठी श्लोकांत, मुसलमान लोकांवर, त्यांच्या धर्मांवर, आचार-विचारांवर देवदास मोठ्या त्वेषानें तुटून पडले आहेत ! परंतु ह्या हिंदुस्थानी श्लोकांत ' तुमारा हमारा खुदा एक भाई ! । कहे देवदासो नहीं बे जुदाई ॥ ' अशा शद्बांनीं, मुसलमान भाईशीं पुनः तडजोड करण्याचाही प्रयत्न केला आहे.

प्रख्यात संतचरित्रकार व प्रेमळभक्त उद्धवचिद्घन हे देवदासांचे समकालीन होते. या शिवाय ' उद्धवसुतकृत रामदासचरित्रांत, देवदासांचे तीन अभंग आढळले ते असे:—

१

वाराणसी क्षेत्र थोर । तेथें लोक जाती फार ॥ १ ॥
परि तेथें अधिक काय । ऐसें विचारोनी पाहें ॥ २ ॥
जेथें तेथें देवधोंडा । तो कां आपुले गांवीं सांडा ॥ ३ ॥
येथें लोक तेथें लोक । अवघें एकचि उदक ॥ ४ ॥
देवीदास ह्मणे वेडें । तीर्था धांवे अवघ्यांपुढें ॥ ५ ॥

२

तीर्थी जाती देखोवेखीं । तेथें कैसी होत पाखी ॥ १ ॥
पाप गेलें पुण्य जालें । प्रत्ययासी कैसें आलें ॥ २ ॥
ह्मणती जाऊं वैकुंठासी । कैसें येतें प्रत्ययासी ॥ ३ ॥
देवीदास ह्मणे हित । कैसें जाहलें स्वहित ॥ ४ ॥

३

दाढी डोई भादरिती । केंस मागुते निघती ॥ १ ॥
शुचिष्मंत जाला कैसा । विवेक पाहाना कां ऐसा ॥ २ ॥
देवासाठीं तीर्थी जाती । तरि कां मागुते फिरती ॥ ३ ॥
देवीदास ह्मणे भ्रम । ज्ञानेविण अवघा श्रम ॥ ४ ॥

वरील अभंगांत, देवीदास असाच पाठ असल्यामुळें तोच मी येथें कायम टेविला आहे. तीर्थयात्रेसंबंधानें इतकें विचारौदार्य प्रकट केल्याबद्दल, त्यावेळच्या कर्मवादी भटाभिक्षुकांनीं, देवदासांचा छळ कसा केला नाहीं, याचेंच आश्चर्य वाटतें. अथवा वरील अभंगांत, देवदासांनीं, तीर्थयात्रेची आंधळी तरफदारी करणारांस जे प्रश्न विचारिले आहेत, त्यांचीं सप्रमाण व समर्पक उत्तरें देण्याचें काम फार विकट असल्यामुळेंच, त्या भानगडींत त्यावेळचे कर्मठ ब्राह्मण पडले नसावेत, असें वाटतें. वास्तविक पाहतां, दोनशें वर्षांपूर्वींच्या धर्मवेड्या व दुरभिमानी ब्राह्मणसमाजापुढें, अशा प्रकारचें कडक भाषण करावयाचें, ह्मणजे कांहीं सामान्य मानसिक धैर्याचें काम नव्हे. परंतु आमच्या साधुसंतांनीं हें काम इतक्या प्रशंसनीय रीतीनें बजाविलें आहे कीं, त्याबद्दल त्यांचें कौतुक करावें तेवढें थोडेंच होईल. ' आली सिंहस्थ पर्वणी । न्हाव्या भटां झाली धणी ' या अभंगांत तुकारामांनीं व ' हमारा तीरथ कौन करे । मनमों गंगा मनमों काशी । भटकत कौन फिरे । ' या पदांत कबीरांनीं, देवदासांच्याप्रमाणेंच आपलें मत दिलें आहे. त्याचें ह्मणणें कीं, जर अंगीं ज्ञान बाणलें नसेल तर तीर्थयात्रा व व्रतोद्यापनें वगैरे धार्मिक प्रकार केवळ भारभूत होत. अंतःशुद्धिवांचून बाह्यशुद्धि ही केवळ वांझवृक्षासारखी आहे. यासाठीं सारासारविचारपूर्वक मुमुक्षूनें पहिल्यानें ज्ञान संपादन करावें. अस्तु.

देवदासाचें पुढील पद तर प्रसिद्धच आहे.

पद. ( बेहाग—दादरा. )

'नको नको स्त्रीसंगनामग्रहण सर्वथा ।
शुक ह्मणे परीक्षितीसी ऐक भारता ॥ ध्रु० ॥
मुक्ततेसि पाश दोन द्रव्य हे सुता ।
त्यांतही अनर्थ जाण स्त्रीच तत्वता ॥
चाल—स्त्रीमुळें बहूत नाश । लिंगपतन शंकरास ।
शिरःपात ब्रह्मयास । विष्णुला स्मशानवास ।
वासवासि भगांकित देह तत्वता ॥ १ ॥
मरण त्या विरोचनासि पांडु दशरथा ।
नपुंसकत्व अर्जुना, विटंब जयद्रथा ।
कुलक्षय दशाननासि कौरवांसि त्या ॥
चाल—कलंक त्या निशिकरासि । किरणलोप भास्करासि ।
वैर वाळि सुग्रिवासी । अति अनर्थ यादवांसी ।
मृगत्वजन्म सोमदत्तिला ॥ २ ॥
कपाट स्वामि कार्तिकासि वध जटायुला ।
बलाढ्य सुंदोपसुंद कीचका नळा ।
मलहदक्ष बाण हो माजि नृपकुळा ॥
चाल—परम उग्र तापसी । पराशरादि राजर्षि ।
ऋष्यशृंग गौतमादि । असंख्यात प्रौढ प्रौढ ।
पर्ण—वायु—जल—फलाशनी ।
त्यक्त विषय अचळ वसति गिरिगुहासनीं ।
त्यांत भ्रष्ट किती अनर्थ प्रळय त्रिभुवनीं ।
देवदास ह्मणे हें सत्य जाणणें ॥ ३ ॥

देवदास हे समर्थांचे शिष्य होते, हें आरंभीं सांगितलेंच आहे. समर्थांवर त्यांनीं कांहीं श्लोक केले आहेत, त्यांतील थोडेसे पुढें दिले आहेत:—

श्लोक. ( प्रमाणिका )

' समर्थ रामदास हा । उदास दास तो पहा ।
जनांस ना कळे स्थिती । मनासि ना कळे गती ॥ १ ॥
प्रपंच वारिला सळें । विवेक लाधला बळें ।
समस्त हेत सारिला । रिपू बळेंचि मारिला ॥ २ ॥
कृदांत काय बापुडे । कदां न पाहे वांकडें ।
उदास दास नाचती । नभांत घोष गाजती ॥ ३ ॥
भला समर्थ दास हा । प्रयोजिलाचि या पहा ।
उदास वृत्ति फारसी । मनांत वृत्ति गाइसी ॥ ४ ॥
जनांत रामदास रे । बहूत मान्य त्यास रे ।
तया पदींच वास रे । करीत देवदास रे ॥ ५ ॥

देवदासांची ही सगळी कविता अद्याप अप्रकाशित आहे.

# श्रीमत्कृष्णदयार्णव.

कृष्णदयार्णव कृष्णचि करिन तया कां न दास मी नमनें ॥
संतांसि मुमुक्षुमनें न विसंबावें नदास मीनमनें ॥ १ ॥

सन्मणिमाला, मोरोपंत.

या महाकवीनें आपल्या हरिवरदा नामक श्रीमद्भागवताच्या दशमस्कंधावरील टीकात्मक ग्रंथानें महाराष्ट्र वाङ्मयांत मोठी भर घातली आहे. आज जेवढे जुने ग्रंथ उपलब्ध आहेत त्या सर्वांत, दासोपंतांचागीतार्णव शिवायकरून, हरिवरदा ग्रंथ फारच मोठा आहे. याची ओंवीसंख्या ५२००० असून तो रचावयास कवीला दीड तप लागलें. परंतु हा ग्रंथ फारसा प्रसिद्ध नसल्यामुळें या कवीचीही फारशी प्रसिद्धि झाली नाहीं. कृष्णदयार्णस्वामींनीं आपल्या ग्रंथांत स्वतःसंबंधानें बरीच माहिती दिली आहे; तिच्या आधारानें मी हें चरित्र लिहितों.

देशावर कृष्णानदीच्या कांठीं कऱ्हाड क्षेत्राच्या उत्तरेस कोपारूढ या नांवाचा एक गांव आहे. तेथें श्रीनृसिंहाचें देवालय आहे. इसवीसन १७०० च्या सुमारास त्या गांवांत एक गौतमगोत्री माध्यंदिन शाखेचा देशस्थ ब्राह्मण राहात होता. हा ब्राह्मण त्या गांवचा जोशी असून वरील श्रीनृसिंहाची पूजा करण्याचें काम त्याजकडे असे. शिवाय तो गांवचा कुळकर्णीही असे. या गृहस्थाच्या वंशांत शंभुमणी या नांवाचा एक मोठा विद्वान् ब्राह्मण होऊन गेला. त्याचा मुलगा नारायण हाही मोठा व्युत्पन्न, चारी शास्त्रें जाणणारा, सदाचारसंपन्न आणि आत्मज्ञानी असा होता. त्याला पहिल्यानें मूलबाळ कांहीं नव्हतें. परंतु त्याची स्त्री बहिणादेवी हिनें बारा वर्षें अश्वत्थाची सेवा केल्यावर तिला दोन पुत्र झाले. त्यांपैकीं धाकटा नरहरी; तेच हे कृष्णदयार्णवस्वामी होत. ते पांच वर्षांचे होतांच बापानें त्यांची मुंज केली व त्यांस वेदादिकांचें शिक्षण दिलें. सोळाव्या वर्षीं स्वामींचें लग्न झाल्यावर त्यांचा बाप वारला. ते मोठ्या धामधुमीचे दिवस होते. जिकडे तिकडे यवन व मराठे यांच्या चकमकी झडत. शिवाजी महाराज नुकतेच कैलासवासी झाले होते, व औरंगझेब बादशहा दक्षिणेंत येऊन त्यानें विजापुरचें राज्य बुडविल्यामुळें राष्ट्रास मोठी विपत्ति प्राप्त झाली

होती. अशा वेळीं, स्वामीचे वडील बंधु जनार्दन यांनीं त्यांचें पालनपोषण केलें. ही सर्व माहिती मी स्वामींच्याच शब्दांनीं देतों.–

### ओंव्या.

" शिवभूपती पावतां मुक्ति । दक्षिणे येवोनि ताम्रमति ॥
केली विजयपुरा समाप्ति । महा विपत्ति राष्ट्रातें ॥ ३२ ॥
मग सोडुनी कृष्णातीर ॥ भ्रमतां काळचक्रानुसार ॥
आश्रयूनि ठेलों अंबापूर । सपरिवार साग्रज ॥ ३३ ॥
तेथ युवाब्दीं करुणासिंधु ॥ भेटला सद्गुरु श्रीगोविंद ॥
श्रावण वद्याष्टमीस वरदू । कृष्णोपासन निरूपिलें ॥ ३४ ॥
कालचक्रें आचारहीन । जठरचिंतनें अभ्यासविहीन ॥
एवं जडमूढ अज्ञान । कथिलें संपूर्ण स्वामीसी ॥ ३५ ॥
तिहीं पाहोन कृपादृष्टीं ॥ ह्मणती भजनप्रेम पोटीं ॥
आहे ह्मणूनि निष्कपटी । वदसी गोष्टी निजवृत्तें ॥ ३६ ॥
येथूनि ऊर्जित अभ्युदय । सुप्रसन्न वैकुंठराय ॥
तुजपासोनि अभीष्ट कार्य । अमृतप्राय घेईल ॥ ३७ ॥
करूनि निरपेक्ष कोरान्न । कृष्णदयार्णव नामस्मरण ।
स्नानसंध्या गीतापठण । पारायण ज्ञानेश्वरी ॥ ३८ ॥
कृष्णदयार्णव दीर्घवाणी । कोरान्नकाळीं ऐकोनि जनीं ॥
सद्गुरु स्वमुखें संतसंज्जनीं । त्याच अभिधानीं आळविलें ॥ ३९ ॥

श्रीहरिवरदा, अध्याय १

याप्रमाणें अंबापुरींत ह्मणजे जोगाईच्या आंब्यास स्वामी येऊन राहिल्यावर त्यांची आणि सत्पुरुष श्रीगोविंद यांची भेट झाली. स्वामींनीं त्यांस आत्मवृत्त निवेदन केलें. " कालचक्राच्या फेऱ्यांत पडल्यामुळें आचरहीन व उदरंभरणांतच आयुष्य गेल्यामुळें विद्याविहीन असा आहें, तरी आपण दासाला कृपा करून सुमार्गी लावावें " अशी स्वामींनीं श्रीगोविंद यांस विनंति केली. त्यांनीं स्वामीचा भोळा भाव पाहून, त्यांस श्रीकृष्णाची उपासना व ज्ञानेश्वरीचें पारायण करावयास सांगितलें. भिक्षा मागतेवेळीं " श्रीकृष्णदयार्णवसमर्थ " अशी गर्जना करण्याची स्वामींची चाल असल्यामुळें, त्यांचें नरहरी हें नांव जाऊन लोक त्यांस कृष्णदयार्णव याच नांवानें ओळखूं लागले.

यानंतर स्वामींनीं तीर्थयात्रा करण्यांत आपल्या आयुष्याचीं बरींच वर्षें घालविलीं. आपल्या गुरूबरोबर वाराणशी, उत्तरमानस व दक्षिणमानस हीं तीर्थें केल्यावर सहा महिनें केवळ लिंबाचीं पानें भक्षण करून स्वामींनीं तपश्चर्या केली. नंतर पूर्वजित् संवत्सरांत द्वारका व त्यानंतर इतर तीर्थें करून स्वामी स्वाश्रमास आले. तेथें येऊन पहातात तों महाराष्ट्रांत चालू असलेल्या धुमश्चक्रींत अंबापुराचा विध्वंस झाला होता. मग स्वामी पिंपळनेर मुक्कामीं जाऊन राहिले. तेथें कित्येक वर्षें राहिल्यावर स्वामींची पत्नी मृत्यु पावली. त्यावेळीं एक मुलगा व एक मुलगी अशीं दोन मुलें मागें राहिलीं, त्यांचें संगोपन करण्यास कोणी मनुष्य नाहीं ह्मणून गुर्वाज्ञेनें स्वामींनीं दुसरें लग्न केलें. ही मुलगी काश्यप गोत्रांतली असून लग्न खरसंवत्सरीं झालें. नंतर स्वामींनीं अग्निहोत्र घेतलें. तेथपासून विलंबी संवत्सरापर्यंत कसे तरी दिवस घालविले. पुढें रक्तपितीची भयंकर व्यथा शरीरास जडली. ही व्यथा कांहीं दिवस सोसल्यावर श्रीएकनाथ महाराजांच्या कृपाप्रसादानें स्वामींची व्यथा दूर झाली. पूर्वीं तीर्थयात्रेच्या वेळीं गयेस असतांना स्वामीस त्यांच्या गुरूंनीं भागवताच्या दशमस्कंधावर महाराष्ट्र भाषेंत टीका करण्याची आज्ञा केली होती. परंतु आपण अल्पमति असें वाटून स्वामीस ग्रंथ रचना करण्यास धैर्य होईना. परंतु पुढें श्रीएकनाथांनीं स्वप्नांत दृष्टांत देऊन, रक्तपितीच्या रोगावर हेंच औषध सांगितलें. स्वामी ह्मणतात—

" तेथूनि विलंबीपर्यंत ॥ काळ क्रमिला प्रारब्धजनित ॥
पुढें उदेला प्रसुत वात ॥ रक्तपित्त तुळणेचा ॥ ४७ ॥
कित्येक काळ शरीरश्रम ॥ एकनाथ कृपाळू परम ॥
तेणें केला रोगोपशम ॥ देऊनि प्रेम निजभजनीं ॥ ४८ ॥
पूर्वीं गोविंदे गयेमाझारी ॥ कृपामृतें पाहोनि नेत्रीं ॥
भाषाव्याख्यान दशमावरी ॥ वरदोत्तरीं करविलें ॥ ४९ ॥
परंतु मानोनी अल्प मति ॥ ग्रथनीं हांव नुपजे चित्तीं ॥
पुढती तेंचि श्रीएकनाथीं ॥ भेषजार्थीं अनुग्रहिलें ॥ ५० ॥
निगम कल्पतरोर्गलितं फलं । शुकमुखादमृतद्रवसंयुतम् ॥
निगम कल्पतरूचें फळ ॥ विशेष शुकमुखसुधेचा मेळ ॥
श्रीमद्भागवत महारसाळ ॥ दशमीं प्रांजळ हरिलीला ॥ ५१ ॥
हें सेवितां दिव्यौषध ॥ तोडील विशेष रोग विरुद्ध ॥
ऐसा प्रभूचा स्वप्नानुवाद ॥ कथिला विशद संतांसी ॥ ५२ ॥

प्लवंगाद्बीं प्रतिष्ठानीं ॥ एकनाथी वृंदावनीं ॥
पुण्योत्साहीं सर्व सज्जनीं ॥ आज्ञा केली ग्रंथाची ॥ ५३ ॥

हे सज्जन कोण कोण होते त्यांचीं नांवें स्वामींनीं दिलीं आहेत.

" बाबजी जगन्नाथ रघुनाथ ॥ संततिरूपी जे एकनाथ ॥
आणिकही गुरुभक्त समर्थ ॥ निगमशास्त्रार्थअभिवेत्ते ॥ ५४ ॥
एका शिवराम रामप्रमुख ॥ कृपा सुधाकर प्रबोधार्क ॥
यतिवर सगुण सच्चित्सुख ॥ सद्विवेक उपदेष्टे ॥ ५५ ॥
इहीं कृपेनें उचंबळोनी ॥ ह्मणती तुझिया बोबड्या वचनीं ॥
दशमस्कंधाच्या व्याख्यानीं ॥ सादर श्रवणीं बैसावें ॥ ५६ ॥
गोविंद सद्गुरूची हे आज्ञा ॥ विशेष मान्य सर्वां सुज्ञा ॥
श्रीकृष्णवरद स्फुरेल प्रज्ञा ॥ भाषा व्याख्यान निरूपीं ॥ ५७ ॥
रोगें शरीर झालें क्षीण ॥ त्यासी औषध भगवद्गुण ॥
श्रीमद्भागवत व्याख्यान ॥ अमृत पूर्ण प्रभुवरें ॥ ५८ ॥

हरिवरदा, अ. १

या ओंव्यांत दिलेल्या सत्पुरुषांच्या नांवांपैकीं पहिलीं तीन नांवें एकनाथमहाराजांच्या वंशजांची होत व एकाशिवराम व राम हे तत्कालीन दुसरे साधु होत. दयार्णवस्वामींचे गुरु श्रीगोविंद हे तत्कालीन संतमंडळांत चांगले मान्य होते असें दिसतें. यांची गुरुपरंपरा अशी होती. श्रीदत्तात्रयाचे अनुग्रहीत जनार्दनस्वामी, त्यांचे एकनाथमहाराज, त्यांचे चिदानंद, त्यांचे स्वानंद, त्यांचे गोविंद आणि त्यांचे श्रीमत्कृष्णदयार्णव. एकनाथांपासून शिष्यपरंपरेनें दयार्णवस्वामींची पांचवी पिढी होय. वरील परंपरेपैकीं स्वानंदस्वामी हे छत्रपती शिवाजी महाराजांशीं समकालीन असून, त्यांचा वृत्तांत स्वामींच्या शिष्यानें हरिवरदा ग्रंथांत दिला आहे.

" श्रीस्वानंदाची महिमा ॥ अपार वर्णितां अनुपमा ॥
अमानित्वादि गुणीं गरिमा ॥ जेथ उत्तमा संपादिली ॥ १०६५ ॥
तया आपुलिया कल्याणकामें ॥ शिवभूपतिनें प्रार्थूनि प्रेमें ॥
रायदुर्गीं स्थापिलें नेमें ॥ सेवानुक्रमें तोषविलें ॥ १०६६ ॥
ये स्थानीं गोविंदराव ॥ शिबिकारूढ सवैभव ॥
उदया आलें योगदैव ॥ तयांचें पूर्व ते ठायीं ॥ १०६७ ॥ "

हरिवरदा, उत्तरार्ध अ. ९०

या ओंव्यांत "स्वानंदस्वामीस श्री शिवाजीमहाराजांनीं साधूंच्या सेवेपासून होणाऱ्या आत्महितबुद्धीनें रायगड किल्ल्यावर नेऊन ठेविलें व त्यांचा योगक्षेम चालवून त्यांची भक्तिपूर्वक सेवा केली. तेथें छत्रपतींच्या सरदारांत पालखीचे धनी कोणी गोविंदराव या नांवाचे ब्राह्मण होते. त्यांचें पूर्व पुण्य फळास येऊन त्यांनीं स्वानंदस्वामीची सेवा केली व उपदेश घेऊन विरक्त झाले " असा मजकुर आहे. हेच गोविंदस्वामी चरित्रनायकाचे गुरु होत. यावरून शिवाजीमहाराज सत्पुरुषांचे किती भुकेले असत व साधुपुरुषांच्या सेवेंत त्यांची किती तत्परता असे हें वाचकांस कळून येईल. यासंबंधानें रा. रा. पांगारकर यांनीं एकेठिकाणीं असें ह्मटलें आहे "तुकाराम रामदासांच्या सेवेंत शिवराय होते, पण योद्धे, मुत्सद्दी यांचप्रमाणें साधुसंतांसही मोत्याच्या दाण्याप्रमाणें वेंचण्याचा जो शिवरायाचा अलौकिक गुण त्याला हा स्वतंत्र पुरावा नाहीं काय ? मराठी इतिहास व मराठी काव्यें यांचा अन्योन्यसंबंध असून दोहींचा अभ्यास आपणांस एकदम केला पाहिजे. ' असो. अशा सत्पुरुषांची सेवा करून आणि त्यांचे आशीर्वाद घेऊन महाराजांनीं स्वराज्याची स्थापना केली यांत आश्चर्य तें कोणतें ?

दयार्णवस्वामींनीं वर लिहिल्याप्रमाणें भागवताच्या दशमस्कंधावर टीका लिहिली. हा ग्रंथ फार मोठा असून त्याचे पूर्वार्ध आणि उत्तरार्ध असे दोन भाग आहेत. पैकीं पूर्वार्ध शके सोळाशें छपन्न, आनंद संवत्सर, श्रावण वद्य अष्टमी (जन्माष्टमी) रविवार या दिवशीं लिहून झालें व तितक्यांत स्वामी रक्तपितीच्या व्यथेपासून मुक्त झाले. पूर्वार्धाच्या शेवटीं स्वामींनीं काढिलेले उद्गार मनन करण्यासारखे आहेत. स्वामी ह्मणतात—

"सद्गुर्वाज्ञा अति समर्थ । परम कृपाळू एकनाथ ॥
संतीं कथिला परमार्थ स्वार्थ । सफळ येथ तो झाला ॥ ४४९ ॥

शरीराची शमली व्यथा । ग्रंथ व्याख्यानीं वक्तृत्व प्रथा ॥
शमल शमनीं हरिगुण त्रिपथा । धरिली माथां शिवश्रोतीं ॥ ४५० ॥

सांप्रत कालीं मोठमोठ्या भिषग्वर्यांकडून जो रोग बरा होणें दुरापास्त, तो रोग पूर्वकालीं नुसत्या श्रद्धेनें कसा नष्ट झाला, याचा वाचकांनीं अवश्य विचार करावा.

हा ग्रंथ स्वामींनी, श्रीधरस्वामींची मूल संस्कृत ग्रंथावर जी टीका आहे, तिच्या आधारानें लिहिला आहे.

श्रीधर स्वामींच्या पदप्रकाशें ॥ सद्गुरु संताज्ञा सौरसें ॥
प्रवर्त्तलों जें महाराष्ट्र भाषे ॥ ते टीका विशेष हरिवरदा ॥ ४५२ ॥
हरिवरदा, पूर्वार्ध अ० ४९

हा ग्रंथ स्वामी रचित, व त्यांचा शिष्य लिहीत असे. या शिष्यास स्वामींनीं "उत्तम श्लोक" ह्मटलें आहे. अथवा कदाचित् हें त्याचें नांवच असेल. पुढें स्वामी लिहितात:—

पुढें उत्तरार्धाची टीका ॥ जरी करवणें श्रीनायका ॥
स्वसामर्थ्यें करील देखा ॥ किमर्थ शंका मज येथें ॥ ४५३ ॥
परंतु जरेनें शरीर क्षीण ॥ देशकालादि विपरीत चिन्ह ॥
संतीं करविलें व्याख्यान ॥ तेही निर्वाण पावले ॥ ४५४ ॥
प्राचीन सज्जन जिवलग सखे ॥ ब्रह्मसायुज्यीं भजले तितुके ॥
त्यांच्या वियोगें वाटे फिकें ॥ जिणें वर्तणें भूभार ॥ ४५५ ॥
त्यांच्या स्मरतां गोठी रहाटी ॥ विरहावस्था उथळे पोटीं ॥
सगुणसुखाची पडली तुटी ॥ भासे सृष्टी अविराम ॥ ४५६ ॥
असो यावरी सज्जनमूर्ति ॥ अवतरोनि जे तारिती क्षिती ॥
त्यांच्या पदींची वंदूनि माती ॥ सुखविश्रांति भावीतसें ॥ ४५७ ॥

या ओंव्यांत स्वामींनीं "पूर्वार्ध एकदांचें लिहून झालें. पुढें उत्तरार्धाची टीका मजकडूनच व्हावी असें जर भगवंताच्या मनांत असेल तर तसें करणारा तो समर्थ आहे. मी शंका काय ह्मणून घ्यावी? परंतु वृद्धपणामुळें शरीर क्षीण झालें, देशकालस्थिति विपरीत झाली, ज्या संतांच्या आज्ञेनें हा ग्रंथ लिहिण्यास प्रारंभ केला ते मोक्षपदवासी झाले, समवयस्क सज्जन व इतर सोयरेधायरेही मरण पावले, त्यांच्या वियोगानें मन उदास झालें आहे, सर्व जग केवळ दुःखमय दिसत आहे व एकंदरींत मनास समाधान न राहिल्यामुळें यापुढें जगणें ह्मणजे केवळ भूमिभार होय! तथापि, जे सत्पुरुष आज आहेत व जे पुढें होतील त्यांच्या पायांच्या कृपेवर लक्ष्य ठेवून मला उरलेलें आयुष्य घालविलें पाहिजे." असे निराशेचे उद्गार

१ भर्तृहरीनेंही आपल्या वैराग्यशतकांत असेच उद्गार काढिले आहेत:—
"झालों जयांपासुनि ते निमाले । ते आमुचे तुल्यवयस्क गेले ॥
आम्हीं असों सांप्रत जाण तैसे । नदीतटीं जर्जर वृक्ष जैसे ॥"

काढिले आहेत. यावरून स्वामी फारच कोमल मनाचे व सहृदय होते असें दिसतें.

एकंदरींत हें पूर्वार्ध रचावयास स्वामीस वरींच वर्षें लागलीं असावीं असें वाटतें. शिवाय ज्या वेळीं स्वामी आपल्या गुरूस शरण गेले त्या वेळीं त्यांनीं ' मी अगदीं विद्याविहीन आहें,' असें त्यांस सांगितलें होतें. त्यावेळीं स्वामींचें वय निदान २४ वर्षांचें तरी असलें पाहिजे. त्यानंतर स्वामींनीं तीर्थयात्रा केली व तेवढ्यांतच त्यांनीं संस्कृत भाषेचें चांगलें ज्ञान संपादन केलें, एवढेंच नव्हे तर वेदांत, सांख्य, मीमांसा आणि न्याय इत्यादि शास्त्रें व उपनिषदें यांत त्यांनीं प्रावीण्य संपादिलें होतें, हें त्यांचा हरिवरदा ग्रंथ वाचणारास तेव्हांच कळून येईल. तर एवढ्या प्रौढ वयांत विद्या संपादन करून तिचा उपयोग जगास करून देणारे महात्मे आतां उरले नाहींत! जाडी विद्वत्ता, वंदनीय साधुत्व आणि अप्रतिम कविताशक्ति या तीन गुणांत विनयशीलतेची भर पडल्यामुळें ग्रंथ फारच रसाळ व रमणीय उतरला आहे. पूर्वार्ध संपलें त्या वेळच्या देशस्थितीचें स्वामी वर्णन करितात—

कळिकाळाचा चढता भर। कांता कनकीं यति सादर ॥
गुरुद्रोही शिष्य; विप्र-। रंडा जारपरायणा ॥ ४५८ ॥
वामी कामी कौळाचरणी। जारण मारण प्रयोगकरणी ॥
साबर चेटकादि निर्घृणी। संतसजनीं मिरवती ॥ ४५९ ॥
देखोनि क्षुद्र चमत्कार। कळिकाळींचे दुर्मति नर ॥
त्यांचे ठायीं भक्तितत्पर। शिष्य सादर होत्साते ॥ ४६० ॥
ऐसियांपासोनि तरणोपाय। मोक्षमार्गींची केउती सोय ॥
स्वमतिं न मिळे त्यां अपाय। करितां अन्याय न मानिती ॥ ४६१ ॥
असो ऐशिया कळिकाळांत। दहासहस्र अब्दपर्यंत ॥
कुढावीन निजसात्वत। हें श्रीकांत बिरुद असे ॥ ४६२ ॥
हाचि भरंवसा सद्भाविकां। सत्वसंपन्ना मुमुक्षु लोकां ॥
भक्तीनिमित्त श्रीनायका। कलिमलपंका निस्तरणें ॥ ४६३ ॥

हरिवरदा, पूर्वार्ध, अ. ४२

वरील ओंव्यावरून, दयार्णवस्वामींच्या वेळीं, खोट्या चमत्कारांनीं भोळ्या लोकांस फसविणाऱ्या ढोंगी लोकांचा सुळसुळाट झाला होता, असें वाटतें.

पूर्वार्धाच्या शेवटीं स्वामींनीं देवाजवळ मागणें मागितलें आहे–

बद्ध मुमुक्षु आणि मुक्त ॥ त्रिविधजनाचा संघात ॥
श्रवणीं बैसतां शुद्धचित्त ॥ अधिकारवंत ते व्हावे ॥ ४७५ ॥
हेतुवाद सांडूनियां ॥ सद्भाव उपजो पाखंडियां ॥
श्रवणाधिकार कुतर्कियां ॥ प्रत्यक्ष बाणोनि हो लाभ ॥ ४७६ ॥
कर्मठांची सकामबुद्धि ॥ तुटोनियां बाणे चित्तशुद्धि ॥
अपरोक्ष बोधाच्या संवादीं ॥ अधिकार सिद्धि लाहो कां ॥ ४७७ ॥
अनन्यप्रेमा सद्गुरुचरणीं ॥ सर्वां उपजो अंतःकरणीं ॥
निंदा द्वेष कोण्हा मनीं ॥ श्रवण मात्रीं न रुचावा ॥ ३७८ ॥
मोडो खळाची वक्रता ॥ निष्काम सत्कर्मीं हो आस्था ॥
सर्व भूतीं एकात्मता ॥ प्रेम वाढो परस्परें ॥ ४७९ ॥

यावेळीं स्वामीचे गुरु गोविंदस्वामी हे समाधिस्थ झाले होते. त्यांचे चिरंजीव शिवदीक्षित यांच्या आज्ञेनें स्वामींनीं उत्तरार्ध लिहावयास प्रारंभ केला. हे शिवदीक्षित वेदार्थवक्ते असून त्यांनीं मंत्रभागवतावर व्याख्यान केलें आहे असें स्वामी स्वतः सांगतात:—

" गोविंदात्मज शिवदीक्षित ॥ वेदार्थवक्ता विपश्चित ॥
चौधरी उपनामें जो ख्यात ॥ मंत्रभागवतव्याख्याता ॥ १३ ॥
दुसरा अपर सिद्धेश्वर ॥ लाहोनि तद्वत साक्षात्कार ॥
करी कारुण्यें जगदुद्धार ॥ भट्ट मुनिवर शिवराम ॥ १४ ॥

हरिवरदा, उत्तरार्ध, अध्याय ५०

उत्तरार्धांत रुक्मिणीस्वयंवरकथावर्णनप्रसंगीं स्वामी सांगतात:—

" दशमस्कंध वाखाणितां ॥ प्रसंगें रुक्मिणीस्वयंवर कथा ॥
उपाविली ते वर्णूं जातां ॥ धिंवसा चित्ता नुपलभे ॥ ३१३ ॥

उत्तरार्ध, अ० ५२

कारण काय तर श्रीएकनाथांनीं लिहिलेला रुक्मिणीस्वयंवर उत्तम आहे व तसा आपणांस लिहितां येणार नाहीं. असें ह्मणून स्वामींनीं एकनाथांचें समग्र रुक्मिणी-स्वयंवर येथें उतरून घेतलें आहे. आरंभीं एकनाथस्वामीचें चरित्र देऊन स्वामी लिहितात:—

" ऐसा महिमा अगाध ज्यांचा ॥ तिहीं रुक्मिणीस्वयंवर वाचा ॥
वाखाणिलें त्या ग्रंथाचा । विचित्र महिमा जग जाणे ॥ ३३६ ॥

असें असतां आपण तीच कथा पुन्हा सांगणें ह्मणजे " वृथा वाग्जल्प " होणार आहे असा स्वामींचा समज होता.

उत्तरार्ध, गोदावरीच्यातीरीं, पैठणास, मार्गशीर्ष शुक्ल पंचमी, गुरुवारीं तृतीय प्रहरीं, शालिवाहन शक १६६५ रुधिरोद्गारी संवत्सर, यादिवशीं संपलें, ह्मणजे एकटें उत्तरार्धच लिहावयास ९ वर्षें लागलीं. गाबाळग्रंथी शेंकडो पुस्तकें भराभर लिहून टाकण्यापेक्षां, एकच उत्तम पुस्तक लिहिण्यांत सर्व आयुष्य गेलें तरी वेहेत्तर आहे हा जो प्राचीन ग्रंथकारांचा करारीपणा त्याचें अनुकरण जर सध्यांचे लेखक करितील तर भारत रामायणासारखे प्रचंड ग्रंथ पाहून आज जो विस्मय वाटतो तो खात्रीनें वाटणार नाहीं असें मला वाटतें. असो.

याप्रमाणें स्वामींनीं आपलें बहुतेक आयुष्य हरिगुणकथावर्णनांत घालवून नरदेहाचें सार्थक्य केलें. ते जाडे विद्वान असून त्यांच्या अंगीं कविताशक्तिही अप्रतिम होती. त्यांची कविता प्रौढ, शुद्ध व उपमा उत्प्रेक्षादि अलकारांनीं युक्त अशी असून वर्णनशैली मनोहर आहे. कवितेंत अप्रसिद्ध शब्द फारसे नाहींत, तथापि संस्कृत शब्दांचा भरणा इतर कवींच्या ओंवीबद्ध ग्रंथांतील शब्दांच्या मानानें अधिक आहे. एकंदरींत कवी या नात्यानें मोरोपंत, वामन व मुक्तेश्वर यांच्या पंक्तीस बसण्याची योग्यता स्वामींच्या अंगीं होती असें स्पष्टपणें ह्मणण्यास हरकत नाहीं. हरिवरदा ग्रंथासंबंधानें आमच्यांतील एका अर्वाचीन पंडितानें काढिलेले उद्गार येथें देतों.

" हा ग्रंथ शंकराचार्यकृताद्वैतमायावादशास्त्रानुसारी असून फार उत्तम आहे. लौकिक दृष्टीनें पाहिलें असतां हा ग्रंथकार, पुष्कळ उपनिषद्, वेदांत आणि मीमांसा व न्याय इत्यादि अनेक शास्त्रपारंगत असावा. आतां अलौकिक दृष्टीनें पाहिलें असतां हा ग्रंथकार भगवत्प्रसादपात्र व गुरुकृपार्ह असा असावा. कारण कीं, विलक्षण अलौकिक शक्तीवांचून असा विलक्षण व सर्व-शास्त्र-भरित ग्रंथ निर्माण करण्याला कोणी शक्त होणार नाहीं. या ग्रंथकारानें सर्व उपनिषद् व श्रीधरी टीका व मधुसूदनी वगैरे ग्रंथ वाचून त्यांतील सार घेऊन, बाहेरचे अधिक विषय ( शंकरमतानुसारी ) सुद्धां या ग्रंथांत घेतले आहेत. हें पुस्तक मुमुक्षु लोकांना फारच उपयोगी आहे. " महामहोपाध्याय भीमाचार्य झळकीकर.

वास्तविक पाहिलें असतां अशा प्रासादिक कवींस व त्यांच्या ग्रंथांस कोणाच्या अभिप्रायांची अपेक्षा नाहीं व पर्वाही नाहीं, परंतु हरिवरदा ग्रंथाची योग्यता केवढी

आहे हें माझ्या शब्दांनीं सांगण्यापेक्षां मोठ्या लोकांच्या शब्दांनीं सांगितल्यास वाचकांची विशेष खात्री होईल, याच हेतूनें वरील गृहस्थांचा अभिप्राय येथें दाखल केला आहे.

आमच्या जुन्या लोकांस राष्ट्रीयत्वाची कल्पना नव्हती व त्यांचें तत्कालीन देशस्थितीकडेही लक्ष्य नव्हतें असा आरोप करणारांनीं तर हरिवरदाग्रंथ मुद्दाम वाचण्यासारखा आहे. ग्रंथाच्या अगदीं आरंभींच स्वामी ह्मणतातः—

ओंव्या.

" शिवभूपती पावतां मुक्ति ॥ दक्षिणे येवोनि ताम्रपती ॥
केली विजयपुरा समाप्ति ॥ महा विपत्ति राष्ट्रातें ॥ ३२ ॥

हरिवरदा, पूर्वार्ध अ० १.

या ओंवींत स्वामींनीं शिवाजीमहाराजांसंबंधानें " मुक्ति " या शब्दानें आपली आदरबुद्धि व " ताम्रपती " या शब्दानें औरंगझेबासंबंधानें तिरस्कारबुद्धि व्यक्त केली आहे. " महा विपत्ति राष्ट्रातें " या चरणावरून व प्रसंगवशात् काढिलेल्या इतर उद्गारांवरून स्वामीसारखे लोक त्या वेळच्या देशस्थितीसंबंधानें विचार करीत असत किंवा नसत, त्यांस राष्ट्रीयत्वाची कल्पना होती किंवा नव्हती व देशाची दुःस्थिति पाहून त्यांस वाईट वाटत असे किंवा नसे याचा कोणासही उलगडा करितां येईल. असो.

आतां स्वामीच्या काव्यांतील कांहीं रसाळ अशीं पद्यें येथें उतरून घेऊन हें चरित्र संपवितों.

श्रीकृष्णाच्या जन्मकालीं सृष्टी किती आनंदमय झाली होती, त्याचें वर्णन स्वामी करितात—

ओंव्या.

" दिशा सुप्रसन्न सकळ । गगन निरभ्र निर्मळ ॥
उदय पावला तारकामेळ । वर्षाकाळ असतांही ॥ ६३ ॥
मंगलोत्साह घरोघरीं ॥ शोभनानंद नगरोनगरीं ॥
दुःख शोक दोष दरिद्री ॥ सुखसागरीं बुडाले ॥ ६५ ॥
हृदयशल्यें विरोनि गेलीं ॥ ब्रम्हानंदें मनें निवालीं ॥
सुहृद्भावें प्रेमाथिलीं ॥ भूतें भूतळीं परस्परें ॥ ६७ ॥

नगरोनगरीं घरोघरीं ॥ प्रतिशरीरीं सर्वांतरीं ॥
ब्रम्हानंदाचिये गजरीं ॥ गोष्टी दुसरी हारपली ॥ ७० ॥
आला जाणोनि प्राणवल्लभ ॥ आलिंगनाचा लक्षूनि लाभ ॥
पतिव्रतेचा विरहक्षोभ ॥ समारंभ जेंवी करी ॥ ७१ ॥
तैसें भूयिष्ट सर्वत्र सर्वी ॥ सालंकृत धरादेवी ॥
निजनाथाची प्रेम पदवी ॥ कोण्हा न वदवी प्रकटत्वें ॥ ७२ ॥
श्रीकृष्णाचा जन्मकाळ ॥ तेणें आनंदभरित जळ ॥
सर्वभूतात्मा गोपाळ ॥ सुखसुकाळ सर्वांसी ॥ ७३ ॥
नद्या वाहति प्रसन्न जळें ॥ शुद्ध सत्वात्मकें सुविमळें ॥
त्यजिलीं रजतमाचीं डहुळें ॥ शुद्ध मेळें ज्याचेनी ॥ ७४ ॥
डोहो भरले अगाध सलिलीं ॥ अनुभवाची अगाध खोली ॥
माजी पंकजें विकासलीं ॥ जीं सेविलीं सद्भ्रमरीं ॥ ७५ ॥
नीलोत्पलें श्वेतोत्पलें ॥ कुमुदें कल्हारें निर्मळें ॥
कुशेशयें हेमकमळें ॥ रातोत्पलें रत्नाभ ॥ ७६ ॥
इंद्रोत्पलें गजोत्पळें ॥ मल्लिका सरसिजें कुड्मळें ॥
श्रीशतपत्रें सहस्रदळें ॥ सुपरिमळें मघमघितीं ॥ ७७ ॥
पद्माप्राणेश्वराचें जन्म ॥ ह्मणोनि पद्मेसि आनंद परम ॥
तिणें अलंकारिलें धाम ॥ पद्माराम पद्माकर ॥ ७८ ॥
मानसादि सरोवरें ॥ भागीरथ्यादि सरितातीरें ॥
पुष्करपृथूदकादि अपरें ॥ पुण्योदारें सुतीर्थें ॥ ७९ ॥
एवं सर्वही जलाशय ॥ श्रियाजुष्ट आनंदमय ॥
तेथ द्विजकुलांचे समुदाय ॥ त्रिदशप्राय संतुष्ट ॥ ८०
अनंत तपें तपूनि मुनि ॥ जन्म पावले पक्षियोनीं ॥
श्रीकृष्णाचें जन्म भुवनीं ॥ देखों नयनीं या हेतु ॥ ८१ ॥
गंधर्व जन्मले भ्रमरकुळीं ॥ श्रीकृष्णावतार भूमंडळीं ॥
तया सुखाची नवाळी ॥ सुकृत बहळीं सेवावया ॥ ८२ ॥
गंधर्व स्तविती सामगायनीं ॥ मुनीश्वरांच्या वेदध्वनी ॥
तैसे द्विजालिकुळांचे पंकजवनीं ॥ मधुर ध्वनी विराव ॥ ८३ ॥

ताप वारूनि सुखशीळ ॥ ह्मणोनि ह्मणिजे सुशीतळ ॥
तैसाचि पवित्र यज्ञानिळ ॥ पुष्पानिळ सुगंध ॥ ९२ ॥
गंगातरंग संभूत ॥ पवन प्राणियां स्पर्शत ॥
पाप अकल्प निर्धूत ॥ अपार सुकृत तत्स्पर्शें ॥ ९३ ॥
तुळसीवनें, पंकजवनें ॥ देवागारें यज्ञसदनें ॥
वैष्णवभुवनें हरिकीर्तनें ॥ त्या त्या पवनें स्पर्शिजे ॥ ९४ ॥
उपजणार जेव्हां हरी ॥ तेव्हां समस्तही सुरवरीं ॥
दुदुंभीच्या घोषगजरीं ॥ परमोत्साह मांडिला ॥ १०१ ॥
सनकादिक ब्रह्मनिष्ठ ॥ कपिलादिक सिद्ध श्रेष्ठ ॥
त्यांच्या आत्मस्थिति स्पष्ट ॥ तोष उत्कृष्ट पावल्या ॥ १०२ ॥

खालील उषःकालाचें वर्णन रमणीय आहे:—

जंव जेंगटें जाणविली वेळा ॥ येइला विद्यार्थियांचा मेळा ॥
एक गाती रागमाळा ॥ उषःकाला जाणोनी ॥ ४९ ॥
भैरव भूपाळ बिलावल ॥ बीभास रामकली मंजुळ ॥
तानमान लक्ष्मीलील ॥ पुण्यशील जागविती ॥ ५० ॥
ऋचावर्ग ऋक्शाखिक ॥ यजुर्वे पढती यजुःपाठक ॥
एक सामगायनीं सामक ॥ बृहत्सामें पढताती ॥ ५१ ॥
अग्निहोत्री संध्यास्नानें ॥ करूनि करिती प्रादुष्करणें ॥
पात्रासादनें परिस्तरणें ॥ परिसमूहनें मंत्रोक्त ॥ ५२ ॥
मुग्धा मधुपानीं कामुक ॥ झाल्या सव्रीड साशंक ॥
वनिता वेष्टूनि अंशुक ॥ कबरी कंचुक सांवरिती ॥ ५३ ॥
कुक्कुटगणीं केला टाहो ॥ पुढें झाला अरुणोदयो ॥
धेनु हंबरती दोहो ॥ करिती पाहो बल्लव ॥ ५४ ॥
भुजंग स्वैरिणी कंठलग्न ॥ कामप्रेमें दृढालिंगन ॥
पद्मगर्भींचे षट्पदगण ॥ तैसे उठोन ते जाती ॥ ५५ ॥

हें वर्णन मुक्तेश्वरांच्या उषःकालवर्णनाइतकेंच हृदयंगम आहे. 'जेंगट' वाजतांच विद्यार्थी जागे झाल्याचा उल्लेख केला आहे, यावरून, निदान कृष्णदयार्णव स्वामींच्या वेळीं तरी, महाराष्ट्रांतील शालागृहांतून हल्लींची घंटावादनपद्धति अस्तित्वांत होती, असें मानण्यास हरकत नाहीं. पहांटेस गाण्यांत येणाऱ्या बहुतेक रागांचीं नांवें

वरील ओंव्यांत आलीं आहेत, यावरून गायनशास्त्रांत स्वामींची चांगली गति होती, निदान त्या शास्त्राशीं ते अगदींच अपरिचित नव्हते, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. स्वामींची वाणी किती शुद्ध, कवित्वप्रचुर व तेजस्वी आहे, याची थोडी तरी कल्पना वरील व पुढील वेंच्यांवरून, वाचकांस झाल्याशिवाय राहणार नाहीं, अशी आशा आहे.

प्रावृट् व शरत्कालवर्णनाचा एक अध्यायच आहे. त्यांतील कांहीं निवडक ओंव्या येथें देतों:—

विराट् पुरुषाचें जें वीर्य ॥ वृष्टिरूपें स्रवतें होय ॥
भूमिदेवी गर्भ लाहे ॥ प्राणिमय चराचर ॥ ५४ ॥
पत्नी जाणूनियां ऋतुमति ॥ कांत आलिंगी एकांतीं ॥
विरहताप टाकूनि क्षिति ॥ तैसी चित्तीं संतुष्ट ॥ ५५ ॥
गर्भ संभवलिया उदरीं ॥ दोहद होती परोपरी ॥
धरा तैसी सस्यभरीं ॥ होय विकारीं विकृत ॥ ५६ ॥
चहूं खाणींमाजी प्राणी ॥ प्रावृट्काळीं प्रसवे धरणी ॥
आदिपुरुषाची हे करणी ॥ राया श्रवणीं परियेसीं ॥ ५७ ॥
प्रावृट् शब्द हा स्त्रीलिंगी ॥ विराट् कालात्मा आलिंगी ॥
द्यावाभूमी उभय आंगीं ॥ सालंकृत दंपती ॥ ५८ ॥
क्षणैक उष्ण क्षणैक अभ्र ॥ कांहीं वृष्टि कांहीं समीर ॥
वर्षारंभीं चमत्कार ॥ होती विकार लघुदीर्घ ॥ ६० ॥
पुढें पुढें प्रबळ मेघ ॥ नभीं दाटती पैं अमोघ ॥
शुभ्र धूसर सजल सांङ्ग ॥ सवेग रंग पालटती ॥ ६१ ॥
नभ आच्छादे निबिडघनीं ॥ माजीं गर्जना दीर्घध्वनी ॥
विद्युल्लतांचिया स्फुरणीं ॥ दृश्य दिसोनि हारपे ॥ ६२ ॥
चंद्र सूर्य तारांगणें ॥ घेती अभ्रांचीं प्रावरणें ॥
स्पष्टास्पष्ट प्रभाहीनें ॥ तेणें गुणें भासती ॥ ६३ ॥
सजल मेघांच्या येती सरी ॥ तेव्हां झांकोनि जाती गिरी ॥
जळें वाहती पृथ्वीवरी ॥ चिंता अंतरीं पांथिकां ॥ ६४ ॥
विद्युल्लता कडकडाटी ॥ महामेघांचिया दाटी ॥

चंडवायो झडझडाटी ॥ करी दिग्पटी सकंप ॥ ७४ ॥
जैसे करुणावंत पुरुष ॥ संतप्त जाणोनि जनांस ॥
वेंचूनि आपुलें अर्थायुष्य ॥ देती तोष सर्वस्वें ॥ ७५ ॥
तैसेचि जाण चंडघन ॥ मोक्षण करूनि निजजीवन ॥
या जगासि आप्यायन ॥ सदयासमान करिताती ॥ ७६ ॥
ग्रीष्मकाळींचा महा आतप ॥ तेणें शोषूनि गेलें आप ॥
विपर्ण झाले पादप ॥ झाला लोप तृणाचा ॥ ७८ ॥
दावानळें जळालीं तृणें ॥ झाडीं न ठरती जीर्ण पर्णें ॥
आहाळलीं वाळलीं वठलीं उष्णें ॥ तीं संपूर्ण खांकरलीं ॥ ७९ ॥
अविद्येचीं मेघपटलें ॥ झांकोळिती ग्रहमंडळें ॥
तेणें गडद पडे काळें ॥ मार्ग न पडे कर्दमीं ॥ ८६ ॥
प्रदोषकाळीं निशामुखीं ॥ प्रभा आगळी खद्योतकीं ॥
मोडे ग्रहांची ओळखी ॥ कोणा ठाउकीं नक्षत्र ॥ ८७ ॥
कलीमाजी जैसीं पापें ॥ वेदप्रणित मार्ग लोपे ॥
जैसें मालवल्हेनी दीपें ॥ विविधें रूपें हारपती ॥ ८८ ॥
प्रावृट्काळाचें निशाण ॥ ऐकोन मेघांचें गर्जन ॥
खवळे मंडूकांचें सैन्य ॥ जेंवी ब्राह्मण नियमांतीं ॥ ९४ ॥
स्नानसंध्येचा शेवट—॥ पर्यंत आचार्य मौननिष्ठ ॥
त्याचा ऐकोनि शांतिपाठ ॥ उठे बोभाट छात्रांचा ॥ ९५ ॥
क्षणैक उत्पथ वाहती पूर ॥ सर्वेचि पात्रीं न मिळे नीर ॥
जेंवी मूर्खांचा स्वैराचार ॥ यौवनभर लोटतां ॥ ९८ ॥

३१ व्या अध्यायांतील "गोपीगीत" या नांवाचें जें लोकप्रिय प्रकरण आहे त्यांतील थोडींशीं पद्यें येथें देतों—

### शुद्धकामदा वृत्त.

"उपजणें तुझें प्राप्त गोकुळीं ॥ वसत इंदिरा ऊर्जितागळीं ॥
प्रकट हो सख्या धुंडितों दिशा ॥ असु विगुंतले जाहलों पिशा ॥ १ ॥
सरसिजें शरत्काळिचीं तळां ॥ विकसितें, तयांतील चित्कळा ॥
हरुनि माखिल्या नेत्र मार्गणें ॥ फुकट किंकरी हे न मारणें ॥ २ ॥

नव्हसि गोपिकातोषदायक ॥ हृदयसाक्षि तूं विश्वनायक ॥
विनवितां विधी विश्वरक्षणीं ॥ यदुकुळीं तुझें जन्म ते क्षणीं ॥ ३ ॥
शरण संसृती भ्याड जे अले ॥ अभय श्रीकरें त्यांस ओपिलें ॥
परिणिली हरी ज्या करें रमा ॥ धरिं शिरीं तया पाणिशंतमा ॥ ४ ॥
व्रजविपत्ति तूं नाशिता हरी ॥ स्वजनगर्व जो सस्मितें हरी ॥
प्रकटवीं सख्या किंकरीं अह्मां ॥ कुमुदकानना वक्त्रचंद्रमा ॥ ५ ॥
पशुपथीं वनीं जाति जीं पदें ॥ जगदघांतकें इंदिरास्पदें ॥
फणिफणावरी रम्य नर्त्तकें ॥ कुचयुगीं धरीं कामकृंतकें ॥ ६ ॥
मधुर उत्तरें पंडितप्रियें ॥ कमललोचना बोलसी स्वयें ॥
अनुचरी तिहीं व्याकुळा, हरी ॥ अधरअमृतें प्राण मोहरीं ॥ ७ ॥
तवकथासुधा तप्त वांचवी ॥ अघहरा कवी वर्णिती चवी ॥
श्रवण मंगला श्रीमदाकुला ॥ कथक देति भू भूरि सोहळा ॥ ८ ॥
हसित पाहणें प्रेमउत्सहें ॥ विचरणें तुझें ध्यान भाग्य हें ॥
झुरतसों मनीं एकल्या घरीं ॥ स्मर भरें मनें क्षोभवी शरीं ॥ ॥ ९ ॥
पशु चरावया नेशि जैं वनीं ॥ पद मृदू तुझे पंकजाहुनी ॥
तिखट दर्भ हे रुतती क्षणी ॥ विकळता भरे आमुचे मनीं ॥ १० ॥
शरणतोषकें कंजजार्चितें ॥ अपदिं ध्येय जीं भूमिमंडितें ॥
सुखतमें तुझीं रम्य पाउलें ॥ स्तनिं धरीं; अम्हां सर्व पावलें ॥ ११ ॥

यानंतर श्रीकृष्ण प्रकट झाला व गोपींस मोठा आनंद झाला. त्या वेळच्या कृष्णमूर्तीचें वर्णनः—

ओंव्या.

नवघन भासुर सोज्वळ कांति । कंठीं मिरवी वैजयंती ॥
किरीट कुंडलांची दीप्ति । कुंतल मंडित गंडयुगीं ॥ १ ॥
माथां मयूरबर्हस्तबक । मृगमद कुंकुममिश्रित तिलक ॥
तरळ अपांग सरळ नासिक ॥ कुंदरदन शशिवदन ॥ २ ॥
प्रवाळाधर मंदस्मित । आजानु बाहु भूषान्वित ॥
नव वनमाळा कौस्तुभयुक्त । मुरलीमंडित करकमळ ॥ ३ ॥
विद्युद्भासुर पीतांबर । मेखळे क्षुद्र घंटिकागजर ॥
चरणी विरुदांचा तोडर । वांकी नुपूर रुणझुणती ॥ ४ ॥

मन्मथ मोही नारीनर । त्या मन्मथास ही मोहकर ॥
ऐसा सुंदर सालंकार । देखिला श्रीधर गोपींही ॥ ५ ॥

द्वारकापुरीचें वर्णनः—

द्वारकाबाह्यप्रदेशीं ॥ आराम रमवी जीवशिवांसी ॥
वसंत निववी सदा सुमनेसीं ॥ संताप कोणासी असेना ॥ १ ॥
प्रेमें विकासलीं कमलें शुद्ध ॥ गुंजारवती कृष्णषट्पद ॥
ऐकोनि गंधर्व झाले स्तब्ध ॥ सामवेद मौनावे ॥ २ ॥
प्रबोधपारावतें घुमती ॥ तेणें वागीश्वरी चवंके चित्तीं ॥
विस्मित झाला बृहस्पती ॥ आश्चर्य मानिती सुरवर ॥ ३ ॥
डोलत द्राक्षींचे पैं घड ॥ मुक्त परिपाकें अतिगोड ॥
सकळ कामांचें पुरे कोड ॥ गोडांत गोड ते गोडी ॥ ४ ॥
कोकिला कृष्णवर्ण कूजती ॥ शब्दीं निःशब्द मधुर वृत्ति ॥
तेणें सनकादिक सुखावती ॥ प्रजापति तटस्थ ॥ ५ ॥
मयूर आनंदें नाचत ॥ अप्सरानृत्य तेणें तटस्थ ॥
ताण्डव विसरला उमाकांत ॥ अति अद्भुत हरिलीला ॥ ६९ ॥
शुद्ध हंस द्वारकावासी ॥ मुक्तमोतियें चारा त्यांसीं ॥
तें देखोन परमहंसीं ॥ निजमानसीं लाळ घोंटिजे ॥ ७० ॥

ह्या ग्रंथांत 'यशोदागीत' ह्मणून एक अभंगवद्ध प्रकरण आहे तें तर वत्सलरसानें केवळ थबथबलेलें आहे.

हरिवरदा ग्रंथ फारच मोठा असल्यामुळें त्यांतील आणखी उतारे देऊं लागल्यास विस्तार होण्याचा संभव आहे. दयार्णवस्वामीचे कांहीं अभंग मला एका अत्यंत जीर्ण अशा वहींत मिळाले ते फार चांगले असल्यामुळें मी त्यांचा येथें समावेश करितों:—

अभंग १

बाळया भोळया जनां उपाय हा सोपा ॥ मन्मथाच्या बापा शरण जावें ॥ १ ॥
सर्वस्वें आपुला भार त्याच्या माथां ॥ घालोनीयां व्यथा ओसरावी ॥ २ ॥
अहंतेचा नाश सर्वस्वीं करावा ॥ कृष्ण ओळखावा सर्वा ठायीं ॥ ३ ॥
जैसें जैसें घडे संतोष सांकडें ॥ तें तें देवाकडे समर्पावें ॥ ४ ॥
असत्य दांभिक सांडावी कामना ॥ निंदाद्वेष मना नातळावीं ॥ ५ ॥

पोटाप्रावरणाची चिंता नाठवावी ॥ प्रारब्धाचे गांवीं सर्व आहे ॥ ६ ॥
भोगावें सर्वही प्रारब्धाचें फळ ॥ करावें अढळ अंतरासी ॥ ७ ॥
वैराग्याच्या बळें असावें उदास ॥ कोण्या वैभवास भुलूं नये ॥ ८ ॥
स्वधर्मीं वर्ततां लज्जा ओसरावी ॥ अधर्मीं धरावी लज्जा थोर ॥ ९ ॥
सर्वांठायीं नाम गोविंदाचें घ्यावें ॥ अंतरीं धरावें विरक्तीसी ॥ १० ॥
दयार्णवामाजी जातां याचि वाटे ॥ अकस्मात भेटे स्वानंदासी ॥ ११ ॥

या अभंगांतील उपदेश मुमुक्षुजनांस अत्यंत उपयुक्त आहे असें कोण ह्मणणार नाहीं ?

## अभंग २.

मी तुझ्या पायींचा रज ऐसा भावीं ॥ तूं आमुचा गोसावी देवराया ॥ १ ॥
गोविंदा तूं गाय मी वत्स निर्धारें ॥ तूं माय म्यां पोरें आळ कीजे ॥ २ ॥
गोविंदा तूं पति आम्हीं पतिव्रता ॥ गोविंदा तूं पिता पुत्र आम्हीं ॥ ३ ॥
गोविंदा तूं सिंधु आम्हीं सर्व गंगा ॥ असों सर्व अंगा आलिंगुनी ॥ ४ ॥
गोविंदा तूं आत्मा आम्ही आत्मस्थिति ॥ तूं रत्न मी दीप्ति गोपीनाथा ॥ ५ ॥
तुह्मीं दयार्णव आह्मीं तेथें दया ॥ असों सोयरिया अभिन्नत्वें ॥ ६ ॥

## अभंग ३.

चाड नसे मज आणिक कोणाची ॥ एका गोविंदाची आस पाहें ॥ १ ॥
तयावीण जीणें शून्य वाटे लोकीं ॥ कोण माझे पोखी मनोरथ ॥ २ ॥
कोण जाणे माझे जीवींचा कळवळा ॥ कोण वेळोवेळां आळवील ॥ ३ ॥
दाही दिशा तुजवीण शून्य झाल्या ॥ चित्त कांहीं केल्या स्थिर नोहे ॥ ४ ॥
दयार्णवा तुझ्या छायेसी वाढलों ॥ आजि वाटे झालों परदेशी ॥ ५ ॥

हा वरील अभंग स्वामीचे गुरु श्रीगोविंद हे समाधिस्थ झाले त्या काळीं रचिला असावा असें वाटतें.

## अभंग ४.

गोविंदा तूं जळ मी तेथें कल्लोळ ॥ असों सर्वकाळ ऐक्यसुखें ॥ १ ॥
तूं बिंब मी तेज तूं हेतु मी काज ॥ व्यापक तूं पूज्य पूजक मी ॥ २ ॥
अणूचा वियोग नसे तुह्मां आह्मां ॥ आजी मेघःशामा सांडूं नको ॥ ३ ॥
तूं रस मी गोडी तूं वृक्ष मी वाढी ॥ तूं शक्ति मी प्रौढी सामर्थ्याची ॥ ४ ॥
दयार्णवस्वामी मी तुझा सेवक ॥ वियोगाचें दुःख साहों नेणें ॥ ५ ॥

खालील अभंगांत ढोंगी लोकांची चांगलीच कानउघाडणी केली आहे—

### अभंग ५

सोंवळेंओवळें जनामाजीं दावी ॥ कामक्रोध जीवीं वागवितो ॥ १ ॥
त्याचें शुद्धपण पिकलें वृंदावन ॥ जैसे भले गुण शिंदळीचे ॥ २ ॥
व्रतें उपवास करी बारामास ॥ आल्या अतितास पाठी लागे ॥ ३ ॥
प्रदक्षिणा फार घाली नमस्कार ॥ जनासी निष्ठुर यमाहुनी ॥ ४ ॥
पुराणश्रवण आपण नाठवी ॥ लोकां बोल ठेवी अधर्मांचा ॥ ५ ॥
दयार्णवीं ऐसें न तरे पाषाण ॥ अपानशोधन आचरती ॥ ६ ॥

### हनुमान्स्तुति.

जयजय मारुतऔरस भोजय ॥ दाशरथेप्रियभक्त विभो ॥ ध्रु० ॥
सीताशोधनशील खलारे ॥ कौणपपुरपतिमत्तबलारे ॥ १ ॥
सौमित्रासुतजीवनहेतो ॥ रामविजयसुखवर्धनकेतो ॥२ ॥
विघ्नसमूहविनाशकृशानु ॥ रामदयार्णवपंकजभानु ३ ॥

### आरती परब्रह्माची.

पहुडावें पहुडावें देवा ब्रह्मांडशेजे ॥
ज्ञानाज्ञानरहित जाणिव जे ठायीं लाजे ॥ ध्रु॥
पिंडीं सकळहि इंद्रियवृंद शोभला मेळा ॥
ब्रह्मरंध्रीं सुखें निद्रा करा गोपाळा ॥ १ ॥
त्रिकुट श्रीहाट गोल्हाटादि सांडुनियां कोठें ॥
औटपीठ लंघुनी ब्रह्मगिरी चोहटे ॥ २ ॥
भ्रमरगुंफा टाकुनि पुनरपि चला सदनासी ॥
जे ठायीं विश्रांती होत पूर्ण मदनासी ॥ ३ ॥
दयार्णवस्वामी ऐसे सदनीं पहुडावें ।
स्वसुखाच्या डोहीं पुनरपि येणें बुडवावें ॥ ४ ॥

हरिवरदा व तन्मयानंदबोध या ग्रंथांशिवाय, या कवीचीं हीं इतकींच पद्यें उपलब्ध असून, तीं अद्याप प्रसिद्ध झालेलीं नसल्यामुळें, त्यांचा येथें समावेश करावा लागला.

कृष्णदयार्णवस्वामीचा, " तन्मयानंदबोध " या नांवाचा सुमारें ३०० ओव्यांचा एक अध्यात्मग्रंथ असल्याचें समजतें, परंतु तो अद्याप प्रसिद्ध झालेला नाहीं. या कवीचें पुढील पद काव्यसंग्रहांत प्रसिद्ध झालेलें आहे:—

पद.

हरि हा आपणचि जग झाला । आपणचि जग झाला ॥ ध्रु० ॥
अपणचि देवभक्तहि होऊनि । पूजित अपणाला ॥ १ ॥
उत्तम अधम योनी जितक्या । जीवरूपें भरला ॥ २ ॥
सर्व खलु इति **कृष्णदयार्णव** । श्रुति वदती त्याला ॥ ३ ॥

यावरून दयार्णवस्वामींनीं आणखी बरींच पदें लिहिलीं असावीं, असें वाटतें, परंतु तीं उपलब्ध व्हावीं कशीं, हाच मोठा प्रश्न आहे.

पुणें येथील, साप्ताहिक ज्ञानप्रकाश पत्राच्या पहिल्या वर्षाच्या ७७ व्या अंकांत, रा. रा. पांगारकर यांचा या कवीवर एक लहानसा लेख प्रसिद्ध झाला आहे त्यांत त्यांनीं, शके १५९६–१६६२, हा या कवीचा काल दिलेला आहे. श्रीकृष्ण-दयार्णवस्वामी आपल्या हरिवरदाग्रंथाचा ८७ वा अध्याय लिहित असतां, शके १६६२ मार्गशीर्ष शुद्ध पंचमी सोमवार या दिवशीं समाधिस्थ झाले व हरिवरदा ग्रंथाचे पुढील अध्याय, त्यांचा शिष्य ' उत्तमश्लोक ' यानें लिहिले. या गुरुशिष्यांच्या समाधि पैठण येथें जवळ जवळ असून, त्यां पैकीं श्रीमत्कृष्णादयार्णवांच्या समाधीवर पुढील श्लोक लिहिलेला आहे:—

' रौद्री द्विषद् षट् शशिशाक्य वर्षीं । सत्पंचकीं शुक्ल सुमार्गशीर्षीं ॥
नैर्गुण्य श्रीकृष्णदयार्णवासी । तत्पादुका पूज्य सुखैकराशी ॥ १ ॥ '

---

# अवचितसुत काशी.

आधीं कवीचा वाग्विलास । तरि मग श्रवणीं तुंबळे रस ।
कवित्वेनि मतिप्रकाश । कवित्वास होय ॥ १ ॥

समर्थ.

या ग्रंथांत, आतांपर्यंत, ज्या महाराष्ट्रकवींचीं चरित्रें दिलीं, त्यांपैकीं 'शेखमहमद' हा म्लेंच्छधर्मीय कवी शिवायकरून बाकीचे सर्व कवि जातीनें ब्राह्मण होते; परंतु आतां, ज्या कवीचें संक्षिप्त चरित्र येथें द्यावयाचें योजिलें आहे, तो कवि, जातीनें क्षत्रिय होता. नासिक जिल्ह्यांत भारम ह्मणून एक गांव आहे, तेथें हा कवि सुमारें २२५ वर्षांपूर्वी होऊन गेला. या कवीचे वंशज सध्यां तेथें आहेत, परंतु त्यांस या आपल्या पूज्य पूर्वजासंबंधानें कांहींच माहिती नाहीं. तथापि, काशिकवीनें, आपल्या 'द्रौपदीस्वयंवर' ग्रंथाच्या अखेरीस थोडेंसें आत्मवृत्त दिलेलें असून, प्रस्तुत चरित्रही त्याच वृत्ताच्या आधारानें लिहिण्यांत आलें आहे.

या कवीचा बाप भारम गांवचा देशमुख असून तो चंद्रवंशी क्षत्रिय होता. त्याचें आडनांव सोळंखी व गोत्र अत्रि होतें. देशमुखीचें काम कांहीं दिवस केल्यावर, अवचितरावांनीं (हेंच त्यांचें नांव होतें) एक गांव वसविलें व त्याचें नांव 'भारम' असें ठेविलें. अवचितरावांस दोन मुलगे होते. एकाचें नांव त्रिंबक व दुसऱ्याचें काशी. हाच काशी आमचा चरित्रनायक 'अवचितसुत काशी' होय. अवचितराव हे जरी मोठे पराक्रमी पुरुष होते, तरी एकंदरींत त्यांची वृत्ति सात्विक व हरिभक्तिपरायण होती. ते पंढरपुरचे वारकरी असून, भारम येथेंही आपल्या वाड्यांत त्यांनीं श्रीपांडुरंगाची मूर्ति स्थापन केली होती व प्रतिवर्षीं, आषाढ वद्य एकादशीच्या दिवशीं, ते तिचा मोठा उत्सव करीत असत. या उत्सवाप्रीत्यर्थ महाराष्ट्रांतील शेंकडो लोक भारम येथें जात असत. अशाप्रकारें विठ्ठलाचें माहात्म्य व भक्ति, हीं अधिकाधिक वाढत चालल्यावर, भारम गांवाचें मूळचें नांव जाऊन, लोक त्यास 'विठ्ठलपुर' असें ह्मणूं लागले. गांवाचे मालक अवचितराव हे स्वतः फार सत्वस्थ वृत्तीचे असल्यामुळें, गांवांतील इतर लोकही तसेंच सज्जन होते. पुढें कांहीं दिवस गेल्यावर, अवचितरावांची महत्त्वाकांक्षा अंमळ वाढत चालली व आस-

पासच्या अधिकारीवर्गाच्या आज्ञेचें ते वरचेवर उल्लंघन करूं लागले. आपला पाठिराखा श्रीपांडुरंग जर समर्थ आहे, तर क्षुद्र मनुष्यांच्या हातून आपलें काय वांकडें व्हावयाचें आहे, असें ते ह्मणत असत. पुढें त्यांनीं भारमगांवानजीक असलेला एक किल्ला हस्तगत केला व त्याचें 'गोपाळगिरी' असें नांव ठेविलें. या किल्ल्यांत, अवचितरावांनीं आपल्या दोघां मुलांसह तीन महिने वास केल्यावर, एकेदिवशीं, दिल्लीपति औरंगजेब याचें सैन्य त्या किल्ल्यावर चालून आलें. नुसत्या लढाईनें किल्ला सर होत नाहीं, असें दिसून आल्यावर, मुसलमानांनीं किल्ल्यावरील कांहीं लोक फितुर केले व त्यांच्या साह्यानें किल्ला घेऊन, अवचितराव व त्यांचे पुत्र यांस कैदेंत ठेविलें. 'त्यावेळीं' कवि ह्मणतो, 'आह्मांस, सगळें ब्रह्मांड दुःखानें भरलें आहे कीं काय, असें वाटूं लागलें. परंतु आमचा पिता अवचितराव याच्या मनावर या विपत्तीचा बिलकुल परिणाम झाला नाहीं. त्यानें आह्मांस धीर दिला व 'परमेश्वराचें स्मरण करा' असें सांगितलें. आम्हीं दिल्ली येथें बंदिवासाचें दुःख भोगीत असतां, अवचितराव आम्हांस रात्रंदिवस ब्रम्हनिरूपण करीत असत व त्यामुळें आम्हीं तेथें आनंदानें कालक्रमण केलें. परंतु आमचें दुर्दैव अद्याप संपलें नसल्यामुळें, कांहीं दिवसांनीं आमचा पूज्य पिताही आह्मांस टाकून गेला व त्यावेळीं आमच्यावर जो दुःखाचा पर्वत कोसळला त्याचें वर्णन करितां येणें अशक्य आहे. दिल्ली येथें अशा दुःखावस्थेंत आह्मीं दिवस कंठित असतां, आमच्या कुटुंबांतील माणसें जीं भारम येथेंच होतीं, त्यांचें तेथील लोकांनीं फार उत्तमप्रकारें संगोपन केलें. पुढें कांहीं दिवस गेल्यावर आह्मीं बंधमुक्त होउन दक्षिणेंत आलों.'

याप्रकारें या काशीकवीचें अल्पचरित्र, त्याच्याच ग्रंथाच्या आधारानें येथें दिलें. या चरित्रावरून, छत्रपती शिवाजी महाराजांच्या मृत्यूनंतर संभाजीच्या कारकीर्दींत महाराष्ट्रांत जी अव्यवस्था माजून राहिली होती तिची चांगलीच कल्पना होते; व अशा अस्मानी सुलतानी देशस्थितीच्या प्रसंगीं, इतक्या विपत्ति भोगून, काशीकवीनें आपला मोर्चा कवित्वाकडे फिरविला याचें मोठें नवल वाटतें. या कवीचे द्रौपदीस्वयंवरावर दोन मोठाले ग्रंथ असून त्यांपैकीं एक श्लोकबद्ध व दुसरा ओंवीबद्ध आहे. पहिल्याचे अध्याय १४ असून दुसऱ्याचे २९ आहेत. हे दोन्ही ग्रंथ छापून प्रसिद्ध झालेले असून, काशीकवि हे महानुभावपंथी असल्यामुळें, या ग्रंथांचें त्या पंथांतील लोकांत मोठें महत्व आहे. या दोन ग्रंथांशिवाय, काशीकवीचा रामचरित्रावरही एक ओंवीबद्ध ग्रंथ असल्याचें समजतें, परंतु तो अद्याप उपलब्ध झालेला नाहीं.

काशीकवींची वाणी प्रासादिक, फारच रसाळ व फार अलंकारिक आहे. याच्या ओंव्या तर मुक्तेश्वराच्या ओंव्यांप्रमाणें फारच सुरस व हृदयंगम आहेत. वर्णनशैली तर इतकी बहारीची आहे कीं, त्याचा ग्रंथ वाचीत असतां त्यांत वर्णिलेलीं कथानकें प्रत्यक्ष आपल्या समोर घडत आहेत कीं काय असें वाटतें. असल्या अंदाधुदीच्या वेळांत, फारसें शिक्षण मिळण्याचा संभव नसतां, काशीकवींसारख्या क्षत्रियवृत्तीनें दिवस घालविणाऱ्या कवीनें 'द्रौपदीस्वयंवरासारखा रसाळ ग्रंथ लिहावा, हें ईश्वरी प्रसादाशिवाय घडून येणें केवळ अशक्य होय. हें लिहिणें कोणास अतिशयोक्तीचें वाटेल तर त्यानें या कवीचें 'ओंवीबद्ध द्रौपदीस्वयंवर' एक वेळ वाचून पहावें. या कवीचा, 'द्रौपदीस्वयंवर' हा विषय फार आवडीचा होता असें दिसतें. कारण तसें नसतें तर त्या एकाच विषयावर, एक श्लोकबद्ध व दुसरा ओंवीबद्ध, असे दोन ग्रंथ लिहिण्याचें त्यांस कांहीं कारण नव्हतें. 'हे दोन्ही ग्रंथ आपण, महाभारताचें आदिपर्व व कथाकल्पतरु या ग्रंथांच्या आधारानें लिहिले' असें कवि ह्मणतो. काशीकवींच्या द्रौपदीस्वयंवरांतील द्रौपदीच्या पणाची गोष्ट मूळ भारतांत निराळ्या रूपानें सांगितलेली असून, कवीनें वर्णन केलेली गोष्ट 'कथाकल्पतरु' ग्रंथावरून घेतली असावी असें वाटतें. मुक्तेश्वरी भारतांत ही गोष्ट मूळ भारताप्रमाणेंच वर्णिलेली असून तेथें 'प्राकृत कवींचा वाग्जल्प' असे उद्गार काढून, मुक्तेश्वरांनीं भारतांतील कथानकांत फिरवाफिरव करणाऱ्या प्राकृत कवींचा निषेध केला आहे. आतां, ज्यांनीं मुक्तेश्वरापूर्वीं महाभारतावर व त्यांतील कथाभागावर प्राकृत ग्रंथ लिहिले होते असे कवि 'माधवस्वामी' 'कृष्णयाज्ञवल्कि' शिवकल्याण व कृष्णदासमुद्गल हे असल्यामुळें, मुक्तेश्वरांचे वरील उद्गार यांसच अनुलक्षून आहेत, हें उघड होतें. माधवस्वामींचा महाभारतावर एक मोठा ओंवीबद्ध ग्रंथ असून, सुमारें ८ वर्षांपूर्वीं, 'हा ग्रंथ लवकरच छापून प्रसिद्ध होणार आहे, अगाऊ किंमत रु. १५' अशा अर्थाची एक जाहिरात, दोन गृहस्थांच्या सहीनें पुण्याच्या जगद्धितेच्छु पत्रांत प्रसिद्ध झाली होती परंतु दुर्दैवाची गोष्ट ही कीं भरपूर लोकाश्रय न मिळाल्याकारणानें तो ग्रंथ शेवटीं प्रसिद्ध झाला नाहीं! कृष्णयाज्ञवल्कीचा कथाकल्पतरु ग्रंथ तर प्रसिद्धच आहे; परंतु हल्लीं जो कथाकल्पतरु ग्रंथ प्रसिद्ध (छापलेला) आहे, तो अस्सल कथाकल्पतरु नसून, मूळ कथाकल्पतरु व माधवकृत महाभारत यांचें तें मिश्रण आहे. मूळ कल्पतरूची प्रत रा. राजवाडे यांस मिळाली आहे असें समजतें. असो.

वरील चारी कवि एकनाथस्वामींचे समकालीन होते.

आतां अवचितसुत काशीच्या दोन्ही द्रौपदीस्वयंवरांतील कांहीं सुरस वेंचे उतरून घेतों. श्लोकबद्ध द्रौपदीस्वयंवराच्या शेवटच्या अध्यायांतील शेवटचे कांहीं श्लोक पहा:—

' कैसें संस्कृत पद्य एक नुमजे छंदोपछंदादिकें ।
हे निभ्रांत हरीदया ह्मणुनिया नेली कथा कौतुकें ॥
कैसी रे तुजला दया कवण तूं कोणें गुजा ओपिलें ।
तुम्ही संत महंत माय पितरें सांगूं तुह्मां आपुलें ॥ १ ॥

श्रीवंशाधिपती निशारमण तो वृत्ति स्वदेशाननीं ।
सोळंखे कुळधर्म श्रीपति कुळस्वामी रहे लोचनीं ॥
भारद्वाज सुगोत्र जाण जननी ती अन्नपूर्णा असे ।
तात श्रीअवचीतराव अवनी प्रौढी प्रतापी वसे ॥ २ ॥

पितृराज तयासि भक्ति पढिये श्रीकेशवाची तदा ।
ठेवी श्रीयदु भार्म पौर नगरा सेवी हरीच्या पदा ॥
वृत्तीकारण सैन्यपालन करी शत्रू रणीं मोडिले ।
तेथें निग्रह वाढला मग जगीं वैरी बहू जोडिले ॥ ३ ॥

त्या दुःखें त्यजिला निवास जनकें गोपाळ नामें गिरी ।
बांधोनी बळकाविला, नृपदळें चालोनि आलीं वरी ॥
संग्रामीं गड नागवे मग तिहीं विश्वासघातक्रिया ।
केलें बंधन संकटांत पडले हा हा हरी सावया ॥ ४ ॥

बंधु त्रिंबकराज तातविषयीं होते सखे सोयरे ।
आतां काय उपाय घाय न चुके दिल्लींद्र मारील रे ! ॥
ऐशा घोर भवार्णवांत जनकें बोधासि आरोपिलें ।
ध्यारे ध्या हरि सांवळ्याति वचनें, सर्वांतरीं लागलें ॥ ५ ॥

गेले दोष मनांत तोष भरले श्रीकृष्णघोषें पहा ।
कैंचे बंधनयुक्त मुक्त हृदयीं आनंद झाला महा ॥
श्रीकृष्णें निजरूप दाउनि मला स्वप्नांत आलिंगिलें ।
प्रेमाचा पुर फूटला मग मुखें वक्तृत्व हें लोटलें ॥ ६ ॥

स्वानंदें जिविंच्या गुजासि वदलों, मानाल हो अन्यथा ।
जालों पावन मी पतीत पतनीं पितृप्रसादें यथा ॥

त्या पितृपतिचें उत्तीर्ण जगतीं होऊं कसे सज्जना ।
जेणें देऊनि जन्मकर्म नयनीं केलें परेशा जना ॥ ७ ॥

देतो जन्म पिता परंतु जनकें नाहीं गती दीधली ।
नाहींही ह्मणतां नये महितळी कोणी असे शोधिली ॥
वक्तृत्वा मुळ हें ह्मणोनि वदलों म्यां सज्जना ओपिली ।
आतां सार विचार फार ह्मणणें राहो, कथा संपली ॥ ८ ॥

तुह्मी संत केला कृपें ग्रंथ सतीं । गुरुत्वें गुरु श्रीपती पूर्ण कर्ता ॥
नमोनी तुह्मां ज्ञानिया ज्ञानमंतां । लडीवाळ मी मागतों एक आतां ॥ ९ ॥
मराठी टिका देशभाषा मराठी । मराठी कुळी जन्मवाणी मराठी ॥
गुरुग्रंथही वाचिले म्यां मराठी । करावी क्षमा न्यून ती पूर्ण दृष्टी ॥ १० ॥
विधिसुतसुत साक्षी पल्लवी नाम होता । निशिवरसुतवारीं श्रावणी शुद्ध भूता ॥
वचनसुमनराशी तद्दिनीं पूर्ण झाली । अवचितसुतकाशी दास साष्टांग घाली ॥ ११ ॥

वरील उताऱ्यावरून कवीच्या शालीनतेशिवाय दुसऱ्या अनेक गोष्टींची माहिती मिळते, ती अशी कीं, कवीस मराठी भाषेचा व महाराष्ट्राचा मोठा अभिमान होता. व त्यानें त्या कालापूर्वीं होऊन गेलेल्या मराठी कवींचे ग्रंथ लक्ष्यपूर्वक वाचिले होते. या कवीनें, आपली कविता लिहितांना, मुक्तेश्वरांच्या कवितेचें व वर्णनशैलीचें बुद्धि-पुरस्सर अनुकरण करण्याचा प्रयत्न केलेला दिसतो व तो प्रयत्न बऱ्याच अंशीं चांगला सिद्धीस गेला आहे असें ह्मणण्यास हरकत नाहीं. ज्या श्लोकबद्ध द्रौपदी-स्वयंवरांतील वेंचे वर दिले आहेत, तो ग्रंथ या कवीच्या दुसऱ्या ओंवीबद्ध ग्रंथा-इतका सरस उतरलेला नाहीं. चुकीची वृत्तरचना, अशुद्ध शब्दप्रयोग व शब्दांची ओढाताण हे प्रकार या ग्रंथांत ठिकठिकाणीं आढळतात, मात्र प्रसादाच्या दृष्टीनें पाहिल्यास ग्रंथास नांव ठेवण्यास जागा नाहीं. या कवीचा दुसरा ओंवीबद्ध द्रौपदी-स्वयंवर ग्रंथ तर कवित्वाची, शब्दसौष्ठत्वाची, उदात्त कल्पनाची व रसपरिपाकाची केवळ खाण आहे, असें ह्मटल्यास खचित अतिशयोक्ति होणार नाहीं. मुक्तेश्वरांचें रामा-यण वाचतांना वाचकांचा जसा विरस होतो, तसा या कवीचा श्लोकबद्ध द्रौपदीस्वयंवर वाचतांना वाचकांचा विरस होतो परंतु तेंच मुक्तेश्वरांचें महाभारत वाचतांना वाचक जसा काव्यानंदानें डोलूं लागतो, तसाच तो या कवीचा ओंवीबद्ध द्रौपदीस्वयंवर ग्रंथ वाचतांनाही डोलूं लागतो. हें या दोन कवींमधील साम्य चिंतनीय

आहे. आतां, याच्या वरील ग्रंथांतील कांहीं सुरस वेंचे येथें देऊन, हा चरित्र-लेख संपवितों.

पांडव, लाक्षागृहांतून सुरक्षितपणें बाहेर पडल्यावर, गंगातीरावरील अरण्यांत भीमसेन व हिडिंब राक्षस, यांचें जें भयंकर युद्ध झालें, त्याचें वर्णनः—

ओंव्या.

'खेचरी घालूनि पृष्ठभागीं । पुढें भीम झाला पवनवेगीं ।
तंव हिडिंब आदळला आंगीं । हाणे 'साहें रे! मानवा ॥ ९८ ॥
प्रचंड हस्तीं होता तरु । तेणें ताडिला वृकोदरु ।
वृक्ष शतचूर्ण झाला, येरू । क्रोधव्याघ्रें ग्रासिला ॥ ९९ ॥
भीम गर्जिनला सिंहनादें । पाताळ दुमदुमिलें पडसादें ।
वनीं गतप्राण झालीं श्वापदें । कडे खचले गिरींचे ॥ १०० ॥
कल्पांत कोपें मुष्टी वळी । आक्रमूनि घाव हाणी वक्षःस्थळीं ।
चाचरी जातां जातां भूतळीं । पडिला मौनी निशाचरू ॥ १०१ ॥
हिडिंब पडिला मूर्च्छित रणीं । राक्षसीं उठावा केला चरणीं ।
पृथ्वी दडपली; त्यांचे पाणि । पादपशिळामंडित ॥ १०२ ॥
वातवेगें करुनि अवळा । प्रहार केला एकवेळां ।
भीम वज्रदेही धोंडा शिळा । भग्न होती लागतां ॥ १०३ ॥
न चले बळ आयुधांचें जेथें । राक्षसीं काय करावें तेथें ।
मग मनोवेगाचे पंथें । रिपु मारूं लागला ॥ १०४ ॥
पायीं धरुनि एका आहाटी । एका घाली नभाच्या पोटीं ।
आक्रमूनि ज्यांसी हाणी मुष्टी । ते भग्नदेही पैं होती ॥ १०५ ॥
भीमगज रिपुकमळदळीं । चंड करूं लागला कंदळी ।
हाक झाली बळी रे बळी । स्वैर पळों लागले ! ॥ १०६ ॥
तंव हिडिंब झाला मूर्च्छारहित । वृक्ष उपटिला नभचुंबित ।
कल्पांत आरोळी देत । आला भीमासन्मुख ॥ १०७ ॥
'साहें रे साहें' म्हणोनि विक्रमें । मस्तकीं ताडिला कोपें परमें ।
तो घाव लागतांचि तमें । नेत्र दोन्ही व्यापिले ॥ १०८ ॥
घडिली सेवाळी लागतां भीमा । त्याची उर्णाव पुरुषोत्तमा ।
तात्काळ सावध झाला, सीमा । क्रोधसागरें सांडिली ॥ १०९ ॥

मग पादप उन्मळोनी भीमें । ह्मणे 'आतां मारीन रे नेमें' ।
ह्मणोनि हाणिला चंडद्रुमें । येरें निजवृक्ष घेतला ॥ ११० ॥
दोन्हींचे वृक्ष भंगोनि गेले । मग दोघे अंगासि आदळले ।
जैसे रुद्र त्रिपुर एक झाले । महादुर्धर वनीं ॥ १११ ॥
दोघे गर्जती सिंहनादें । घाव हाणिती दीर्घद्वंद्वें ।
आकाश दुमदुमी, दोघांचीं पदें । पृथ्वी ग्रासीतसे ॥ ११२ ॥
कळा लाविती परस्परें । युद्ध करिती महानिकरें ।
भिडतां भिडतां पंडुकुमरें । काय केलें तें ऐका ॥ ११३ ॥
वळोनि वज्रांगपाणि मुष्टी । रिपु ताडिला हृदयसंपुटीं ।
कंठीं श्वास दाटला, दृष्टी । व्यापिली महानिद्रेनें ॥ ११४ ॥
पायीं धरूनि नभीं फिरविला । मग बळें पृथ्वीवरी आहाटिला ।
पर्वत अवघा दणाणिला । दिशा लंघिल्या राक्षसीं ॥ ११५ ॥

वरील वर्णन वाचून, भीममागधयुद्धाचें मुक्तेश्वरानें जें वर्णन केलें आहे, त्याची रसिक वाचकांस आठवण झाल्याशिवाय रहाणार नाहीं. एखाद्या गोष्टीच्या वर्णनाची काशीकवींची हतोटी केवळ अपूर्व आणि रसाळ अशी आहे. किंबहुना त्याचा ओंविबद्ध द्रौपदीस्वयंवर हा ग्रंथ केवळ वर्णनात्मकच आहे, असें ह्मटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं व अशा सुरस ग्रंथांतील थोडेसे उतारे वाचून रसिक जनांचें पूर्ण समाधान होणें अशक्य आहे. यासाठीं हा उत्कृष्ट ग्रंथ एकवेळ वाचून पाहण्याची वाचकांस आग्रहपूर्वक विनंति करितों.

पांडव व कौरव हे, द्रोणाचार्यांच्या अध्यापनाखालीं सर्व शस्त्रास्त्रविद्यापारंगत झाल्यावर, आचार्यांनीं त्यांजपाशीं, द्रुपदराजास पकडून आणा, अशी गुरुदक्षिणा मागितली, त्यावेळीं कर्ण व आचार्य यांचा जो संवाद झाला, तो वाचनीय आहे:—

'असो, सकळांसि विद्या संपूर्ण । झाली, मग सभा केली, जाण ।
कौरव पांडवां गुरुद्रोण । दक्षिणा झाला मागता ॥ १ ॥
तवं कर जोडिले गांधारें । ह्मणे आज्ञा करावी दातारें ।
देश नगरें भांडारें । जें मागाल तें देईन ॥ २ ॥
द्रोण ह्मणे दुर्योधनासी । येणें चाड नाहीं आह्मांसी ।
धरूनि आणावें द्रुपदासी । येणें सर्व पावलों ॥ ३ ॥

ऐसें गुरुवचन परिसतां । गांधार पाहों लागला खालता ।
द्रोण ह्मणे गांधारीसुता । खालीं कां तूं पाहसी ? ॥ ४ ॥
अमित तुजपाशीं दळभारू । आणि कर्णाऐसा महावीरू ।
काय पांचाळ देशींचा नृपवरू । रणीं तुज न जिंकवे ? ॥ ५ ॥
कर्ण ह्मणे भरद्वाजात्मजा । अघटित बोलिलेति जी द्विजा ।
प्रतापनिधि द्रुपदराजा । सैन्यसागराचा स्वामी ॥ ६ ॥
रचवेल अचलांची उतरडी । जाळवेल भविष्याची चिरडी ।
धरवेल अंतकाची नरडी । परी द्रुपद न वचे धरियेला ॥ ७ ॥
ह्मणोनि करवेल तेंचि सांगा । भांडारें देश नगरें मागा ।
मग द्रोण पात्र झाला रागा । काय ह्मणे गांधारासी ॥ ८ ॥
हानि केली रे स्वधर्मालागोनी । जानिता कष्टविली जन्मोनी ।
असो, मज शिष्य नाहीं मेदिनी । व्यर्थ वाणी कां श्रमवूं ॥ ९ ॥

द्वारकानगरीचें पुढील वर्णन किती समर्पक आहे पहा:—

'इंद्रनीळाची प्रभा बहु नीळी । परि त्या वनें दाविली धवळी ।
फणसी कर्दळी नारिकेळी । रातांजन चंदन ॥ १ ॥
ताल माल तमाल खर्जूरी । कपित्थ मांदार बेल बदरी ।
वेत वेळू हरीतकी पिंपळी । चारी गुग्गुळी साल्या ॥ २ ॥
निंब महाळुंगी राय आंवळी । दाळिंबी करवंदी पोफळी ।
भोंकरी पीलुका पूगीफळी । अंबु जांबु कंचन ॥ ३ ॥
बकुल चंपक रंभा सेवंती । पारिजातक मोगरे मालती ।
जाई जुई नाना याती । दिव्यलता जाणिजे ॥ ४
निबिड नांदती तरुराजे । मनोहर शीतळता त्यांमाजी गाजे ।
प्रवेश केलिया हींव वाजे । तापत्रयतप्तासी ॥ ५ ॥
कास्मीरी शिळांची तळमेदिनी । अनंत पंथ बांधिले वनीं ।
हिऱ्यांचे चौक त्यांचे कोनीं । कळा उदकें तुषारती ॥ ६
हेमबंदी बावी पोखरिणी । राहाट पाटें वाहे पाणी ।
वृक्ष पाल्हेजले दाट किरणीं । धरणी तरणी देखेना ॥ ७ ॥

परी ते द्रुम लागले आकाशीं । फळवाणें देती एकमेकांशी ।
सफळ सदा फळफळांच्या राशी । अमृत अंकनी घातलें ॥ ८ ॥
तीं फळें सेवीत स्वइच्छावृत्ति । विहंगराज तेथें नांदती ।
बहुत वर्ण बहुत याती । अगाध मति तयांची ॥ ९ ॥
शुक ह्मणती सारिकांप्रती । कृष्णकथा सांगा हो पुढती ।
मग त्या श्रीगुणमाळा गुंफिती । निराकारापासोनी ॥ १० ॥
वेद ह्मणती आइका आइका । अकळ बोलताती सारिका ।
ह्मणोनि हृदयींची आशंका । श्रवणद्वारें निरसिती ॥ ११ ॥
भविष्योत्तरासी जें नकळे । तें भविष्य बोलती पिंगळे ।
पुराणीं आपुलें अंतर डोळे । सादर तेथें लाविले ॥ १२ ॥
पिकीं पीतांबरधर या नामीं । सुस्वरें रटणा लाविल्या द्रुमीं ।
तेणें किन्नरांचे अंतर्यामीं । सुखसरिता वाहती ॥ १३ ॥
आलापयुक्त वनगायनीं । कोकिळा गायन करिती वनीं ।
परिसोनी अष्ट नायिका मनीं । स्वर आपुले धिःकारिती ॥ १४ ॥
देखोनि उत्तम शीतळ छाइ । मयूरें नाचती तांडव पायीं ।
तेथें लुब्धोनि ह्मणे मी कायी । भद्रनामा नट्ट ॥ १५ ॥
ठायीं ठायीं सरोवरें तळीं । भरलीं असती उत्तम जळीं ।
श्वेत सोमकांताच्या पाळी । पायऱ्या मंडित विशाळा ॥ १६ ॥
कनकवर्ण तेथें हंसें । स्नानें सारोनि वरी उल्हासें ।
द्वारी बैसोनि आपुलीं पिसें । चंचुपुटें सांभाळिती ॥ १७ ॥
प्रियासहवर्तमान सुंदरें । तटाकीं सारसें सुस्वरें ।
बोभाती, कृष्णइंदु सुधाकरें । चकोरें तेथें तृप्तती ॥ १८ ॥
गणना कैंची बदकां बकां । वियोग नाहीं चक्रवाकां ।
परि ऐसें बोलतां आशंका । श्रोतयां निर्माण होईल ॥ १९ ॥
रुक्मिणीमंडित द्वारकाप्रभु । वरी सोळा सहस्रांचा वल्लभू ।
आनंदें भरला असतां नभू । त्यांसि कां वियोग देईल? ॥ २० ॥
आणिक एक मन भावी । बोलोनि गेले पुराणकवि ।
द्वारके प्रकाशले कोटी रवी । तरी रात्र कैंची तेथें ॥ २१ ॥

निशी नाहीं मग शशि दिसेना । न दिसे तैं वियोग त्यां असेना ।
ह्मणोनि चक्रवाकें नाना । सरोवरीं सुख भोगिती ॥ २२ ॥
अखंड कमलिनी आणि कुमुदी । विकासती फुल्लारांची मांदी ।
मकरंद सीमा सांडी षट्पदीं । सदां वीर भ्रमण कीजे ॥ २३ ॥
ऐसें तें श्रीकृष्णाचें क्रीडावन । रम्य आणि स्वर्गापेक्षां पावन ।
नंदनवनें आपुलें मन । ओंवाळूनि सांडिलें ॥ २४ ॥
विविध ते वनींचा सुवास । सेवितां तृप्ति कैंची पवनास ।
शक्रसुमन वाटिकेचें मानस । भ्रमर तेथें झालें ॥ २५ ॥
राजमार्गें सुरनर वागती । उभयभागीं कनकाभिंती ।
उदार द्रुमावरुनि झेंपावती । फळें पुष्पें वोपिती तयां ॥ २६ ॥
कर्दळीपत्रें भरूनि पुष्पीं फळीं । दोहींकडून धांवती माळी ।
घ्या घ्या स्वामी अमृत नव्हाळी । पहा ह्मणती सर्वांसी ॥ २७ ॥

वरील उतारा लक्ष्यपूर्वक वाचिला असतां, असें दिसून येईल कीं, काव्य लिहितांना काशीकवीस एकसारख्या कल्पना सुचत असत. वाचकांनीं, याच ग्रंथांत दुसरीकडे दिलेलें श्रीमत्कृष्णदयार्णकृत द्वारकावर्णन, वरील वर्णनाशीं अवश्य ताडून पहावें. द्रौपदीच्या स्वयंवरासाठीं, दुर्योधन जेव्हां आपल्या शतबंधूंसहवर्तमान, द्रुपदनगरास जाण्याकरितां हस्तिनापुराहून निघाला, तेव्हां त्यानें आपल्याबरोबर जें चतुरंग सैन्य घेतलें होतें, त्यांत मावळे लोकही होते, असें काशीकवीनें लिहिलें आहे ! त्याप्रमाणें आपल्या ग्रंथांत, मराठी भाषेसंबंधानेंही त्यानें एके ठिकाणीं अभिमान प्रदर्शित केला आहे. नैसर्गिक कवित्वशक्ती, उत्कृष्ट व्यवहारचातुर्य, मधुर व समर्पक शब्दयोजना आणि ठिकठिकाणीं प्रगट केलेला अत्यंत विनय, यांहींकरून काशीकवीच्या ग्रंथास एकप्रकारची मनोहर शोभा प्राप्त झालेली आहे. वास्तविक पाहतां द्रौपदीस्वयंवर हें प्रकरण मूळ भारतांत फार विस्तारानें वर्णिलेलें आहे, असें नाहीं. मराठी कवींनींही, महाभारत लिहितांना, या प्रकरणास, एका अध्यायापेक्षां अधिक जागा दिलेली नाहीं; असें असतां, काशीकवीनें द्रौपदीस्वयंवरावर २९ अध्याय, आणि जवळ जवळ ४००० ओंव्या लिहिल्या आहेत, यावरून एखादें लहानसें कथानक, एखाद्या चांगल्या कवीच्या काव्यौघांत सांपडलें, ह्मणजे त्यास अफाट समुद्राचें स्वरूप कसें प्राप्त होतें, हें वाचकांच्या लक्ष्यांत येईल.

काशीकवीनें, दुर्योधनाचें सैन्य व वैभव, द्रुपदराजाच्या राजवाड्यांतील स्वयंवर-मंडप, स्वयंवरासाठीं आलेले छपन्न देशींचे राजे व वधू द्रौपदी, यांचीं जीं वर्णनें दिलेलीं आहेत, तीं फार हृदयंगम आणि अवश्य वाचण्यासारखीं आहेत. परंतु विस्तारभयास्तव तीं येथें उतरून घेतां येत नाहींत, ही निरुपायाची गोष्ट आहे. तथापि इतकेंच सांगतों कीं, ओंवी वृत्तांत कविता लिहिणाऱ्या कवींच्या ग्रंथांवरून त्यांची परीक्षा करण्याचा जर एखाद्या रसिक व विद्वान् गृहस्थानें प्रयत्न केला, तर त्यावेळीं, त्यास, मुक्तेश्वरांच्या खालची दुसरी किंवा तिसरी जागा काशीकवीस देणें भाग पडेल, यांत मुळींच संशय नाहीं. सरस्वतीमंदिरांत, हा ब्राह्मण आणि तो मराठा, असला पंक्तिप्रपंच नाहीं, हें सांगावयास नकोच. तसेंच विद्वत्ता आणि कवित्व हीं सदोदित एकाच व्यक्तीचे ठायीं वास करितात, असें नाहीं, हेंही लक्ष्यांत ठेविलें पाहिजे. विद्वत्ता ही श्रमसाध्य आहे आणि कविता ही ईश्वराचे घरची एक पवित्र देणगी आहे. असो.

द्रुपदराजानें, द्रौपदीस्वयंवरांत, असा पण लाविला कीं, मंडपाच्या एका कोनांत उभारिलेल्या मत्स्य यंत्रावरील फिरत्या मत्स्याचा वामनेत्र, जो कोणी, तीन बाणांनीं विंधन करील, त्यास द्रौपदी माळ घालील. परंतु, ज्याचे तिन्ही बाण फुकट जातील, त्यास तप्ततैलपात्रांत लोटून दिलें जाईल. हा भयंकर पण श्रवण करितांच, स्वयंवरार्थ जमलेल्या राजेलोकांची कशी गाळण झाली, द्रुपदानें त्यांच्या क्षात्रवृत्तीचा कसा धिःकार केला व त्यावेळीं, काशीचा तेजस्वी राजा पक्ष यानें द्रुपदाची कशी कान-उघाडणी केली, हें पुढील वेंच्यांत वर्णिलें आहेः—

> ' एकही[१] न दे प्रतिवचन । सकळ झाले अधोवदन ।
> एक ह्मणती आमुचें आसन । कितिक मोलाचें असेल ॥ १ ॥

---

१ या प्रसंगाचें वर्णन, पांडुरंग कवीनें, आपल्या द्रौपदीस्वयंवरांत केलें आहे, तेंही वाचण्यासारखें असल्यामुळें, मी तें येथें उतरून घेतोंः—

पद

> ' येउनि धृष्टद्युम्न ह्मणे, ' नृप कां बसले न उठा ?, ।
> सज्जुनि धनु हें यंत्र भेदुनी न्यावी हे प्रमदा ' ॥ ध्रु० ॥
> ' प्राप्त जरा हे वर्षं अमूप ' ' कां बसले न उठा ? ' ।
> ' जन्मपासुनि आह्मीं कुरूप ' ' कां बसले न उठा ? ' ।

एक तळासनीं चित्रें काढिती । एक शस्त्रमुष्टीचे मळ फेडिती ।
एक सुवर्णपात्रें मोलाविती । उदमी झाले मावेचे ॥ २ ॥
एक नृप झाले भयातुर । ते आपणांत करिती विचार ।
' कांहो ! कैसा दिसतो प्रकार ' । दुजे ह्मणती ' समयो कठिण ॥ ३ ॥

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

........................... । ' कां बसले न उठा ? ।
' नेणो कांहीं विद्येचें रूप ' । ' कां बसले न उठा ? ' ॥ १ ॥
' पहातां पुरतें न दिसे डोळां ' कां बसले न उठा ? ।
' बापा ! तुटलों प्रस्तुत काळा ' । ' कां बसले न उठा ? ' ।
' पुसणें उचीत नव्हे बाळा ' । ' कां बसले न उठा ? ' ।
' वरुनि श्रमलों कपाळशूळा ' । ' कां बसले न उठा ? ' ॥ २ ॥
' दुर्धर वायु भरला मार्जी ' । ' कां बसले न उठा ?' ।
' आंगीं भरला हा ज्वर आजी ' । ' कां बसले न उठा ? ' ।
' न पडों आह्मीं ऐशा काजीं ' । ' कां बसले न उठा ? ' ।
' नाहीं आमुचे वडील राजी ' । कां बसले न उठा ? ॥ ३ ॥
' आलों दुरूनि हो ! उपवासी ' । ' कां बसले न उठा ? ' ।
' व्याप्त सुषुप्ति हो हृदयासी ' । ' कां बसले न उठा ? ' ।
' एकचि पत्नीव्रत आह्मांसी ' । ' कां बसले न उठा ? ' ।
' ज्ञानें विटलों या विषयांसी ' । ' कां बसले न उठा ? ' ॥ ४ ॥
' द्रौपदी सखीच आह्मां जननी ! ' । ' कां बसले न उठा ' ।
' नमिती मस्तक लावुनि धरणीं ' । ' कां बसले न उठा ? ।
' कैसी करणी ऐकों श्रवणीं ' । ' कां बसले न उठा ? ।
' कृष्ण कृष्ण हरि हरि हरि वदनीं ' । ' कां बसले न उठा ? ॥ ५ ॥

श्लोक

धृष्टद्युम्न ह्मणे, ' समस्त नृपहो ! ऊठा जिणाया पणा ।
योजा चाप. ' तदां कितेक वदती, ' व्याधी पिडा आपणा ' ॥
एका आड दडूनि एक वदती, ' हे चाड नाहीं धरूं ' ।
आली धाड निवारली, तरि पुढें भिक्षा सुखें आदरूं ! ॥ १ ॥

राजे मेळवोनियां सांगु । द्रुपदें मांडिला नरयागु ।
रक्षिता हो हिमाद्रिजारंगु । कांहीं बरें दिसत नाहीं ' ! ॥ ४ ॥

एक अत्यंत भ्याडाथिले । ते प्रतिभ्याडा ह्मणते झाले ।
' कां हो ! बैसलेति उगले । शीघ्र विचार सांगाना ? ॥ ५ ॥

ते ह्मणती " काय सांगों ? आतां । प्राण वांचोत येथून पळतां ।
तरी यादव जाऊं न देती जातां । तोंही लाग दिसत नाहीं ॥ ६ ॥

कटकटा ठेवा पूर्वीं पापाचा । स्वयंवरा धेऊनि आला आमुचा ।
असो, विवेक जाऊीन वांचण्याचा । संशय पडला रायांसी ॥ ७ ॥

राजे प्रतापाचे डोंगर । द्रुपद पुण्याचा मांदार ।
पुनरपि वचन गंभीर । काय झाला बोलता ॥ ८ ॥

ह्मणे, 'प्रत्युत्तर कां न द्या हो ! । मी तवं तुह्मांसि पुसतों नृप हो ।
सभेसि पृथ्वीपतींचा समूहो । असोनि एकही न बोला ॥ ९ ॥

तळीं काय पाहतां ? तुमचे । विक्रम हारपले सर्वांचे ।
कीं दीर्घ मौन्य पाडिलें वाचे । शब्द न फुटे भयास्तव ? ॥ १० ॥

ऐसें वचनसंधान द्रुपदाचें । वर्म भेदिलें महावीरांचें ।
बडिवार भांडार काशीश्वराचें । न सांभाळेच फूटलें ॥ ११ ॥

महाराज तो महाबुद्धि । राव पक्षनामा धर्मसंधी ।
वीर्यसिंधु प्रतापनिधि । उचंबळोनि बोलतु ॥ १२ ॥

ह्मणे, ' द्रुपदराया ! तुमचे ठायीं । नरेंद्र आले आहेत ये समयीं ।
परी बुद्धीचा सारांश हृदयीं । प्रचंड देखतों आह्मीं ॥ १३ ॥

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

क्रोधें पांचाळ राजा वदत, ' क्षितिच हे आजि निर्वीर झाली ।
वाटे निश्चित मातें परिसुनि सकळें भूपवृंदें बुजालीं ॥
केली म्यां हे प्रतिज्ञा फुकट न कळतां चापयंत्रा अशाला ।
हीं भूपें काय रूपें मिरविति प्रहुडी सूर्यतेजीं मशाला ' ॥ २ ॥

काव्यसंग्रह, अनेककविकृतकाव्यें, भाग १ ला.

तुह्मी आज धरापति निरेखिले । तरी काय शब्दचि उंचावले ।
तुह्मासी विक्रम दावूं आपुले । हरूं नवरी छळद्वंद्वें ॥ १४ ॥
कोण वारील पाहों आह्मां । शरसमुद्रीं बुडविजेल तुह्मां ।
जिंकितां वेळ नाहीं या संग्रामा । परी भीड धरितों देवाची ॥ १५ ॥
हा पुरुषोत्तम आदिमूर्ति । पुराणें गाती जयाची कीर्ति ।
स्वयें बैसोनि शोभनभर्ती । सहस्र हातें करवितो ॥ १६ ॥
काय येणें मांडिलें कळेना । एरवीं पण ऐसा असेना ।
विचारितां या त्रिभुवना- । मध्यें ऐसें झालें नाहीं ॥ १७ ॥
नाहीं वर्तलें स्वर्गीं पाताळीं । नाहीं वर्तलें भूमंडळीं ।
कृत त्रेत द्वापार कळी- । मध्यें श्रवण झालें नाहीं ॥ १८ ॥
नाहीं उपदेशिलें नीतिशास्त्रें । नाहीं वदलीं मुनींचीं वक्त्रें ।
काय स्वयंवरें पूर्वीं पणमात्रें । झालीं नाहीं भुवनत्रयीं ? ॥ १९ ॥
जो ब्रह्मचराचर प्रसवला । तेणें अहल्यार्थीं पण केला ।
ह्मणे प्रदक्षिणा करील पृथ्वीला । पुढें येईल तो जामातु ॥ २० ॥
तो पण गौतमें जिंकियेला । 'इंद्र कां हो मागूनि आला ? ।
त्यासी कढईत घाला घाला' । ऐसा धाता ह्मणेचना ! ॥ २१
जनक राजा मैथिलीचा । तेणें पण केला त्र्यंबक धनुष्याचा ।
त्यासी सज्जील तो कन्यकेचा । आत्माराम ह्मणोनी ॥ २२ ॥
तें चाप रावण चढवूं लागला । न चढवेचि कांहो उलंडला ।
त्यासी कढईत घाला घाला । ऐसें विदेही ह्मणेना ? ॥ २३ ॥
कलिद्वापारीं गोविंदें । काय केलें कैसें निकंदें ।
भीमकदुहिता दीर्घद्वंद्वें । बलात्कारें हरियेली ॥ २४ ॥
तेथें शिशुपाळ अपमानला । वधू हारवोनि निका बैसला ।
त्यासी कढईत घाला घाला । ऐसें भीमक ह्मणेच ना ॥ २५ ॥
ऐसीं स्वयंवरें बहुत झालीं । परी कढईत घालण्याची बोली ।
या त्रैलोक्यामध्यें परिसिली । एक तुमचेनि मुखें ॥ २६ ॥
यासी कारण तरी काय राया ? । कीं रूपस आहे तुमची तनया ।
ह्मणोनि असेल, तरी त्या जाया । न्यून कैशा ह्मणाव्या ? ॥ २७ ॥

ज्या अहल्येस्तव नरेंद्रा । सहस्र भगें पडलीं इंद्रा ।
रावणाऐशा ज्ञानसमुद्रा । जानकीरूपें बुडविलें ॥ २८ ॥
रेणुका अग्नींतचि जन्मली होती । परी हे रेणुरायाची स्थिति नव्हती ।
अगाध रूपस झाली दमयंती । परी पिता हें नाहीं बोलला ॥ २९ ॥
पृथ्वीचे राजे करूनि गोळा । दाविला मीनाचा डावा डोळा ।
चुके त्यासी तुह्मी कढईत घाला । हा कोण धर्म ! द्रुपदराया ॥ ३० ॥
खालीं पाहोन वरी विंधावें । तीन बाण चुकतां कढईत जावें ! ।
शिवें दिधलें त्यासी मुकावें । काय घ्यावें ते नोवरीचें ? ॥ ३१ ॥
परी वाटतें आवडे तुह्मासी । लौकिकार्थ रचिलें स्वयंवरासी ।
वधू देणें नाहीं वरासी । मग असाध्य पण केला ॥ ३२ ॥
तुमची बढाई आणि तुह्मीं । रामराज्य करा द्रुपदस्वामी ।
शिवाची आण हो ! हात आह्मीं । जोडिले हे गंगेसी ! ॥ ३३ ॥

या उताऱ्यांतील, काशीराजाच्या स्पष्टवक्तृत्वाची आणि पाणीदारपणाची तारीफ करावी, कीं काशीकवीच्या समयसूचकतेची आणि मानवस्वभावपरिज्ञानाची तारीफ करावी, हेंच समजत नाहीं. काशीकवीच्या कवनशक्तीची परीक्षा या एकाच प्रसंगावरून चांगली करितां येण्याजोगी आहे. इतकीं चांगलीं स्थळें, मोरोपंत आणि मुक्तेश्वर यांच्या काव्याशिवाय, इतर महाराष्ट्र कवींच्या काव्यांत क्वचितच आढळतील.

वर लिहिल्याप्रमाणें, क्षत्रियमंडळी पण जिंकावयास असमर्थ झालेली पाहून, राजा द्रुपद स्वयंवरमंडपांत, आपले प्रजाजन जेथें बसले होते, त्या ठिकाणीं गेला व द्रौपदीचा पण किती भयंकर आहे, हें त्यानें त्यांस पुनः निवेदन केलें, त्यावेळीं, त्यांपैकीं कांहीं धीट गृहस्थ पुढें होऊन राजास ह्मणाले:—

ह्मणती ' काय बोलिले जी तुह्मीं । आमुचें कर्म हें होय स्वामी ।
नृपच्छाया सेवूनि आह्मीं । धन धान्य वेंचावें ॥ १ ॥
आह्मांस विटाळ आहे शस्त्राचा । स्पर्श नाहीं धनुष्याचा ।
कैसें विंधितों त्या विद्येचा । अभ्यास स्वप्नींही नाहीं केला ॥ २ ॥
प्रजाजन बाळकें रायाचीं । राजसुता भगिनी होय आमुची ।
ऐसा कोण पतित जो तिची । विपरीत आशा धरील ? ॥ ३ ॥
प्रजांची वृद्धी इच्छा तुह्मीं । कढईत वैरी घाला स्वामी ।
आतां आज्ञा द्याल तरी आह्मीं । जाऊं जी निजदेशा ॥ ४ ॥

प्रजाजनांकडून याप्रमाणें सणसणीत उत्तर मिळाल्यावर, राजा ब्राह्मणमंडळीपाशीं गेला व आपल्या कन्येचा पण त्यांस निवेदन करून, पण जिंकावयाची कोणाची इच्छा असेल, तर त्यानें उठावें, अशी सूचना केली, त्यावेळीं, भँयानें गांगरून जाऊन कांहीं ब्राह्मण ह्मणाले:—

ऐसें रायासी बोलतां पाहें । ब्राह्मण ह्मणती त्राहें त्राहें! ।
परी आह्मांसी लाहे लाहे । कां जी आलों स्वयंवरीं? ॥ १ ॥
राया दक्षिणा देववेना । तरी विप्र हो! जा कां ह्मणेना? ।
आह्मांसि काय या शोभना— । विण राहिलें आहे? ॥ २ ॥
कढईंत घालीन ब्राह्मणाप्रति । कैसें बोलवलें भूपति?
राम राम! जनकजापति! । कोण धर्म क्षत्रियांचे! ॥ ३ ॥

याप्रमाणें ब्राह्मणमंडळी राजाच्या भाषणाची थट्टा करीत आहे, इतक्यांत, ब्राह्मणवेषानें ब्राह्मणमंडळींत बसलेला अर्जुन पण जिंकावयास पुढें झाला, त्यावेळीं काय मौज झाली, हें कवि सांगतात:—

' ब्राह्मण हासिन्नले सर्वही । ह्मणती ' सत्य संदेह नाहीं ।
आजी यंत्रवैरी नुरे कांहीं । तुह्मांपुढें सर्वथा! ॥ १ ॥
फार उठलेत हो! रागें रागें । परी कासोटें फिटलें आहे मागें ।
कोण्या दुःखास्तव ऐसें वेगें । उबगलेति संसारा? ॥ २ ॥
दंडग्रंथी कंमडलु चिरें । विप्रासि वांटोनि द्या आदरें ।
मग सुचलें कार्य तुह्मी बरें । सिद्धि न्या हो! आपुलें ॥ ३ ॥
गुरूनें ताडिलें काय स्वामी? । कीं वधूसि भाळलेत तुह्मीं ।
वरावया पुढिले जन्मीं । देह संकल्पितां? ॥ ४ ॥

परंतु, पुढें जेव्हां अर्जुनानें एकाच बाणानें मत्स्ययंत्र भेदन केलें, तेव्हां, याच ब्राह्मणांनीं, ' धन्य धन्य ' ह्मणून, आपल्या कानटोप्या, मृगाजिनें, कमंडलु इत्यादि वस्तु, बक्षिसादाखल त्याजकडे फेंकिल्या!

' हरीची भगिनी ह्मणे सुभद्रा ' ही प्रसिद्ध लावणी काशी कवीचीच होय. ही लावणी रामजोशीबुवांची आहे, अशी लोकांची समजूत आहे; पण ती चुकीची होय. कारण या लावणीच्या शेवटीं जोशीबुवांचें नांव नसून, ' काशिकवीचा ठिक होरा '

असे स्पष्ट शब्द आहेत. काशीकवीचें आणखी एक पद एका जुन्या बाडांत मिळालें, त्यांत काशीकवीनें देवापाशीं स्वात्मनिवेदन केलें आहे. हें पद खालीं दिलें आहे:—

तारीं तारीं गुरुराया । गेला गेला जन्म वायां ॥ ध्रु० ॥
केलें नाहीं शिवध्यान । केला साधूचा अपमान ।
धरिला मान नरकीं जाया ॥ तारीं० ॥ १ ॥
केलें नाहीं गंगास्नान । नाहीं गादेचें दर्शन ।
किंवा समुद्रा उधळण । यमुना कालिंदीस जाया ॥ २ ॥
काय केलें पापाचरण । असे कोठें गलें मरण ।
जालों सर्व परी दीन । दिलीं कन्यासुत यमराया ॥ ३ ॥
घडलें नाहीं देवदर्शन । नाहीं फिरलों तीर्थाटण ।
संसारीं गुंतलें मन । काशी दीन लागे पाया ॥ ४ ॥

यावरून काशीकवीस वृद्धपणीं, अपत्यवियोग झाला होता, असें वाटतें. प्रस्तुत पद ' अवचितसुत काशी ' कवीचेंच आहे कीं दुसऱ्या एखाद्या काशीकवीचें आहे, हें मात्र निश्चयपूर्वक सांगतां येणें शक्य नाहीं.

काशीकवीनें आपल्या बापासंबंधानें किती पूज्यबुद्धि प्रदर्शित केली आहे, पहा:—

' पितृसेवा करावी ' सांगे गुरु । तरी मी आजन्म सेवाचोरू ।
ते पोटीं घालूनि उपकारू । थोर केला जनकराजें ॥ १ ॥
तातमंत्रें मी पापात्मा । पावन झालों पंडितोत्तमा ।
मग वक्तृत्वमहिमा । तुह्मांमध्यें पावलों ॥ २ ॥
पितृप्रसादें यथारुची । कृपा लाधलों भगवंताची ।
दुजा भगवंत नाहीं मग कैंची ? । उत्तीर्णता मजलागीं ॥ ३ ॥
पिते सकळांसि असती पाहीं । परी समर्था भेटवी ऐसा नाहीं ।
नाहींही ह्मणतां नये, मही । कोणी शोधिली आहे ? ॥ ४ ॥

या ओंव्यांतील, ' पावन झालों पंडितोत्तमा ' या चरणावरून, काशीकवीची, त्या काळच्या महाराष्ट्रपंडितांत चांगली मान्यता होती, असें वाटतें. काशीकवीचे तीर्थरूप अवचितराव हे परलोकवासी झाले, त्यासंबंधानें कवि ह्मणतो:—

' ह्मणोनि रुसावें विठ्ठलासी । तरी सीमा नाहीं त्या मूर्खपणासी ।
बदरीबीज पेरिलें तयासी । आम्रफळें कैंचीं येताल ? ॥ २ ॥

शुभाशुभ कर्म आचरे प्राणी । हे पूर्वदत्ताची जाण करणी ।
चुकला चुकला मिथ्या वाणी । दोष लावी लौकिकासी ॥ २ ॥
' कर्मणो गहना गतिः सर्वथा । पंडितराजे जाणती यथा ।
शब्द नाहीं त्या कृपाब्धि समर्था । ' बुद्धिः कर्मानुसारिणी ' ॥ ३ ॥

आपल्या द्रौपदीस्वयंवर ग्रंथासंबंधानें कवि ह्मणतोः—-

' सुमनमाळा माझी वाणी । रुळत राहो हरिचरणीं ।
हरीची कीर्ति तांबुलवर्णी । माझे वदनीं सदा रंगो ॥ १ ॥

द्रौपदीस्वयंवर ग्रंथ, शके १६१८ पौषवद्य १० गुरुवार या दिवशीं पूर्ण झाला. या गोष्टीस आज दरोबर २१० वर्षें झालीं. इतक्या वर्षांत, कित्येक राज्यांच्या उलथापालथी झाल्या, कोट्यावधि लोक जन्मले आणि मेले, आणि देशाच्या राजकीय आणि सामाजिक स्थितींत जमीनअस्मानाचें अंतर पडलें; तथापि सत्कवींचे ग्रंथ अद्याप कायम असून, ते ज्या भाषेंत लिहिलेले असतील ती भाषा अस्तित्वांत असेपर्यंत ते असेच कायम रहावयाचे आहेत व त्यांचा लाभ राजापासून रंकास सारखा होणार आहे. तर अशा प्रकारचे ग्रंथ लिहून, सगळ्या जगास आपलें कायमचें ऋणी करून ठेवणारे जे सत्कवि होऊन गेले, त्यांत आमच्या काशीकवीचीही मी गणना करितों व त्याच्या अमर आत्म्यास एकवार सप्रेम वंदन करून, हा अल्पचरित्रलेख येथें पूर्ण करितों.

# प्रल्हाद शिवाजी बडवे.

प्रल्हादें बळकावुनि नवघननिभकायगड बडवयानें ।
कलि न गणिला करावी, तेथें मग काय गडबड वयानें ॥ १ ॥

सन्मणिमाला, मोरोपंत.

पंढरपूर हें मराठी कवींचें व साधुसंतांचें माहेरघर होय. ज्ञानदेव नामदेवापासून तों तहत मोरोपंत, महिपति व रामजोशी यांजपर्यंत झाडून सारे मराठी कवि ( रामदासपंचायतनांतील कवि सोडून ) श्रीपांडुरंगाचें उपासक होते; त्याच्या प्रेरणेनें त्यांनीं लोकोद्धारार्थ कवनें केलीं यामुळें, पावनता, प्रसाद वगैरे लोकोत्तर गुण आमच्या मराठी कवितेंत सांपडतात; पण ज्या निस्पृहतेनें आणि वैराग्यानें त्यांनीं काव्यें केलीं त्याच गुणांमुळें तीं सांदीकोपऱ्यांतून प्रकाशांत येण्यास उत्सुक नाहींतशीं दिसतात ! असो. आतां ज्या सत्कवीचें लघुचरित्र येथें देण्याचें योजिलें आहे तो कवि श्रीक्षेत्र पंढरपूर येथें सुमारें २०० वर्षांपूर्वीं होऊन गेला. त्याचें नांव प्रल्हाद शिवाजी बडवे. याच्या गुरूचें नांव राघव. ते कीर्तन उत्तम करीत व त्यांचें दुसरे शिष्य गोपाळ व सदाशिव हे मागें राहून आलाप काढीत असें प्रल्हादबुवांनीं आपल्या एका पदांत ह्मटलें आहे:—

'राघववेषें प्रकटुनि आह्मां केला हा उपकार ।
प्रल्हादप्रिय कीर्तन ज्याचें नोहे हा उपचार ॥ '

प्रल्हादबोवांनीं श्रीशिवछत्रपतीची कांहीं कारकीर्द पाहिली असावी, असें वाटतें. शिवछत्रपती कैलासवासी झाल्यावर दिल्लीपति औरंगझेब बादशहानें दक्षिणेंत स्वारी केली होती हें प्रसिद्धच आहे. या हिंदुधर्मद्वेष्ट्यानें पंढरपूरच्या श्रीविठ्ठलाच्या मूर्तीचा उच्छेद करण्याचा घाट घातला होता, परंतु प्रल्हादबोवांनीं त्यावेळीं श्रीपांडुरंगास आपल्या घळदांत लपवून ठेविलें व आलेला प्रसंग टाळून आपलें नांव तत्कालीन संतमंडळांत दाखल केलें. प्रल्हादबोवा प्रेमळ भगवद्भक्त होते व पांडुरंग त्यांशीं बोलत असे, असें सांगतात. बारावर्षांनंतर ह्मणजे औरंगझेब बादशहा मृत्यु पावल्यावर इ. स. १७०९ मध्यें श्रीपांडुरंगाची पुनः राजरोसपणें स्थापना झाली ती आजवर अभंग आहे. पांडुरंगास असा अज्ञातवास पूर्वीं एकदां भोगावा लागल्याचें प्रसिद्ध आहे

यवनी अमलांत विजयानगरच्या राज्यांत विठ्ठलास नेण्यांत आलें होतें तेथून एकनाथ-महाराजांचे आजे भानुदासबोवा यांनीं त्यास पंढरपुरास आणून त्याची पुनः स्थापना केली होती, ही गोष्ट इतिहासज्ञांस विदित आहेच. असो. प्रल्हादबुवांच्या चरित्रां-तील अनेक गोष्टी आज उपलब्ध नसल्यामुळें, या तुटपुंज्या माहितीवरून निर्वाह करून घेणें भाग पडत आहे, त्यास उपाय नाहीं. प्रल्हादबोवांनीं, शके १६४० विलंबीनाम संवत्सर, माघ मास, कृष्णपक्ष, एकादशी वार बुधवार या दिवशीं आपला देह ठेविला. त्यांची समाधि देवळांतच असून अद्याप त्यांच्या पुण्यतिथीचा उत्सव होतो. त्यांचे वंशज सध्यां पंढरपुरांत राहत असून, त्यांनीं आपल्या घरांतील जुनीं दप्तरें पाहण्याची रा. पांगारकर यांस मोठ्या आनंदानें परवानगी दिली व त्यामुळेंच या सत्कवीच्या चरित्रासंबंधानें चार ओळी लिहिण्यास मी समर्थ झालों, याबद्दल त्यांचे आभार मानणें अवश्य आहे.

प्रल्हादबोवा साधु होतेच, पण मोठे कवीही होते. यांनीं श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या अमृतानुभवाचें संस्कृत भाषांतर श्लोकनिबद्ध आहे. प्राकृत काव्यास संस्कृताचें वेष्टन मिळाल्याचीं तीनच उदाहरणें आमच्या पहाण्यांत आलीं आहेत. एक प्रस्तुतचा अमृतानुभव, दुसरें अनंतबोवांनीं संस्कृतांत लिहिलेला मुकुंदराजकृत विवेकसिंधु व तिसरें उदाहरण मोरोपंतांच्या केकावलीची कोणी शास्त्र्यानें केलेली संस्कृत टीका होय. यावरून अमृतानुभव, विवेकसिंधु व केकावली हे तिन्ही ग्रंथ प्राकृत-ग्रंथप्रमाणेंच शास्त्री लोकांस व संस्कृतशास्त्रज्ञांस मान्य झाले हें उघड होत आहे. प्रल्हाद बोवांचें अमृतानुभवाचें संस्कृत भाषांतर फारच सरस व रसाळ उतरलें आहे. आरंभींच्याच दोन ओव्या पहा:—

'ऐसीं निरुपाधिकें । जियें जगाचीं जनकें
तियें वंदिलीं मूळिकें । देवोदेवी ॥ १ ॥
जो प्रियुचि प्राणेश्वरी । उलथ आलिंगनें सरोभरी ।
चारुस्थळीं एके हारीं । सेवितांना ॥ २ ॥'

याचें प्रल्हादबोवा भाषांतर करितात:

'एवं यत्कलामूलं जनकं निरुपाधिकम् ।
शिवशक्त्यात्मकं द्वंद्वं वंदितं तन्मयामुदा ॥ १ ॥
यः प्रियः स [illegible] या मूला प्रिया स्वसुखलिप्सया ।
चारुस्थलेकां पंक्ती भुंजाते सज्जनानुभौ ॥ २ ॥

या संस्कृत ग्रंथाशिवाय त्यांचीं कांहीं मराठी प्रकरणेंही हल्लीं सापडलीं आहेत तीं अशीं:—१ अहल्योद्धार ( ओंव्या ४६ ); सीतास्वयंवर ( मराठी कवींचें लाडकें आख्यान, ओंव्या ७६ ); पांडुरंगमाहात्म्य ( ओंव्या १७९ ). याशिवाय २५ सुंदर पदें व २ आरत्या आहेत. प्रल्हादबोवा हे प्रेमळ हरिभक्त असल्यामुळें त्यांच्या काव्यांतील प्रसाद अवर्णनीय आहे. त्यांच्या पदांतील व वरील तीन्ही ओंवीबद्ध प्रकरणांतील कांहीं वेंचे येथें देतों:—

पद. ( धुमाळी. )

देवा ! नलगे तुमचें कांहीं हो । चंचळ हें मन
निश्चळ होउनि विनटो तुमचे पायीं हो ॥ धृ० ॥
नलगे सुत-धन-गृह-दारा मज इंद्रपदादिक कदाही हो ।
तवपदपंकजभजनेंविण मज सर्वहि ते आपदाही हो ॥ १ ॥
देशी वर जरि तरि तूं आतां याचि स्वरूपें राहीं हो ।
यावच्चंद्रदिवाकर येथुनि कोठेंहि नव जाईं हो ॥ २ ॥
दर्शनमात्रें जडमुढ पापी निजपदवी त्यां देईं हो ।
शिवतनय तवदीन तयाचे हृदयमंदिरा येईं हो ॥ ३ ॥

पद. ( शंकराभरण. )

नमो भक्तजनवत्सला ! पांडुरंगा ! । निजपदांबुजभजकभीतिभंगा ! धृ० ॥
तूंचि जननी जनक तूंचि माझा सखा । स्वजन तूं सद्गुरू गोत्र बंधू ।
तूंचि माझें द्रविण धाम गति विश्राम । तूंचि सकळही काम दीनबंधू ॥ १ ॥
बहुत मी तापलों त्रिविध तापत्रयें । विविध या भवभया फार भ्यालों ।
अमृतदृष्टी करुनि वृष्टि मजवरि करीं । सर्वभावें तुला शरण आलों ॥ २ ॥
त्वत्कथाश्रवण तवनाम संकीर्तन । स्मरणपदसेवनार्चनवंदना ।
दास्यसख्यात्मनिवेदना नवविधा । माजि एक तरि देईं भजना ॥ ३ ॥
विधिहरप्रमुखसुर योगियां नातुडसि । श्रुतिशतें ज्याचिया गाति बिरुदा ।
तो अह्मां सुलभ सन्मूख दृष्टीपुढें । दिससि प्रत्यक्ष प्रल्हादवरदा ॥ ४ ॥

पद (धुमाळी. )

तो हा भीमातीरविहारी हो ।
दुस्तरतर भवडोहीं बुडतां दर्शनमात्रें तारी हो ॥ धृ० ॥

भक्तकाजकैवारी वारी जन्ममृत्युची वारी हो ।
सोसुनि जन्म नृपाचे आपण गर्भवास निवारी हो ॥ १ ॥
गोपवेष अवलंबुनि गोकुळिं करि जो गोरसचोरी हो ।
गोपवृंदसवें घेउनि वृंदावनिं गोवृंदा चारी हो ॥ २ ॥
कंसवंशविध्वंसनकारी यदुवंशी अवतारी हो ।
शेष अशेष मुखें स्तवितां न स्तववे ज्याची थोरी हो ॥ ३ ॥
गोवर्धनिहूनि येउनि भक्ता पुंडलिकाचे द्वारीं हो ।
कटिं कर ठेवुनि तिष्टत इटेवरी शिवसुतसाहयकारी हो ॥ ४ ॥

पद ४.

वाचे शिव शिव नाम गा रे । शिवधर्मीं जागा रे ॥ धृ. ॥
दुर्लभ या नरदेहीं येउनि काय उगा निसुगा रे ।
आळस करितां न कळे केव्हां देइल काळ दगा रे ॥ १ ॥
हरिहरनामावांचुनि आणिक साधीं न लागा रे ।
नामचि हें भवतारक ह्मणउनि वाजति वेदनगारे ॥ २ ॥
यौवनजनधनसंपतिचा तूं धरिसि व्यर्थ फुगा रे ।
संपति तों अवघे विषयीजन मिळति जेंवि ठुगारे ॥ ३ ॥
सद्गुरुकरुणापांगें विश्वीं विश्वंभर उमगा रे ।
शिवतनय प्रभुचे गुण गाउनि अक्षय सुख भोगा रे ॥ ४ ॥

पद ५.

स्तंभीं प्रकटला नरहरी हो ॥

गडगड गडगड गर्जत घोषें धाकें काळ थरारी हो ॥ धृ० ॥
कडकड स्तंभ कडाडित नादें गडगड गगन विदारी हो ।
घडघड रविरथ विघडत गगनीं तडतड धरणि तडाडी हो ॥ १ ॥
कराळमुख सिंहाचें दाढा विक्राळा व्यंकटा हो ।
पिंगट वर्ण जटा सुभटा करिं नखपंक्ती अतितिखटा हो ॥ २ ॥
धडधड धडधड धडकत नेत्रीं अग्नीचे कल्लोळ हो ।
सळसळ सळसळ वदनिं सळाळी विशाळु जिव्हा लोळे हो ॥ ३ ॥
जानूवरि हरि धरि दनुजाधिप रागें उदर विदारी हो ।
काढुनि अरिउदरांतुनि अंत्रें घाली निजकंधरीं हो ॥ ४ ॥

घट घट घोंटित रक्त कंठिंचें वाटे काळ भुकेला हो ।
वृत्तवृकापति दिक्पति ह्मणती मोठा प्रळय उदेला हो ॥ ५ ॥
सुरवर सुमनें वर्षति हर्षें गर्जति जयजयकारीं हो ।
स्ताविती नरकिंकर विद्याधर प्रल्हादकैवारी हो ॥ ६ ॥

वरील पदें किती सरस आहेत व त्यांतील शेवटच्या पदांत नृसिंहावताराचें किती समर्पक वर्णन केलेलें आहे हें रसिकांस सांगावयास नकोच. अशीच सरळ व प्रेमळ रचना त्यांच्या सर्व कवितेची आहे. प्रल्हादबोवांची ओंवी तर मुक्तेश्वराच्या तोलाची आहे. रामानें शिवधनुष्याचा भंग केला त्याचें वर्णन पहा:—

' नृपवदनासह धनुष्य लववी । दक्षीण हस्तें शीत चढवी ।
सर्व संशयासहित उडवी । धनुष्य धुळी टंकारें ॥ ४७ ॥
जानकीचित्तासहित वोढी । भार्गवगर्वासहित मोडी ।
कडकड शद्बें शेष तडमडी । भरे हुडहुडी कूर्मासी ॥ ४८ ॥
नादें मेरुही डळमळी । धाकें समुद्र खळबळी ।
इंद्रादि ह्मणति स्थितिकाळीं । प्रळय कैसा वोडवला ॥ ४९ ॥

सीतास्वयंवर

गोपाळकाला.

तयांप्रती विश्वंभर । ह्मणे, ' शिदोऱ्या आणारे सत्वर ।।
बा रे ! भुकेलेति फार । आजि उशीर बहु झाला ॥ ७० ॥
ह्मणे भोज्यांच्या परवडी । सवंगडी आणिती तांतडी ।
दहींदुधाच्या कावडी । अति आवडी आणिलिया ॥ ७१ ॥
येकीं विस्तीर्ण पाहोनि शिळा । सभोंवता गोपपाळा ।
मध्यें शोभे घनसांवळा । गोपाळकाला मांडिला ॥ ७२ ॥
शिदोऱ्या सोडूनि खडकावरी । येकीकडे मोपहारी ।
एकीकडे बैसल्या व्रजनारी । परी सन्मुख हरी सकळांही ॥ ७३ ॥
गडी ह्मणती यदुपती । तुह्मीं आह्मीं करूं आथींपाथी ।
जे जे ज्या रुचती । ते ते अर्पिती कृष्णमुखीं ॥ ७४ ॥
एकएका गुदगुलिया । एक दाविती वांकुलिया ।
मिथ्याच ह्मणती गाई चुकलिया । दूरी गेल्या उठा वेगीं ॥ ७५ ॥
एक एकाची दृष्टि चुकवूनि । शिदोरी खाती चोरूनि ।

एक पळती घेऊनि । दांत विचकोनी दाविती ॥ ७ ॥
एक करीं घेऊनि अन्नकवळ । नाचतचि खाती गोपाळ ।
एक ह्मणती करतळ । उच्छिष्ट कवळ उडविती ॥ ७७ ॥
भोजनाचिया अंतीं । उरलीं दहींदुधें पिती ।
एक एकावरी ओपिती । एक शिंपिती परस्परें ॥ ७८ ॥
नवनीत भक्षूनि कौतुकें । एकएकाचीं माखिती मुखें ।
गुरळ्या भरूनि ताकें । टाकिती एक एकावरी ॥ ७९ ॥
गगनगर्भीं सुरश्रेणी । बैसूनियां विमानीं ।
काला पाहती नयनीं । दिव्य सुमनें वर्षती ॥ ८० ॥
ह्मणती धन्य धन्य गोकुळजन । धन्य धन्य वृक्ष पाषाण ।
धन्य धन्य तें स्थान । जगर्जीवन जेथें नांदे ॥ ८१ ॥

प्रल्हादबडवेकृत पांडुरंगमाहात्म्य.

अहल्येचें गौतमशापोत्तर दुःखः—

‘ अहल्या ते थोर शाप । ऐकतां पावली परम ताप ।
ह्मणे ‘ मजकडोनि नकळत पाप । देवा ! कैसें घडविलें ! ॥ २० ॥
पति नव्हेसें जरी कळतें । तरि मग कशासि अनुसरतें ? ।
ऋषिसामर्थ्यें स्वदृक्पातें । भस्म करितें दुष्टातें ॥ ॥ २१ ॥
हार ह्मणोनि धरिला कंठीं । पहातां सर्प देखिला दृष्टीं ।
तेणें दूषिली शरीरयष्टी । तैसी गोष्टी हे झाली ॥ २२ ॥
भूतभविष्यवर्तमान । सदा ज्याला त्रिकाळ ज्ञान ।
क्रोधें त्यासही अज्ञानघन । करूनि शाप वदविला ॥ २३ ॥
ऐसें माझें प्रारब्ध खोटें । ह्मणूनि दुःख पावलें मोठें ।
परी माझ्या ऋषीचें मज कोठें । दर्शन घडेल या वरी ? ॥ २४ ॥
आतां अपराधाच्या कोटी । तूं ऋषिराया ! घालीं पोटीं ।
प्रारब्ध भोगूनि सेवेसाठीं । योग्य लवकरी करावें ॥ २५ ॥
ऐसें ऐकोनि करुणावचन । वृक्षपाषाण करिती रूदन ।
निरपराध ऐसें समजोन । गौतममुनी कळवळला ॥ २६ ॥’

अहल्योद्धार.

विस्तारभयास्तव याहून ज्यास्त उतारे देतां येत नाहींत. महाराष्ट्र कविवर्य मोरोपंत यांनीं प्रल्हादबोबांचीं काव्यें चांगलींच वाचलीं होतीं व प्रल्हादबोवांच्याठायीं त्यांची मोठी पूज्यबुद्धि होती हें या चरित्राच्या आरंभींच दिलेल्या सन्मणिमालेंतील आर्येवरून व्यक्त होतें. शिवाय यास दुसराही पुरावा आहे तो असा:—

( १ ) 'ज्ञानहीनानुग्राहक । या अर्थाचें प्रतिपादक ।
विठ्ठल हें नाम एक । अन्वर्थक तुज असो ॥ १२४ ॥'

ही प्रल्हादबुवांच्या 'पांडुरंगमाहात्म्यांतील ओंवी, मोरोपंतांच्या पांडुरंगस्तोत्रांतील

'विदाज्ञानेन ठान् शून्यान् लाति गृण्हाति विठ्ठलः ।'

ह्या चरणाशीं किती तरी जुळते. पण याहीपेक्षां बळकट पुरावा:—

( २ ) 'जो या त्रैलोक्याचा ठक । त्या ठकाचे वेद पाठक ।
त्या ठकासही महाठक । बरा पुंडरीक भेटला ॥ १४२ ॥

प्रल्हादकृत पांडुरंगमाहात्म्य.

'हा विठ्ठल ठक, ठकिले ठक, ठक पडले ठकासि जो हरितो ।
नामचि देतो दावुनि निजार्थजनसंचितार्थं संहरितो ॥ १ ॥
त्यासहि नामा ठकडा भेटे मग यासि ठकविलें तेणें ।
सद्गुणगायननिपुणें वेधियला कृष्णसारसा जेणें ॥ २ ॥'

मोरोपंतांनीं लहान मोठे मराठी कवि वाचले होते यास, त्यांच्याच ग्रंथांत भरपूर पुरावा सांपडतो व मोरोपंत हे स्वत: महाराष्ट्रांतील बऱ्याच मराठी कवींपेक्षां योग्यतेनें व विद्वत्तेनें श्रेष्ठ असतां त्यांनीं सरसकट सर्व मराठी कवींचीं बरीं वाईट काव्यें वाचून त्या सर्वांच्या कवितेचें, आपल्या रसाळ वाणीनें स्तुतिस्तोत्र करावें व आपलें काव्य त्यांच्या काव्यापेक्षां अगदीं कमीप्रतीचें आहे असे उद्गार काढावे, हें मोरोपंतांसारख्या रसिकशिरोमणि महाकवीच्या शालीनतेचें लक्षण नव्हे असें कोण म्हणेल ? मनाचा मोठेपणा ह्मणतात तो हा. असो. आंग्ल कवि ग्रेप्रमाणें जुन्या कवींच्या काव्यकलापांतील जुन्या कल्पना तेवढ्या घेऊन त्यांजवर आपल्या स्वत:च्या अकलेनें कोटी करावयाची ही पंतांची हातोटी तर वर्णनीय होय. वर दिलेल्या दोन

आर्याच पहा, ह्मणजे या विधानाची सत्यता सहज लक्ष्यांत येईल. आपल्या पांडुरंगमाहात्म्यांत विठ्ठलास ठक ह्मटलें प्रल्हादबोवांनीं, परंतु भक्तांचा संचितार्थ हरण करून त्यांना कोरड्या नामाची लालूच दाखवितो ह्मणून विठ्ठलास ठक हें नांव शोभतें, अशी सुंदर कोटी केली मोरोपंतांनीं ! तर, रामायण भारतादि इतिहासग्रंथ, कालिदास भवभूत्यादिकांचीं काव्यें व मराठी साधुसंतांची प्रसादपूर्ण सरस्वती, यांच्या मिश्रणाचा अर्क एका मोरोपंताच्या कवितेंत मात्र सांपडेल. कै. परशुरामपंत तात्या, शंकर पांडुरंग पंडित व निबंधमालाकार यांच्यासारखे भ्रमर मयूरकाव्यमकरंदावर जे एवढे लुब्ध झाले ते यामुळेंच. तर अशा मोरोपंतांनीं प्रल्हादबुवासारख्या प्रेमळ हरिभक्तास आपल्या सन्मणिमालेंत ओंवावें यांत आश्चर्य तें काय ? व बाबापाध्यांसारखा विद्याचारसंपन्न पुरुष त्यांच्या समाधीचें नियमानें दर्शन घेऊन त्यांस गुरुतुल्य मानीत होता यांत नवल तें कोणतें ?



# अनंत बडवे.

' कीं हीं विवेकनिधीचीं भांडारें । प्रकट जाहलीं मनुष्याकारें ।
नाना वस्तूंचेनि विचारें । कोंदाटले हे ॥ १ ॥ '

समर्थ.

मागें ज्यांचें अल्पचरित्र दिलें आहे त्या प्रल्हादबुवांचे अनंत बडवे हे नातू होत. प्रल्हादबोवांस लक्ष्मण व रामचंद्र या नांवांचे दोन पुत्र होते, त्यांपैकीं रामचंद्राचे अनंत बडवे हे पुत्र होत. त्यांनीं आपल्या आजापासून कवित्वशक्ति उचलेली दिसते. प्रल्हादबुवांचा गुरुबंधु गोपाळ तो या अनंतबुवांचा गुरु होय. अनंत बडव्यांनीं एके ठिकाणीं ह्मटलें आहे, ' जें कां तातकृपेकरूनि फळ मी अद्वैत हें लाधलों. । यावरून त्यांचे तीर्थरूपही चांगले अधिकारी होते असें वाटतें. यांचें गोपाळाष्टक गुरुस्तवनपर असून फारच गोड आहे, त्यांतील एकच श्लोक पहा:

' ज्याचा बोधसुधांशु पूर्ण उगवे होतां कृपापूर्णिमा ।
आनंदाब्धि उचंबळे अतिशयें नाशीत जो हृत्तमा ॥
वारी जन्मजरादि जो निजकरस्पर्शें अविद्या हरी ।
ऐसा श्रीगुरुराज तो स्मर मना गोपाळजी अंतरीं ॥ १ ॥

या कवीसंबंधानें महत्वाची अशी कांहींच माहिती उपलब्ध नाहीं. यानें लिहिलेले ग्रंथ :–१ मल्हारीमाहात्म्य ( ओंव्या १३८ ); २ श्रीमद्भागवताच्या पंचमस्कंधांतील भरताख्यान ( ओंव्या १०२ ); ब्रम्होत्तरखंडाच्या आधारानें लिहिलेलीं ३ शिवरात्री-माहात्म्य ( ओंव्या ७३ ) व ४ प्रदोषमाहात्म्य ( ओंव्या ७५ ). याशिवाय कांहीं पदें वगैरे आहेत. काव्यसंग्रहांत ज्या अनंताचीं काव्यें छापिलीं आहेत तो रामदास शिष्य अनंत या कवीहून निराळा आहे हें लक्ष्यांत ठेविलें पाहिजे. या कवीची वाणी किती सरळ, किती रसाळ व कशी प्रासादिक आहे हें खालील पदांवरून रसिकांच्या तात्काळ ध्यानांत येईल.

पद १.

विठोबा आमुचें निजधन तूं । निशिदिनिं तुज चिंतूं ॥ ध्रु० ॥
पुंडरीक यजमान आह्मांप्रति । भाग्योदय हेतू ॥ १ ॥
संत लुटारी लुटति तथापि । मनिं न धरी किंतू ॥ २ ॥
याचिवळें गृहपाशीं असतां । कळिकाळा जिंतूं ॥ ३ ॥

ज्या निधिलाभें प्रल्हादाचा । परमसुखी नातू ॥ ४ ॥

हें पद किती उत्तम आहे बरें ? पद २

ते मज निरवधि आवडती । भक्त महासुकृती ॥
कायावाचा मानस अर्पुनि । जे मजला भजती ॥ ध्रु० ॥
ज्यांच्या पादरजें गा अद्भुत ब्रह्मांडें विरजें ।
व्हावीं, यास्तव त्यांमागें मी चालें पादगती ॥ १ ॥
दोंवरि, दोन्ही भुजा घेउनी आलों या काजा ।
कीं कवळावें आंग तयाचें हृदयीं चौंहातीं ॥ २ ॥
श्रीसद्गुरुच्या बोलें विश्वीं मजला ओळखिलें ॥
नित्य अनंत अनामय त्या मज स्वमनीं सांठविती ॥ ३ ॥

या पदांतील सुलभ व मधुर शब्दयोजनेची तारीफ करावी कीं अर्थसौष्ठवाची तारीफ करावी हें सांगतां येणें कठिण. इतकीं सुंदर पदें महाराष्ट्रवाङ्मयांत थोडींच आढळतील.

पद.

गुरुवर प्रल्हादाचे दास ह्मणवूं आह्मी रे ।
सेवे वय हें वेंचुनि विचरों निजसुखधामीं रे ॥ध्रु
प्रेमें जिव्हेकरूनि नाम त्याचें घेऊं रे ।
नयनद्वारा रूप त्याचें आह्मी पाहूं रे ॥
कर्णांवाटे तद्गुणगण तो हृदयीं घेऊं रे ।
तत्पदतीर्थें सर्वांगें या शीतळ होऊं रे ॥ १ ॥
वाटे कल्पतरूवरि केलीं आह्मीं नीडें रे ।
किंवा कामप्रद धेनूचे झालों पाडे रे ॥
कवणहि आशेचे सर्वथा न पडों चाडे रे ।
विफळ न होती मनोरथाचे रचिले गाडे रे ॥
ब्रह्मविद्येचा जो केवळ मंगळ तंतू रे ।
जेणें निजशरणाचें हरोनि नेलें मीतूं रे ॥
..........................................
अनंत सुकृतें अनंत ह्याचा झाला नातू रे ॥ ३ ॥

साधूच्या वंशांत जन्मास येणें केवढ्या भाग्याची गोष्ट आहे पहा. वरील पदाच्या शेवटच्या चरणांतील कवीच्या उद्गारांचें रसिकांस मोठें कौतुक वाटेल यांत संशय नाहीं.

---

# श्रीरमावल्लभदास.

**हृदयें वचनेंहि रमावल्लभदासासि नत असों देहें ॥**
**प्रभुसि ह्मणेल 'स्वपदीं दीनाचें चित्त रत असों दे हें' ॥ १ ॥**

सन्मणिमाला, मोरोपंत.

हे प्रसिद्ध सत्पुरुष सुमारें १५० वर्षांपूर्वी सोलापूर येथें होऊन गेले. हे मोठे सावकार होते परंतु कांहीं कारणामुळें त्यांस विरक्तता उत्पन्न होऊन शेवटीं ते परमभागवत झाले. हे जातीनें देशस्थ आश्वलायन ब्राह्मण. यांचे गुरु लक्ष्मीधर या नांवाचे कोणी सत्पुरुष होते असें त्यांच्या कवितेंतील उल्लेखावरून दिसतें. रमावल्लभदास ह्मणतातः—

"लक्ष्मीधर गुरुवर ॥ मज सार निरंतर ॥
पूज्य आहे अतःपर ॥ दुजें नाहीं पाहतां ॥ १ ॥
जन्ममृत्यु नाहीं सत्य ॥ कृपा होतां जाहलें स्वप्न ॥
प्राणभवभय, आत्मसुख पाहिलें ॥ तेणें साच मज मीच भेटविलें वाहिलें ॥
लक्ष्मीधर गुरुवर मज सार पूज्य हो ॥ २ ॥

निरंजन माधवकर्वीचे गुरु लक्ष्मीधर बरवे या नांवाचे सातारा येथें राहणारे साधु होते, तेच हे रमावल्लभदासांचे गुरु असावे असें निरंजन माधव व रमावल्लभदास हे समकालीन होते, यावरून वाटतें. रमावल्लभदास, आपला काल सत्समागम, श्रवण, कीर्तन, भगवंताची नित्यप्रार्थना यांत घालवीत असत. गुरूपदेश घेतल्यावर ते फिरत फिरत गोकर्णक्षेत्रीं आले. तेथें योगबलाच्या सामर्थ्यानें त्यांजकडून एक अद्भुत गोष्ट घडली ती अशीः—शिवरात्री अमावास्येच्या यात्रेस एका सारस्वत ब्राह्मणाची स्त्री समुद्रस्नान करीत असतां तिच्या अंगावरील एक मूल्यवान् अलंकार पाण्यांत पडून हरवला. तेव्हां ती बाई मोठ्यानें रडूं लागली असतां तिचा तो करुणरव श्रवण करून परम दयेनें रमावल्लभदासांची स्वारी तेथें अकस्मात प्राप्त झाली आणि पाण्यांत हात घालून, अचानक जणूं काय ठेवल्या ठिकाणचाच अलंकार काढून त्या बाईच्या स्वाधीन केला. या अद्भुत कृत्याचा लोकांस मोठा अचंबा वाटून हा कोणी तरी महापुरुष आहे अशी त्यांची खातरी झाली. ज्या बाईवर महाराजांनीं हा उपकार केला ती आपले पतिसह मोठ्या आनंदानें व भक्तीनें महाराजांचे चरणीं साष्टांग नमस्कार

करून मोठ्या आदरानें, ' आपण आमच्या मल्लापूर गांवीं येऊन यथाशक्ति सेवेचा अंगीकार करावा " अशी विज्ञापना करिती झाली. महाराजांस त्या दांपत्यभक्तीचा मोठा आनंद वाटून त्यांनीं त्यांचे विनंतीस मान दिला व तीं दोघेंही अनुग्रहपात्र आहेत असें जाणून " श्रीकृष्णजयंतीव्रतसार ' त्यांस निरूपण केलें. याप्रमाणें कांहीं दिवस मल्लापूर येथें घालविल्यावर महाराज तीर्थयात्रेस निघाले. ते श्रीक्षेत्र काशी येथें बरींच वर्षें होते असें सांगतात. यापुढें महाराज कोठें गेले व त्यांनीं समाधि कोठें व केव्हां घेतली, यासंबंधानें माहिती मिळत नाहीं.

ज्या सारस्वत ब्राह्मणाचे बाईवर महाराजांनीं अनुग्रह केला होता तिचें नांव ' आवडी ' असें होतें. तिनें महाराजांच्या उपदेशाप्रमाणें व्रताचरण केल्यावर तिचे पश्चात् तिच्या कुटुंबी व अनुयायी मंडळीनें ' आवडी ' या नांवाचा मठ स्थापन केला. तेथें या ' कृष्णजयंतीव्रतकथेप्रीत्यर्थ प्रतिवर्षीं मोठा उत्सव होतो. महाराजांच्या शिष्यांपैकीं ' कृष्णदास ' नांवाच्या एका शिष्यानें कुंदापूर तालुक्यांत हेमाडी ह्मणून एक गांव आहे तेथें ही व्रतकथा आचरण करून आपल्या सिद्धीच्या व उपास्यदैवताच्या प्रसादबलानें एका योगनाणी ऊर्फ जोगव्वा या नांवाच्या मुक्या स्त्रीवर अनुग्रह करून उत्तमप्रकारची वाचा व सुबोध देऊन तिला जीवन्मुक्त केलें अशी ख्याति आहे. त्या ठिकाणीं स्थापन झालेल्या श्रीदत्तमंदिरांत या स्त्रीची व कृष्णदासाची अशा समाधि आहेत; व तेथें या व्रतानुयायी मंडळीचा समुदाय असून या जयंती व्रतकथेचें औपासन तेथें प्रशस्त रीतीनें चालू आहे.

रमावल्लभदास हे मोठे भगवद्भक्त होते व त्यांनीं श्रीकृष्णजयंतीव्रतकथेवर रचिलेले प्रबंध उत्तर कानडा व कर्नाटक या प्रांतीं फार प्रसिद्ध आहेत. या अमृतोपम व्रतकथारूप उपासनेपासून बाल, तरुण, वृद्ध, ज्ञानी व अज्ञानी या सर्वांस त्यांच्या योग्यतेनुरूप आनंद होत आहे. रमावल्लभदासांची वाणी साधी व भक्तिरसपरिपूर्ण अशी असून प्रासादिक आहे हें येथें सांगण्याची आवश्यकताच नाहीं. या श्रीकृष्णजयंतीव्रतकथाप्रबंधांशिवाय त्यांनीं श्रीमद्भगवद्गीतेवर प्राकृत टीका केलेली असून, तो ग्रंथ सोलापुरास त्यांच्या वंशजांपाशीं आहे, असें समजतें.

लक्ष्मीधरदास, कृष्णदास, कान्हायी या नांवाचे रमावल्लभदासांचे तीन प्रख्यात शिष्य होऊन गेले. त्यांपैकीं ' कान्हायी ' यांनीं आपली हकीकत एका पदांत दिली आहे:—

" देवगीरगडीचा राजा ॥ अंबर प्रधान ज्याचा ॥
सकळ मालाचा साचा ॥ लेखक होतों मी त्याचा ॥

संचार झालासे मज उतार नव्हे जयाचा ॥ १ ॥
मज वेडें वेडें गे केलें ॥ कान्हीयीनें मन नेलें ॥
म्लेंच्छसेवे सांडविलें ॥ आपुल्या सेवे लावियलें ॥ ध्रु० ॥
परमार्थ महाल सार ॥ लेववी तो मजकरवीं ॥
हिरोनि घेउनि शीण ॥ हातांत लेखणी धरवी ॥
वाचीं रे वाचीं रे ह्मणे ॥ प्रबंधरचना बरवी ॥ २ ॥
संसार हा झाडावया ॥ सद्गुरु लवकरि आला ॥
भागवत मंत्राक्षरीं ॥ संचार अधिक झाला ॥
पहिलेपण नाहीं नाहीं ॥ झेलितां अनुभव भला ॥ ३ ॥
देहबुद्धि खोंचियली ॥ जनमान खोंचियला ॥
मायादेवी खोंचियली ॥ विरोनि अहंकार गेला ॥
प्रवृत्ति निवृत्ति खोंचियली ॥ स्वानंदें सुरोनि ठेला ॥ ४ ॥
शिव जिणें मोहियला ॥ जीवं माझा तिणें नेला ॥
काय झालें तें मी नेणें ॥ सनकादिकां विस्मय झाला ॥
रमावल्लभाचा दास ॥ ' कान्हायी ' होउनी ठेला ॥ ४ ॥

यांतील भावार्थ असा आहे कीं ' मी देवगीरगडच्या म्लेंच्छ राजाचा प्रधान अंबर याजपाशीं कारभारी होतों. परंतु मनांत हरिभक्ति बाणल्यामुळें मला श्रीरमावल्लभदास हे गुरु मिळून त्यांनीं म्लेंच्छसेवेपासून मला मुक्त केलें व आत्मस्वरूपाची खूण पटवून दिली. '

रमावल्लभदासकृत ' श्रीकृष्णजयंतिव्रतकथाप्रबंध ' या नांवाचें पुस्तक मंगळूर येथील वकील रा. रा. कल्हे मंजुनाथय्या यांनीं छापून प्रसिद्ध केलें आहे. त्यांतील थोडे उतारे येथें देऊन हें चरित्र पुरें करितों:—

श्रीरमावल्लभदास भाविकांस भाविकपणानें मुक्तीचा सुलभ उपाय सांगतात:—

अभंग.

" काय करिसी व्रत तप ॥ कृष्ण कृष्ण इतुकें जप ॥ १ ॥
तेणें सार्थक देहाचें ॥ जन्ममरण खंडे साचें ॥ ध्रु ॥
काय करिसी तुझी व्युत्पत्ती ॥ संतचरणीं धरीं प्रीती ॥ २ ॥
काय करिसी तुझी जाणीव ॥ जतन करीं हा सद्भाव ॥ ३ ॥

एक कृष्ण जीवीं धरीं ॥ नाना दैवतें न धरीं ॥ ४ ॥
रमावल्लभदास ह्मणे ॥ सत्य माना हें बोलणें ॥ ५ ॥

अभंग.

हरि होउनि हरिगुण गावे ॥ तेणें आपण उद्धरावें ॥ धृ० ॥
अवघा बोले चाले हरी ॥ ज्याची कथा तोची करी ॥ १ ॥
होउनियां श्रोता वक्ता ॥ करी आपुली आपण कथा ॥ २ ॥
विश्वव्यापक परिपूर्ण ॥ अवघा एकचि नारायण ॥ ३ ॥
कैंचा रमावल्लभदास ॥ अवघा हरीचा उल्हास ॥ ४ ॥

खालील अभंगांत रमावल्लभदासांनीं देवाच्या एकत्वासंबंधानें आपलें मत स्पष्टपणें नमूद केलें आहे.

" देव तो एक आहे ॥ स्वामि तो एक आहे ॥
कल्पांबुसरिता जेंवि सिंधूसि पावे ॥ १ ॥
कोणी ह्मणती गणेश ॥ कोणी ध्याती रवीश ॥
कोणी ह्मणती चंडिमाया ॥ नेणती परेश ॥ २ ॥
कोणी ह्मणती महादेव ॥ भैराळाचा घेतो भेव ॥
मार्तंड भैरव ह्मणती ॥ नेणती देव ॥ ३ ॥
कोणी ह्मणती मानव ॥ आह्मीं धरिला माधव ॥
वैष्णव ह्मणवुनि फुगती ! ॥ नेणती लाघव ॥ ४ ॥
देहबुद्धि न सांडिती ॥ देह मीच ह्मणती ॥
देहातीत बोध नाहीं ॥ संदेहीं पडती ॥ ५ ॥
आत्मबोधप्रकाश ॥ करी गुरु सावकाश ॥
सर्व देव ना मनास ॥ ह्मणे रमावल्लभदास ॥ ६ ॥
देव तो एक आहे ॥ धृ० ॥

खालील पदांत ढोंगी लोकांचें वर्णन देऊन, खरा सत्पुरुष कसा असतो हें रमावल्लभदासांनीं विस्तारपूर्वक सांगितलें आहे:—

" गुरुविण कोणि नाहिं गति । वेदशास्त्र पुराण सांगती ॥
सकळहि जन हें ऐकती । कोणी केल्या करुंगा ह्मणती ॥ १ ॥
परि तो गुरु नकळे सर्वथा । घरोघरीं करिति पैं कथा ॥
नानामतें नेणति सर्वथा । उपदेश जीविताच्या अर्था ॥ परि तो गुरु. ॥ धृ० ॥

कोणी हठयोग पैं दाविती । कोणी टिळे मुद्रा पैं लाविती ॥
कोणी आह्मीं वैष्णव ह्मणती । मुद्रा तप्त देऊनि ठकविती ॥ २ ॥
कोणा रुचे जंगम भावना । कोणा रुचे ज्योतिषसूचना ॥
कोणी मंत्र तंत्र यंत्र नाना । कोणी दंभ वाद आपणा ॥ ३ ॥
कोणी नाथपंथि पैं झाले । कोणी अवधुत होतां ठेले ॥
कोणी संन्यास घेत आले । कोणी जटा बुंचडा घाले ॥ ४ ॥
मंत्र तंत्र उपदेशिते जन । प्रपंचांत ते गुरु गहन ।
परमार्थ दुर्लभ पावन । आत्मज्ञानी तो जगजीवन ॥ ५ ॥
तोच गुरु पाहावा जगांत । तोच गुरु राहावा मनांत ॥
मीपण हें सांडुनी निवांत । आपणांत मिळवी निभ्रांत ॥ ६ ॥
भागवतगीतानिरूपण । करोनि नेघे गुरुत्व आपण ॥
लेइला शांतीचें भूषण । कोणासी कांहीं ठेवीना दूषण ॥ ७ ॥
सर्वभूतीं भगवंत पाहे । तंव भगवंत एक आहे ॥
मूर्ति भगवंत भेद न राहे । अभेद हें बोलणें साहे ॥ ८ ॥
त्याचें प्रेम धरि तोचि चेला । प्रेम टांकी वायां तोचि गेला ॥
सर्वां उपदेशू त्याणें केला । सर्वांमतीं तोचि तो उदेला ॥ ९ ॥
जातिकुळ न पाहे कवणाचें । आर्त एक देखोनी मनाचें ॥
घ्यावया प्रेम धांवतो तयाचें । शरीर हें जाणोनि जायाचें ॥ १० ॥
चाड नाहीं शिष्य करायाची । चाड नाहीं गुरुत्व घ्यावयाची
चाड नाहीं मत स्थापावयाची । चाड नाहीं ख्याति व्हावयाची ॥ ११ ॥
चाड जया साचार भावाची । चाड जया साचार देवाची
वाणी रमावल्लभदासाची । चाड तया प्रेम बोलावयाची ॥ १२ ॥

खालील अभंगांत परमेश्वराचें अगाध दयालुत्व वर्णिलें आहेः—

" विश्व पाळीतसे हरी । दासा केंवि तो अव्हेरी ॥ १ ॥
विश्वंभर नाम ज्याचें । केंवि उपेक्षिल साचें ॥ २ ॥
जननीजठरीं नवमास । नाहीं उबगीलें आह्मांस ॥ ३ ॥
स्तनीं दुग्ध जें निर्मिलें । बाळपणीं वांचवीलें ॥ ४ ॥
कीटक पाषाणांत वसे । त्याचे मुखीं चारा असे ॥ ५ ॥
धरा धरा हा विश्वास । ह्मणे रमावल्लभदास ॥ ६ ॥

# निरंजन माधव.

" नसता कवींचा व्यापार ॥ तरी कैंचा असता जगदुद्धार ॥
म्हणोनि कवि हे आधार ॥ सकळ सृष्टीसी ॥ १ "

दासबोध—रामदास.

मराठी कवींत, राजकारणांत ज्याचें प्रत्यक्ष अंग असे, असा हा एकच कवी होय. याची कविता अगदीं उत्तमांतली असून हा आजपर्यंत अगदीं अप्रसिद्ध कसा राहिला याचें नवल वाटतें. यानें केलेल्या ग्रंथांपैकीं चिद्बोधरामायणाचें बालकांड मात्र छापून प्रसिद्ध [illegible] ग्रंथ किंवा या कवी-संबंधाची हकीकत, आजपर्यंत मुळींच उपलब्ध नव्हती. तथापि अलीकडे प्रख्यात शोधक रा. रा. पांगारकर यांनीं मोठ्या प्रयत्नानें या कवीचीं कांहीं काव्यें हस्तगत केलीं आहेत; त्यांत "सांप्रदायपरिमळ" या नांवाचा एक ओंवीबद्ध ग्रंथ असून त्यांत निरंजनमाधवांनीं आत्मचरित्र वर्णिलें आहे. त्यावरून हें लहानसें चरित्र येथें देतों.

"सांप्रदायपरिमळ" हा ग्रंथ निरंजन माधवांनीं इ. स. १७६३ मध्यें आपली पत्नी साध्वी गंगाव्रती इजसाठीं रचिला. याच्या ओंव्या १००० असून, त्यांत पेशवाईंतील तत्कालीन देशस्थितीसंबंधानें ठिकठिकाणीं बहुत माहिती दिली आहे.

गोदावरीच्या दक्षिणेस वरखेडाच्या शिवेवर रामडोह नामक प्रसिद्ध गांव आहे ती या कवीची मातृभूमी होय. यांचे पूर्वज तेथें कुळकर्णी होते. यांच्या बापाचें नांव महादो बनाजी व आईचें नांव भागीरथी होतें. हा कवी इ. स. १७००—१७९० या कालांत होऊन गेला. हा देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण असून याचें गोत्र विश्वामित्र व कुलदेव गिरीचा व्यंकटेश होता. याचा जन्म १७०५ चे सुमारास कांची प्रांतीं वेगवती नदीतीरीं पक्षितीर्थासमीप झाला. श्रीमंत पहिले बाजीराव पेशवे यांनीं त्यास आपल्या आश्रयास ठेवून घेतलें होतें. पहिले बाजीराव पेशवे हे छत्रपती शिवरायांप्रमाणें गुणग्राही असून गुणी पुरुषांचा संग्रह करण्याचा त्यांचा सद्गुण प्रसिद्ध आहे. त्यांनीं कित्येक वीर पुरुष उदयाला आणिले हें इतिहासप्रसिद्ध आहे परंतु मराठी भाषेचा एक उत्तम कवि त्यांच्या गुणज्ञतेनें वेगवती नदीतीरीं पक्षितीर्था

समीप उदय पावला ही गोष्ट आजपर्यंत कोणास ठाऊक नव्हती. खरोखर या गोष्टीनें बाजीरावांच्या उज्वल कीर्तीत अधिक भर पडेल यांत संशय नाहीं. असो.

पुढें बाजीराव व त्यांचे चिरंजीव नानासाहेब यांनीं निरंजन माधवांस, तंजावर, श्रीरंगपट्टण वगैरे संस्थानांत मोठीं हुद्याचीं कामें सांगितलीं त्यामुळें ते फार व्यवहारचतुर व राजकार्यनिपुण झाले. तरी त्यांचा मुख्य व्यासंग अध्यात्म ग्रंथांचें मनन व हरिभक्ति हा होता. हा कवि चांगला योगी असून साऱ्या भरतखंडभर यानें तीर्थयात्रा केल्या व राजकीय पुरुष या नात्यानें मोठमोठ्या राजेरजवाड्यांच्या दरबारांत हा वागलेला होता. बाजीराव व नानासाहेब पेशवे यांच्या आश्रयांत याचा जन्म गेला, व राजकारणांत शिरलेल्या लोकांस राजकारणाशिवाय दुसरें कांहीं कृत्य करणें कितपत आवडतें हें पाहिलें ह्मणजे निरंजनमाधवांचें लक्ष्य मराठी भाषा व कविता यांजकडे कसें गेलें याचें मोठें आश्चर्य वाटतें. या कविला संस्कृत, मराठी, कानडी व हिंदुस्थानी या चार भाषांचें उत्तम ज्ञान होतें. एक ग्रंथ तर यानें एका गुजराथी ग्रंथाच्या आधारानें तयार केला आहे.

निरंजनमाधवांची पत्नी गंगावती एकदां त्यांस ह्मणाली:—

" आपण रचिलीं ग्रंथरत्नें ।। तीं म्या केलीं हृदयाभरणें ॥
आतां स्वसांप्रदायकथन ॥ शिरोभूषण मज द्यावें ।। १ ॥

हा प्रेमानें केलेला प्रश्न ऐकून निरंजनमाधव ह्मणाले:—

तुझ्याच अर्थीं जाण ।। म्यां पूर्वीं ग्रंथ रचिले पार न ॥
आतां सांप्रदायकथन ॥ करणें वल्लभे तुजसाठीं ।। २ ।।

स्वत:च्या भार्येसाठींच ग्रंथरचना केल्याचें महाराष्ट्र वाङ्मयांत हें एकच उदाहरण होय. असो.

यानंतर कवीनें प्रथम आपल्या कुळाचा व आपला इतिहास गंगावतीस निवेदन केला. हा सर्व ग्रंथ फार महत्वाचा आहे. आधीं आत्मचरित्र कोणाही थोर पुरुषाचें असलें तरी तें मनोवेधक व बोधप्रद असतेंच; त्यांतही बहुभाषाकोविद, बहुदेश संचारी राजकार्यनिमग्न अशा सत्कवीचें आत्मचरित्र ह्मणजे वाचनप्रिय रसज्ञास तो खमंग मेवाच वाटला पाहिजे.

कवीची माता भागीरथीबाई ही पवित्र माउली होती व ' प्रत्यक्ष स्वप्नदर्शन। प्रत्यक्ष करावें भाषण ' अशा अधिकाराची होती, अशा आईच्या अधिकारांत

निरंजनमाधवांस चांगलेंच बाल्यशिक्षण मिळालें असेल यांत संशय नाहीं. बाप वारल्यावर कवींचा तो देश सुटून साताऱ्यास पहिले बाजीराव पेशवे यांच्या आश्रयास त्यांचें जाणें झालें. निरंजन माधव स्वतः सांगतात—

" कालकर्मऋणानुबंधें ॥ तो देश सुटला प्रसिद्ध ॥
आम्हां येणें घडलें शुद्ध ॥ महाराष्ट्र देशांतरीं ॥ १ ॥
शाहू भूपतीचा प्रधान ॥ बाजीराव बल्लाळ पृथ्वीरत्न ॥
परम यशस्वी पावनगुण ॥ भूपाळमंडळीशिरोमणी ॥ २ ॥
गुणरत्नांचा परीक्षक ॥ स्वयें सद्गुणपूर्ण अशेख ॥
तेणें संग्रह केला सम्यक ॥ ज्येष्ठ बंधूसह आमुचा ॥ ३ ॥

वरील ओंव्यांत या कविश्रेष्ठानें श्रीमंत बाजीराव पेशव्यांस दिलेलीं विशेषणें किती समर्पक आहेत बरें? " गुणरत्नांचा परीक्षक " असावयास स्वतः सद्गुणपूर्ण असावें लागतें, हें काय सांगावयास पाहिजे ?

निरंजनमाधव साताऱ्यास आल्यावर तेथें त्यांनीं विद्याभ्यास करण्यास प्रारंभ केला. त्यावेळीं हल्लींच्या प्रमाणेंच शिक्षकमंडळी केवळ उदरंभरणार्थी असल्यामुळें निरंजन माधवास आस्थेनें सांगणारा कोणी गुरु भेटेना ! चरित्रनायक लिहितात:—

" आस्थापूर्वक सांगणार ॥ कोणी न मिळती विप्रवर ॥
सर्वही अर्थकामातुर ॥ भरणें उदर मुख्य स्वार्थ ॥ "

परंतु कविवर्यांची ही चिंता लवकरच दूर झाली. साताऱ्यास लक्ष्मीधर वरवे या नांवाचे कोणी विद्वान सत्पुरुष होते त्यांस हे शरण गेले. हे लक्ष्मीधर मोठे विद्वान् वेदांती व साधु असून शिवाय ते वीणावादनांत फार प्रवीण होते. ते आपल्या ओंव्या गोड सुरावर म्हणत. लक्ष्मीधरांचे गुरु ब्रह्मानंदस्वामी यांनी त्यांची कवित्व-शक्ति पाहून त्यांस ' लक्ष्मीधर कालिदास ' या नांवानें गौरविलें होतें. परंतु त्यांची कोठील कविता आज उपलब्ध नाहीं ही खेदाची गोष्ट होय ! निरंजनमाधवाच्या वेळीं लक्ष्मीधरांची कविता प्रख्यात होती असें दिसतें. साताऱ्यास येणार राजेरजवाडे प्रथम लक्ष्मीधरांचें दर्शन घेत असत. शाहू महाराजांनीं त्यांस एक गांव इनाम दिला असून, त्यांचे वंशज तो अद्याप उपभोगित आहेत असें समजतें. लक्ष्मीधरांनीं निरंजनमाधवांस महावाक्याचा उपदेश केला व नंतर त्यांस साक्षात्कार झाला. सांप्रदायपरिमळ ग्रंथांत कवीनें लक्ष्मीधरांचें प्रेमळ स्तवन केलें आहे.

हे लक्ष्मीधर दत्तसांप्रदायी होते. गुरूपदेश झाल्यावर निरंजनमाधवांनीं काशी-पासून रामेश्वरापर्यंत सर्व तीर्थयात्रा केल्या. त्यांचें पहिलें काव्य इ. स. १७३५ मधलें आहे. पुढें श्रीमंत बाजीराव पेशवे वारल्यावर नानासाहेबांनींही निरंजनमाधवांचा सप्रेम समाचार घेतला. परंतु पुढें काय प्रकार झाला हें कवि सांगतात:—

' बाजीरावभूपाळनंदन । नाना प्रभू अतिप्रवीण ॥
तत्सेवनीं रात्रंदिन । अवकाश न घडे सुटाया ॥ १ ॥
सर्व संस्थानीं मजप्रती । पाठवितां राजकार्यार्थीं ॥
दाक्षिणात्य सर्व नृपती । करिती प्रीति गुणग्राही ॥ २ ॥
अस्मिन्नवसरीं पिशुनजनीं । असत्य भाषणें कथोनी ॥
अप्रीति उत्पन्न केली मनीं । बाळाजी पंडित प्रधानवर्या ॥ ३ ॥
हेही देवमाया घडली । संदेह नसतां चित्तवृत्ति फिरली ॥
पूर्ववत् न देखतां ममता झाली । बुद्धि उद्विग्न माझीही ॥ ४ ॥

अशा सत्पुरुषाविषयीं संशय घेऊन त्यांविषयीं अप्रीति धारण करावी हें नानासाहेब पेशव्यांस खरोखर भूषणास्पद नाहीं. पाध्यांसारख्या विद्वान् व ईश्वरभक्त सद्गृहस्थांचा छळ; निरंजन माधवांसंबंधानें, केवळ त्यांच्या शत्रूंच्या भाषणावर विश्वास ठेवून धारण केलेली अप्रीति व पुनः प्रीति; धावडशीकर स्वामीसंबंधानें अपूज्य बुद्धि; इत्यादि गोष्टींवरून पाहिलें असतां, नानासाहेबांच्या मुत्सद्दीपणास बराच कमीपणा येतो असें म्हणावें लागतें. त्यांचे पूज्य तीर्थरूप वीरशिरोमणि बाजीराव व मराठी राज्याचे संस्थापक छत्रपति शिवाजीमहाराज यांच्या राजनीतीशीं, नानासाहेबांची राजनीति, निदान या बाबतींत तरी बरोबरी करूं शकत नाहीं असें म्हणणें भाग आहे. तथापि त्यांतल्यात्यांत समाधानाची गोष्ट ही आहे कीं, त्या वेळचे सगळेच राजे नानासाहेबांसारखे अश्रद्ध व चंचल मनाचे नव्हते. कारण ' **दाक्षिणात्य सर्व नृपति । करिती प्रीति गुणग्राही ॥** ' असें स्वत निरंजनमाधवच म्हणत आहेत. असो.

निरंजनमाधवांच्या हातून मोठमोठीं राजकारणें झालीं परंतु त्यांचा मुख्य विश्रांतीचा विषय म्हटला म्हणजे अध्यात्म चिंतन हा होता. " कृष्णानंदसिंधु " या नांवाचा ग्रंथ रचण्यास त्यांनीं पुण्यांत प्रारंभ केला होता. त्यानंतर चिद्बोधरामायण किंवा निरंजन-रामायण हा श्लोकबद्ध मोठा ग्रंथ त्यांनीं रचिला. या ग्रंथांत एके ठिकाणीं " बनाजी " असेंही कवीनें आपलें नांव लिहिलें आहे. तीर्थयात्रेसंबंधानें कवि म्हणतात:—

" नाना देशसंचार करितां ॥ नाना स्थळीं फिरतां ॥
नानापरिचे सत्पुरुष संतां ॥ पाहोनि झाल्यों कृतार्थ ॥ "

पूर्वी, निरंजनमाधवांचे गुरु लक्ष्मीधर होते म्हणून लिहिलें, तेथें एक गोष्ट सांगावयाची राहिली. त्या गोष्टीवरून मराठी भाषेचे किती कवि अद्याप अज्ञात आहेत याची कल्पना करितां येईल. लक्ष्मीधरांची गुरुपरंपरा अशी होती. मूळ सांप्रदायसंस्थापक श्रीदत्तमहामुनि, त्यांचे शिष्य विमलानंद, त्यांचे अमृतानंद, त्यांचे ब्रह्मानंद, त्यांचे सच्चिदानंद, त्यांचे ब्रह्मानंद व त्यांचे लक्ष्मीधर. मराठी सत्पुरुषांपैकीं शेंकडा नव्वद कवि होते, यावरून पाहिलें असतां या परंपेंतील सत्पुरुषांपैकीं जे कोणी कवि असतील त्यांची कविता असणें संभवनीय आहे. परंतु अद्याप ती कोठेंही उपलब्ध नाहीं. तथापि अलीकडे शोधकांच्या खटपटीनें बरेच अप्रसिद्ध कवि व त्यांचे ग्रंथ यांचा शोध लागत चालला आहे यावरून हेही कवि पुढें प्रसिद्धीस येतील अशी आशा करण्यास हरकत नाहीं. शिवाय निरंजनमाधवांचे बंधु तिमाजीपंत हेही कवि होते असें वाटतें; कारण प्रस्तुत चरित्रनायक लिहितात:—

" नकरितां मनुजांचें सेवन । तिमाजीपंती आमरण ॥
भगवद्भजन पुस्तकलेखन । करोनि काळ दवडिला ॥

असो. यानंतर निरंजनमाधवांस दुसरा गुरु करावा लागला. हा सिद्धेश्वर सांप्रदायी होता. " सांप्रदायपरिमळ " ग्रंथांत निरंजन लिहितात, " पहिल्या दत्तसांप्रदाय लक्ष्मीधर गुरूंच्या कृपेनें धरिला असतां सिद्धेश्वर संप्रदायांतील दुसरा गुरु करण्याचें कारण काय ? " असा आपणास गंगाबाईनें प्रश्न केला. हा त्या साध्वीचा प्रश्न ऐकून कवीस मोठा हर्ष झाला:—

" निजसुंदरीची प्रेमझरी । तथापि विज्ञापना कुसरी ॥
श्रवण करोनी हर्षितांतरीं । प्रत्युत्तरीं प्रमोदवितो ॥ "

निरंजनमाधवांस दुसरा गुरु करण्याचें कारण हें कीं:—

अस्मिन्नवसरीं बाजाराव प्रधानें । सेवा सांगोनि परम मानें ॥
शिबिकादि संपत्तिदानें । चंदावर संस्थाना पाठविलें ॥
तेथील कार्य—भाग—भार । पडला कांहीं संवत्सर ॥
येता जातां सद्गुरुवर । भेटतांही तांतडी ॥ "

याप्रमाणें बरेच दिवस तंजावरप्रांतीं, राजकारणाकरितां वास्तव्य करणें भाग पडल्यामुळें त्यांस आपल्या लक्ष्मीधर गुरूंची भेट घेतां येईना. तथापि त्यांना ईश्वर-

भक्ति व ग्रंथव्यासंग सोडिला नाहीं. तंजावरप्रांतीं राहिल्यानें “ काव्यनाटककळा कुसरी । मानाविनोद राजसभांतरीं ॥ ” वगैरे सद्गुण कवींस प्राप्त झाले. राजकारणपरत्वें पुण्यपट्टणापासून तंजावरापर्यंतचा प्रदेश वरचेवर फिरावा लागल्यामुळें निरंजनास व्यवहारज्ञान होऊन मोठमोठे पंडित, वैदिक व संतमहंत यांचीं दर्शनें झालीं. कविवर्य स्वतः सांगतातः—

“ सर्व भाषापरिज्ञान । घडों आलें देशाटणें ॥ ”

असो. यानंतर निरंजनमाधवांचे गुरु लक्ष्मीधर हे परलोकीं गेले. ही दुःखद वार्ता कानीं पडतांच निरंजनमाधवांनीं फार शोक केला. त्यांनीं सात अहोरात्र उदकपानही केलें नाहीं. सातवे दिवशीं रात्रौ त्यास लक्ष्मीधरांनीं स्वप्नांत दृष्टांत दिला कीं “ आजपासून सातव्या दिवशीं तुला आमची विभूति भेटेल ” स्वप्नवाक्याचा प्राज्ञ पुरुष विश्वास धरीत नाहींत, म्हणून या स्वप्नानें निरंजन माधवास कांहीं आनंद झाला नाहीं. परंतु शेवटीं गुरूंचें वाक्य खरें झालें. गणेशसुत बापजी पंडित या नांवाचे बाजीरावांचे स्नेही नियोग कर्मांत कुशल व मोठे राजकारणी होते. निरंजनाच्या बंधूचा व त्यांचा फार स्नेह असे, परंतु ते स्वतः वृद्ध असल्यामुळें त्यांचें दर्शन घडणें मोठें कठिण होतें. कांहीं कारणाकरितां बाजीरावांनीं या दोन्ही पुरुषांची योजना एकाच कामांत केली असतां परिचयामुळें ते एकमेकांचे स्नेही झाले. तथापि निरंजनमाधवांस बापजीपंडित गुरुस्थानीं होते. बापजीपंडित आपल्या शिष्यांस “ बालबोध ” नांवाचा प्राकृत ग्रंथ नित्य पढवीत. या बापजीपंडितांच्या कृपाप्रसा-

१ हा ग्रंथ अलीकडे उपलब्ध झाला आहे. याचे कर्ते त्र्यंबकराज या नांवाचे सत्पुरुष असून ते या सिद्धेश्वर संप्रदायाचे मूळपुरुष होत. हे एकनाथांच्या कालीं होऊन गेले. बालबोध ग्रंथास बालावबोध असेंही नांव आहे. कृष्णदेवाचा सुत भैरव नामक होता तो राजयोगी व ब्रह्मनिष्ठ असून त्यास तुळजापुरची भवानी प्रसन्न असे. तिनें त्यास तीन फळें देऊन सांगितलें कीं, तुला तीन पुत्र होतील. त्यांतील मधल्या मुलाच्या हातावर “ त्रिशूळ ” दिसेल, तो मदंश समज. नंतर भैरवास नरसिंह, त्र्यंबक व कौंडण्य असे तीन पुत्र झाले. विद्या दिल्यास तो लग्न करणार नाहीं या भीतीनें भैरवानें त्र्यंबकास विद्या दिली नाहीं. बाप वारल्यावर त्र्यंबकानें संसार चालविला. वडील बंधूनें त्यास उपदेश केला. नंतर ज्ञानी कमलाकर या साधूनेंही त्यास बोधिलें. पुढें त्यानें बंडीची सेना आरंभली व ससद्-

दानें निरंजनास प्रत्यक्ष ब्रह्मदर्शन होऊन ते जीवन्मुक्त झाले. याप्रमाणें निरंजनमाधवांस दोन गुरु मिळाले. त्यांनीं आपल्या ग्रंथांच्या आरंभीं या दोन्ही गुरूंस वंदन केलें आहे:—

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

गीच्या डोंगरावर जाऊन देवीस प्रसन्न करून घेतल्यावर श्रीसिद्धेश्वर यांनीं त्यास पंचवचनात्मक उपदेश केला. या पांच वचनांच्या आधारानें त्र्यंबकराजांनीं वरील "बालबोध" ग्रंथ रचिला. हा ग्रंथ लिहिण्यास शके १४९४ त प्रारंभ करून तो शके १५०२ मध्यें संपविला. या ग्रंथाची निरंजनमाधवानें १७६४ त केलेली एक प्रत रा. पांगारकर यांस मिळाली आहे. या ग्रंथाचे तीन खंड असून ओवीसंख्या ५२४० आहे. यांत ४५ कथनें आहेत. ग्रंथ कृष्णदयार्णवांच्या हरिवरदा ग्रंथाप्रमाणें मोठा प्रौढ असून त्यांत वेदांतादि शास्त्रांचा फार चांगला खुलासा केला आहे. हा बालबोध, एकनाथी भागवत व माधवदासांनीं योगवासिष्ठ हे तीन मराठी ग्रंथ ५-१० वर्षांच्या अंतरानें लिहिलेले असून ते शिवाजीच्या पूर्वींच्या महाराष्ट्रांतील देशस्थितीच्या इतिहासाचे दर्शक आहेत. वरील "बालबोध" ग्रंथांत त्र्यंबकराजांनीं मराठी भाषेविषयीं खालील विचार प्रदर्शित केले आहेत:—

" जैसा सुखासनाचा मार्गु ॥ तैसा महाराष्ट्र-प्रसंगु ॥
अंगीं बाणे राजयोगु ॥ रोकडाची ॥ १ ॥
ये मराठीचे पल्लवें ॥ जीव उगमालें पावे ॥
तरी कासया उल्थावें ॥ पानाचें कवळ ॥ २ ॥
वापी कूप देवराणी ॥ मध्यें सखोल अर्थपाणी ॥
तें सुदेशी सेदनीं भरूनी ॥ आहाच कीजे ॥ ३ ॥
आणि संस्कृत केवळ ॥ अर्थ करावे प्रांजळ ॥
येरवीं रक्षितां फळ ॥ कोण त्याचें ॥ ४ ॥
अर्थज्ञान पदें प्रासें ॥ वरी बैसती प्रमाणें सुरसें ॥
ते मऱ्हाटी पुरवील भडसे ॥ विद्वज्जनाचे ॥ ५ ॥
धन्य धन्य हे मऱ्हाटी ॥ ब्रह्मविद्येची कसवटी ॥
हा द्वारशिळेचे पोटीं ॥ परिसु जोडिला ॥ ६ ॥ "

" मंत्रयोगीं लक्ष्मीधर । ज्ञानयोगीं बापदेव गुरुवर ॥
दोघेही एकाकार । मंगल चरणीं वंदिजे ॥ १ ॥

हा सिद्धेश्वरसांप्रदाय पुढें निरंजनमाधवांनीं चालविला.

" सांप्रदायपरिमळ " ग्रंथांत आत्मचरित्र व ज्या सांप्रदायपरंपरा दिल्या आहेत त्यांच्या आधारानें, निरंजनमाधवांचे चरित्र येथपर्यंत लिहिलें. सांप्रदायपरिमळ ग्रंथाचे समाप्तिकालीं कवि आपल्या पत्नीस ह्मणतात:—

" तूं तंव भक्तिमती नारी ॥ माझी परमप्रिय सुंदरी ॥
" ह्मणुनी गुरुसांप्रदायकथा विस्तरीं ॥ कथिली म्यां प्रेमें ॥ १ ॥
गौरी शंकराची वल्लभा ॥ किंवा सूर्याची प्रभा ॥
अग्नि शक्ति शुभा ॥ स्वाहा जैसी ॥ २ ॥
किंवा चंद्राची दीप्ति ॥ किंवा वायूची सदागति ॥
कुबेराची संपत्ति ॥ तैशी तूं ममप्रिया ॥ ३ ॥
किंवा ब्रह्माणी ब्रम्ह्याची ॥ इंदिरा जैसी विष्णूची ॥
प्राणप्रिया आत्मयाची ॥ चित्कळा तैंवी ॥ ४ ॥
जैसी शर्करेची मधुरता ॥ कीं उदकाची शीतळता ॥
सुमनांची शुभ्रता ॥ नये निवडितां भिन्नत्वें ॥ ५ ॥
तुज मज भिन्नभाव तत्त्वता ॥ नसोनि दिसे बोलापुरता ॥
अल्पज्ञीं हे वार्ता ॥ उपाधीकृत ॥ ६ ॥

निरंजनमाधवांचें धर्मौदार्य केवढें मोठें होतें हे खालील ओंव्या सांगतील:—

" **सर्व धर्मांची सहायता ॥ करावी सामर्थ्य असतां ॥**

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

हा " बालबोध " ग्रंथ दासबोधाचा पूर्वजन्मच दिसतो. याची भाषा ३३० वर्षांपूर्वीची असल्यामुळे ज्ञानेश्वरींतील बरेच कठिण शद्व यांत आढळतात. " या प्रथमारंभिंहून एक वेळ ओंविलेला शद्वमणि पुनः आणलेला नाहीं, संस्कृताची गोडी या ओंव्यांत आणिली आहे; हा मननपूर्वक वाचल्यास सर्व शास्त्रांचें सार आकलन करितां येईल व ब्रह्मसायुज्यता मिळेल " असें त्र्यंबकराज ह्मणतात व हें त्यांचें ह्मणणें बहुतांशीं खरें आहे असें ग्रंथावलोकनावरून कोणासही वाटेल.

त्र्यंबकराजांपासून न्हापजी हे सांप्रदायांतील सातवे पुरुष होत.

आपल्या धर्मविहिता ॥ सदा फार जपावें ॥ १ ॥
परधर्माचें आचरण ॥ आपण कदापि न करावें जाण ॥
परंतु परधर्म पाहोन ॥ संतोष मानावा मानसीं ॥ २ ॥
हें ईश्वराचें कौतुक ॥ ईश्वर मायाचालक ॥
अनेक मार्गदर्शक ॥ ईश्वर सर्व ॥ ३ ॥

या तीन ओंव्यांत परधर्मसहिष्णुतेचें ( Religious toleration ) केवढें उदार तत्व गोंविलें आहे पहा ! हा सिद्धांत, हा सदुपदेश परधर्मनिंदक आंधळ्या स्वधर्मोत्कर्षेच्छूनें आपल्या हृदयपटावर खोदून ठेवावा.

निरंजनमाधवांच्या या चरित्रांतील कांहीं मुद्दे विचारणीय आहेत. ( १ ) " पृथ्वीरत्न " शब्दानें कवीनें बाजीरावांची स्तुति केली आहे ती अयथार्थ आहे असें कोण ह्मणेल ? नानासाहेबांच्या राजकारण नैपुण्याची कवीनें तारीफ केली आहे. " बाळाजी पंडित प्रभुवर । मुख्य प्रधान परिराजेश्वर " असें ह्मणून नानासाहेबांच्या वाढलेल्या सत्तेचा उल्लेख केला आहे. कवीचें व त्यांचें थोडे दिवस बिनसलें होतें त्यावेळीं इंगितज्ञ व निस्पृह अशा निरंजनमाधवांनीं तीर्थयात्रेच्या मिषानें पुण्याहून कसा पाय काढला याचेंही त्यांनीं दिलेलें कारण स्मरणीय आहे. पिशुन जनांनीं असत्य भाषणें करून नानासाहेबांचें मन कलुषित केलें असें कवी ह्मणतात. यावरून नानासाहेब हलक्या कानाचे असून त्यांचे भोंवतीं आपमतलबी लोकांचा गराडा होता असें नाहींका निष्पन्न होत ? गुणरत्नाचे परीक्षक बाजीराव ब्रह्मेंद्रस्वामी, निरंजनमाधव व बापूजी पंडित यांसारख्या बहुमोल सत्पुरुषांचा संग्रह करीत व नानासाहेब पिशुन जनांचें ऐकून त्यांचा रोष व पाप्यांसारख्या सत्पुरुषांचा शाप घेत, यावरून या पितापुत्रांच्या स्वभावांतील तफावत स्पष्ट दिसून येते. ( २ ) निरंजनमाधवांच्या प्रवासावरून तत्कालीन देशस्थितीची कल्पना होते. बापूजी पंडित, निरंजनमाधव व ब्रह्मेंद्रस्वामी यांसारखीं राजकारणें दक्षतेनें करणारीं परंतु वस्तुतः त्यांपासून अलिप्त असून नित्य समाधिसुखाचा अनुभव घेणारीं माणसें शें दिडशें वर्षांपूर्वी आपल्या समाजांत बरींच असत. नोकरीच्या पेशाच्या लोकांना स्नानसंध्येलाही वेळ मिळत नाहीं ह्मणून अलीकडे लोक कुरकुरतात! ( ३ ) हा मुद्दा फारच महत्वाचा आहे. निरंजनमाधव व त्यांची पत्नी गंगावती यांचे परस्परसंवाद वाचून व निरंजनांनीं तिच्यासाठीं ग्रंथ लिहिले, तिला कौतुकानें गोड, प्रेमळ व सन्मानपूर्वक शब्दांनीं

उपदेशून आपली शिष्यीण व सांप्रदायिनी केली यावरून व शेवटचें पतिपत्नीच्या अभेदरूपाचें वर्णन वाचून पूर्वी आमच्या समाजांत स्त्रियांस शिक्षण कसें देत व किती मानीत हें प्रत्येकाच्या ध्यानांत येईल. " निजसुंदरीची प्रेमझरी ॥ तत्रापि विज्ञापना कुसरी " अशा गुणांनीं पतिमन मोहित करणाऱ्या स्त्रिया निव्वळ जुन्या पद्धतीच्या शिक्षणानेंही तयार होतात हें यावरून सिद्ध होतें.

आतां कवि या नात्यानें निरंजनामाधवांच्या चरित्राचा विचार करूं. मराठींत जे उत्तम कवि होऊन गेले त्यांतील निरंजनमाधव हे एक होत. तथापि इतर कवींप्रमाणें त्यांची कविता फारशी प्रसिद्ध नाहीं. यांच्या ग्रंथरचनेचा मुख्यकाळ शके १६८०–१६९५ हा होय. यांनीं ज्ञानेश्वरविजय (अ. ५ श्लोक.२१८) नामक ग्रंथांत ज्ञानेश्वरांचें चरित्र दिलें आहे. ज्ञानेश्वरसमाधि ( अ. १२ श्लोक. ७६३ ) हा ग्रंथ नामदेवांच्या अभंगांच्या आधारें शके १६८७ पार्थिव संवत्सरांत केला. चिद्बोधरामायण ( श्लो. ४२२ बालकांड ) रामकर्णामृत ( १११ ) निरोष्ठ्य रामायण ( श्लोक ४५ ) व मंत्ररामचरित ( श्लोक १५ ) हे चार ग्रंथ रामवर्णनपर आहेत. चिद्बोधरामायण शके १६८० पूर्वी श्रीरंगपट्टणास रचिलें, तो ग्रंथ उत्तम असून त्यांत अध्यात्मरामायणावर टीका आहे. याचीं पुढचीं सहा कांडें मिळालीं होतीं परंतु तीं चोरीस गेलीं असें समजतें. यांचे छंदःशास्त्रावर तीन ग्रंथ आहेत. वृत्तमुक्तावली (श्लोक २५० ) वृत्तवनमाला ( श्लोक १११ ) व वृत्तावंतस ( श्लोक २५१ ) हे अनुक्रमें शके १६८३, १६८९ व १६९४ या सालांत रचिलेले आहेत. याचा सुभद्राचंपू ( सर्ग ७ श्लोक ३८० ) हा शके १६९० मध्यें रचलेला आहे. सांप्रदायपरिमळ ( उद्गार ५ ओवी १००० ) हा शके १६८५ मध्यें रचिला आहे. याशिवाय यांची कांहीं स्फुट प्रकरणें, स्तोत्रें व पदें आहेत. वामनपंडितांच्या धर्तीवर यानें बहुतेक काव्यरचना भिन्न भिन्न वृत्तात्मक श्लोकांत केली आहे. शुद्धाशुद्धतेकडे यानें फारसें लक्ष्य नाहीं, तरी याच्या काव्यांत प्रसाद चांगला असून याच्या वाणीचा ओघ अगदीं अस्खलित चालला असतो. हा मोठा वेदांती योगी असून परम भक्त होता. साहित्यशास्त्र यानें चांगलेंच पाहिलेलें दिसतें. याला हिंदुस्थानी, कानडी, गुजराथी, संस्कृत, मराठी व इतर कित्येक भाषा येत होत्या. वृत्तावंतस ग्रंथ तर यानें नथ्थुभट नामक नागर ब्राह्मणाच्या मतानुसारें केला आहे! याच्या ग्रंथांतील कवितेचे निरनिराळ्या प्रकारचे मासले दाखवितों:—

पैठणच्या ब्राह्मणांकडे जेव्हां ज्ञानेश्वरादि भावंडांस शुद्धिपत्रार्थ जाण्याचा प्रसंग आला तेव्हां त्यांनीं एकत्र बसून विचार केला. प्रथम निवृत्तिनाथ ह्मणतात:—

ह्मणे ऐकें ज्ञान्या ! अतिचतुर आहेसि बरवा ।
तुला सांगें माझा अनुभव तमोनाशक दिवा ॥
नसे मातें कांहीं कुळ अकुळ मी ब्राह्मण नव्हें ।
नव्हें क्षत्री वैश्यांतरि वृषल जाती न गणवे ॥ १३ ॥
नव्हों आह्मीं कांहीं त्रिगुणचि महत्तत्व अथवा ।
विराटात्मा नोहे अगुण तरि मी जाण बरवा ॥
नव्हे कांहीं जें जें वदति जन जें त्याहुनि पर ।
स्वरूपानंदीं मी निखिल सुखचैतन्य सुपुर ॥ १६ ॥
अह्मां धर्माधर्मीं किमपि तरि संपर्क न वसे ।
निषेधाचा हो कां किमपि विधि निर्बंध न दिसे ॥
नसे भेदाभेदीं अढळ निजरूपीं दिसतसे ।
अशा बोधानंदीं सहज सहजीं मी वसतसें ॥ १७ ॥
तदा बोले ज्ञानेश्वर कथिसि तूं गोष्टि बरवी ।
निहारीं लिंपेना उदित घडला निश्चय रवी ॥
जसें सोनें माती न धरित तसा शुद्ध अगुणी ।
गुरू चैतन्यात्मा अससि परिसावी विनवणी ॥ १८ ॥
करावी वेदाज्ञा प्रभु सकळ आचारविषयीं ।
धरीं या सृष्टीतें ह्मणुनि वसिजे त्याच समयीं ॥
महाश्रेष्ठीं कीजे प्रथम अपुला धर्म सकळीं ।
जसा आहे ज्याचा श्रुतिविहित ज्या उत्तम कुळीं ॥ १९ ॥
अनाचारें नोहे जय, भयचि दे त्या इहपरीं ।
ह्मणोनी पाळावा नियतचि सदाचार चतुरीं ॥
जरी ज्ञानी आहे तरिहि जनतासंग्रह धरी ।
यथाशास्त्रें धर्माचरण करिजे उत्तम परी ॥ २० ॥

ज्ञानेश्वरविजय, अध्याय ३

सोपानदेवानें या वादांत आपला अभिप्राय ज्ञानोबारायासारखाच दिला आहे. निवृत्तिनाथांचें ह्मणणें योग्य आहे, तरी धर्मप्रवर्तक संत ह्मणून ज्ञानोबारायांचेंही ह्मणणें

योग्य आहे. योग्य पुरुषांच्या तोंडीं यथायोग्य भाषणें घालणें सामान्य बुद्धिमत्तेचें काम नव्हे ! ज्ञानेश्वरी गीताकल्पवल्लीचें गोड फळ आहे असें सांगतांना कवि ह्मणतात:—

श्रीगीता कल्पवल्ली उपजत बरवी कृष्णवक्त्रालवालीं ।
व्यासें सिंचोनि तीतें टवटवित तसी विस्तरा पाववीली ॥
पार्थाख्या मंडपीं जे बहुत पसरली संजया साधली ते ।
सेवावी ज्ञानदेवी परमफळ जना मुक्तिकैवल्य देते ॥ २२ ॥

ज्ञानेश्वरसमाधि, अ. १

निरोष्ठ्र रामायण व मंत्ररामचरित हे लहानसे ग्रंथ मोरोपंती थाटावर रचलेले आहेत. मोरोपंती रामायणांचा काल पाहतां हे निरंजनमाधवाचे ग्रंथ आधींचे दिसतात. हे पाहून तर आर्यापतीला अष्टोत्तरशतरामायणांची सोमती वाहण्याची कल्पना सुचली नसेलना ? मोरोपंताप्रमाणेंच निरंजनमाधवानेंहीं निरोष्ठ्ररामायणांत फक्त पवर्ग गाळला आहे. मंत्ररामचरितांत त्रयोदशाक्षरी मंत्र एकदांच आणला आहे. रामकर्णामृत काव्य लहानच आहे पण फारच गोड आहे. यांत श्रीरामचंद्राच्या प्रतापयशगांभीर्यौदार्यादिगुणांचें रामचरित्रांतील उदाहरणें देऊन पृथक्त्वानें वर्णन केलें आहे. बहुतेक कवींनीं रामचरित परोपरीनें वर्णिलें आहे. पण रामचरित्राचें मंथन करून रामगुणरत्नांचा समूह असा निरंजनमाधवाशिवाय कोणीही आपल्यापुढें एकत्र ठेवला नाहीं. उदाहरणार्थ रामप्रतापवर्णन ( श्लोक ३८–५१ ) पहावें:—

रामा जे सगरान्वयीं उपजले राजे धरामंडळीं ।
त्यांचें सद्यश आजुनी प्रकटतें आहेचि सर्वांस्थळीं ॥
एकें निर्जर रक्षिले सुरनदी एकें जगीं आणिली ।
एकें दीर्घशिलोच्चयें विरचिला अक्षोभ्य सेतू जळीं ॥ ३८ ॥
पाताळीं भय दुष्ट दानवकुळां आनंद स्वर्गीं सुरां ।
पृथ्वीमाजि तुझी सुकीर्ति विलसे तारावयातें नरां ॥
ब्रह्मांडांतरिं राघवा तव गुणा वांचोनि कोठें रितें ।
नाहीं साच मला मनासि गमलें हें शोधितां पूरतें ॥ ४२ ॥
लोकीं या मृगनाभि केशर तसें कर्पूर ही वानिती ।
पाटीरागरु केतकी सुरभिता सर्वत्र सन्मानिती ॥

रामा तद्यशसाम्य एकहि नये ब्रह्मांडभांडोदरीं ।
आहे वास विशेष आजुन युगें लोटोनि गेलीं तरी ॥ ५० ॥

रामचरित्रांतील कुलपरंपरागत आलेला एक महद्दोष कवि मोठ्या गंभीरपणानें सांगतात:–

रामा ! त्वत्कुळदोष एक विलसे अत्यंत दुर्वार कीं ।
तूझा तूंचि विचार यासि करिजे ! आणूं नये लौकिकीं !! ॥
जे तूझ्या कुळिंचे नृपाळ अपुल्या सत्पूर्वजांच्या यशा ।
सारे लोपिति आपुली प्रकटिती सत्कीर्ति दाही दिशा !!! ॥ ६० ॥

आणखी एकच श्लोक पहा:—

झाली सौंदर्यसीमा तववपु घडतां शिल्पसीमा विधीची ।
झाली माधुर्यसीमा मुखकमळाभवा वाक्य मुक्ताफळांची ॥
दोर्दंडीं शौर्यसीमा पदकमळवरी दीनसंतारणाची ।
झाली मद्भाग्यसीमा तवगुणगणनीं योजितां बुद्धि साचि ॥ १०८ ॥

या श्लोकांवरून निरंजनमाधवाची प्रतिभा किती सोज्वळ होती हें कोणाच्याही कळून येईल.

श्रीरामाच्या बाललीलाप्रसंगाचे श्लोक:—

विचित्र तोकाभरणीं विराजे । सर्वांहुनी राम विशेष साजे ।
तारांगणीं श्रेष्ठ सुधांशु जैसा । भासे जनां श्रीरघुराज तैसा ॥४८॥

बोबडे सरस बोल कोंवळे । इंद्रनीळ मणिकांति सांवळे ॥
दंतमौक्तिकसुपंक्ति साजिरी । शोभली वदनशुक्तिकांतरीं ॥ ५० ॥

एकामागें एक सुनीलोत्पल पंक्ती । चौघे रांगों लागति गेहांगणवर्ती ॥
भिंती टेंके घेति उभे राहति तोषें । सौख्या देती मातपित्यालागिं विशेषें॥५१॥
धांवो लागे माय धरों ‘ ये ’ ह्मणवोनी । धांवे पाठीं पुण्यवती पंकजपाणी ॥
योगींद्रातें साध्य नव्हे त्याप्रति राणी । हातीं वोढी भक्तिबळें चित्सुखखाणी ॥५४॥

चिद्बोधरामायण, बालकांड, अ. ४.

‘ वृत्तवनमाला ’ हें देवीचें स्तोत्र आहे. प्रत्येक श्लोक निरनिराळ्या वृत्तांत असून त्यांत त्या त्या वृत्ताचें नांव मोठ्या खुबीनें आणलें आहे.

इया रूपीं विद्युन्माला । येना साम्या आणायाला ।

ऐशी स्वर्णांगी तूं बाला । येसी कैसी वर्णायाला ॥ १८ ॥
जें इंद्रवज्रा गणना करीना । जें विष्णुचक्रा सहसा तुटेना ।
दारिद्य माझें हरिलें कृपाळें । आलोकमात्रें अति पुण्यशीळें ॥ २९ ॥
यथार्थ वंशस्थ तयासि बोलिजे । सुपंडितीं त्यासचि फार वानिजे ॥
अहर्निशीं पादसरोज जे तुझे । पूजोनि भावें भजताति तूळजे ! ॥ ४६ ॥
क्षमा तव विचारितां अमित साच पृथ्वी उणी ।
तशी गति नभासही न गणवे तुझ्या सद्गुणीं ॥
समीर मग तेज हो तव कशासि वानूं पुढें ।
नहोनि समतोलने घडति भूतमात्रें जडें ॥ ८६ ॥

वृत्तें लोकप्रिय करण्याची व भगद्भक्ति वाढेल अशा रीतीनें त्यांची गोडी मुलांस लावण्याची शिताफी निरंजन माधवांस कशी साधली आहे याची या सरस छंदोमय स्तोत्ररूप काव्यावरून वाचकांस कल्पना होणार आहे. कै० गोडबोले यांच्या हातीं हें स्तोत्र व वृत्तावतंस पडलें असतें तर आपलें वृत्तदर्पण झांकून ठेवून त्या रसिक-वर्यांनीं हेच ग्रंथ प्रसिद्ध केले असते ! दुसऱ्या ग्रंथांत कवीनें आपणांस 'कविस्तोमैकचूडामणि' व 'नाना काव्यकलाकलापसह जो भासे दुजा कीं रवी' अशीं विशेषणें लावून घेतलीं आहेत तीं अयथार्थ दिसत नाहींत.

सुभद्राचंपू, कवीनें भारत, भागवत व अन्य पुराणांच्या आधारें व पदरची 'कवीभारती' घालून रचिला आहे. हा शृंगाररसप्रधान असून मराठींत तर अद्वितीयच आहे. साहित्यसागर मंथन करून हा चंपू रचला असें कवि प्रारंभींच ह्मणतो व ग्रंथसमाप्तिप्रसंगीं 'रसालंकाराची अतिसरस वाणी प्रकटली' ह्मणून अभिमानोद्गार काढतो. यांत कवीनें आपलें चातुर्य व वर्णनसामर्थ्य खरोखरच उत्कृष्ट तऱ्हेनें दाखविलें आहे. हें काव्य कांहींसें संस्कृताच्या धाटणीवर गेलें आहे, तरी कवीनें आपली अक्कल यांत फार खर्च केलेली उघड दिसते. पहिल्याच सर्गांत सुभद्रेचें वर्णन पहाः—

प्रभा गल्लद्वंद्वें सहज अरशाची हरितली ।
तिळाच्या पुष्पाचें यश जिणुनि नासा मिरविली ॥
सुमुक्ताशुक्ती त्या श्रुति निरखितां मज्जति जळीं ।
मुखाब्जा लक्षोनी परम त्यजिला गर्व कमळीं ॥ १६ ॥
इच्या वक्षोजांहीं सरस हरिल्या कंजकळिका ।

म्हणोनी कंदर्पा प्रकटविति चित्तीं सकळिका ॥
दिसे श्यामा पोटावरि लघुतरा रोमसरणी ।
असे कीं कामाची तरि असिलता जीवहरणी ॥ १९ ॥

नितंबातें कुंभस्थळ निरखितां मत्त करिचे ।
महालज्जेनें ते स्त्रवति अजुनी साच परिचे ॥
तया शुंडादंडा जिणुनि उरुयुग्मीं स्वमहिमा ।
जगीं केली तेही प्रकट दिसते दिव्य सुषुमा ॥ २१ ॥

यापुढें अर्जुनाचें तीर्थाटण, अर्जुन पति मिळावा म्हणून सुभद्रेनें केलेली देवीस्तुति, अर्जुनानें यतिवेषानें यादवगृहीं वास केल्यावर प्रेमपरीक्षणार्थ केलेली स्वनिंदा व कौरवस्तुति व त्याचवेळीं सुभद्रेनें केलेलें स्वप्रेमाविष्करण, बलरामाचा त्वेष व सांत्वन वगैरे प्रकार कवीनें मोठे मनोरम वर्णिले असून प्रसंगोपात्त आपली रसिकता पूर्णपणें दाखविली आहे. सहाव्या सर्गांत शरत्काळाचें वर्णन वर्णनीय आहे:—

वर्षाकाळ समस्तही निरसला आला शरत् साजिरा ।
झालें अंबर शुद्ध मंद गतिनें वायू फिरे गोजिरा ॥
तत्कालोद्भव सत्फळें सुकुसुमें भारें तरू डोलती ।
सस्यें शोभित दीसते वसुमती संफुल्लल्या मालती ॥ १ ॥

झाले स्तब्ध शिखी सुखी घडुनिया अर्थी जनाचे परी ।
पाहा शोभति शाड्वलें हरित ते श्रीमंत तैसे गिरी ॥
झाल्या त्या सरिता कुषारसयुता स्वच्छांबु संधारणें ।
लोकालंघन शक्य त्या विलसती शैत्यादि सर्वांगुणें ॥ ३ ॥

नाना नव्य तृणें वनीं मृगगणें सेवोनियां पुष्ट ते ।
जैसे नूतन संपदा मदभरें सानंदले दुष्ट ते ॥
कामार्थी करिताति युद्ध अपुल्या जातींत कामाथिले ।
ते दुर्वृत्त मदोद्धतासम पहा ग्रामीणसे मातले ॥ ४ ॥

औदार्योन्नत दंभवंत करिती देतां जना गर्जना ।
तेव्हां पावति कृष्णता अपयशें मालिन्य ये त्या जना ॥
तेही सज्जनसंगलाभ घडतां शुद्धाकृती पावती ।
तैसे मेघ शरत्समागमवशें मौनें शुची राहती ॥ ५ ॥

जाती ते द्विज नीड टाकुनि तसे सद्विप्र तीर्थाटणा ।
राजे जेथ रथावरोह करिती शत्रूचिया शासना ॥
वाणिज्यार्थ वणिग्जनीं वृषगणीं वाहोनि वस्तू बऱ्या ।
नेतीउद्यम लाभ इच्छुनि मनीं स्वच्छंद देशांतरा ॥ ६ ॥

मुक्तेश्वराच्या कवितेंत सृष्टिवर्णन हरएक प्रकारचें व मोठ्या मार्मिकतेनें केलेलें आढळतें. मराठींत सृष्टिवर्णन नाहीं असें ह्मणणारांनीं निरंजनमाधवाचें हें शरद्वर्णन, मुक्तेश्वराचें रात्रिप्रभाववर्णन, होनाजीबाळाची भूपाळी किंवा रघुनाथ पंडितांचें उपवनहंसवर्णन हीं पहावींत, ह्मणजे मराठी कवींस सृष्टिसौंदर्यनिरीक्षणाची संवय नव्हती, हें विधान किती खोटें आहे, हें त्यांच्या लक्ष्यांत येईल. सुभद्रार्जुनांचा विवाह ह्मणजे समसमांचा योग, त्याप्रसंगीं:—

प्रताप कीर्तीसह वर्तताहे । धर्म क्रियेसी अति शोभताहे ।
साजे जसा तो ऋतु दक्षिणेसीं । तसा विराजे तय यादवीसी ॥ ७० ॥
संतोष वाटे सकळां जनांला । पाहोनि कांतेसह अर्जुनाला ।
रूपें गुणें शीलवयें समान । ह्मणोनि ते डोलवितात मान ॥ ७१ ॥

सुभद्राचंपू, सर्ग. ७

सांप्रदायपरिमळ ग्रंथांत कवीनें स्वतःची, स्वतःच्या गुरूची व त्यांच्या सांप्रदायांची हकीकत विस्तारानें दिली आहे. त्याच ग्रंथाच्या पांचव्या उद्गारांत कवीनें स्वसांप्रदायाचे नियम व सदाचारपद्धति दिली आहे ती सर्वांनीं वाचण्यासारखी आहे:—

देह पुत्र वनिता । तेही रक्षिती परहिता ।
परोपकारावांचोनि स्वार्था । न सेविती ते उदार ॥ १२ ॥
जैसा जीवंत तरुवर । आपण वाहे फळपुष्पभार ।
पर्जन्य उष्ण हिम दुर्धर । साहे आंगीं परार्थ ॥ १५ ॥
सर्व धर्मांची सहायता । करावी सामर्थ्य असतां ।
आपुल्या धर्मविहिता । सदा फार जपावें ॥ ४३ ॥
परधर्माचें आचरण । आपण कदापी न कीजे जाण ।
परंतु परधर्म पाहोन । संतोष मानावा मानसीं ॥ ४४ ॥
हें ईश्वराचें कौतुक । ईश्वर मायाचाळक ।
अनेक मार्गदर्शक । ईश्वर सर्व ॥ ४५ ॥

तर्डी तापडी संन्यासी । ब्रह्मचारी अतिथी मुख्यत्वेंसी ।
तयांसी जो गृहस्थ पोषी । कुटुंबपोषक तो एक ॥ ७३ ॥
ज्ञानी ह्मणजे परमेश्वर । परमेश्वराचें कुटुंब विश्वाकार ।
यांसी घडावा उपकार । तरी तें कुटुंबपोषण ॥ ७६ ॥
ज्ञान ह्मणजे अनुभवशास्त्र । येथें लौकिक नगे तिळमात्र ।
ज्ञाननिष्ठ स्वतंत्र । तयासी परतंत्रता किमर्थ ॥ ८८ ॥
जितुकी उपाधि जडे । तितुकाचि संसार वाढे ।
जितुकी उपाधि खंडे । तितुकी घडे ज्ञानवृद्धि ॥ ९० ॥
शांतिसुख प्राप्त जयासी । तोचि मुख्य संन्यासी ।
ते त्यागलिया गृहस्थासी । न पावती संन्यासी कळा त्याची ॥ ९१
परंतु वेष मात्र पाहोन । गृहस्थें करावें वंदन ।
भिक्षा भक्तियुक्त देऊन । विनयनम्रें पूजिजे ॥ १११ ॥
शूद्र जरी देवभक्त । त्यासी पूजिजे यथोक्त ।
अन्नपान मानयुक्त । अर्पिजे गृहस्थें सर्वांशीं ॥ ११९ ॥
आपुल्या दारपुत्रीं आवडी । संकटीं कैसा चरफडी ।
तैसाचि परहितीं स्वदडसवडी । धांवे तो गडी मुक्तीचा १२१ ॥
निंदा करोतु निंदक । छळोत परोपरी छळक ।
बरे वाईट बोलोत लोक । आपण सारखा सर्वांशीं ॥ १२७ ॥
उदारांचा शिरोमणी । शांतचित्त समाधानी ।
सर्वांशीं मृदुभाषणी । चित्त हरील तो धन्य ॥ १२८ ॥

वरील ओंव्यांवरून निरंजनमाधवांचें धर्मौदार्य व विचारौदार्य उत्तम प्रकारें व्यक्त होत आहे. 'ज्ञानी ह्मणजे परमेश्वर । परमेश्वराचें कुटुंब विश्वाकार । यांसी घडावा उपकार । तरी तें कुटुंबपोषण ॥' आणि 'शूद्र जरी देवभक्त । त्यासी पूजिजे यथोक्त ॥ हे कवीचे उद्गार किती उदात्त आहेत! वसुधैव कुटुंबकत्वाचें सगळें तत्व पहिल्या ओंवींत भरलें आहे; व दुसरींत, जातिभेदाकडे न पाहतां मनुष्याच्या केवळ गुणावरून त्याची पारख करावयाची व योग्यता ठरवावयाची, असा जो कवीनें आपला अभिप्राय दिला आहे, तो हल्लींच्या काळीं किती उपयुक्त आहे! प्रस्तुत, जातिभेद नको असें ह्मणणाऱ्यांत, एखाद्या सुशिक्षित किंवा धार्मिक अतिशूद्राची पूजा करावयास किती असामी तयार होतील? हल्लीं, जि

तिकडे 'परोपदेशे पांडित्य' बोकाळलेलें दृष्टीस पडतें पण कृतीच्या नांवानें वाटोळें; ही स्थिति फार शोचनीय आहे. असो.

निरंजनमाधवाच्या स्तोत्रांतही त्याची श्रद्धाळु व प्रेमळ वाणी अस्खलित चालते सद्गुरुस्तोत्रांतील खालील श्लोक पाहावेः—

गुरू उदार माउली प्रशांत सौख्य साउली ।
जया नरासि फावली तयासि सिद्धि धावली ।
गुरू गुरू गुरू गुरू ह्मणोनि जो स्मरे नरू ।
तरोनि मोहसागरू सुखी घडे निरंतरू ॥ २३ ॥

गुरूचिदाब्धिचंद्र हा महत्पदीं महेंद्र हा ।
गुरु प्रतापरुद्र हा गुरू कृपासमुद्र हा ।
गुरु स्वरूप दे स्वता गुरूचि ब्रह्म तत्वता
गुरूविना महाव्यथा नसे जगीं निवारिता ॥ २४ ॥

गुरूचि बाप माउली गुरूचि दीन साउली ।
गुरूचि शिष्यवांसुरांसि कामधेनु गाउली ।
गुरूचि चिंतितार्थ दे गुरूचि तत्व तो वदे ।
अलभ्य मोक्ष लाभ आपुल्या कृपें गुरूचि दे ॥ २८ ॥
गुरूचि भेद नाशितो जडांधकार शोषितो ।
गुरूचि मोह वारितो अविद्यभाव सारितो ।
गुरूचि ब्रह्म दावितो गुरूचि ध्यान लावितो ।
गुरूचि विश्व सर्व आत्मरूप हें बुझावितो ॥ २९ ॥
गुरूचि ध्येय ध्यान रे गुरूचि सर्व भान रे ।
नसे गुरूसमान रे जगीं गुरूसी मान रे ।
गुरूचि थोरसान रे महासुखा निदान रे ।
गुरू गुरू गुरू गुरू करीं ह्मणोनि गान रे ॥ ३४ ॥

निरंजनमाधवाचें एकच पद मासल्याकरितां देऊन पुरे करूं:—

मनुजवरा विषयकाम वाढवूं नको ॥ धृ० ॥
क्षणिकचि संसार सुखी सार ह्मणुनि गुंतलासि ।
भजन तंतु करुनि मना तोडवूं नको ॥ १ ॥

कामलोभमोहबद्ध जाहलासि काय तरी ।
भाव भक्ति धर्म कर्म बुडवूं नको ॥ २ ॥
सद्गुरुसी शरण रिघुनि मरण जनन दूर करीं ।
निरंजनीं लाग भेद रूढवूं नको ॥ ३ ॥

याशिवाय, श्रीमच्छंकराचार्यकृत " स्वात्मानंदप्रकाश " या ग्रंथाच्या १५२ आर्यांवर व त्यांच्याच दुसऱ्या एका गुरुशिष्यसंवादपर ग्रंथावर, निरंजनमाधवांनीं " प्राकृत गद्यमय सुबोध व सरल टीका " केल्या आहेत. पहिलीस " अद्वैतामृत " व दुसरीस " बोधभानु " अशीं नांवें दिलीं आहेत.

## निरंजनमाधव यांच्या गद्याचे मासले.

### आर्या.

( १ ) देशिकवरं दयालुं वंदेहं निहतसकलसंदेहं ।
यच्चरणद्वयमनुभवमुपदिशति तत्पदस्यार्थम् ॥ १ ॥

टीका:—" देशिक जे उपदेष्टे जे त्यांमध्यें श्रेष्ठ ते देशिकवर ह्मणावे ॥ दयालु ह्मणजे संसारग्राहग्रस्त जीवांस उद्धार करावयाविषीं अत्यंत दया आहे ज्यांस ॥ शिष्य जे निष्ठेकरून श्रीगुरुचेठायीं परमेश्वरबुद्धि केली आहे जेहीं ऐसे जे त्यांचे सकल संदेह निहत ह्मणजे निवारण केले आहेत जेहीं ॥ ज्यांचे चरणद्वय तत्पदांचा अद्वयानुभवरूप अर्थ उपदेश करिते त्यांस वंदन करितों ॥ "

( २ ) न क्लेशपंचकमिदं भजते कृतकोशपंचकविवेकः ।
अतएव पंचकोशान्कुशलधियःसंततं विचिन्वन्ति ॥

टीका:—" पंचकोशविवेक ज्या पुरुषानें केला आहे त्यास पंचक्लेश होत नाहींत यास्तव कुशल बुद्धिवंत निरंतर पंचकोशविवेक करीत आहेत ॥ ते पंचक्लेश कोणते ॥ अविद्या, अस्मिता, राग, द्वेष, अभिनिवेश, । पंचक्लेशाः, । याचा अर्थ करितों । अविद्या ह्मणजे मूलविद्या आत्मविषयीं अज्ञान । अस्मिता ह्मणजे देहादि, अनात्मयाचेठायीं आत्मबुद्धि अहंदेही इत्यादि । देहानुकूल शब्दादिविषय याचे ठायीं प्रीति तो राग। देहास प्रतिकूल शब्दादिविषयीं अप्रीति तो द्वेश, । रागद्वेषाचेठायीं दुराग्रह ह्मणजे अनुकूलच संपादावें प्रतिकूल सर्वथा नसावें ऐसा जो अभिनिवेश । हे पंचक्लेश महादुर्धर ॥ "

हे दोन्ही उतारे अद्वैतामृत ग्रंथांतले आहेत. यावरून दीडशें वर्षांपूर्वींच्या परमार्थपर गद्याची पद्धति समजते.

( २ ) " कृष्णनाथगाथा " या निरंजनमाधवरचित संस्कृत ग्रंथांतले श्लोकः—

कदाचित्पुण्यसमये नारदो देवदर्शनः ।
स्वैरगोरणयन्वीणां विचचार महीतलं ॥ १ ॥
नानापुष्पलताकीर्णं फलच्छाया समन्वितम् ।
नानापक्षिगणोपेतं मृगयूथविराजितम् ॥ २ ॥
मनोहरं ददर्शाग्रे वनं नंदनसन्निभम् ।
बुध्द्वामुनि निवासंच प्रविवेश महाद्युतिः ॥ ३ ॥

हें गोकर्ण महाबळेश्वर वनाचें वर्णन असून, त्यांतील

प्रतिमा देवदेवस्य कलौ तारकरूपिणी ।
ध्यानपूजा पराणां च सद्यो मुक्तिप्रदा भवेत ॥ ६ ॥

हा श्लोक चिंतनीय आहे.

निरंजन माधवाच्या ग्रंथांपैकीं चिद्बोधरामायणाचें बालकांड पूर्ण छापून निघालें आहे. त्यानंतर, गेल्या एकदोन वर्षांत ठाणें येथील महाराष्ट्र कवि मासिक पुस्तकांतून या कवीचे पुढील ग्रंथ छापून प्रसिद्ध झाले आहेत:—

| | श्लोकसंख्या. | | श्लोकसंख्या. |
|---|---|---|---|
| १ ॐ नमोभगवते वासुदेवायस्तोत्र. | १४ | ६ श्रीसांबशिवाष्टक. | ९ |
| २ व्यंकटेशस्तोत्र. | १०९ | ७ देवी अष्टक. | १० |
| ३ श्रीमल्लारीस्तोत्र. | ४४ | ८ श्रीसांबशिवध्यान. | ७६ |
| ४ श्रीराम जयराम जयजयराम स्तोत्र. | १५ | ९ श्रीमहालक्ष्मीस्तोत्र. | १७ |
| ५ श्रीविठ्ठलस्तोत्र. | ५८ | १० श्रीगुरुस्तव ( अपूर्ण ) | २४ |
| | | ११ सद्वृत्तमुक्तावली. | २५० |

वरी ग्रंथांपैकीं ' सद्वृत्तमुक्तावली ग्रंथांत कवीनें बहुतेक सगळ्या वृत्तांचीं लक्षणें सोपपत्तिक रीतीनें दिलीं असून, कै. परशुरामपंत तात्यांच्या वृत्तदर्पणाचा अभ्यास केल्यावर, हाही ग्रंथ एकदोन वेळां चांगला लक्षपूर्वक वाचिल्या असतां, पाठकांस किंवा विद्यार्थ्यांस छंदःशास्त्राची चांगली माहिती होईल यांत संशय नाहीं. हा ग्रंथ लिहिण्याचें कारण कवीनें पुढील दोन श्लोकांत सांगितलें आहे:—

झाले वैदिक लौकिकात्मक असे ते छंदसर्वा दिसे ।
वेदीं वैदिक मंत्र मूळ सकळां मंत्रासि आदी असे ॥
श्लोकीं लौकिक पद्यबंधरचना नाना कवींची गिरा ।
शोभे या वसुधातळीं जनमुखीं सौख्यप्रदा सुंदरा ॥ १ ॥
ऐका सांप्रत लौकिकक्रम असा उक्तादि षड्विंशती ।
छंदीं वृत्त अपूर्व पूर्व ऋषिंनीं नानागणीं संस्कृतीं ॥
केली पद्धति ते सुदेशवचनें जाणावया प्राकृतां ।
छंदःशास्त्रविशारदें विरचिली संतोषदात्री सतां ॥ २ ॥

सदर ग्रंथांतील कांहीं वृत्तें पुढें दिलीं आहेत:—

पंक्ति

पंक्ति सुनामें । गाजत नेमें । भोगवती हे । सत्प्रिय आहे ॥

शशिवदना

**न य** युत आहे । **शशिवदना** हे । ह्मणुनि इचा तूं । धरिं बहु हेतू ॥

मातंगी

**मा** दोनी ते योजा । **मातंगी** हे वोजा ॥
भावें पूजा ईतें । देते सर्वार्थातें ॥

सुमना.

**न न** गुरु सुमना । रमविल सुमना ॥
रसलघु गयुता । रसिकजन मता ॥

विद्युन्माला

**मा मा गा गा विद्युन्माला** । दों मार्गांनीं योजी बाला ॥
वाणी शोभे ईचां संगें । संतांचा हे चित्ता रंगे ।

माणवक.

**भा त ल गा माणवका** । योजिशि तूं सद्गुणका ।
पावशि सौख्यामृत तें । या भुवनांतीं सुमते ॥

इंद्रवज्रा.

हे **इंतवज्रा त त ता ग** युग्मी । योजीं, प्रिया तूं वरि कीर्ति लक्ष्मी ॥
पांचां सहांनीं यति तूं विचारीं । जो वृत्तवृंदीं अतितोषकारी ॥

### दोधक.

दोधक भत्रय दोनि गुरूंनीं । योजि भुजंगम सूत्रविधानीं ।
सत्कविमंडण पद्य रचोनी । पाव जगीं यश सद्गुणखाणी ॥

### स्वागता.

स्वागता रनभ युग्मगुरूंशीं । योजिशील जरि सद्गुणराशी ॥
पावशी सुयशमौक्तिक हातीं । मान्य होशिल बुधीं गुणवंतीं ॥

### मौक्तिकमाला.

मौक्तिकमाला भ त न ग गांता । योजुनि अर्पी कविवर संतां ।
डोलशि तेव्हां परम सुखानें । वानिति जेव्हां सुजन मुखानें ॥

### भुजंगप्रयात.

भुजंप्रयाता घडे चौं यकारीं । कवी जाणते योजिती या प्रकारीं ।
भुजंगेशतुल्यासि हा वृत्त माने । रचीं पद्य येणें करीं नामगानें ॥

येथवर दिलेल्या हकीकतीवरून व उताऱ्यांवरून निरंजनमाधव यांची योग्यता वाचकांस अजमावतां येणार आहे. ऱ्हस्वदीर्घादि प्रकारांकडे यांनें मुळींच लक्ष्य नाहीं ह्मटलें तरी चालेल. पण हाच प्रकार मोरोपंतांशिवाय बाकीच्या सर्व मराठी कवींच्या ग्रंथांत आढळतो त्यामुळें प्रस्तुत कवीस मोठासा दोष देतां येणार नाहीं. कवीच्या मनाचें उदात्तपण, त्याचा प्रेमळ व उदार स्वभाव, त्याची रसिकता, त्याची निरिच्छवृत्ति व योग आणि भक्ति या दोन्ही मार्गांवरील श्रद्धा, त्याची उत्कृष्ट गुरुभक्ति वगैरे गुणांमुळें त्याच्या काव्यांस गोडी आली आहे. शिवाय तीर्थयात्रेचें व प्रवासाचें विलक्षण प्रेम, व्यवहारचातुर्य व राजकार्यकुशलत्व या कवीच्या गुणांत पूर्वी कोणी न केलेल्या विविध काव्यप्रकारांमुळें अधिक भर पडून एका दृष्टीनें हा कवी मराठींत अद्वितीयच होऊन गेला असें ह्मणावें लागतें. त्याचा चंपू, त्यानें छंदःशास्त्रावर रचलेले तीन ग्रंथ व मुख्यतः वृत्तात्मक देवीस्तोत्र, त्याचें आत्मचरित्रपर गुरुसांप्रदायवर्णन, व त्याचें रामकर्णामृत वगैरे काव्यें अशीं आहेत कीं त्या धर्तीवर दुसऱ्या कोणत्याही मराठी कवीनें काव्यें केलेलीं नाहींत. या अनेक गोष्टींवरून निरंजनमाधवाच्या कवितेचें महत्व व अलौकिकत्व वाचकांस सहज कळून येणार आहे.

---

# मध्वमुनीश्वर.

मध्वमुनीश्वर चित्तीं आणुनि जाणुनि हरीच तो भावें ॥
नमिला; नारदयशसें ज्याचें यश सज्जनांत शोभावें ॥ १ ॥

सन्मणिमाला, मोरोपंत.

हे प्रसिद्ध सत्पुरुष व कवि कोणत्या कालीं होऊन गेले या संबंधानें विश्वसनीय माहिती उपलब्ध नाहीं. तथापि यांचा जन्मकाल शके १६०० चे सुमारास असावा असें अनुमान आहे. हे जातीचे देशस्थ ब्राह्मण असून श्रीक्षेत्र नासिक येथें रहात असत. हे पक्के वैष्णव असून काशी येथील अद्वैतानंद नामक एका प्रसिद्ध संन्याशांकडून यांनीं उपदेश घेतला होता. कांहीं दिवसांनीं ते औरंगाबाद येथें येऊन राहिले. तेथें असतां प्रख्यात महाराष्ट्रकवि अमृतराय यांनीं त्यांची एकदां थट्टा केली, तेव्हां मध्वमुनीश्वरांस अमृतरायांचा कळवळा येऊन त्यांनीं त्यांस बोध केला व आपल्या गुरूंकडून उपदेश देवविला. तेव्हांपासून अमृतरायांनीं कविता लिहिण्यास प्रारंभ केला. ही आख्यायिका सर्वत्र प्रसिद्ध आहे.

मध्वमुनीश्वरांसंबंधानें. निरनिराळ्या ग्रंथकारांनीं निरनिराळी माहिती दिली आहे. महिपति ह्मणतात: मध्वमुनि हे जनस्थानचे रहिवासी; यांस पांडुरंगाचा साक्षात्कार होत असे. लक्ष्मण, यादोपंत नगरकर व अमृतराय हे मध्वमुनीश्वरांचे शिष्य होत. वृद्धापकालीं मध्वमुनीश्वर हे 'सेंदुरवाडे' येथें राहात असत.' राजारामबुवा प्रासादी ह्मणतात: 'मध्वनाथ नीरानदीच्या कांठीं कळबोली येथें जन्मले. हे आश्वलायन शाखी ब्राह्मण. यांचा जन्म शिवरात्रीस झाला, ह्मणून आईबापांनीं यांचें नांव 'महादेव' असें ठेविलें. पांचवे वर्षी त्यांची मुंज झाली. पुढें त्यांनीं जांभुळ वनांत श्रीदत्ताची उपासना केली. नंतर दत्तात्रयानेंच त्यांस अनुग्रह दिला, व मध्वनाथ असें नांव ठेविलें. त्यांचा जन्म शके १६६९ शुक्ल संवत्सर माघ कृष्ण १४ या दिवशीं झाला.' नरहरि धुंडिराज माळी हे लिहितात. 'मध्वमुनि नासिकचे राहणारे. त्यांच्या बापाचें नांव नरहरी; आईचें द्वारवती. या दांपत्यास नवानवसांनीं

१ भक्तलीलामृत २ भक्तमंजरिमाला ३ भक्तकथामृत.

त्र्यंबक या नांवाचा पुत्र झाला. सातारच्या शिवाजी महाराजांजवळ हा कांहीं दिवस होता. यास आरंभीं त्र्यंबक गोसावी असें ह्मणत असत. यानें विसामोरोचा आश्रित अंबाजीपंत यास अनुग्रह देऊन त्याचें नांव अमृतराय ठेविलें. हा त्र्यंबक गोसावी, 'शेंदुरवादें' या गांवीं राहात असे, पुढें त्याची व मध्वाचार्यांची एकदां गांठ पडली, त्या वेळीं आचार्यांनीं त्याचें नांव 'मध्वमुनि' असें ठेविलें व तेव्हांपासून ह्याच नांवानें तो प्रसिद्ध आहे.

महाराष्ट्रकवि मासिकपुस्तकांत, मध्वमुनीश्वरांचा समाधिकाल, शके १६५६, विरोधी संवत्सर, मार्गशीर्ष शुद्ध १ हा दिला आहे.

वर दिलेल्या निरनिराळ्या चार हकीकतींची एकवाक्यता करणें फार कठिण आहे. यापैकीं महिपती व नरहरि माळू यांच्या ग्रंथांतील चरित्रें परस्परांशीं बरींच जुळतात. त्यांनीं दिलेला मध्वमुनीश्वरांचा कालही एकच आहे. राजारामबुवांनीं दिलेल्या चरित्रांत 'मध्वनाथ' या नांवाचा उल्लेख आहे व शके १६६९ हा त्यांचा जन्मशक दिला आहे. महाराष्ट्रकविकर्त्यांनीं, शके १६५६ हा मध्वमुनीचा निधनशक दिला आहे. यावरून मध्वनाथ आणि मध्वमुनीश्वर हे निरनिराळे दोन सत्पुरुष निरनिराळ्या काळीं होऊन गेले असावेत, असें ह्मणावें लागेल व आज मध्वमुनीश्वरांची ह्मणून जी कविता प्रसिद्ध आहे ती या दोन कवींची कविता आहे, असें ह्मणणें भाग पडेल. नरहरि माळू हे ह्मणतात कीं अमृतराय हा मध्वमुनीश्वरांचा शिष्य होता, परंतु अमृतरायांनीं आपल्या गुरूचें नांव 'अंबिकासरस्वती' असें दिलें आहे. यावरून अमृतराय या नांवाचे दोन कवि झाले असावेत, असा जो संशय अमृतरायावरील निबंधांत मी प्रकट केला आहे, त्यास अधिक बळकटी येते. मध्वमुनीश्वराचा 'त्र्यंबक' या नांवाचा एक शिष्य होता, त्यानें 'प्रल्हादचरित्र नामक एक ४७ श्लोकांचें काव्य लिहिलें आहे; त्याच्या शेवटीं त्यानें 'मध्व-मुनीश्वरांचा स्पष्ट उल्लेख केला आहे. हा त्र्यंबक मूळचा पैठणचा राहणारा होता, परंतु मध्वमुनीश्वरांचा उपदेश घेतल्यापासून तो नासिक येथे राहूं लागला. त्याचें वरील लहान काव्य फार सरस आहे. असो.

वर दिलेल्या माहितींपैकीं, महिपतींच्या ग्रंथांतली माहिती अधिक विश्वसनीय मानून प्रस्तुत लेख लिहिला आहे.

मध्वमुनीश्वर कीर्तन करीत व त्यांना पांडुरंगाचा साक्षात्कार असल्यामुळें, पाहिजे त्यावेळीं अभंग, पदें वगैरे कविता रचीत असत. असें सांगतात कीं मुनीश्वर, कांहीं कामाकरितां, एकदां सहकुटुंब, नासिकाहून औरंगाबादेस गेले असतां, त्यांच्या कीर्तनास भुलून, तेथील लोकांनीं त्यांस तेथेंच राहण्याचा आग्रह केला. असें त्यांचें कीर्तन प्रेमळ व रसभरित होत असे. औरंगाबादेस, स्वामीच्या शेजारींच, लक्ष्मणपंत ह्मणून एक गृहस्थ त्यांचा अनुयायी व कीर्तनसमयीं धृपद धरणारा होता. त्यास कांहीं कारणानें सरकारांतून कैदेची शिक्षा झाली. आपल्या शिष्यास विनाकारण शिक्षा झाली हें पाहून मध्वमुनीश्वरांस फार वाईट वाटलें, व त्यास बंधमुक्त करावें ह्मणून त्यांनीं श्रीविठ्ठलाची आराधना केली. मध्वमुनीश्वरांची भक्ति पाहून देव प्रसन्न झाला आणि त्यानें असा कांहीं चमत्कार केला कीं, लक्ष्मणपंत कैदी होण्यास, हाजी अहंमद या नांवाचा एक कोतवाल कारण होता त्यासच मोठ्या संकटांत पाडिलें. हा सर्व प्रकार कोतवालानें ध्यानांत आणून लक्ष्मणपंतास बंधमुक्त केलें व आपणही विरक्त होऊन मध्वमुनीश्वरांचा शिष्य झाला.

कान्होजी आंग्रे हा पेशव्यांच्या आरमारावरील मुख्य अधिकारी व मोठा शूर सरदार, मुंबई येथें रहात असे. तो फार धर्मशील व उदार असून पंडितांचा मोठा पुरस्कर्ता असे. त्याचे पदरीं शेंकडो पंडित होते. त्यांत भास्करराव पंडित मुख्य होता. या पंडितांला, त्यांतही विशेषेंकरून भास्कररावाला प्राकृत भाषेंत केलेले ग्रंथ आवडत नसत व प्राकृत ग्रंथकारांचा व हरिदास लोकांचा तो फार द्वेष करीत असे. तो स्वतः मोठा व्युत्पन्न असल्यामुळें, केवळ अभंग पदें व आर्या इत्यादि प्राकृत कवितांवर कीर्तनें करून उदरनिर्वाह करणारे हरिदास लोक त्याजकडून वादांत पराजय पावत असत.

एके दिवशीं मध्वमुनीश्वर कान्होजीच्या घरीं आले असतां, त्यांचा त्यानें फार चांगला आदरसत्कार केला. रात्रौ नाथांच्या प्राकृत कीर्तनाचा घोष चालला असतां, वरील भास्करराव पंडितास मोठा क्रोध आला. नंतर मुनीश्वरांचा व त्याचा, त्या विषयासंबंधानें कडाक्याचा वाद होऊन पंडितांचा गर्वपरिहार झाला व मुनीश्वर विजयी झाले. या गोष्टीचा कान्होजीसही फार आनंद झाला. ही गोष्ट घडल्यावर मध्वमुनि स्वदेशीं परत आले.

मध्वमुनीश्वर प्रतिवर्षी पंढरीची वारी नियमानें करीत असत. त्यांस वृद्धावस्था प्राप्त झाली तेव्हां मात्र त्यांस वेळेवर वारी करण्यास अडचण येऊं लागली. ते पंढरीच्या विठोबाचे प्रेमळ भक्त असल्यामुळें, त्याच्या दर्शनाशिवाय त्यांस चैन पडेना व पंढरीस जावें तर अंगांत शक्ति नाहीं. यामुळें ते फार चिंताक्रांत असतां त्यांस विठोबाचा दृष्टांत झाला कीं, “ उद्धवभट याच्या अंगणांत दीड पुरुष जमिनीखालीं माझी मूर्ति आहे ती काढून स्थापावी व तिची पूजाअर्चा करून शेष आयुष्यक्रमण करावें. ” दृष्टांताप्रमाणें मुनीश्वरांनीं दुसऱ्या दिवशीं उद्धवभटाच्या अंगणांत गड्यांकडून दीड पुरुष जमीन खणविल्यावर श्रीविठ्ठलाची सुंदर मूर्ति त्यांस प्राप्त झाली. तिची स्थापना करून, समाधीपर्यंतचा काल त्यांनीं तिच्या सेवेंत घालविला. मध्वमुनि कोठें व केव्हां परलोकवासी झाले, यासंबंधानें विश्वसनीय माहिती मिळत नाहीं.

या कवीचा स्वतंत्र व मोठा असा एकही ग्रंथ उपलब्ध नाहीं, “ धनेश्वराचें चरित्र ” या नांवाचें लहानसें अभंगबद्ध प्रकरण त्यांनीं केलें आहे. त्याचा कथाभाग असा आहे कीं, “ चाकणचा राजा, तेथील शिवलिंगावर, भूमीगत द्रव्याच्या आशेनें, एका ब्राह्मणाच्या मुलास, त्याच्या आईबापांच्या अनुमतानें ठार मारीत असतां, प्रत्यक्ष शंकरांनीं प्रगट होऊन त्या मुलाचें रक्षण केलें. ” याशिवाय सगुणें चरित्र, गणेशाष्टक, कांहीं अभंग व पदें एवढी मुनीश्वरांची कविता उपलब्ध असून ती सर्व छापून प्रसिद्ध झाली आहे. त्यांतील थोडेसे उतारे येथें देऊन हें लहानसें चरित्र पुरें करितों.

खालील गुर्गुडीवरील रूपक अवश्य वाचंण्यासारखें आहे. धूम्रपानाच्या भोक्त्यांस तर ही केवळ कपिलाषष्ठी आहे !

पद.

ध्या तुह्मि गुर्गुडी । गुर्गुडी ॥ प्रपंच धुर हा सोडो ॥ धृ० ॥
नारळ औट हाताचे ॥ आंत जीवन सत्रावीचें ॥ १ ॥
धैर्य तोच मेरू ह्मणती ॥ शांति चिलीम शोभे वरती ॥ २ ॥
काम क्रोध तंबाकू ॥ त्याचा जाळून केली राखू ॥ ३ ॥
ज्ञान घालुन खडा ॥ गुर्गुडी बोलतसे भडभडां ॥ ४ ॥
अनुभव लावुन नळी ॥ गुर्गुडि बोले वाणी मंजुळी ॥ ५ ॥
ह्या गुर्गुडिच्या छंदें ॥ मध्वनाथ जाहला धुंद ॥ ६ ॥

वरील पद मध्वनाथांचें आहे, हें लक्ष्यांत ठेविलें पाहिजे.

खालील पदांत कृष्णाच्या वेणुक्रीडेचें फार सरस वर्णन केलें आहे.

पद.

मनमोहन वाजवि वेणु ॥ ध्रु० ॥
कुंजवनीं ध्वनि ऐकुनि कानीं ॥ मोहित झाल्या धेनु ॥ १ ॥
मोहविल्या व्रजसुंदरि सर्वहि । पार तयाचा नेणूं ॥ २ ॥
मध्वमुनीश्वर कल्पद्रुमातळीं । वंदि पदांबुजरेणु ॥ ३ ॥

आणि खालील सुप्रसिद्ध पदांत तर करुण रस मूर्तिमंत अवतरला आहे कीं काय असें वाटतें:—

पद.

उद्धवा! शांतवन कर जा त्या गोकुळवासि जनांचें ॥ ध्रु० ॥
बा नंद, यशोदामाता मजसाठीं त्यजितिल प्राण ॥
त्यागुनी प्रपंचा फिरती मनिं उदास रानोरान ॥
अन्नपाणि त्याजिलें रडती अतिदुःखित झालीं दीन ॥
॥ चाल ॥ जन्मलों तैंहुनी झटले ॥
कटिंखांदीं वाहतां घटले ॥
मजलागीं तिळतिळ तुटले ।
आटलें रक्त देहाचें ॥ उद्धवा! ॥ १ ॥

आइबाप त्यजुनी बाळें मजसंगें खेळत होतीं ॥
गोडशा शिदोऱ्या आणुनी आवडिनें मजला देती ॥
रात्रंदिस फिरले मागें दधि गोरस चोरूं येती ॥
॥ चाल ॥ मी तोडुनि आलों तुटका ॥
तो जिवा लागला चटका ॥
मजविण त्यां युगसम घटका ॥
आठवतें प्रेम जयांचें ! ॥ उद्धवा ! ० ॥ २ ॥

पतिसुतादि गृहधन त्याजिलें मजवरती धरुनी ममता ॥
मानिलें तुच्छ आतवर्गा मजसंगें निश्चळ रमतां ॥
मद्भक्तचित्त त्या गोपी नेत्रांतरिं लेउनि समता

॥ चाल ॥ तिळतुल्यहि नाहिं मनिं दुगल्या ॥
दृढनिश्चय धरुनी तगल्या ॥
बहुधा त्या नसतील जगल्या ।
भंगले मनोरथ ज्यांचे ॥ उद्धवा ! ० ॥ ३ ॥

हरि आहे सुखरुप ह्मणुनी भेटतांचि त्यां सांगावें ॥
सांग कीं " समस्तां पुसिलें " प्रत्युत्तर त्यां मागावें ॥
करुनियां ज्ञान तयांतें सांग कीं शोक त्यजावे ॥
॥ चाल ॥ हें कार्य नव्हे तुजजोगें ॥
मजसाठीं जावें वेगें ॥
हें मध्वमुनीश्वर सांगे ॥
त्यां नपवे ज्ञान जयाचें ॥ उद्धवा ! ० ॥ ४ ॥

( एका जुन्या बाडांत खालील पद आढळलें )

## ज्ञानेशस्तवन

### पद.

शुकसनकादिक महिमा ज्याचा वर्णिति वेदपुराणीं रे ।
गोकुळिं गोवळ होउनि गाई चारी चक्रपाणी रे ॥
जो हा पांडवघरिं हरि सारथि पाजी तुरगा पाणी रे ।
तो हा सद्गुरु ज्ञानेश्वर हरिस्मरणें तारी प्राणी रे ॥ १ ॥

भगवद्गीतेवरती सुंदर ज्यानें केली टीका रे
सादर परिसति होती त्यांची संसारांतुनि सुटका रे ॥
प्राकृतभाषा रुचिकर रचिली करुनि सुधारस फिका रे ।
भक्तिज्ञानविरक्तीचाही पोषीतो रस नीका रे ॥ २ ॥
दगडाची हो भिंत जयानें चालविली जड माती रे ।
पैठणिं दिधली वेदपरीक्षा वेड्या रेड्याहातीं रे ॥
सुवर्णाचा पिंपळ ज्याच्या द्वारीं वैष्णव पाहाती रे ।
अजान वृक्षाखालें शांभव आसन घालुनि राहती रे ॥ ३ ॥

मुक्तपुरीहुनि श्रेष्ठ पुरातन पाहतां क्षेत्र आळंदी रे ।
इंद्रायणिचें जळ जो सेवी इंद्रपदासिहि निंदी रे ॥
ज्याचे सन्निध सिद्धेश्वर तो सन्मुख शोभे नंदी रे ।
कार्तिकमासीं पंढरपुरपति समाधि ज्याची वंदी रे ॥ ४ ॥
ज्ञानेश्वर या नामाचा जो जप करि अनुदिन वाचे रे ।
त्याचे हृदयीं परमेश्वर तो लक्ष्मी घेऊनि नाचे रे ॥
ज्याची टीका श्रवणीं पडतां भवभयपर्वत कांचे रे ।
अगणित गुणगण मध्वमुनीश्वर वर्णीतो हे वाचे रे ॥ ६ ॥

## चिमणा श्रीकृष्ण.

### पद.

खेळे चिमणा घेउनि चेंडू चिमणासा दांडू । ध्रु० ॥
चिमणी घोंगडी चिमणी काठी चिमणा जगजेठी ।
चिमणा वासरां लागे पाठीं यमुनेच्या तटीं ॥ १ ॥
चिमणी मुरली वाजवि ध्वनी चिमण्या गवळणी ।
चिमण्या गाडग्या घेउनि लोणी हिंडती रानीं ॥ २ ॥
चिमणा मुगूट चिमणा टिळा चिमणीशी माळा ।
चिमणा कौस्तुभ शोभे गळां मुलांचा मेळा ॥ ३ ॥
चिमणा पितांबर चिमण्या भुजा यादवराजा ।
चिमण्या मुलांच्या बह्लवर्धुजा पाही कान्हया राजा ॥ ४ ॥
चिमणा भंवरा चिमणी जाळी चिमणीशी गोळी ।
चिमण्या भक्तांची आज्ञा पाळी चिमणा वनमाळी ॥ ५ ॥
चिमणा चिमणीं घरें फोडी दुधाचीं गाडीं ।
मध्वनाथ हात जोडी गड्यांचा गडी ॥ ६ ॥

हें सरस पदही मध्वनाथांचेंच आहे. मध्वमुनीश्वर आणि मध्वनाथ यांची कविता अगदीं एकसारखी दिसते. कदाचित् हीं दोन्ही नांवें एकाच कवींचीं असतील.

पुढील पदावरून मध्वमुनीश्वरांची ईशनिष्ठा उत्तमप्रकारें व्यक्त होतेः—

पद.

तूं माझा यजमान । रामा ! ॥ धृ० ॥
जननीजठरीं रक्षियलें मज । पोसुनि पंचप्राण ॥ १ ॥
बाहेर निघतां मातेचे स्तनीं । पय केलें निर्माण ॥ २ ॥
ऐसें असतां या पोटाची । कां करूं चिंता जाण ॥ ३ ॥
मध्वमुनीश्वर स्वामि रमापति । धरिं माझा अभिमान ॥ ४ ॥

एकंदरींत, ' मध्वमुनीश्वरांची वाणी फार मधुर ' अशी जी प्रसिद्धि आहे, ती अगदीं योग्य आहे यांत संशय नाहीं. दुर्दैवाची गोष्ट एवढीच कीं मुनीश्वरांची उपलब्ध असलेली कविता अगदींच थोडी आहे. यांची जी कविता हल्लीं प्रसिद्ध आहे, तिच्या पुष्कळपट कविता अद्याप अनुपलब्ध असावी, असें वाटतें. औरंगाबाद व पैठणकडे मुनीश्वरांचे वंशज अद्याप आहेत, असें महाराष्ट्रकविकर्ते लिहितात; यावरून मागेंपुढें या कवीची बरीच माहिती व कविता उपलब्ध होईल, अशी आशा करण्यास हरकत नाहीं.

# अमृतराय.

कीर्तनसुखार्थ झाला अवताराचि अमृतराय जीवाचा ।
भलत्या मुखांतुनि अशी सुरसखानि निघेल काय जी वाचा ?॥ १ ॥

सन्मणिमाला, मोरोपंत.

वरील आर्येचा भावार्थ असा आहे:—‘ हरिकीर्तनानें प्राप्त होणारा आनंद मिळविण्यासाठीं, बृहस्पति हे अमृतरायांच्या रूपानें ह्या मृत्युलोकांत अवतरले, कारण, इतकी सुरस आणि उत्कृष्ट कविता सुरगुरूशिवाय दुसऱ्या कोणाच्या मुखांतून बाहेर पडेल ? ’ ह्या अभिप्रायावरून, अमृतरायांच्या कवितेविषयीं व खुद्द अमृतरायांविषयीं पंतांची केवढी पूज्यबुद्धि होती, हे लक्षांत येतें. महाराष्ट्रांतील अत्यंत लोकप्रिय* कवींपैकीं अमृतराय हे एक होत.

अमृतराय हे औरंगाबाद येथें राहात असत. त्यांचा जन्म शालिवाहन शके १६२० मध्यें बहुधान्य संवत्सरीं झाले; असें कै. वामन दाजी ओक यांनीं काव्यसंग्रहांत लिहिलें आहे; परंतु ह्यास आधार काय आहे हें समजत नाहीं. अमृतरायांसंबंधानें, महाराष्ट्रांत बऱ्याच दंतकथा व आख्यायिका प्रचलित आहेत, परंतु त्यांच्या चरित्रक्रमासंबंधाची केवळ विश्वसनीय अशी माहिती मुळींच मिळत नाहीं असें म्हटल्यास चालेल. अशा स्थितींत कै. ओकांनीं ज्याअर्थीं अमृतरायांचा जन्मशक दिला आहे, त्याअर्थीं, त्यांस या बाबतींत कांहीं तरी पुरावा किंवा आधार मिळाला असला पाहिजे, असें दिसतें; परंतु उलट पक्षीं अशी शंका येते कीं, अमृतरायांचा जन्मशक तेवढा ओकांस मिळाला, पण त्यांच्या चरित्रासंबंधानें त्यांस कांहींच माहिती मिळाली नाहीं हें कसें ? असो.

---

* अमृतरायांसंबंधानें मोल्स्वर्थ साहेबांच्या कोशान्ते प्रस्तावनेंत म्हटलें आहे:— ‘Amritraw who wrote in the lengthy Pada was the contemporary of Moropant. His writings are of a metaphysical cast and are not much admired’ ( ! ) मराठी भाषेचा कोश लिहिणाऱ्या आंग्ल गृहस्थाचा आमच्या लोकप्रिय कवीसंबंधानें हा अभिप्राय ! ह्यावरून, वस्तुस्थितीची त्यांनीं कितीशी माहिती मिळविली असावी, याचा तर्क वाचकांनींच करावा.

औरंगाबादेस, विसामोरो ह्मणून कोणी मुत्सद्दी होते, त्यांच्या पदरीं अमृतराय हे नोकर होते, अशी आख्यायिका आहे. रा. मोरो गणेश लोंढे, यांनीं विविधज्ञान-विस्तारांत अमृतरायांवर एक लहानसा लेख लिहिला आहे, त्यांत त्यांनी वरील आख्यायिका खोटी आहे असें ह्मटलें आहे, पण त्यास आधार काय आहे, हें त्यांनीं नमूद केलें नसल्यामुळें, त्यांचें ह्मणणें खोटें आहे, असें ह्मटलें पाहिजे. कारण कीं, वरील आख्यायिका आज दीडशें वर्षें सारखी प्रचलित आहे, आणि दुसरें असें कीं, अमृतरायांच्या कवितेंत जीं कित्येक झोंकदार आणि श्रीमंतीचीं वर्णनें आलीं आहेत, तीं सर्व मोगलाईंतील तत्कालीन इष्कबाजी आणि चैन यांच्या प्रत्यक्ष निरीक्षणाचीं निदर्शक आहेत. शिवाय धुंडिराज मालुकृत 'भक्तकथामृत' ग्रंथांत अमृतराय हे विसामोरो याचे आश्रित होते असें स्पष्ट लिहिलें आहे.

अमृतरायांनीं आपल्या कवितेंत स्वतः संबंधानें जी थोडीशी माहिती दिली आहे ती येणेंप्रमाणें:—

श्लोक.

'माता उमा परमशंकर तात झाला । अंबाजिता अमृत पावन नाम ज्याला ॥
येणें यथामति कथा रचिली ध्रुवाची । घे भक्तिमुक्ति निज जो नर नित्य वाची॥ १॥
ध्रुवचरित्र.

ह्यावरून रायजींच्या तीर्थरूपांचें नांव 'शंकर' व आईचें नांव उमा होतें, असें वाटतें. वरील श्लोकांतील 'अंबाजिता' या शब्दाचा अर्थ बरोबर लागत नाहीं; 'अंबिकासरस्वती'[1] नामक अमृतरायांचे गुरु होते, त्यांचा हा नामोल्लेख असेल तर कोण जाणे. अमृतराय हे देशस्थ आश्वलायन ब्राह्मण, असें, कै. ओक ह्मणतात.

प्रसिद्ध साधु मध्वमुनीश्वर हे रायजींचे समकालीन होत. असें सांगतात कीं, रायजींचा स्वभाव अंमळ थट्टेखोर असल्यामुळें, त्यांनीं मध्वमुनीश्वरांची एकदां थट्टा केली. परंतु त्यामुळें, मुळींच न रागावतां, मुनीश्वरांनीं रायजींस इतकेंच ह्मटलें कीं 'तुह्माला परमेश्वरानें अमृतासारखी वाणी दिलेली आहे; शिवाय तुमच्या आईबापांनीं तुमचें नांवही 'अमृतराय' असें ठेविलें आहे. असें असतां त्या वाणीचा असा दुरुपयोग करण्यापेक्षां तिला तुह्मी जर ईश्वरस्तुतीकडे लावाल, तर केवढा फायदा होईल बरें ?' ह्या भाषणाचा रायजींच्या निसर्गकोमल मनावर अत्यंत सुपरिणाम झाला व त्या

१ ह्यांचें चरित्र ह्याच ग्रंथांत दुसरीकडे दिलें आहे, तें पहावें.

दिवसापासून, आपल्या वाणीचा व आयुष्याचा उपयोग ईशसेवेकडे करण्याचा त्यांनीं निश्चय केला. ह्या कालपावेतों रायजी नोकर होते. परंतु ह्यापुढें नोकरी सोडून ते कीर्तन करूं लागले असावे असें वाटतें. तसेंच, कित्येक शिष्यांस गुरूपदेश करण्यासही त्यांनीं प्रारंभ केला. अमृतरायांच्या गुरुसंबंधानें अशी दंतकथा सांगतात कीं, मध्वमुनीश्वरांनीं आपले गुरु अद्वैतानंद यांजकडून त्यांस अनुग्रह देवविला होता, परन्तु खुद्द अमृतरायांनीं, आपल्या 'अविनाशसंदेहहरण' नामक ग्रंथांत, ज्याअर्थी आपल्या गुरूचें नाव 'अंबिकासरस्वती*' असें दिलें आहे व त्यांच्या कित्येक पदांतही याच नांवाचा उल्लेख आढळतो, त्याअर्थी वरील दंतकथा खरी नसली पाहिजे, हें उघड आहे. कदाचित् इतकें खरें असेल कीं, मुनीश्वरांच्या भाषणानें पश्चात्ताप पावून रायजी परमार्थाकडे वळले व पुढें त्यांनीं 'अंबिकासरस्वतींचा अनुग्रह घेतला. हे अंबिकासरस्वती श्रीशंकराचार्यांच्या शिष्यपरंपरेपैकीं एक साधु होत. तर उल्लेखित केलेला 'अविनाशसंदेहहरण' हा ग्रंथ कटावकार अमृतरायांचा नसून दुसऱ्या एखाद्या अमृतरायाचा असेल, तर मात्र या गोष्टीचा सहज उलगडा होईल. अविनाशसंदेहहरण ग्रंथाची भाषा कटावांच्या भाषेहून बरीच भिन्न व फार साधी दिसते, यावरून हा ग्रंथ औरंगाबादकर कटावकर्त्या अमृत-

२ रा. लोंढे म्हणतात कीं, अमृतराय हे कधींही नोकर नव्हते व हें त्यांनीं अगदीं निक्षून लिहिलें आहे. पण आधाराशिवाय असलें विधान करून कै. ओकांसारख्या विद्वान् शोधकाचा लेख खोटा ठरविण्याचा प्रयत्न करणें हें साहस होय व ह्याबद्दल विस्तारकारांपाशीं दुसऱ्या एका लेखकानें पत्रद्वारें तक्रारही केली होती. मुनीश्वरांच्या भेटीनंतर, रायजींची प्रवृत्ति परमार्थाकडे झाली व नंतर गुरूपदेश ग्रहण करून ते कीर्तन करूं लागले. तत्पूर्वी ते नोकर होते, अशी जी आख्यायिका आहे, तीच खरी दिसते.

* अमृतरायकृत अविनाशसंदेहहरण ‌या प्रकरणांतील गुरुपरंपरा येणेंप्रमाणें:—

शृंगेरी मठ साचार । तेथें अधिष्ठान सरस्वती ॥ ७९ ॥
तोचि सांप्रदाय माधवसरस्वती । वास गोदातीर नाभीतीर्थी ॥
असतां अनुग्रहप्राप्ति । विठ्ठलसरस्वतीसी ॥ ८० ॥
मग तयाचा उपदेश । प्राप्त अंबिकासरस्वतीस ॥
तयाच्या अभयकर अमृतास । असे सत्य ॥ ८१ ॥ ”

रायांचा नसावा, असा संशय येतो. असो. अमृतरायांची कीर्तनशैली फार चित्तवेधक व परिणामकर असली पाहिजे, असें त्यांच्या कवितेवरून दिसतें. श्रीमंत नानासाहेब पेशवे यांनीं रायजींचें कीर्तन करविलें होतें व तें ऐकून ते फार खूष झाले, ही आख्यायिका तर प्रसिद्धच आहे. अमृतराय, महीपती मोरोपंत, रामजोशी, सोहिरोबा व अनंतफंदी हे समकालीन होते; त्या सर्वांत रायजी ज्येष्ठ व फंदी कनिष्ठ होत.

रायजींची पत्नी कर्कशा असावी व तिच्या त्रासामुळें, त्यांच्या परमार्थवृत्तींत कडकडीत वैराग्याची भर पडली असावी, असें त्यांच्या पुढील श्लोकांवरून वाटतें:—

'मागे ती लुगडीं सकोंप[१] बुगडी आटां दिसां बांगडी ।
घाली ते फुगडी कधीं न रगडी फाडीतसे आंगडी ॥
खैराची सगडी तशी धडधडी तोंडाळ मोठी खुडी ।
सोन्याच्या लगडीस देखुनि रुसे, ऐशी महा धांगडी ॥ १ ॥

दारा देत कडी सदा बडबडी बोले महा वांकडी ।
दाणे चोरुन फांकडी न कळतां घेते मुळे कांकडी ॥
खाते ती जशि माकडी वसवसी दांतीं दिसे खेकडी ।
यालागीं अमृतेश्वरासि रुचली गंगातिरीं झोंपडी ॥ २ ॥

हें वर्णन अमृतरायांनीं आपल्या स्त्रीचें केलें असावें असें दिसतें. परंतु, शेवटच्या श्लोकपादांत सांगितल्याप्रमाणें, रायजी गंगातीरीं झोंपडी बांधून राहिले होते कीं काय यासंबंधानें संशय* वाटतो. कदाचित् हें सामान्य कर्कशा स्त्रीचेंही वर्णन असेल.

अमृतराय स्वभावानें रंगेल होते व हा त्यांचा रंगेलपणा त्यांच्या कवितेंत ठिकठिकाणीं दिसून येतो; तथापि एकंदरींत वैराग्य व परमार्थ यांकडेच त्यांचा कल विशेष होता. 'अशाश्वतसंग्रह कोण करी,' 'हे हरि संतपदाची जोड', 'वैराग्यभाग्यासारिखें भाग्य नाहीं,' इत्यादि पद्यांवरून त्यांची कडकडीत वैराग्यवृत्ति स्पष्ट

---

१ रा. लोंढे यांनीं 'सकाय' असा पाठ दिला आहे, परंतु त्याचा अर्थ सरस लागत नाहीं.

* ह्यासंबंधानें रायजींच्या हिंदुस्थानी पदांत एके ठिकाणीं पुढील चरण आढळला:—'झुलता श्रीगंगाके तटमो अमृतराय.' ह्यावरून रायजी कांहीं दिवस तरी गंगा ( गोदावरीसही गंगा ह्मणतात ) तीरीं राहिले होते, असें वाटतें.

दिसून येते. ' वैराग्यभाग्यासारिखें भाग्य नाहीं; ' हें त्यांचें पद फार प्रसिद्ध झालें. तें एका वैराग्याचे कानीं आलें. तेव्हां स्वतः अमृतरायांचें वैराग्य कितीं आहे, तें प्रत्यक्ष पाहावें, ह्मणून तो औरंगाबादेस आला. तेथें अमृतराय मोठा झोंकदार पोषाक करून झोंपाळ्यावर बसले आहेत व खुशाल झोंपा घेत आहेत, असा प्रकार त्याच्या दृष्टीस पडतांच, त्यास मोठें आश्चर्य वाटलें व ' वैराग्यभाग्यासारिखें भाग्य नाहीं ' हें पद तुमचेंच ना ? ' ह्मणून त्यानें रायजींस विचारिलें. रायजी ' होय ' ह्मणाले; तें ऐकतांच बैराग्यास मोठा राग आला. तो ह्मणाला, ' बोलणें सोपें पण करणें फार कठीण आहे. आपण भाग्याचा उपभोग खुशाल घ्यावा आणि ' परोपदेशे पांडित्य ' याप्रमाणें दुसऱ्यांस वैराग्याचा उपदेश करावा, यांत अर्थ काय ' ? रायजी ह्मणाले ' बुवाजी ! हें सगळें देहप्रारब्ध आहे. ' वैरागी ह्मणाला ' ठीक आहे, आपलें देहप्रारब्ध आपल्याबरोबर आहेच; आपण मजबरोबर वनवासास चलावें ' अमृतराय ह्मणाले, चलावें, मी यावयास तयार आहें. पुढें ते दोघेही, एका अरण्यांत आले; तेथें अमृतरायांस बसवून गोसावी गांवांत भिक्षा मागण्यास निघून गेला. इकडे रायजींचा एक शिष्य मोठा सरकारी कामदार होता, तो त्या मार्गानें येत होता. त्यानें रायजींस पाहतांच, तेथेंच मुक्काम केला; त्याच्या चाकरांनीं रायजींस मऊ परांच्या गादीवर निजविलें व ते त्यांचे पाय चेपूं लागले. इतक्यांत बैरागीबुवा भिक्षेहून आले. पाहतात तों अमृतरायांचा निराळाच थाट ! तो पाहतांच रायजींचें भाषण त्यांस खरें वाटलें, व त्यांची रजा घेऊन ते निघून गेले. ' ह्या आख्यायिकेस रायजींच्या पुढील उक्ति पुष्टि देतात.—

' श्रीगुरुमध्वनाथपर अमृतराय बलहारी '
( अमृतरायकृत कवितासंग्रह, पृष्ट १३५ पद १०९ पहा )
' जो निश्चय धरुनि बैसतो । त्याला घरिं बसल्या राम देतो ॥ '
' अमृत ह्मणे मज भिक्षा डोहळे । उठति अशा लहरी ॥ '

अमृतरायांचे शिष्य पुष्कळ होते; त्यांपैकीं ' माधव ' व ' ब्रह्मगिरी ' हे कवि असून, त्यांनीं आपल्या कवितेंत रायजींचा उल्लेख केला आहे. ' वंदी माधव

१ कित्येकांचें असें मत आहे कीं, हा बैरागी मध्वमुनीश्वरच होय. अमृतरायांनीं मध्वमुनीश्वरांचें नांव आपल्या एका पदांत गुरुस्थानीं आणिलें आहे:—

अमृतचरणीं ' असा माधवाच्या एका पदाचा शेवटचा चरण आहे व ' दामाजी-पंताची रसद ' या प्रेमळ काव्यांत ब्रह्मगिरीनें रायजींचा उल्लेख केला आहे, तो चरण असा आहे:—

धन्य श्रीगुरु अमृतराय । वंदावे पाय ।
ब्रह्मगिरि हरिच्चरणीं तत्पर । जैसें पाडस त्या हरिणीचें ॥ '

ह्यांशिवाय, कोल्हापुरचे प्रसिद्ध साधु सिद्धेश्वर महाराज हेही अमृतरायांचे शिष्य होते, असें, रा. पांगारकर यांच्या केसरींतील एका पत्रव्यवहारावरून समजतें. त्या पत्रव्यवहारांत सिद्धेश्वरमहाराजांची गुरुपरंपरा अशी दिली आहे:—

आर्या.

श्रीपति विधिसनकादिक नारद तो व्यास योगि शुकतारू।
पूर्णानंद ज्ञानानंद अमृतराय सिद्ध राजगुरु ॥ १ ॥

अमृतराय व सिद्धेश्वर महाराज हे समकालीन होते ही गोष्ट खरी आहे. परंतु वरील आर्येंत ' अंबिकासरस्वती ' चें नांव नसल्यामुळें सिद्धेश्वर महाराजांचे गुरु हेच अमृतराय होते कीं काय, हें निश्चयपूर्वक सांगतां येत नाहीं. ' व्यंकटेशविजयकर्त्या कुडचीवीर कवींचें चरित्र याच ग्रंथांत दुसरीकडे दिलें आहे, त्याच्या गुरुपरंपरेंत अमृतराय हें नांव आढळतें, यावरून अमृतराय या नांवाचे दोन सत्पुरुष जवळ जवळ एकाच कालीं होऊन गेले असावे, असें वाटतें; पैकीं प्रस्तुत चरित्रनायक हे कवि होते तसे दुसरे अमृतराय कवि नसावे, किंवा, काव्यसंग्रहांत प्रसिद्ध झालेली अमृत-रायांची कविता ही या दोन्ही अमृतरायांची असावी, असें ह्मणावें लागतें. सिद्धेश्वर महाराजांचे गुरु हे दुसरे अमृतराय असावे, असें ह्मणणें अधिक प्रशस्त होईल. कै. ओक किंवा रा. लोंढे यांपैकीं कोणीही, या बाबतींत विचार केलेला दिसत नाहीं. ' अमृत ह्मणे तुह्मि भजा निरंतर । श्रीधरगुरुचे पाय ' असा एक चरण रायजींच्या काव्यसंग्रहांत आढळतो, तेव्हां आणखी श्रीधरांचा शिष्य तिसरा कोणी अमृतराय होता कीं, काय, असाही प्रश्न उत्पन्न होतो. असो.

अमृतरायांचें देहावसान, शके १६७५ ( इ. स. १७५३ ) चैत्र ६ श्रीमुखनाम संवत्सरीं झालें, त्यावेळीं त्यांचें वय ५५ वर्षांचें होतें.

अमृतरायांचीं पुढील काव्यें, काव्यसंग्रहांत प्रसिद्ध झालीं आहेत व त्यांची उपलब्ध अशी कविता इतकीच आहे:—

| | | |
|---|---|---|
| १ गणपतिवर्णन. | १० कृष्णवर्णन. | १९ कृष्णलीला. |
| २ जगदंबावर्णन. | ११ राधावर्णन. | २० चंद्रावळी. |
| ३ ध्रुवचरित्र. | १२ कृष्णध्यान. | २१ द्रौपदीवस्त्रहरण. |
| ४ शुकचरित्र. | १३ मृत्तिकाभक्षण. | २२ दुर्वासयात्रा. |
| ५ सुदामचरित्र. | १४ " " | २३ पारिजातकाख्यान. |
| ६ नारदी. | १५ वत्सहरण. | २४ जीवदशावर्णन. |
| ७ कृष्णचरित्र. | १६ " " | २५ उपदेश. |
| ८ द्रौपदीवस्त्रहरण. | १७ रासक्रीडा. | २६ पूतनावध. |
| ९ रामचंद्रवर्णन. | १८ कुंजवनविहार. | |

ह्यांशिवाय आणखी सुमारें ३४ प्रकरणें व १५० पदें प्रसिद्ध झालीं आहेत; ह्यांतील कित्येक आख्यानें थोड्याशा फेरफारानें पुनः छापलीं आहेत. उदाहरणार्थ 'द्रौपदीवस्त्रहरण' हें काव्यसंग्रहांत तीन वेळ छापलें आहे. तसेंच 'दामाजीची रसद' हें काव्य अमृतरायांचें नसता तें त्यांच्या नांवावर छापलें आहे. वास्तविक पाहतां हें काव्य, अमृतरायांचे शिष्य 'ब्रह्मगिरि' यांनीं केलें आहे, असें असतां, कै. ओक, कविचरित्रकार व रा. लोंढे या विद्वत्त्रयानें तें अमृतरायांच्या कवितेंत काय ह्मणून घालावें हें समजत नाहीं. कदाचित् ह्या काव्याचा शेवटचा चरण त्यांच्या पहाण्यांत आला नसेल किंवा तें काव्य वाचीत असतां त्यांतील कवित्वाशीं तादात्म्य पावल्यामुळें, तेवढ्या वेळेपुरती त्यांची चिकित्साबुद्धि जागृत नसेल, असें पाहिजे तर ह्मणावें. एकंदरींत अमृतरायांची जी कविता प्रसिद्ध झाली आहे, तींत बऱ्याच चुक्या झालेल्या आहेत व ह्या कवितेशिवाय त्यांची पुष्कळ कविता अप्रसिद्ध असली पाहिजे. त्यांचा हिंदी रुक्मिणीस्वयंवर असल्याची प्रसिद्धि आहे, पण तो उपलब्ध होत नाहीं.

अमृतरायांची बहुतेक कविता वर्णनपर असल्यामुळें, हरिदास लोकांस तिचा फार उपयोग होतो. एखाद्या सुंदर स्त्रीचें वर्णन करावयाचें असलें, तर रायजींचें राधावर्णन ठेवून द्यावें ह्मणजे झालें. पक्कान्नांचे वर्णन हवें असेल तर सुदामचरित्रांतील पक्कान्नवर्णनाचा भाग पुढें केला असतां, काम होण्यासारखें आहे. याप्रमाणें सुदामचरित्र, शुकचरित्र, ध्रुवचरित्र यांतील कित्येक वर्णनें तर हवीं तेथें लागू पडण्या-

१ हें काव्य फारच सुरस आहे, यांत संशय नाहीं.

सारखीं आहेत. अमृतरायांच्या कटावांनीं कीर्तनांत कसा रंग भरतो, हें बहुधा पुष्कळांच्या अनुभवास आलें असेलच.

अमृतराय शीघ्रकवि होते, अर्थात् तसल्या कवीस फार उपयोगी असें जें कटाव वृत्त त्याचाच भरणा त्यांच्या कवितेंत फार आहे. 'अमृतरायांची वाणी अमृतलहरींसारखी सुधास्राविणी आहे. मराठी भाषेंतील उच्च प्रतीच्या कवींत त्याची गणना करण्यास कांहीं हरकत नाहीं. याची कविता प्रासप्रचुर असल्यामुळें ती नुसती ऐकणारासही गोड वाटते, मग जो अर्थाकडे दृष्टि देऊन ती वाचील, तो तन्मय झाला ह्मणून काय नवल ? प्रकृत कवीनें कर्णमधुर कविता केली आहे तरी उगीच क्लिष्टपणा येईल अशी रचना कोठेंच आढळत नाहीं. वर्णनास एकदां प्रारंभ झाला ह्मणजे त्यांत योग्य ठिकाणीं योग्य शब्दयोजना व्हावयाचीच असें पाहून, त्याच्यापुढें मराठी भाषा हात जोडून उभी असावी असें वाटतें. मराठी भाषेप्रमाणेंच हिंदी भाषा त्याला अवगत असल्यामुळें, त्याची दोन्ही भाषांतील कविता सारखी रसाळ आहे. अमृतरायांच्या काव्यांत प्रसादगुण विशेष आहे, भक्तिरस ओतप्रोत भरला आहे, त्याची सर्व कविता सर्व स्थळीं सारखी रसमयी आहे; जो रंग कटिबंधांत आहे तोच रंग पदांतही आहे. अमृतरायाचा उपदेश मनावर ठसा उठविण्यासारखा असून, फारच सौम्य शब्दांनीं गुंफिलेला आढळतो. अमृतरायाची कविता वाचणारास नुसता काव्यरसपानाचा लाभ घडतो असें नाहीं, तर त्या वेळच्या देशस्थितीचें, रीतीभातीचें, आचारविचारांचें, ऐतिहासिकदृष्ट्याही ज्ञान होण्यासारखें आहे अमृतरायांच्या काव्यांत प्रसंगविशेषीं शृंगार, वीर, हास्य, बीभत्स इत्यादि रसही अंगभूत आहेत. अमृतरायाची भाषा साधी, सरस व प्रौढ आहे, अमृतरायास हिंदी भाषा किती चांगली येत असे, हें सांगावयास त्यानें तींत मराठीसारखीं सरस कवनें केलीं आहेत, एवढें सांगणें पुरे आहे. अमृतरायाची भाषा सर्व काव्यांत सारखी नाहीं, कोठें गीर्वाण वाणीच्या संगतीनें प्रौढ बनलेली, कोठें हिंदीच्या सहवासानें झोंकदार झालेली, कोठें साध्या रूपानें प्रकट होणारी आहे, या वैचित्र्यामुळें ज्या प्रकारचा वाचक असेल त्या प्रकारचें रूप धरून ती करमणूक करणारी आहे. अमृतरायाला मराठी, संस्कृत, हिंदी, फारशी, आरबी व उर्दू ह्या भाषा येत होत्या. तो चांगला व्यवहारज्ञान व बहुश्रुत होता. संस्कृत व मराठी या भाषांचें ज्ञान त्यास चांगलेंच होतें. आतां त्याच्या कवितेंत दोष अगदीं नाहींत असें नाहीं, परंतु असले तर ते फारच कमी आहेत; व जे आहेत तेही कवितेच्या बाह्यांगाच्या व अंतरंगाच्या

सौंदर्यनिरीक्षणांत वाचक गुंग झाला, ह्मणजे त्याच्या लक्षांत येत नाहींत. याची शब्दयोजना अशी कांहीं सुरस, समर्पक, विपुलार्थसूचक, श्रवणमधुर व मनोरम आहे कीं, याची कविता वाचीत असतां वृत्ति इतकी तल्लीन होते कीं, दोषैकदृक् पुरुषाला आपल्या वृत्तीस चळवळ करूं देण्यास वावच सांपडत नाहीं !' हा कै. ओकांचा अभिप्राय आहे. अर्थात् त्याजपुढें माझ्या अभिप्रायाची मुळींच किंमत नसल्यामुळें, अमृतरायांच्या कवितेसंबंधानें आणखी कांहीं लिहिण्याचा प्रयत्न न करितां, वाचकांस त्या कवितेंतील कांहीं उत्कृष्ट स्थळीं नेऊन सोडितों, तेथें ते यथेच्छ काव्यरसपान करोत.

श्रीशुकाचार्य आपल्या मातेच्या उदरीं असतां, श्रीकृष्णानें त्यांस 'तूं कोण' असा प्रश्न केला, त्या वेळीं शुकाचार्यांनीं सांगितलें:—

कटाव.

'पुससी, कोण तो मी ऐसा ? अनादि जीव तो नामें कैसा ?
पापपुण्यमिश्रीत सरीसा, अंगुष्ठासम, लहान उलीसा, तो मी सूक्ष्मस्थूळीं
भरलों, लक्ष चौऱ्याशीं भरूनि पेणें, दुरोनि झालें येथें येणें, दष्टी
दीधली पापभयानें, माझीं ऐका अपूर्व कथनें, स्वधर्म सांडुनि अधर्म
वाटे, कुकर्म जीवा गोड वाटे, अनर्थ तेथें कर्म चपेटे, मर्म तयाचें
कर्म फळे मग कृमी होउनी भ्रमणीं चक्रीं, भ्रमदुःखानें काळ क्रमीं मी;
मी मी ह्मणतां मेंढा झालें, चंडीपाशीं मुंडि खंडिलें, काळचक्रामाजी
भरडलों, बुरूड होउनि दुरड्या केल्या, कोष्टी होउनि पाष्टा विणिल्या,
परस्त्रियांतें पाहतां दृष्टी, अंध होय त्या पापें कष्टी, विषप्रयोगें अंग
कुष्टी, अन्नदानें स्वदेहपुष्टी, क्रयदानें नित्य तुष्टी, अदत्त योगें पात्रें
उष्टीं, चाटीं श्वान होउनि इष्टी, भिक्षा तांदुळ न घालिं मुष्टी, तरीच
कीटक कोरड काष्टीं, हरिनामाची न करि गोष्टी, दर्दुर होऊनि ओरडें
सृष्टी, ब्रह्मकुळींचा आचार भ्रष्टी, तरीच गर्दभ भार पृष्ठीं, अतिथीतें
ठेवुनि उपवासी, आपुल्या काया बहुतचि पोशीं, धनि असोनि विपत्ति

१ काव्यसंग्रहांतील अमृतरायांवरील निबंध, व विविधज्ञानविस्तारांतील रा. रा. मोरो गणेश लोंढे यांचे 'अमृतराय' ( पुस्तक ३२ अंक ८।९ ) व 'ध्रुवचरित्र' ( पु. ३३ अंक ७ ) हे लेख वाचण्याची वाचकांस शिफारस करितों.

कोशी, पुरुन ठेवणें ऐसा दोषी, खुशी होउनी घुसे बिळांताचि, बिडाल काळा मुषक ह्मणें मी, सूकर नामा डुकर होउनी, उकिर उकरडा उकरिला ॥ २ ॥

शुक्राचार्यांस भुलवून त्यांस भ्रष्ट करविण्यासाठीं, इंद्रानें रंभेस पाठविलें, तें वर्णनः—

' इंद्र ह्मणे, ' गे चंद्रवदने ! चंद्रहार घे चंचलनयने ! , चित्रविचित्रही चिरें भूषणें, चंदनचर्चित सुगंधानें, हार चमेली चंपा सुमनें, चतुरपणें वंचवीं युक्तीनें, निश्चळ मुनिमन चंचळ करणें, मुखचंद्रानें चंद्री लावुनि, नयनचकोरें, करीं भिकारें, बहुप्रकारें विकारवावें, चित्त तयांचें, तपोवित्त हळु जपोनि घ्यावें! ' सहस्रनयनें गौरवोनियां, सौरभजननी सुहास्यवदनें, ' अवश्य ' वदली, ' वश्य करीन मी, ' नमन करुनियां गमन करीतां, शचिपतिलागुनि, रतिपति मागुनि, वसंत घेउनि हास्यवदना, हृदयद्युतिनें, विद्युत्तेज ते ललना जात्या, उचिताकृतिनें विकृति पावे, विवेकवृत्ती, तैशा अनृति, तथापि तृप्ती, गानतान संगीत पयोधर, शीत तेथ मंदसुगंध—वातसह, सुरवर किंनर गंधर्वादिक, सर्वचि ते वयगर्वें स्फुरती, अवघ्या कुशला सकाम कामिनी, सौदामिनिशा दिव्यशरीरी, भव्य भूषणें, प्रभाकराच्या उग्रप्रभेचा भोळाजन मग लाभ लाभला, भला मनाला आला प्रेमा, बाळालिंगनिं ताळा घालुनि ज्याला, मग त्या परहिताला पडेल घाला, लोश माळा गळांच घालिती, छळोनि घाला, समुदायें प्रमदा एकसला, सकळाही विमानवाहनीं, समान नक्षत्रांच्या पंक्ति, दिशा रंगती, निशा भंगती अंग प्रभेनें, उजळे तनु ते सोज्वल वस्त्रें, मज्जन करुनी कज्जल किंचित, चिरी लावुनी, दिसति हिरे पाचूचे हार, फार सुमनाचे ते भार, मस्तकिं वरिले हस्तकिं धरिले, सन्मुख सखया अर्पण करिती, दर्पण पाहुनि सिंधुजानना, मुखइंदूवरि तिलकबिंदु सुरेख रेखिला, अंबुजमुखिनीं मुनिवृंद भेदिला, एक शुक्रमुनि, त्याहि द्विजवरें, भाळिं त्रिजवरे, धिक्कारिलें अनुसंधानें, ध्यानयोग हा जुनाट चंदन नंदनवनिंचा, आनंदानें अंग चर्चिलें, हृदय पिंडिका त्यांसि अर्चिलें, उद्भेदुनियां आकर्ण हृदया, भितरुनि कामें भरुनि पातले, अरुण रंगे, कंचुकी चित्तें धरुनि राहिले, तरुण जनांचीं हरुनि चित्तें, अशाच येती, कितीक

जाती, मुनीतापसी ऋषी दिगंबर, अमरतेज परि पामर झाले, विप्रादिक बहु क्षिप्रा भक्षुनि, प्राप्ति इच्छिती स्त्रीअधराची पयोधरार्ची, पिंवळ्या अंगीं उट्या केशरी, बुट्या भर्जरी, नक्षत्रासम बेसर नाकीं, हातांत गजरे, श्रीहरिनामीं प्राण्या ! भजरे, अंतरि त्यजरे, त्यजरे ! त्यजरे अशा मोहातें, अशा नागिणी कुरळकेश त्या, सरळ-वेणिया मुक्तालंकृत श्रेणि नगांच्या, तांबुलवदनीं सिंहकटी त्या, कटिसूत्रें कटिं ज्यांच्या सुवर्ण रत्नें जडित, तडिद्भाससम भांग भरुनियां, द्वादश अंगी सांग आभरणें, मतंगगमना, उत्तुंग कच्च ते पतंग जैसे, तंग ताठ हृद्बंध अशापरि, अंग बराबर अंगनाचें, दळ सबळाचें, कवि अबला यां, बळेंचि ह्मणती, चपळा एकी, बुबुळा फिरवुनि, लोकत्रय हा दुबळा करिती, चित्त वित्त तें समस्त हरिती, पुढें प्रेरिती वसंत कामा, अनिळ रिकामा, सिंधुसमा देउना ताातें, घाडि घाडिली, पावे जेथें अगण्य पुण्यारण्य शुकाचें, विकट वनीं त्या निकट जाउनी, विनोदवाचा उपक्रमो आदरिला ॥ ९ ॥

वसंत संतत सुलता प्रसवी, कंदर्पाची सत्ता बसवी, समीरदर्पाहि वायु सूचवी, पुष्पवाटिका रम्य नेटका, टाकंटीका विस्तीर्ण चेटका, वस्ति खेटका, मंत्रें समान सूत्रें साधुनि, कळा कूसरी, निबीड दूरीं शीतळ छाई, विकसित जाई जुई शेवती, चमेलिचंपागंधमालती, मंदाराच्या सरळ्या पंक्ती, कोरांटी बहु रंग रंगिती, आराटीची नाहीं जाती, फुलें मोगरे पिंवळी जाती, गोकर्णी गोकर्ण आकृती, एक सुकृती तुळशी नवती, जैसे चेंडू फुलले झेंडू, गेंद शेंदरे लोक आदरें कानिं खोविती, तुरे लाविती, घट्ट फुलांचे बद्ध मोगरे, द्वार पांगरे निंब कळीचे कळवळती, भळभळीत फुलले, मल्लिकांच्या दीर्घ वल्लिका, कळिका फुलल्या, अपार तेथें पारिजात, जळिं वारिजात, कर तरंगते, भातभातचे वात त्यांत बहु मात करीतो, वनस्पतिंचा गुण विखरीतो, खडे दुपारीं, फुले दुपारी, सरळ सुपारी गगन चुंबिती, द्राक्ष घडांतें पक्षि भक्षिती, क्षितीबराबर शीतळ नीतळ सपाट वाहति पाट जळाचे, थाट दाट तत्प्रफुल्ल वृक्षीं फाट नसे, परि वाटेमधिं चोहाटे बांधिले, रत्नशिळा लखलखाट, त्यांच्या कळा फांकती, मधुर शद्व कोकिळा

गुंजती, गुंजारवती सकळांमध्यें, बकुळाच्यासम कुळाभोंवते, अली-कुळाचे वृंद हिंडती, मंद मारुतें वृक्ष डुल्लती, नागकुळें परिमळें झुल्लती, शूक शुकातें स्पष्ट बोलती, ' अरिष्ट तुज हें आलें ' ह्मणती, धारिष्टातें हरूं पाहती, मुख्य अघाती श्रीरागानें गीत गाती, ऐशी विवशी तुज खायाशी, वश्य कराया लक्ष लाविती, दक्ष मुनी तो अक्षकपाटें अक्षय देउनि, क्षेमरूपें सुक्षित जेणें, शमदमसमाधि सादर हृदयीं भरिला ॥ १० ॥

कुशासनीं क्षेम समोद, भजनीं रस चढे उन्माद, न गणीं कांहीं हर्ष विषाद, निर्गुणाशीं नित्य विवाद, भोगी अद्वय चिन्मय मुद्रा, सौख्य समुद्रामध्यें विषय क्षुद्रासी त्या नातळोनियां, मनबुद्धीचे पैलतिरास, निरासतेची मूळ मिरास, तिजवरि गांठुनि शुकगिरास, भाग्याचा तो वैराग्याच्या दुर्गावरता, दुर्गाधिप भर्गासम साजे, स्वर्गावरुनी स्त्रीवर्गानीं शुकोपसर्गा महास्वर्गातें घेउनि, बाळा प्रौढा मुग्धा नारी, सुरतीं निरता, चतुरीं चौकसा, चौऱ्याशींचे आसनिं बसुनी, व्यसनिं शहाण्या, सुंदर पाहण्या, कोणि लहान्या मोठ्या गोऱ्या गोमट्या त्या, खोट्या मनिंच्या, कामिष्टा त्या, नेमिष्टाचें चेष्टाया मन, अचाट दळ अबळांचें कैसें प्रबळ माजलें, माजपट्यानें माज बांधलें, सैन्य साजलें, नितंब तेची मतंग त्यावरि ध्वजा फरारी, तेवि अंचळ वायुस्पर्शें हलती चंचळ, पाहुनि त्यातें धीरत्वाहि तें चळचळ कांपे, झळफळ झळफळ भांग शिरींचा, वदनद्युति सांगचि हृदयातें दुभंग करिती, भांग जशी सर्वांग व्यापुनी गाढी, मूर्च्छा पाडी, भ्रुकुटी चापें ताडी, नर मृग नयन बाळ सत्राण विवेकें प्राण हरिती वैराग्याच्या टाण्यावरती, उठावणी हे कठिण कुचांची, अग्रें ज्यांचीं निग्रह भाले, तेंवि निघाले कदन कराया मदन शुभांगी, भणंग शिवें तो अनंग केला, यदर्थिं चरणावळि चालविती, कुंजवनीं स्मरसंजिवनी ते, मंजुळ मंजुळ ते जप जपती, पैंजण आंदू पैज बोलती, तुरें तींचि नुपूरें वाजती छननं छननं, अलाप रागें तननं तननं, मृदंग झल्लरि झननं झननं, विमानघंटा घननं घननं, वाजति रागें रागोद्धारी, सारीगमपधनी हृदय विदारी, सुरासुरीं घेउनी बांसरी, गात सुस्वरीं, किन्नर घे करिं,

महा हुबरी चित्त हारिती, विरक्त योगी सक्त कराया, कामयुक्त हीं श्वेतरूप पक्ष्यांचीं युग्में वृक्षावरुनी पक्ष पसरुनी मन्मथ क्रीडा करिती, त्यांतें बघुनी उन्मत्त स्त्रिया त्या करीं दाउनी खदखद हंसती, वसन आणि कुचकसणी फेडुनी, आसन दाविती चौऱ्यांशींचें, ऐशी लीला सेवुनि दाविती नाना लीला, कामकळीका खुलवायासी, वपूंहि उघड्या, कितीएक त्या फेडुनि लुगड्या घेती फुगड्या, धीट धांगड्या, धांगडधिंगा अंग मोडुनी पिंगा देती, अनंगाचिया रंगा येउनि रंग पाहुनी ढंग मांडले, छंद ताल स्वर थै थै थै थै, मंद मंद हें नृत्य करीती, गंधफुलांचे गेंद घेउनी भारमदें बहु मार करिती वारंवार, तरवारीचे वार परांचें हृदय विंधिती, बुद्धि जाऊनी शुद्धि हरीती, युद्धीं ज्यापरि शूरचि जैसा, शुकही तैसा, धीर वीर तो धीमहिच्या अधीन स्वामी नव्हे पराधीन, अधिष्ठानीं निचेष्टित मनीं ब्रह्मनिष्ठ शिष्टवाक्यें योगवासिष्ठ ग्रंथाचिया, अर्थग्रंथींची जडी छेदुनी, अखंड निर्गुण समाधि साधी, अबाधित सुख रमाधिशाच्या, अनुग्रहें विग्रहेंन्द्रि अंतरिं आवरिलें त्या मन्मथ अरिला ॥ ११ ॥

वरील वेंच्यांतील उपवनाचें व रंभेचें वर्णन किती हृदयंगम आहे ! आणि हें वर्णन करितांना, शब्दांसाठीं वाट पाहात बसावें लागलें असेल, असें मुळींच वाटत नाहीं; उलट शब्दावर शब्द, कल्पनेमागून कल्पना, प्रासामागून अनुप्रास यांची सारखी रांग लागलेली दिसून येते. यावरून रायजींच्या अंगीं खरें कवित्व व भाषा-प्रभुत्व हीं सारखींच होतीं, असें प्रत्येकास कबूल करावें लागेल. वास्तविक पाहतां, रायजींच्या इतर कवितेप्रमाणें हा ' रंभाशुकसंवादावरील सगळाच कटाव फार रमणीय आहे, पण स्थलसंकोचामुळें त्यांतील थोडासा भाग मात्र येथें दिला आहे. मुक्तेश्वरांचाही ' रंभाशुकसंवाद ' आतां प्रसिद्ध झाला आहे. त्याच्याशीं रायजींचा संवाद ताडून पाहतां, दोघांत सरस कोणता हें ठरविणें फार कठीण आहे; तथापि एकंदरींत, या काव्यापुरती तरी रायजींनी मुक्तेश्वरांवर कडी केली आहे, असें ह्मणणें भाग पडेल असें वाटतें. शिवाय मुक्तेश्वरांच्या सदर प्रकरणांत शृंगाराचा इतका अतिरेक झाला आहे कीं, कित्येक ठिकाणीं त्याचें पर्यवसान बीभत्स-रसांत झालेलें दृष्टीस पडतें; पण रायजींच्या प्रकरणांत तो प्रकार नाहीं, याबद्दल रायजींचें अभिनंदन करणें योग्य आहे.

रंभेच्या आपल्या सौंदर्याबद्दलच्या गर्वाचें खंडन, शुकांनीं कसें केलें तें पहा:—

'बोले ब्रह्मराज तो प्रचंड' 'निश्चळ मळमूत्राचा पिंड, संचय होउनियां उदंड, मातलें हें स्त्रियांचें बंड, भुलले कविजन अशांसि लंड, मोहमदिरेनें भंड उभंड, बडबडोनि श्रमविती तुंड, निःशंक मुखासी शशांक ह्मणती, मृगांक तुळिती, नेत्रनासिका छिद्रें असती, मेकुड शेंबुड थेंबुड नाहीं, बिडबिड लाळ थुंका पाहीं, मांस गोटलें ते स्तन उठले, कविंसि वाटले हेमकुंभ हे, ऐसे वेडे मदांध रेडे, मन्मथ चाडे भिडेभिडेनें, गाढवाचे घोडे ह्मणती, कुडकुड हाडें प्रत्यक्ष किडे, क्षतें पडतांचि चिडे तेधवां, आंतड्यावरि कातड्यानें दुर्गंधीस्तव पड वेष्टुनि टाकियले, मग कुडें मडें हें अमेध्याचे सडेचि स्रवती, मूढ मोहारूढ होउनी, कुडीवासना उडी घालिती, पूयगर्तीं दडीच देती, गडी तयांचे नहोंच आह्मी, पडी घेउनी सुखी राहिलों, रंभे ! आली वाट धरावी, चाट बोलसी अचाट भलतें, नष्टे विषय भ्रष्ट वासना, निष्ठा कळली, चेष्टा करिसी, विष्टेचीच प्रतिष्ठा वदविसि विटाळाचा जमला गाळ, अधोऊर्ध्व द्वारा लाळ, द्रवती तेथें मूत्रखळाळ, अशुद्ध भळभळ, जंतु वळवळ, तंतु सूक्ष्म मग गुंतुनि पडती, दुष्ट कोणी कुष्ट वाणी पुष्टहि अपानमार्गीं पचती, जेंवीं मुतती कुत्रीं त्यांचीं छत्रें उठती, तशा तूंझिया विषयापासुनि विषवल्लरी ग्रामथिल्लरी, उदकानें टवटवीत तेजें, शृंगारुनियां नरकमंदिरीं गर्क जाहलां, मूर्ख अशा तुह्मी तर्क कराया, यौवन जाइल, मग जरा करिल जर्जराचि यातें, उंच कुच हे दुष्ट मदानें उंचावले, नर लाचावले, कां चर्ममयी त्या चर्मपीशव्या, घर्मजन्य शिरीं केशिं उवा, वदन बोंथरें, नेत्रिं पू भरे, शरीर अवघें थरथर कांपे, सर सर परती दूर हो मागें, वरि वरि आंगें वृंदावनशी गोड बोलसी, खोड स्त्रियांची गोड बोलणें, मग सद्वृत्तीला पुढें लावणें, कर्मकोथळी धर्म तूमचा, वर्म निष्ठुर' ऐसें रंभा परिसुनि चित्तीं, शद्ब खोंचुनि लज्जा वेंचुनी, जवनें मुक्त केलें निरिला, निर्दोष हृत्कोश चिरोनी शुकापुढें दाखविला ॥ १४ ॥

वरील उतारा ह्मणजे मूर्तिमंत बीभत्सरस होय. येथें, भर्तृहरीप्रमाणें रायजींनीं स्त्रियांच्या सौंदर्याचें अलंकारिक शद्बांनीं वर्णन करणाऱ्या कवींवर शद्बशरांचा भडिमार करून त्यांस अगदीं तुच्छ करून टाकिलें आहे, पण राजश्रींच्या लक्षांत आलें नाहीं कीं, स्वतः आपणही तसल्याच प्रकारच्या कविवर्गात मोडतां ! कारण याच आख्यानांत त्यांनीं स्त्रियांचें सौंदर्याचें फार समर्पक व सरस वर्णन केलें आहे. तर, ही मौज अशी आहे कीं, जो रस किंवा जो वर्णनीय विषय हातीं घेतला, त्याच्याशीं स्वतःचें अगदीं तादात्म्य करून घेणें, हेंच खऱ्या कवित्वाचें लक्षण होय व रायजी स्वतः खरे कवि असल्यामुळें, ज्यांवर आपण एके ठिकाणीं ताशेरा झाडितों, त्यांच्याच मार्गाचें अवलंबन, दुसऱ्या ठिकाणीं आपण केलें आहे, याचें स्मरण त्यांस झालें नाहीं; आणि या कवित्वाबद्दल त्यांची स्तुति करावी तितकी थोडीच आहे. घेतलेल्या भूमिकेशीं तादात्म्य पावल्यावांचून नटाच्या कामास जसा रंग येत नाहीं, तद्वतच् कविजनाचाही प्रकार होय व एखादा नट, तुकारामसाधूची भूमिका धारण करून रंगभूमीवर प्रविष्ट झाला असतां तेथें त्यानें दाखविलेलें साधुत्व दुसऱ्या प्रसंगीं तो राणाभीमदेव होऊन आला असतां जसें दृष्टीस पडणें शक्य नाहीं, त्याचप्रमाणें रंभेचें व उपवनाचें वर्णन करितांना रायजींनीं दाखविलेल्या रंगेलपणाची अपेक्षा, शुकाचार्यांच्या मुखीं घातलेल्या भाषणांत करणें अप्रासंगिक व अरसिकपणाचें होईल. असो.

रायजींच्या शुकरंभासंवादाप्रमाणेच त्यांचें 'सुदामचरित्रही फार सरस आहे. त्यांतील सुदाम, द्वारका, कृष्णवैभव, भोजनसमारंभ इत्यादिकांचीं वर्णनें अत्यंत हृदयंगम आहेत. सुदामचरित्रावर बापू वामन, साम्राज्य वामन, मोरोपंत, कचेश्वर, आनंदतनय, रंगनाथ इत्यादि सात आठ कवींचीं कविता आहे. परंतु त्यांतही रायजींच्या सुदामचरित्राचा मासला कांहीं निराळा आहे. विशेषतः त्यांतील वर्णनाची बरोबरी, पूर्वोक्त कवींपैकीं कोणत्याही कवीच्या सुदामचरित्रांतील वर्णनाकडून होणें शक्य नाहीं.

द्वारका नगरीचें वर्णनः—

### कटाव.

'चरती कामधेनुखिल्लारें, सुवर्णरत्नखचित धवलारें, फुललीं कांचनमय
कल्हारें, कौतुक रचिलें हरिमल्हारें, समुद्रवलयित मलयमेरुसम निलय

हरीचें, प्रलय संपल्या कुवलय उगवे, करुणालय आलवाल, यादव-प्रवालवल्ली भली उगवली, कृष्ण घन कल्पद्रुम फळली, कोमलता सत्वें पल्लवली, मुक्ताफळें चहुं देशीं स्रवलीं, अमृतफळें नम्रत्वें लवलीं, सोमवंशतेजें टवटवलीं, स्थैर्यमंडपावरि सांठवली, संतवसंतां भेटतां शांति लवली, धवळी भूतप्रभा उद्भवली ॥ ३ ॥

सुदामाचें व श्रीकृष्णानें त्याचा जो सत्कार केला त्याचें वर्णनः—

‘जाहले हातपाय त्या नळ्या, नाडी दिसती वरि वेगळ्या, सुकलें मांस पडल्या वळ्या, नखीं वेष्टियल्या आंगोळ्या, उपोषणें चिरकाळें झालीं, सरकाळें अंगाचीं वाळुनि, देह तये जाहलासे जर्जर, उभा अस्थिचा केवळ पंजर, तो भूनिर्जर, निगमगर्भ कृश दुर्भर, बोटीं दर्भ पवित्र, सदा मुखीं स्तव, ब्रह्मसूत्र सित गळां, परि निब्बर दोडका, तेंवि रोडका, धर्म जोडका, अडका जवळीं नाहिं तथापि, अडकाठीही कोणि न करितां, तीन देवड्या ओलांडुनियां, चौथें मुक्तद्वार हरीचें, वेंघतांचि देखिलें हरीनें, लगबग लगबग अंकीं रुक्मिणी बसली ते पर्यकीं लोटुनि, उडी घालुनी, धांवत धांवत स्वयें येउनी, ब्राह्मणचरणीं मस्तक ठेवुनि, दंडवतानें मिठी घालुनी, उठीं उठीं ह्मणतांचि सुदामा चहूं भुजीं कडकडूनि आलिंगुनी, प्रेमबाष्प वारि तें लोचनीं, स्फुंदत स्फुंदत कडे घेउनी नाचत नाचत, पूर्ति नव्हे प्रियमूर्ति द्विजाची, निजासनीं बैसविली ॥ ५ ॥ ब्राह्मण बैसविला पर्यकीं, त्याचे चरण मळले पंकीं, ते ठेउनियां आपुले अंकीं, शंकित मति नाहीं द्विजरंकीं, अंकितसा अवलोकित पंकज, अंकुरहस्तें शंकरसमान शंकर सुदामभूदेवाचे पाय चूरिले, जानुजंघा गुल्फपद कठोर भिंगुळिका, आर्ता अंगुळिका, नख मातीसह ते सांवरिले, हळू हळू पदतळ कुरवाळुनियां कंटक हरिले, सुगंध शीतळ निर्मळ जळ रखुमाई ओती कांचन पात्रीं, प्रक्षाळुनियां अंचळवस्त्रें पुसोनि निर्मळ हृदयीं धरिले, नेत्रीं लावुनि, मुकुट काढुनी, मस्तकिं वरिले, चंदनचौकीवरि विस्तरिले, क्षणक्षणां अवलोकुनि प्रेमें बहु आदरिले, स्वागतसुख शब्दांहीं भरिले, धन्योऽहं कृतकृत्यमतीनें मस्तकिं धरिले, चरणोदक

सहकुटुंब सेवुनि, दांडे वांसे स्तंभ शिंपिले, नवकेशरघनसारमलय पाटीरघनरसें भाळ चर्चिलें, सुखकारकशशिकिरणकरें उद्वर्तुनियां सर्वांग अर्चिलें, ब्राह्मणचरणीं तनुमनधन सर्वस्व अर्पिलें, दशांग गुग्गुळ, धूप कूपभर तूप, यूपसम तूळवर्तिका, सूपसविस्तर दीपमाळिका कूप, लाविले अमूप, मध्यें भूप विप्रवर रूप, भव्य भरपूर आणि कर्पूर दिवे बहु परिमळ वाहे घव घव घव घव, ते तूपसाखर अमूप, वक्रकरंज्या, शुभ्र फेणिया, पंचखाद्य नैवेद्य हृद्य मृदु दुग्ध दधि, वाद्य पुरस्सर पद्य गद्य, अनवद्य सद्य सुख विद्यमान, शुभ नद्य जलाशय, मध्यमध्य पानियासहित श्रीआद्य हरीनें नैवेद्य समर्पुनि वेदवेद्य ब्राह्मणापुढें त्या भरुनि पराता त्वरा करुनि पृथु पात्रें निवेदिलीं ॥ ६ ॥

श्रीकृष्णानें स्वतःची हकीकत सुदामास सांगितली व 'आपली हकीकत कशी काय आहे ? ह्मणून सुदामास विचारलें, तें वर्णन रायजींनीं किती व्यावहारिक भाषेंत केलें आहे पहाः—

'तुमचें दैव तें आहे तमाम, आत्मसुखीं हो अंतर्याम, सफलित झाला प्राणायाम, प्राप्त होईल धनसुतधाम, या वरदानें मी बळराम, अथुनि रथ पृथु मथुरें आलों, मथुनि दैत्यखळ, अथुनि यादवदळ, तेथुनि निघुनियां आतां येथेंचि राहिलों, तुह्मीं निरंतर गुरुकुळवासी, गुरु आज्ञेनें समावर्तनें विवाह शुभ केला कीं नाहीं ? प्रापंचिक बोला जी ! कांहीं, चित्त अनुकूळ नवरी मिळाली कीं सांगा, काय ? किती घरीं मुलें लेंकरें ? योगक्षेम कसकसा चालतो ? '

श्रीकृष्णैवभववर्णनः—

'कृष्णें वृत्ति करुनि पांगोळी, आपुली वागवोनि आंगोळी, घोंळुनि मोतियांचि रांगोळी, करवी ब्राह्मणासि आंघोळी, चौक न्हाण विहिणीचें तैसें ब्रह्म श्री वहिणीचें, हिरवे नवे केळिचे खांब कोंवळे, लांब लांब सह इक्षुदंड, वरि मंडप साखर निंबोळ्यांचे घोंस पोसले, लाल दुरंग्या नारंग्या सारंग्या लटकति, द्राक्षांचे घड पिकले रसाळ, मधुप झोंबती, मुक्त लोंबती, पारिजात नयन फुल वारिजात शुभ्रचांदवे तयांत खुलले, कमळ फुलारे फुलले, विठाबाईनें ठाणें सोडुनि ठाण-

च्या लखलखित ठेविल्या, रांवे हंस ज्यास लाविले, नवरत्नाच्या चौरंगावरि, श्रीरंगानें झुलत सुखप्रद विप्र बसविला, पीतांबर पड- दणीस देऊनि, खंबाइति भर्जरि नेसवुनि दीनबंधूनें, सुगंधराय चमेली वर चांपेल बुक्याचा लेप देउनी, वेल फुलेल बुक्याचें उटणें, कृष्णहस्तिचें उष्ण उष्ण जळ, घम घम घम कर्पूरवर्तिका, वाजंत्र्यांचे वाजे वाजति, त्या फुलबाजा, नळे हवाया, चंद्रज्योति बहुत सुटती, मखरिं लोंबती घागरमाळा, घंटा घण घण, भंवत्या भंवत्या फिरति नायका, अष्टनायका, द्वारावतिचे कृष्णरावजी, त्यांचे बंधू वडिल भाउजी, सद्दा साउजी, जडावाच्या खडावांत हळु पाय देउनी, क्षीरोदक परिधान करवुनी, उंच दुशाल खुशाल समोर मशाल अति विशाल, त्यांतुनि सुदाममूर्ति भोजनार्थ माजघरीं चालविली ॥ १२ ॥

आतां, खालील पक्वान्नावर आमच्या बुभुक्षित वाचकांनीं यथेच्छ हात मारावा, लाज भिडू नये, अशी सप्रेम विनंति आहे:—

' मांडुनि स्वस्तिक सुवर्णपाट, अडणीवर सोन्याचें ताट, भंवता फल- शाखांचा थाट, कांठीं वरण पिंवळें दाट, मीठ मिरें वरि आलें लिंबू, नुतिया खोबरें, किसून कोशिंबीर सुंदर, आम्ल रायतें, रुचिर आयतें कोमळ अंगीं सगळीं वांगीं, शुभ्र कारलीं, मेथी, पोथी थोथी केळें, कोथिंबीर हळदीसह, कार्था ताथी साथी चरुसह चाकवत चुका, चवळी विवळी, कवळ्या शेंगा, चिमकुरादळ चिरुनि, चांगली चमचमित फोडणी देउनी चरारित, चारोळी सांभारें, मउ चिमणी बोंडें, चिंचपान चिंचोळी तोंडें, कोहळा काशीफळें, कांकडी कुहिरिया, कमळकंद कोंवळी काचरी, दूध भोंपळे, दिव्य दोडके, दाळ दिंड शेवाळ वाळकें, शेंगा सुरण अरुवार परवरें, पडवळी तोंडली, कोंडली कंद मूळ फळ फूल पत्र तरु वेलमात्र घृतपाचित शाका, वडे नसति वावडे, सार आवडे, तिखट तिळवडे, सारभिज वडे, सहित पापडे, कथिक वडे, आणिक कोरवडे, शिऱ्यासगटगट पुऱ्या, बऱ्या गुरवऱ्या, काचोऱ्या सांजोऱ्या, मालत्या बोटवे, शुभ्र देटवे, सायसहित शेवाया, शर्करा पायस लुचया, मांडे पांडुरवर्ण पूर्ण पोळिया, घृतें घोळिल्या द्विजें गिळील्या, दुरडी भरूनि घिरडीं,

भाजुक साजुक नाजुक राजसवाणे, कानवल्यासी मानवले, साखरफेण्या धिवर घारगे, मोतीचूर जिलेबी दळिया, वारिक ओदन दे अनुमोदन, घमघमाट तो अमोद न राहे, भात केशरी परम कुसरी, दहीं दूध घृत मधु साखर, निंबू घन राव जांबभर पन्हें फुटाचें, मठ्ठा मिठ्ठा. मटमटा बहु मधुर लापसी, लोणकडें थिजलें गाईचें तूप मधुर सुवासिक महा चंगाळ, थोर घंगाळ, वाटीभर एक एक धरिंचें, सोळा हजार पदार्थ आले निजभाग्यें भोजनीं, अन्न ब्रह्मरसानुभवानें विप्र जेविला, उरलें मानें, सादर नम्र समारंभानें करिती प्रीतीनें पंचारति, सहस्र नव गंगेरी पानें, विडा अर्पिला अतिसन्मानें, कात रुक्म रंगेरी पानें, चिकणि सुपारी सोनेरी कोनें, लवंग सोनेरी सवंग केले, वेळा जायफळ सौवर्णिपर्ण चूर्णकृत मौक्तिक भाजुनि चुना अर्क निंभ वर्ख शर्करासंक्षाळित............हस्तें सेवितांचि कर्क गुरुसम गर्क सुदामा, तर्करहित नृप अलर्क तैसा, समाधिशयनीं शयन करूनी इंद्रभुवनपदसुवर्णपट्टण आत्मलक्ष दक्षणा लक्षशत मूर्तिमंत अगोदर देवें त्यासि न कळतां हुंडी करोनि गांवाचि गांवा पाठविली ॥ १४ ॥

हल्लींच्या काळीं, प्रत्यक्ष युद्धचमत्कार अवलोकन करण्याचें आमच्या नशिबीं नाहीं, तथापि पुढील वर्णनानें युद्धाची थोडीतरी कल्पना होईल असें वाटतें:—

'उभय दळींचे वीर मिळाले, हीरखचित कोटीरशीर, यचीर झळझळी, तीरदार जंजीरपाणि गंभीर कितिक हंबीर जातिचे, शीरपाणिसम धीरपराक्रम, परस्परांतें नीरधरावरि समीर जैसे, भीरहीत ज्या स्वप्राणांची फिकीरहि नसे, युद्धश्रवणें परमोत्साहें टिरी बडवुनी उशिर न करिती, कंठीरव ते घोर गर्जती, सिंग तुतारे महा नगारे, धिम् धिम् धिम् धिम्, साहेब नौबत तुडुम् तुम् तुडुम् झडे आणि घडिये वाजी तासे मर्फे कर्णे हलग्या घोर घोर रणढोल रवें ब्रह्मांड भांड हें गाजविलें, बहुवाद्य वाजवुनि चंग सदृश नवभृंगसंगसंगीत दंग मातंग धांवती, अंग रंग दुग्धांबुराशि जे संगरांत चतुरंग तुरंगम पारदचल संचार कनकशिंगार भर्जरीच्यार जमेवरि शिलेदार किति बारगीर ते स्वार महाझुंजार थोर सरदार बिरुद संभार वाहती धारराव

स्वागारदार संसारमोह सांडुनि फार निर्धार करूनि जे स्वप्राणावरि उदार झाले, भालेवाले तीक्ष्णधार तलवार चमकवुनी मार मारिती, वार करुनि अरपार शत्रुला ठार मारिती फार गारदी वार धडकती अर्भकसे भट गर्भगलित व्हावे तर्बेजहि अर्भ असे संदर्भशुद्ध सरबत्ति करिती. किती चक्रविक्रमण विक्रमशाली शक्र समक्रम तक्र जैसें तैलंग विप्र पिती मद्य पिउनियां धुंदीमध्यें काढिति कुंदी, युद्धीं परम महोत्सव सिंदी तुंदिल हे श्रीब्रह्मवृंद बुंदीवरि जैसें विधुस्वच्छता तुच्छ कर्णतां-पुच्छ गुच्छसम पुच्छ विराजित अच्छच्छवि अच्छिद्र विविध रुक्छत्रच्छादित मोरपिच्छ पिच्छलप्रांत आणि मच्छ कच्छ मकरादी लांछन ध्वजें शोभती निपुण सारथी रथी रथीश्वर हाण हाण हण म्हणुनि मारिती, सणणणणणणण बाण त्यांपुढें कोण जाणती धैर्य धराया, गरडमल्ल शरवीरतल्लज प्राणवल्लभा हल्ल पावल्या फुल्ल गल्ल गत पल्लवरचना भृंगपुरःसर हाहाकारें ऊर बडवितां हारहि तुटले नेत्रगलित जीवाच्या जाणों साक्षात् नीरधि वाहे, तें युद्ध वर्णावया वाग्देवी स्वस्थ राहे । तेथें मग इतर कवींची प्रतिभा ती काय आहे ? ॥ १ ॥

रायजींच्या हिंदी कवितेचा नमुना; लंका व रामरावणयुद्ध यांचें वर्णनः—

कटाव.

' देखोरे ! देखो आया लंकका राजा ॥ ध्रु० ॥

कांचनकी लंका, ती कोन सब काम सुनेरी रंगमहाल, सब जगा जगा चौगिर्द बनीहै, लाख माडिया, बड्या उंच खुब खड्या हवेल्या, मड्या लालसे, जड्या जुहरसे झगमग तारे सफेद सारे कोंदन हीरे, जरी फरारे उपरसवारे, चंद हजारे सबसें न्यारे, चंद्र सुरज दोनोपर वारे, ढाल ढोल डफ मेघगर्जना, कडकड बिजली, घडघड बादल, भंभेरिया चराचर करण ताल रणसिंग ढोल पखवाज बजंतर, थय्य थैय्य के लाख लठिया, अश्वसूत्र और तिडिमिडि तिडिमिडि, धौंस घडाघड नौबद बाजा ॥ १ ॥

रणखांब गढा अस्मानबराबर, ध्वजा उंच नव लाख देखते, लोक खलक सब, मुलुख मुलुखके, करोर, हाती, घोरे तेजी, ऊट पालखी,

रथ गाडीया करोर लष्कर, ताहामें खूबखूब बिलंदी, दसाननघन, सुभान अल्ला, ओमतवाला, खूब बना दौलत का प्याला, दादा आदमकी अजब लीला, कांचनका तो कोट बनाहै, चौफेर जिनखंदक क्यारी, भरे जोर दर्याव दर्दे कर, कहा रहे भाई वो राम लछीमन भरत सत्रुघ्न बाली सुग्रिव बंदर लंगुर, बैन बैनको धुमा चौकडे, खानेवाले देखो यारो, थरथरथरथर दसाननके कंपत भये बीस भुजा ॥ २ ॥ एतनमो श्रीरामचंद्रकी चढी फौज ज्या पडी लंकपर, अढी अढाकर सिडी आनपर, भिडी बांधकर, खडी बाहपर, बडी लढाई, चढी लंकपर, चंद्र सुरज दोडा उडाउकर, नडा छूटकर, खडा मेघ गडगडा गुमानिल लडा ऊटकर, खडा लढा लड्ड सनननननन, बान छुटे छच्छनननननन, खर्ग बाजे खक्खनननननन, तोफ बाजे दद्दनननननन, गगनबीच घंघनननननन, मेघनाद कंकडड-डडडडड, पेट बाजे बब्भररररर, बाफे तीर सस्सररररर, उडे फूल जब झूले हाती, गिरे सिपाई फते रामकी, खुले लाल गुलाल सिंधुकर रावन मारा, राकेस घेरा, तमाम सारा, भागे लोक कुल लंक लुटाई, निशाण चढाया दुराई फिरे रामराजा ॥ ३ ॥

ह्यावरून असें दिसतें कीं, रायजींस मराठी, संस्कृत व हिंदी या तीन भाषांचें ज्ञान फार चांगलें होतें. रायजींची इतर हिंदी कविताही अशीच सरस आहे. आतां आणखी थोडेसे वेंचे देऊन हा चरित्रलेख पूर्ण करूं.

पुढील उपदेशपर कटाव पहाः—

' आहारे ! मूर्खा ! जन्मुनी काय केलेंरे ? ॥ ध्रु० ॥

विचार पाहतां, बाळपणींचा जन्म भासतो अज्ञानाचा विट्टू दांडू लगोऱ्या चेंडू चक्र भोंवरे खेळाचे मांडू, डाव देईना त्यासचि भांडू, तरुण अवस्था अगीं येतां दिवसां दिवसां वाढुं लागला, जननीपासुनि दूर राहिला, पुरोहितानें वधू पाहिली, चिरंजिवांचें लग्न करावें, जाती पत्नी निटस ठेंगणी विशाळनयनी गोजिरवाणी, लग्न जहालें. दहा वीस हजार रुपये खर्च जहाले, ऋतुदर्शनिं फळशोभन केलें, अलंकार ह्मणे श्रीला देणें, बाळी बुगडी चिंता कासरी माळ जवाची एक दाण्याची, प्रभा फांकली कर्णफुलांची, ध्वनी उठली पैंजणांची,

मातोश्रीचें फार लाडकें, तीर्थरूपांचे फार जोडकें, या पंतांचा दिवाण-खाना रंगमहालीं नरम बिछाना, किनखापाचे पडदे आणि तिळभर वायु उष्ण साहिना, रावजी नाजुक मर्जी उर्जीत जाहले फजित अर्जी करितो, अट्ठनि वेट्ठनि शिरकंदि दुपेटा, टिळेदारि हें अंगांत डगलें उंच मुसे जरि तऱ्हेतऱ्हेचे रंग नित्य करि, या पंतांची केवढी भर्जरी, रात्र अंधारी, चोर तस्कर लपूनि तैसा मार्ग लक्षितो, मध्यस्थावरि भरला ताटा, धर्मविषयीं फार करंटा, ऐसा गाढव कलिचा फांटा मायाजाळीं गुंतला ॥ १ ॥

वृद्धपणींची थोर अवस्था, वडील असतां ह्मणति नेणता, नेत्रस्थानीं आलि अंधता, दंत भग्न मग झाला, बोचरा चल्या, नाहीं ह्मणति ह्मातारा, सुना असोनी निष्ठुरवचनी, सुत पुसेना पित्यालागुनी, शरीरमदानें कोण गुमानी ? बाळ खेळवा पालख हलवा, रडूं लागलें, बाहेर न्यावा, अंगडें कुंचडें अचडें बचडें, कडिवर घ्याना माझें छकडें, नका नेऊं त्याला उघडें, किती बडबड कराल तुह्मी ? वृद्ध रागीट अंतर्यामीं, हातीं काठी घेउनि चपाटी, मुलांलेंकरां लागे पाठी, बसबसोनी उगाच्च उठी, उबाळे येउनि कंठ दाटला, माजकनाटा वाळूनि गेला, सर्वांगासी कंप सुटल्या, रूप मर्कटा दशा पातली, नेत्रस्थानीं दशा वाळली, अपान खिडकी तीहि उघडली; तीन अवस्था पाहुनि नयनीं, अमृतेश्वर ह्मणे कृष्णमाउली, कर जोडुनि सद्गुरुचरणीं रंगला ॥ १ ॥

भीष्मप्रतिज्ञा:—

पद.

' अरे ! मी भीष्म जरीच तरी, श्रीहरि ! धरविन चक्र करीं, श्रीहरि ! ॥ध्रु०॥
क्षत्रियकुळिचा सुत शंतनुचा, । जन्मलों शुभजठरीं ।
हरिपदिं जन्मुनि शिवमौळिं वसे । त्या गंगे उदरीं ॥ श्रीहरि ! ॥ १ ॥
सानुम यादव, चक्ररहित तूं । निश्चय करिसि तरी ।
सांप्रत मजला कळों येईल रे ! ह्या अनुपम समरीं ॥ २ ॥
पार्थ हें बच्चडें बाळक अजुनी । दुग्ध दिसे अधरीं ।
बजवणियास्तव पशुपक्षि भितीं । निर्भय क्षेत्र करी ॥ ३ ॥

ध्वजरूपी हरि, हय तेहि हरी । सारथी मुख्य हरी ।
हरिमय रथ हा विजय श्रीहरि । मी यातें प्रहरीं ॥ ४ ॥
पाहें, मी शिष्य भार्गवरामाचा । कोपल्या न उरे उरी ।
अमृतवचनीं सत्य प्रतिज्ञा । ऐकिजे रणरंगचतुरीं ॥ ५ ॥

ही प्रतिज्ञा, याहून अधिक जोरदार, तेजस्वी आणि भारदस्त शब्दांत सांगता येणें शक्य नाहीं, असें मला वाटतें. रायजींच्या ह्या प्रासंगिक पदांचा व वर्णनात्मक कटाव्यांचा कीर्तनांत फार उपयोग होतो, हें सर्वांस ठाऊकच आहे. भीष्मापुढें जसें ' पार्थ हें बच्चडें बाळक तान्हें ' दिसलें, तसे अमृतरायांसारख्या मर्दांनी कवीपुढें हल्लींचे शृंगारिक व विधवांच्या दुःस्थितीचीं करुणरसयुक्त वर्णनें करणारे कवि कांहींसे जनानी दिसतात, नाहीं बरें ?

अमृतरायांची एकंदर कविता पाहिली व तिच्यांत रागादिकांचा उल्लेख आढळतो, तो लक्षांत घेतला, ह्मणजे त्यांस गायनवादनाची चांगली माहिती होती, असें दिसतें.

श्रीशंकराचें पुढील वर्णन रायजींनीं किती साध्या शब्दांनीं केलें आहे तें पहा:—

पद.

वेडा तामसा जोगी देखिला गे माय ।
भिकेचे तुकडे मागुन भोंपळ्यांत खाय॥ ध्रु० ॥

---

१ प्रसिद्ध हिंदी कवि सूरदास यांनीं हिंदी भाषेंत लिहिलेली भीष्मप्रतिज्ञाही अशीच जोरदार आहे:—

पद. ( राग जंगला. )

जो मै हरी न शस्त्र गहाऊं । तो लाजों गंगा जननिको ।
संतनुसुत न कहाऊं ॥ ध्रु ० ॥
शर धनु तोड महारथ मारूं । कपिध्वज सहित गिराऊं ॥
पांडव सैन समेत सारथी । शोणित सिंधु बहाऊं ॥ १ ॥
जीवों तो यश लेवँ जगतमें । जीत निशान फिराऊं ॥
मरों तो मंदिर भेदि भानुको । सुरपुर जाय बसाऊं ॥ २ ॥
इतनीं शपथ करौं प्रभु तुमरी । क्षत्रियगति ना पाऊं ॥
सूरस्याम रण विजय सखाको । जियतन पीठ दिखाऊं ॥ ३ ॥

स्मशानीं ज्याचें राहणें लोळे राखेंत ।
दंत दाढ विक्राळ दिसे अद्भुत ।
प्यां प्यां वाजवी शिंगी भंवतालीं भुतें ।
आतां खाइलसा दिसतो, कोण तिकडे जाय? ॥ १ ॥
हातीं एक लोखंडाचें शस्त्र त्याला तिन धारा ।
दुसरें कुऱ्हाडीवाणी वागवी बरा ॥
डुमडुम वाजवी डमरू बोले हरिहरा ।
भं भं वाजवी शंख, हंसूं येतें गे माय ॥ २ ॥
खडबड काळे मणके वोवुनियां माळा ।
केवढें थोरलें पेंडें वेडियाचे गळां ।
जन्म जोड हातांत विभूतिचा गोळा ।
अखंड ओढी राव भांग धुंद होउनी राहे ॥ ३ ॥
तिनशें साठ ठिगळयांची गोदडी वरी ।
शंभर वांवे दोरा काढुनी कुसरी ।
षड्चक्रांचे बुटे, दिसे गोजिरी ।
वेड्यानें कोठून चोरून आणिली कीं काय? ॥ ४ ॥
उटवण करि एक बैल त्यावरि बसे ।
जुनाट जोगी वेडा निरंजनीं वसे ।
त्याचे पाठीं लागलें सद्भाव पिसें ।
ह्मणे अमृत मज दावा वेडियाचे पाय * ॥ ५ ॥

ह्या पदाच्या ' ह्मणे अमृत मज दावा वेडियाचे पाय ' हा चरण दृष्टीस पडेपर्यंत अमृतरायांनीं शंकराची थट्टा चालविली आहे कीं काय असें वाटतें !

---

*अमृतरायांनीं ' महादेवप्रयाणवर्णन ' ह्मणून हिंदी भाषेत एक कटाव केला आहे तोही फार मौजेचा आहे:—

चली संकरकी असवारी । त्रिभुवनमो बात पुकारी ॥ ध्रु० ॥
धवला बैल सजा है नंदी । तापर बैठे शंकर छंदी ।
किल्कारते जिल्लिमो बंदी । लेवेसाथ सुखी आनंदी ,

# सोहिरोबा आंबिये.

**कवि संत सोहिरोबा बांदें गांवीं वसे महाद्विज हा ॥**
**ज्याचे ग्रंथ विलोकुनि हरि स्वजनां भूवरी ह्मणे द्विज व्हा ॥ १ ॥**

विठोबा अण्णा.

हे सुप्रसिद्ध भगवद्भक्त, सुमारें १५० वर्षांपूर्वी सावंतवाडी प्रांतीं होऊन गेले. हे योगी असून, त्यांनीं केवळ योगशास्त्रावर व वेदांत विषयावर मोठमोठे ग्रंथ लिहिले आहेत. परंतु ते कोंकणांतील एका अप्रसिद्ध भागांत होऊन गेल्यामुळें त्यांच्या ग्रंथांची अद्यापपर्यंत व्हावी तेवढी प्रसिद्धी झाली नाहीं. त्यांचे वंशज अद्याप तिकडे आहेत, परंतु सोहिरोबांसंबंधानें व त्यांच्या ग्रंथांसंबंधानें त्यांस मुळींच माहिती नाहीं. यामुळें त्यांचें चरित्र लिहावयास, असावी तेवढी साधनें उपलब्ध नाहींत. याचें कारण असें कीं ते मुक्तावस्थेस पोंचण्याच्यापूर्वी अत्यंत गरिब असल्यामुळें त्यांच्यासंबंधानें विशेष चौकशी करण्याची कोणासही आवश्यकता नव्हती व ते मुक्तावस्थेस पोंचल्यावरही, त्यांच्या हातून लोकांचें चित्त वेधून जाण्यासारखे अलौकिक चमत्कार न घडल्यामुळें त्यांची विशेष प्रसिद्धि झाली नाहीं. दुसरें असें कीं ते ज्या प्रांतीं होऊन गेले तेथील लोक नेहमीं व्यापारोद्यमांत व द्रव्यार्जनांत मग्न, अर्थात् परमार्थाविषयीं अगदींच पराङ्मुख असल्यामुळें, सोहिरोबांच्या उपदेशामृताचा लाभ त्यांना बिलकूल झाला नाहीं. तिसरें, सोहिरोबांस कोणा श्रीमान् मनुष्याचा आश्रय नसल्यामुळें एखाद्या कोना कोंपऱ्यांत पडून राहिलेल्या रत्नाप्रमाणें त्यांचे तेज लोपून गेल्यासारखें झालें. त्या वेळीं त्यांच्या कवितेचा जर कोणी उपयोग करून घेतला असेल तर तो गोमांतकांतील नृत्यांगनांनीं होय. कारण सोहिरोबांचीं पदें गायनाच्या फार उपयोगाचीं असून त्यावरून, सोहिरोबांस गाण्याचें बरेंच अंग होतें असें दिसून येतें. अद्याप त्या प्रांतांतील नृत्यांगनांच्या तोंडीं सोहिरोबांचीं शेंकडो पदें आहेत. असो. तर आतां सोहिरोबांचें जें चरित्र लिहावयाचें तें फक्त वृद्ध लोकांच्या तोंडून ऐकलेल्या माहितीच्याच आधारानें लिहिणें भाग आहे.

शके १६३६ ह्मणजे इसवी सन १७१४ या वर्षाच्या सुमारास सोहिरोबांचें जन्म झालें. बाळाजी विश्वनाथ यांस पेशवाईचीं वस्त्रें याच वर्षी मिळालीं. सावंत-

वाडी संस्थानांत बांदें या नांवाचा एक गांव आहे, तेथें सोहिरोबा रहात असत व ते त्या गांवचे कुळकर्णी होते. ते जन्मापासून सात्त्विक वृत्तीचे असल्यामुळें द्रव्यार्जनास लागणारें आवश्यक व्यवहारपटुत्व त्यांचे अंगीं नव्हतें व यामुळें त्यांस आपले दिवस फार विपन्नावस्थेंत काढावे लागत. तथापि त्यांचा ओढा प्रपंचापेक्षां परमार्थाकडे विशेष असल्यामुळें, जुन्या संस्कृत व प्राकृत कवींचे ग्रंथ वाचून त्यांची विद्वत्ता बरीच वाढली होती. सोहिरोबांच्या पूर्वजांसंबंधानें कांहींच माहिती मिळत नाहीं. परंतु बांदें येथें येण्यापूर्वी ते गोवें प्रांतांत रहात असावे असें अनुमान करितां येतें; कारण त्यांचे वंशज अद्याप गोवें प्रांतीं फार आहेत. सोहिरोबा हे जातीचे सारस्वत ब्राह्मण. यांचें आडनांव आंबिये. गांवच्या कुळकर्ण्याचें काम बरींच वर्षे सचोटीनें केल्यावर सोहिरोबांस, त्यांच्या वयाच्या ३५ व्या वर्षी खरी वैराग्यदशा प्राप्त झाली.

सज्जनांना छळ दुर्जनाकडून बहुधा व्हावयाचा असा एक सामान्य नियम आहे; त्याप्रमाणें सोहिरोबांनाही त्यावेळच्या दुर्जनाकडून छळ झाल्याशिवाय राहिला नाहीं. त्यावेळीं, सावंतवाडीच्या गादीवर श्रीमंत खेमसावंत हे असून, ते अल्पवयी असल्यामुळें, त्यांचे चुलते आबासाहेब हे सगळा राज्यकारभार पहात असत. ते स्वत: अत्यंत दुष्ट, कपटी व पहिल्या प्रतीचे मत्सरी होते. त्यांनीं खुद्द खेमसावंत यांच्याही जिवावर अपघाताचा प्रसंग आणण्यास कमी केलें नाहीं. प्रजाजनाकडून सरकारचे पैसे वेळेवर वसूल न झाल्यास, 'सराफकट्टा' म्हणून एक जागा होती, तेथें त्या गांवच्या कुळकर्ण्यांस नेऊन त्याचा नाना प्रकारीं छळ करावा, त्याच्या पोटावर जड जड दगड ठेवावे, प्रसंगीं त्याचा प्राणही घ्यावा, अशी बेबंदशाही चालू होती. एकवेळ बिचाऱ्या सोहिरोबांच्या पोटावरही, अशा प्रकारें दगड ठेवण्यांत आले होते, असें सांगतात.

एके दिवशीं, आबासाहेबांनीं, सोहिरोबांस कांहीं निमित्तानें वाड्यांत बोलावून नेऊन, एका खोलींत कोंडून ठेविलें व 'देव दाखव नाहींतर ठार करितों' अशी त्यांस धमकी दिली. बिचाऱ्या सोहिरोबांनीं देवाचा धांवा केला. तोंच असा चमत्कार झाला कीं, त्या खोलीच्या भिंतींतून अकस्मात् एक ज्वाला उत्पन्न होऊन, तिच्या तेजानें आबासाहेबांचे डोळे दिपून गेले ! त्यांस आपल्या कृत्याचा पश्चात्ताप होऊन सोहिरोबांच्या साधुत्वासंबंधानें त्यांची अगदीं खात्री होऊन चुकली. नंतर सोहिरोबांनीं त्यांस सांगितलें, आबासाहेब ! तुमच्या या कृत्यामुळें परमेश्वरास मोठा राग आला आहे व ही ज्वाला हें त्याचें चिन्ह होय. आतां उभयतांतून कोणातरी एकाच्या

बळी घेतल्याशिवाय ही ज्वाला आतां कांहीं शांत होणार नाहीं. नंतर आबासाहेब त्या खोलींतून बाहेर पडले व सोहिरोबाही तेथून निघून आपल्या गांवीं आले पुढें थोडयाच दिवसांनीं सोहिरोबांचें वरील भविष्य अक्षरशः खरें झालें. कांहीं कारणानें उदास होऊन, कुडाळ येथें, तोफेच्या दारूच्या पिंपावर बसून व त्यास स्वतःच आग लावून, आबासाहेबांनीं आत्महत्या केली !

पुढें सोहिरोबांस लवकरच सद्गुरूंचा अनुग्रह झाला. त्यासंबंधानें प्रसिद्ध असलेली आख्यायिका अशी आहे कीं, एके दिवशीं सोहिरोबा स्नान करून पूजाअर्चा करण्यांत गुंतले असतां सावंतवाडीच्या राजेसाहेबांनीं पाठविलेला एक शिपाई, सोहिरोबांस वाडीस नेण्याकरितां येऊन दाखल झाला. त्यानें सोहिरोबांस सांगितलें कीं राजेसाहेबांनीं आपणास आतांच सावंतवाडीस बोलाविलें आहे. " राजाज्ञा प्रमाण ह्मणून, सोहिरोबा भोजन न करितां, घरांत एक पिकलेला फणस होता तो बरोबर घेऊन, तसेच सावंतवाडीस जाण्याकरितां निघाले. बांदें व सावंतवाडी या दोन शहरांत ३ कोसांचें अंतर आहे. सुमारें अर्ध्या रस्त्यावर आल्यावर सोहिरोबांस चालण्याच्या श्रमानें अंमळ थकवा आला ह्मणून, वाटेंत इनसुली नामक गांव आहे, येथें त्या दाट जंगलांतून वाहणाऱ्या एका ओढ्याच्या कांठीं ते विश्रांतीस बसले. क्षुधेची थोडीशी शांति करावी ह्मणून त्यांनीं बरोबर आणिलेला फणस फोडला व आतां खावयास प्रारंभ करणार तोंच ' बाबू हमकू कुछ देताहै ? ' असा गंभीर ध्वनी अकस्मात् त्यांच्या कानीं पडला. आसपास कोणी मनुष्य दिसत नसतां हा ध्वनी कोठून आला याचें सोहिरोबांस आश्चर्य वाटलें, इतक्यांत कोणी एक परम तेजस्वी सत्पुरुष त्यांच्या पुढें प्रगट झाला. हा कोणी तरी महापुरुष आहे अशी सोहिरोबांची खातरी होऊन त्यांनीं त्याचे चरणीं आपलें मस्तक ठेवून, तो फणस प्रेमपुरःसर त्याचे पुढें ठेविला. त्या सिद्ध पुरुषानें तो सर्व फणस भक्षण करून प्रसाद ह्मणून कांहीं गरे सोहिरोबांस दिले आणि त्यांच्या मस्तकीं आपला वरदहस्त ठेवून आपण अदृश्य झाला. सोहिरोबांची वृत्ति तत्क्षणींच ब्रह्मरूप होऊन त्यांना सर्व विश्व ब्रह्ममय दिसूं लागलें. सोहिरोबांचा फणस भक्षण करून त्यांच्या मस्तकीं आपला वरदहस्त ठेवून त्यांस ब्रह्मोपदेश करणारे हे दिव्यदेही सत्पुरुष कोण होते यासंबंधानें विश्वासपात्र माहिती मिळत नाहीं, तथापि गहिनीनाथ किंवा गैबनाथ या नांवाचे ते एक सत्पुरुष होते असें सोहिरोबांनीं आपल्या कवितेंत कांहीं ठिकाणीं नमुद केलेलें आहे. हे गहिनीनाथ किंवा गैबीनाथ नाथसांप्रदायी होते हें त्यांच्या नांवावरून

सिद्ध होत असून त्यांचें चरित्र ' धुंडीराज नरहरी माल्ड ' या कवीनें आपल्या ' नवनाथ-भक्तिसार ' नामक प्राकृत ओंवीबद्ध ग्रंथांत दिलेलें आहे तें संक्षेपरूपानें येथें देतों.

" प्रसिद्ध नऊ नाथांपैकीं मच्छिंद्रनाथ यांनीं आपले शिष्य गोरखनाथ यांस एके दिवशीं ' संजीवनी ' मंत्राची संथा देऊन, ' हा मंत्र एकांतीं पठत जा ' अशी त्यांस आज्ञा केली. त्याप्रमाणें गोरखनाथ मंत्र पठण करीत बसले असतां गांवचीं मुलें तेथें येऊन त्यांनीं आपणांस एक मातीचें चित्र करून देण्याविषयीं त्यांस विनंति केली. गोरखनाथांनीं त्यांच्या विनंतीस मान देऊन मातीचें चित्र करावयास आरंभ केला. चित्र तयार करीत असतांना त्यांचें संजीवनी मंत्राचें पठण चालूच होतें. चित्र तयार होतांच असा चमत्कार झाला कीं, संजीवनी मंत्राच्या योगानें त्यांत जीवनतत्त्व उत्पन्न होऊन तें माणसासारख्या चेष्टा करूं लागलें. हा विलक्षण प्रकार पाहतांच तीं सर्व मुलें " भूत भूत " ह्मणून ओरडत वाट फुटेल तिकडे पळूं लागलीं व गोरखनाथही भयानें अगदीं गांगरून गेले. ही झालेली गडबड कशाची आहे याची मच्छिंद्रनाथ यांनीं चौकशी केली तों झालेला प्रकार त्यांच्या ध्यानांत आला. संजीवनी मंत्राचा हा परिणाम असून भूत नव्हे असें सांगून त्या मुलांची व व गोरखनाथांची त्यांनीं समजूत केली व तें उत्पन्न झालेलें बालक घेऊन ते आपल्या मठांत आले. तेथें त्या बालकास नाथांनीं दूध पाजून त्याची योग्य व्यवस्था ठेविली. ही हकीकत गांवांतील सर्व लोकांस समजांच ते मच्छिंद्रनाथांच्या मठांत आले व ' बालक कोणाचें ' असें त्यांनीं नाथांस विचारिलें. झालेली इत्थंभूत हकीकत मच्छिंद्रनाथांनीं त्यांस निवेदन केली, त्यावेळीं नाथांच्या सामर्थ्याचें लोकांस फार आश्चर्य वाटलें. मग त्यांतील कांहीं लोक नाथांस ह्मणाले कीं, हें बालक ' गैबीनंदन ' आहे. ( गैबिनंदन ह्मणजे ज्यास आईबाप नाहींत तो. गैबी—गहाळ झालेला ). याचें योग्य संगोपन आपल्यासारख्या विरक्त मनुष्याकडून होणें कठीण आहे. याकरितां जीस कांहीं मूल बाळ नाहीं अशा एखाद्या स्त्रीस हें मूल दिल्यास ती त्याचा चांगला प्रतिपाळ करील. ही सूचना नाथांस पसंत पडल्यावरून त्यांनीं तें बालक, त्या गांवांत मधु या नांवाचा एक ब्राह्मण रहात होता त्याच्या स्त्रीस अर्पण केलें. तिनें तो मुलगा लहानाचा मोठा केल्यावर त्यास मच्छिंद्रनाथांनीं मंत्रोपदेश केला. तेच हे सोहिरोबांचे गुरु ' गहिनीनाथ किंवा गैबनाथ ' होत. यांची समाधि गर्भागिरी नामक पर्वतावर असून हिंदु लोक यांना ' गैबीनाथ ' व मुसलमान ' गैबीपीर ' असें ह्मणतात.

महिपतीच्या भक्तविजयांतही ह्या नाथसांप्रदायासंबंधानें बरीच माहिती दिली आहे. कोल्हापुरानजीक बत्तिस शिराळें नामक गांवीं ह्या सांप्रदायाचा मठ असून ह्या गांवचें उत्पन्न त्या मठास इनाम दिलेलें आहे. ह्या मठांत पुष्कळ नाथसांप्रदायी लोक राहतात. ह्या मठांत नाथसांप्रदायासंबंधाची बरीच कविता असून, 'गोपिचंदाख्यान' या नांवाचा महाभारतासारखा एक प्रचंड हिंदी ग्रंथही आहे, असें सांगतात, परंतु ही कविता प्रसिद्ध करण्यास मठस्थ लोक कबूल नाहींत. थोडया दिवसांपूर्वीं कैलासवासी झालेले वे. शा. सं. सीतारामशास्त्री इस्लामपुरकर हरिदास यांनीं गोपिचंदाख्यानावर केलेल्या कीर्तनांनीं खुप होऊन, ह्या मठांतील लोकांनीं वरील ग्रंथाचा कांहीं भाग बुवांस दाखविला होता व त्याचा उपयोग सीतारामबुवा पुढें आपल्या कीर्तनांत करीत असत. सदर गांवीं गोरखनाथांनी स्वहस्तानें लाविलेल्या चिंचेच्या शुष्क खुंटाचें एक मोठें सुंदर झाड झालें असून, लोक त्यास गोरखचिंच ह्मणतात व भक्तीनें त्याचें दर्शन घेतात.*

सोहिरोबांस उपदेश झाल्यावर ते सावंतवाडीस गेले व लेखणी राजेसाहेबांच्यापुढें ठेवून यानंतर मजकडून आपली सेवा होणें नाहीं असें त्यांनीं त्यांस सांगितलें. सोहिरोबांची विरक्त स्थिति राजेसाहेबांनीं अवलोकन करितांच त्यांस मोठा विस्मय वाटला. 'महाराज! आमच्यावर आपला राग नसावा' असें राजेसाहेब गहिंवरून सोहिरोबांस ह्मणाले. त्यावर 'राग कशाचा? आपले राज्यांत यापुढें दारूचे मक्ते देऊन लोकांस मद्यपी बनवूं नये, इतकीच विनंति आहे' असें ह्मणून सोहिरोबा तेथून निघाले. पुष्कळ लोक त्यांस पोंचविण्यास गेले होते. नंतर सोहिरोबा बांदें येथें आले. तेथें मुमुक्षु लोकांकरितां अध्यात्म विषयावर सोप्या भाषेंत ग्रंथ लिहिण्यांत व समाधिसुखांत ते आपला कालक्षेप करीत असत. सोहिरोबांस, एकाएकीं, योग्य गुरु मिळून त्यांची प्रपंचावरील इच्छा एकदम उडाली, यावरून त्यांची पूर्वीं परमार्थविषयांत बरीच तयारी झाली होती असें वाटतें. ते योगी असूनही त्यांच्या हातून लोकांस चकित करून सोडणारे असे कांहींच चमत्कार झाले नाहींत. त्यांची वृत्ति खऱ्या सत्पुरुषास साजेल अशीच होती. ते मुमुक्षु पदावरच एकदम ज्ञानी बनून गेल्यामुळें तत्कालीन भक्तिमार्गाची त्यांना विशेष आवश्यकता वाटली नाहीं.

---

* लोकमित्र मासिक पुस्तक.

वैराग्य प्राप्त होण्यापूर्वीचे सोहिरोबांच्या हातचे, सरकारी कामासंबंधाचे बरेच लखे आढळतात. परंतु त्यानंतर त्यांनीं स्वतः लिहिलेला असा एकही ग्रंथ मिळत नाहीं. याचें कारण असें दिसतें कीं, त्यांनीं आपली लेखणी जी एकवेळ सावंतवाडीच्या राजेसाहेबांसमक्ष खालीं ठेविली ती फिरून कधींहि उचलली नसावी. यामुळें त्यांची सर्व कविता दुसऱ्या लोकांनीं लिहिलेली आहे. सोहिरोबांच्या कवितेचा बराच भाग त्यांच्या वहिणीच्या हातचा आहे. या बाईस चांगलें लिहितां वाचतां येत असून तिला कविता वाचण्याची विशेष आवड असे. सोहिरोबा ब्रह्मानंदांत असतां ज्या कविता रचीत त्या ही बाई लिहून ठेवी. सोहिरोबांची आज जी कविता उपलब्ध आहे ती या बाईच्या काव्यवाचनलालसेचेंच फळ होय. एकंदरींत या बाईचे महाराष्ट्रजनांवर मोठे उपकार झाले आहेत हें सोहिरोबांच्या कवितेची योग्यता जाणणारांस सांगण्याची आवश्यकता नाहीं. असें होतें तरी सोहिरोबांची बरीच कविता नष्टही झाली. याचीं कारणें अनेक आहेत. त्यावेळीं कागद फार महाग असल्यामुळें सोहिरोबांस ते विकत घ्यावयास सामर्थ्य नव्हतें यामुळें त्यांच्या वहिणीनें कांहीं कविता झाडांच्या पानांवर लिहून तीं पानें एका खोलींत व्यवस्थेनें रचून ठेविलीं असतां त्यांच्या वृद्ध मातुश्रीनें तीं सर्व पानें कचरा समजून जाळून टाकिलीं ! या तिच्या कृत्यानें सोहिरोबांची किती कविता नष्ट झाली असेल हें सांगतां येणें कठीण आहे तथापि त्यामुळें महाराष्ट्र भाषा-मंदिरांतील एकदोन मूल्यवान् रत्नें तरी भस्मीभूत होऊन गेलीं असतील यांत संशय नाहीं. दुसरें असें कीं सोहिरोबांचें वास्तव्य एकाच ठिकाणीं नव्हतें. आपल्या घरीं ते थोडाच वेळ रहात व गोमांतकांत वगैरे वरचेवर त्यांचें जाणें येणें होत असल्यामुळें त्यांची कविता तेथील लोक लिहून ठेवीत, यामुळें ती सर्वत्र पसरली गेल्याकारणानें एक ठिकाणीं मिळत नाहीं व ती कोठें आहे याचा बरोबर शोध लागत नाहीं.

याप्रमाणें वाडीप्रांतीं बरेच दिवस वास्तव्य केल्यावर, उत्तर हिंदुस्थानांतील पुण्यक्षेत्रें पहावीं व साधुसंतांच्या भेटी घ्याव्या या उद्देशानें सोहिरोबांनीं आपल्या वयाच्या ६० व्या वर्षीं ह्मणजे शके १६९६ च्या सुमारास तिकडे जाण्याचा विचार केला आणि बरोबर आपले दोघे मुलगे घेऊन ते निघाले. त्या वेळची एक फार हृदय-द्रावक अशी आख्यायिका प्रसिद्ध आहे. सोहिरोबा उत्तर हिंदुस्थानांत जावयास निघाले त्या वेळीं त्यांची एक सून व रोगानें केवळ आसन्नमरण झालेला असा एक तिचा मुलगा हीं दोन माणसें घरांत होतीं. निघतांना सोहिरोबांनीं

आपल्या सुनेस ‘ आह्मीं आतां येतों ’ असें सांगतांच ती प्रेमळ बाई ढळढळा रडूं लागली. कारण यापूर्वीं सोहिरोबांस कधीं बाहेर जावयाचें असल्यास ते घरांतील मंडळीस कांहींच न सांगतां मनास येईल तेव्हां उठत आणि चालते होत. वाटेल तेव्हां न सांगतां जावें आणि वाटेल तेव्हां परत यावें असा त्यांचा परिपाठ होता. असें असतां आजच ज्याअर्थीं हे “ आतां आह्मीं येतों ” असें ह्मणतात त्या अर्थीं हे आतां खचित परत येणार नाहींत असें त्यांच्या सुनेस वाटलें व ती स्फुंदस्फुंदून रडूं लागली. ती ह्मणाली ‘ तुह्मीं आतां जातां, पण माझी वाट काय ? माझा एकुलता एक मुलगा घरांत मरणोन्मुख होऊन पडला आहे, त्याची काय दशा ? ” सोहिरोबा परमज्ञानी असून जरी त्यांनीं मायाजाळाचा अगदीं त्याग केला होता तरी यावेळीं त्या बाईची दीनावस्था पाहून त्यांचा कंठ भरून आल्यावांचून राहिला नाहीं. त्यांनीं अद्यापपर्यंत त्या आपल्या नातवासंबंधानें कांहींच चौकशी केली नव्हती. परंतु ते आतां त्याजपाशीं गेले व त्यांनीं परमेश्वराचा धांवा केला कीं, ‘ देवा ! आजपर्यंत तुझ्यापाशीं कांहीं मागितलें नव्हतें परंतु आज तुला संकट घालण्याचा प्रसंग आला आहे. तर या मुलास तूं आरोग्य दे ! असें ह्मणून मुलाच्या पाठीवरून सोहिरोबांनीं आपला वरदहस्त फिरवितांच तो अगदीं चांगला झाला. मग सुनेची योग्य व गोड शब्दांनीं समजूत करून व तिचा निरोप घेऊन सोहिरोबा उत्तरप्रांतीं जावयास निघाले. त्या हृदयद्रावक देखाव्याचें जर एकाद्या कुशल चित्रकारानें चित्र वठविलें असतें तर तें पाहून सहृदय मनुष्याच्या डोळ्यांतून खातरीनें अश्रुपात झाला असता !

उज्जनी, दिल्ली, प्रयाग, काशी वगैरे तीर्थें व पुण्यस्थळें पहात पहात सोहिरोबा शके १७०१ ह्मणजे इसवी सन १७७९ च्या सुमारास ग्वाल्हेर येथे आले. त्यावेळीं प्रसिद्ध राजकारणी व शूर सरदार महादजी शिंदे हे गादीवर असून त्यांचे पदरीं गोमांतकांतील केरी गांवचे जिवाजी बल्लाळ ऊर्फ जिवबादादा बक्षी हे प्रतापी व इतिहासप्रसिद्ध मुत्सद्दी सेनापती होते. शिंद्यांचे दरबारीं त्यांचें फार वजन असे. आपल्या प्रांतीं राहणारे सत्पुरुष ग्वाल्हेरीस आले आहेत हें ऐकतांच जिवबादादा यांनीं आपले नोकर लोक पाठवून, सोहिरोबांस मोठ्या प्रेमबुद्धीनें आपल्या वाड्यांत आणिलें व त्यांची उत्तमप्रकारें बडदास्त ठेविली. सोहिरोबांची विरक्तवृत्ति पाहून जिवबादादांच्या मनांत मोठी पूज्यबुद्धि उत्पन्न झाली. त्यांस असें वाटलें कीं सोहिरोबांची व महादजी शिंदे यांची गांठ घालून द्यावी. मग शिंदे हे सोहिरोबांचें

साधुत्व व कवित्व पाहून खुश होऊन जातील व सोहिरोबांस मोठा द्रव्यलाभ होईल. परंतु सोहिरोबा द्रव्यास किती तुच्छ मानीत असत याची कल्पना जिवबादादांस झाली नाहीं. त्यांनीं आपल्या विचाराप्रमाणें सोहिरोबांस सांगितलें कीं मी आज आपणास महादजी शिंदे यांच्या दरबारीं घेउन जातों. तेथें आपला चांगला आदरसत्कार होईल व महादजी शिंदे यांनीं स्वत: कांहीं कविता रचिली आहे ती ते, आपण कवि असल्यामुळें, आपणास दाखवितील. तेव्हां 'कविता चांगली आहे' एवढें आपण ह्मणा ह्मणजे झालें. हें जिवबांचें भाषण ऐकून सोहिरोबांस थोडेंसें आश्चर्य वाटून ते ह्मणाले, जर शिंद्यांची कविता चांगली असली तरच मी ती चांगली आहे असें ह्मणेन परंतु जर ती वाईट असली तर तसें स्पष्ट सांगेन. हें आपणांस कबूल असेल तर एकवार त्यांच्या दरबारीं जाऊन शिंद्यांची भेट घेण्यास मी तयार आहे." हें दोघांचें संभाषण चाललें आहे इतक्यांत महादजींकडून जिवबांस निरोप आला कीं आपले इकडे आलेल्या सत्पुरुषांस बरोबर घेऊन आज दरबारास यावें. मग भोजनोत्तर जिवबादादा सोहिरोबांस घेऊन दरबारीं गेले. तेथें महादजींनीं सोहिरोबांचा भक्तिपुर:सर आदरसत्कार केला व त्यांस आपल्या सिंहासनावर बसावयास सांगितलें, परंतु सोहिरोबांस तसें करणें कठीण वाटल्यामुळें ते इतर मंडळी बसली होती तींत जाऊन बसले. नंतर कांहीं वेळ त्यांचें व महादजींचें भाषण झाल्यावर महादजींनीं आपल्या कवितांची वही आणवून सोहिरोबांपाशीं दिली व विनंति केली कीं 'एवढ्या कविता वाचून पाहून त्या कशा काय उतरल्या आहेत तें सांगावें.' सोहिरोबांनीं त्या वहींतील कांहीं कविता वाचून पाहिल्या व ते एवढेंच ह्मणाले कीं 'कविता आहेत ब-या परंतु प्रासादिक नाहींत.' ही भरदरबारांतील सोहिरोबांची स्पष्टोक्ति शिंद्यांस रुचली नाहीं असें त्यांच्या मुद्रेवरून दिसून आलें व ब-याच मंडळीस याबद्दल थोडेसें वैषम्य वाटलें. परंतु सामान्य मनुष्यांच्या—मग ते राजे असोत कीं रंक असोत—रागास आणि वैषम्यास साधु थोडेच भितात! ज्यांस राजा आणि रंक हे सारखेच वाटूं लागले त्यांजकडून खुषमस्क-यांचीं आणि खुशामतीचीं कामें थोडींच होणार? आपल्या स्पष्टोक्तीनें महादजींस वाईट वाटलें हें सोहिरोबांच्या तात्काळ ध्यानांत येऊन त्यांनीं महादजींस उद्देशून खालील हिंदुस्थानी पद तेथल्या तेथें रचून ह्मटलें:—

पद—( प्राण्या राम भजावा रे—ही चाल. )

अवधूत! नहीं गरज तेरी ॥ हम् बे परवा फकेरी ॥ धृ० ॥

तूं है राजा मैं हैं जोगी । पृथक पंथका न्यारा ॥
छत्रपती सब तेरेसरिखे । पांव न परे हमारा ॥ १ ॥
तैं दाल्भिबन् हम् झोलीबन् । चार खूट जहागिरी ॥
तीन तालमों दुवाय फिरती । घर घर अलख पुकारी ॥ २ ॥
सोना चांदी हमे नहिं चहिये । अलख भुवनके बासी ॥
महाल मुलुख सब झांट बराबर । हम् गुरुनाम उपासी ॥ ३ ॥
तैं बी डुबे हमे डुबावे । तेरा हम क्या लीया ॥
कहे सोहिरा सुनो महादजी । प्रकाश जोग कमाया ॥ ४ ॥

हें पद ह्मणून सोहिरोबा दरबारांतून चालते झाले. दरबारांतील मंडळीस सोहिरोबांच्या साधुत्वाबद्दल मोठें आश्चर्य वाटलें. वरील पद सोहिरोबांनीं हिंदुस्थानीसारख्या परक्या भाषेंत तेथल्या तेथें रचिलें, यावरून ते शीघ्रकवीही होते असें वाटतें. वरील पदाशिवाय दुसरें एक पद, सोहिरोबांनीं वरील प्रसंगीं ह्मटलेलें प्रसिद्ध आहे. तें येथें देतों:—

पद.

दौलत देख दिवाना मेरी । अपना मौज न करना फेरी ॥ ध्रु० ॥
कोई दिन बनियांके दुकान । कोई दिन पर्वतके ठिकान ॥ १ ॥
तनके करत कारभार । हमारे छत्तिस खिजमतगार ॥ २ ॥
मन पवनकी पागा । सोहं पिलखानेकी जागा ॥ ३ ॥
करम कारखाना । हमारा नशिब जामदारखाना ॥ ४ ॥
जब सोहिरा तख्तपर बैठे । तब सब दुनियां लंडपर बैठे ॥ ५ ॥

वरील दोन्ही पदांवरून व महादजींपाशीं त्यांनीं केलेल्या वर्तनावरून सोहिरोबा प्रपंचासंबंधानें किती पराङ्मुख होते याची चांगलीच कल्पना होते. भरदरबारांत इतक्या स्पष्टपणाचा उपयोग करण्यास मनुष्य केवळ पूर्णावस्थेस पोंचलेला असला पाहिजे, सामान्य माणसांचें तें काम नाहीं, हें उघड आहे.

सोहिरोबांसंबंधानें दुसरी एक आख्यायिका प्रसिद्ध आहे. एके दिवशीं, ग्वाल्हेर येथें, सोहिरोबा आपल्या बिऱ्हाडीं ईश्वरभजन करीत बसले असतां त्यांच्या शांतवृत्तीची परीक्षा पाहण्याच्या हेतूनें कोणीएक गृहस्थ हातांत गुडगुडी घेऊन

त्यांजपाशीं येऊन बसला व निर्लज्जपणानें त्यानें तंबाकूचा धूर सोहिरोबांच्या तोंडाजवळ सोडून त्यांस चिडविण्याचा प्रयत्न केला. परंतु सोहिरोबांस त्याच्या या कृत्याचा राग तर आला नाहींच, परंतु त्याच्या मूर्खपणाबद्दल त्यांस हसूंही आलें नाहीं ते शांतपणानें ह्मणाले:—

पद ( असावरी–त्रिवट )

तुम् अच्छा हुक्का पिना ॥ ध्रु० ॥
ब्रह्मरंध्रमें त्रिकूट चिर्लाम । प्रान अपानसें दमपर दम लेना ॥ तुम् ० १ ॥
अलख तमाखू ग्यान अगनसें । जलकर माया धूर छोड देना ॥ २ ॥
कहत सोहिरा सतसंग धरना । अहंमलीसें नली खलील कर देना ॥ ३ ॥

ही सोहिरोबांची शांतवृत्ति अवलोकन करून त्या हुक्केवाल्या गृहस्थास आपल्या कृत्याची लाज वाटली व त्यानें सोहिरोबांची माफी मागितली.

ग्वाल्हेरींत बरेच दिवस राहिल्यावर सोहिरोबा उज्जनीस आले व तेथें मठ बांधून राहिले. सोहिरोबा उज्जनीस आले त्यावेळीं पहिल्यानें ते एका धर्मशाळेंत उतरले होते. त्या धर्मशाळेंत रात्रीच्या वेळीं, उज्जनींतील 'विठ्ठलाचार्य' नामक एक मनुष्य व 'चंपा' नामक एक गृहिणी स्त्री हीं व्याभिचारास प्रवृत्त होत असत. एका रात्रीं, संकेताप्रमाणें तीं दोघेंही त्या ठिकाणीं प्रविष्ट झालीं असतां, तेथें बसलेले सोहिरोबा त्यांच्या दृष्टीस पडले. त्यावेळीं हा कोणी तरी प्रवासी असेल, अशा समजुतीनें, त्यांनीं त्यांची फारशी पर्वा न करितां आपला व्यवहार पूर्ववत् चालू ठेविला. अशा प्रकारें कांहीं दिवस गेल्यावर तो प्रकार सोहिरोबांच्या लक्षांत आला, व त्यांस त्या पापाचरणापासून परावृत्त करण्याकरितां त्यांनीं पांच पदें रचून विठ्ठलाचार्यास उपदेश केला. ह्या पदांच्या शेवटच्या चरणात 'विठ्ठलाचार्य' 'व श्रीविठ्ठल' या दोघांसही सारखें लागू पडेल अशा रीतीनें 'विठ्ठल' हें पद श्लेषार्थीं योजिलें आहे. सोहिरोबांच्या ह्या सदुपदेशाचा परिणाम त्या पतितांच्या अंतःकरणांवर मुळींच झाला नाहीं. उलट त्यांस सोहिरोबांचा राग आला व आपल्या वाटेंतला हा कांटा काढून टाकावा या दुष्ट हेतूनें, त्या उभयतांनीं सोहिरोबांस शेजारच्या एका विहारींत लोटून दिलें! नंतर योगबलानें सोहिरोबा वर आले, त्यावेळीं विहिरींतील आपल्या स्थितीचें वर्णन त्यांनीं पुढील पदांत केलें:—

१ सोहिरोबाकृत पारमार्थिक पद संग्रह, भाग २ रा, पहिलीं पांच पदें पहा.

पद.

स्थान बरें जलवास । जेथें स्वप्निं नसे खल त्रास ॥ धृ ॥
वर वर पाथर आसन विराजे । स्वार सजे महाराज ।
जलदेवता नवविध कांता । दिव्य सुमनता दे हातास ॥ १ ॥
ज्ञानतोय हें तरणिच पाहे । इतरचि नोहे जें बुडवी ।
'गंगागंगेति यो ब्रुयात्'चें । दे फल साचें हरत भवास ॥ २ ॥
'चंपा' माताऽचार्यीचि त्राता । होतां संगविलास ।
संचित व्यालें निमित्त ठेलें । सहज घडे संन्यास ॥ ३ ॥
ह्मणे सोहिरा शेषशायी हा । झाला विठ्ठलदास ।
खल मित्रासम मानुनि केला । क्षीरसागर हा वास ॥ ४ ॥

दुसऱ्या दिवशीं विठ्ठलाचार्यांनें पाहिलें तों सोहिरोबा पूर्ववत् धर्मशाळेंत आनंदानें बसले आहेत, असें त्याच्या दृष्टीस पडलें. त्या वेळीं तो अत्यंत लज्जा पावला असतां, सोहिरोबांनीं पांचवें पद ह्मणून त्यास पुनः उपदेश केला. ह्या पांचही पदांच्या अर्थाचें उत्कृष्ट विवेचन 'योगिराज सोहिरोबानाथ' या त्रैमासिक पुस्तकांत रा. पै यांनीं दिलें आहे, तें जिज्ञासूंनीं अवश्य वाचून पहावें.

सोहिरोबा उज्जनी येथें असतांना, त्यांचे दोन मुलगे त्यांजबरोबर होतेच, शिवाय त्यांजपाशीं शिष्यसमुदाय बराच जमला होता. उज्जनींत सोहिरोबा सुमारें १० वर्षे होते. पुढें शके १७११ ह्मणजे इसवीसन १७८९ या वर्षाच्या सुमारास, सोहिरोबा एके दिवशीं, मठांतून जे एकटेच बाहेर पडले ते फिरून कोणाच्या दृष्टीस पडले नाहींत. ते कोठें गेले किंवा त्यांची काय अवस्था झाली यासंबंधानें कांहींच माहिती मिळत नाहीं. त्यांच्या मुलांनीं व शिष्यमंडळीनें पुष्कळ शोध केला, परंतु कांहींच पत्ता लागला नाहीं.

साधुशिरोमणी तुकारामबुवांच्या निधनासंबंधानें जसें गूढ आहे, तसाच प्रकार सोहिरोबांच्या प्रयाणकालासंबंधानें आहे. वर लिहिल्याप्रमाणें, ज्या दिवशीं सोहिरोबा मठांतून कायमचे निघून गेले किंवा गुप्त झाले, त्या दिवशीं त्यांच्या बिछान्यावर त्यांच्या शिष्यमंडळीस पुढील पद मिळालें:—

'दिसणें हें सरलें । अवघें प्राक्तन हें मुरलें ॥ धृ० ॥
आलों नाहीं गेलों नाहीं । मध्यें दिसणें हे भ्रांति ।
जागृत होतां स्वप्नची हरपे । कर्पुरन्यायें जग हरलें ॥ १ ॥

दिसणें हाचि जन्म योगिया । ना दिसणें हा मृत्यु ह्मणा ॥
गैबिप्रसादें गैबचि झालें । आपआपणामधें लपलें ॥ २ ॥
मच्छिंदर गोरख जालंधर हे । न्याया आले स्वस्वरूपीं ।
जातां जातां गमनग्राम तें । समूळ कोठें ना गमलें ॥ ३ ॥
ह्मणें सोहिरा सत्रा चवदा । मधु मासाच्या नवम दिनीं ।
सगुण स्वरूपीं निर्गुण ठेलें । अनुभव हरले स्वरुप कळे ॥ ४ ॥

ह्या पदावरून आपण ब्रह्मांत लीन होत आहों, हें सोहिरोबांस शेवटीं कळलें होतें, असें स्पष्ट दिसतें, मागें रंगनाथ स्वामीवरील निबंधांत तुकाराम बुवांच्या निधना-संबंधानें रंगनाथस्वामीचें एक पद दिलें आहे, त्यांतील कल्पना व वरील पदांतील कल्पना अगदीं सारख्या दिसतात. असो, एकंदरींत सोहिरोबांनीं, उज्जनी येथें, शके १७१४ चैत्र शुद्ध नवमी ( किंवा दशमी ) या दिवशीं आपली ' काया ब्रह्म केली ' असें मानण्यास हरकत नाहीं. सोहिरोबा मठांतून शेवटीं बाहेर पडले त्यावेळीं त्यांचें वय सुमारें ८० वर्षांचें होतें. पुढें सोहिरोबांचे दोन्ही मुलगे उज्जनी येथेंच मरण पावले. सोहिरोबांचें चरित्र येथें संपलें.

सोहिरोबा हे केवळ टाळकुटे साधु नव्हते. त्यांचें ज्ञान शुद्ध, व वैराग्य कडकडीत होतें. त्यांची वृत्ति उदासीन, निस्पृही, निरिच्छ, निरभिमानी व नेहमीं ब्रह्मानंदांत निमग्न अशी असे. हे समाधि लावून बसले असतां तीन तीन चार चार दिवस तसेच बसत असत असें सांगतात. ते केवळ निराकार परब्रह्मस्वरूपी ईश्वरास भजत व त्यांचे उद्गारही सर्वत्र याच मासल्याचे आहेत. तथापि त्यांनीं शिव, राम, कृष्ण, विठ्ठल वगैरे अवतारपुरुषांविषयींही आपला भक्तिभाव पुष्कळ ठिकाणीं प्रगट केला आहे. परंतु एकंदरींत सगुण भक्तीपेक्षां निर्गुणभक्तीकडे त्यांचा ओढा विशेष होता यांत संशय नाहीं. ते योगी व पूर्ण वेदांती असून खऱ्या साधूचीं सर्व लक्षणें त्यांच्या आंगीं होतीं. अक्कलकोट, सुरत व उज्जनी या ठिकाणीं सोहिरोबांचे मठ अद्याप असून, त्यांची स्थिति चांगली आहे असें समजतें.

सोहिरोबांनीं आपली कविता भारतभागवतादि पुराण ग्रंथांच्या आधारानें

---

' दशम ' असाही पाठ आहे.

लिहिलेली नाहीं. ती केवळ स्वानुभवयुक्त व स्वतंत्र अशी असून, योग, भक्ति, ज्ञान, वैराग्य इत्यादि पारमार्थिक विषयांनीं परिपूर्ण आहे. केवळ काव्य या दृष्टीनें पाहणारास ती विशेष मनोल्हादक होईल असें वाटत नाहीं, परंतु अध्यात्म विषयांची ज्यांस आवड आहे, त्यांस त्या कवितेच्या वाचनानें पाहिजे तेवढा आनंद करून घेतां येईल. सोहिरोबांस मराठी भाषेचें उत्तम ज्ञान असन संस्कृत व हिंदुस्थानी या दोन भाषांचा त्यांचा बराच अभ्यास होता असें त्यांच्या कवितेवरून दिसतें. सोहिरोबांच्या कवितेसंबंधानें अर्वाचीन भगवद्भक्त व रसिकशिरोमणी विठोबा अण्णा दप्तरदार यांनीं काढिलेले उद्गार या चरित्राच्या आरंभींच दिले आहेत. कै. वामन दाजी ओक या थोर गृहस्थांनीं सोहिरोबांच्या कवितेसंबंधानें असें ह्मटलें आहे. "सोहिरोबांच्या कवितेंत जीं अशुद्धें आढळतात त्याबद्दल कवि दोषास पात्र नाहीं, कारण सोहिरोबानें केलेले ग्रंथ, पदें, इत्यादि वाङ्मय अन्य लोकांकडून लिहविलेलें आहे. लेखकांस भाषेचें अज्ञान असल्यामुळें त्यांनीं कानांवर शब्द आले ते कसेतरी लिहून ठेविले आहेत; बरें कवीनें तरी आपण सांगितल्याप्रमाणें लेखकानें ठसा उमटविला आहे कीं नाहीं हें पाहिलें पाहिजे होतें, परंतु सोहिरोबांची वृत्ति यासंबंधानें उदासीन होती. त्यांना हठयोगाची पूर्ण सिद्धि झालेली होती; ब्रह्मानंदाचे वेळीं जे उद्गार आले ते ते बोलून चुकले; पुनः त्यासंबंधाच्या नीटनेटकेपणाकडे लक्ष्य पुरविण्याची त्यांस गरज नव्हती. सोहिरोबांची कविता ही त्यांनीं केलेली कविता नव्हे; ही त्यांचेकडून स्फूर्तिप्रभावानें झालेली कविता होय. भाषेच्या संबंधानें कवीलाच अज्ञान होतें असें ह्मणावें तर जी या कवीची कृति उपलब्ध झाली आहे, तीवरून पाहतां सोहिरोबांस भाषापरिज्ञान चांगलेंच होतें असें वाचकांस वाटल्याविना राहणार नाहीं. तसें नसतें तर त्यांच्या उक्तीचा एवढा ठसा उमटलाच नसता असें आह्मांस वाटतें. सोहिरोबांची कविताकृति इतर कविकृतीहून अगदीं भिन्न प्रकारची असून केवळ स्वानुभवयुक्त अशी स्वतंत्र आहे. तींत भारतभागवतादिक कथानकसंबंध मुळींच नसून केवळ भक्ति, ज्ञान, वैराग्य, नीति इत्यादिकांचा समावेश आहे; ह्मणून यासंबंधानें इतकी सूचना देणें अवश्य आहे कीं, ही कविता केवळ शब्दालंकार, वाक्यालंकार, अर्थालंकार, तसेंच छंदःशास्त्र, व्याकरण इत्यादिक नियमानुरूप ताडून पाहणाऱ्या जनांस आनंददायिनी वाटणार नाहीं. परंतु भक्ति, ज्ञान, वैराग्य इत्यादि प्रकारानुरूप ही कविता अवलोकन करणाऱ्या जनांस आनंददायिनी वाटल्याविना राहणार नाहीं, अशी आमची समजूत आहे. आर्वाचीन सुप्रसिद्ध

भगवद्भक्त कविवर्य विठोबा अण्णा दप्तरदार यांनीं सोहिरोबांची बहुतेक कविता लक्ष्यपूर्वक पाहिली होती व ते तिला फार मान देत असत, तो, या कवितेंत ज्ञानमार्ग विशेष याच गुणांमुळें होय. अण्णासारख्या भक्तिशील आणि विद्वान् पुरुषानें ज्या कवितेविषयीं इतका गौरव केला आहे, त्या कवितेंत कांहीं तरी सत्यत्वांश आहे यांत संशय नाहीं. ”

सोहिरोबांनीं पुष्कळ कविता लिहिलेली आहे आणि ती सर्व अगदीं सहज लिहिल्यासारखी दिसते. त्यांचे मोठमोठे ओंवीबद्ध ग्रंथ पांच आहेत, ते हे:-( १ ) अक्षयबोध, ( २ ) महदनुभवेश्वरी, ( ३ ) पूर्णाक्षरी, ( ४ ) अद्वयानंद आणि ( ५ ) सिद्धांतसंहिता. यांशिवाय चित्सुखानंद या नांवाचा सोहिरोबांचा आणखी एक ग्रंथ आहे असें समजतें. परंतु तो अद्याप उपलब्ध झाला नाहीं. सोहिरोबांचीं पदें रागतालबद्ध असून भक्ति, वैराग्य, वेदांत इत्यादि विषयांनीं परिपूर्ण व फारच प्रेमळ आहेत. तीं एकाच ठिकाणीं मिळण्यासारखीं नसून गोंवें प्रांतांत सर्वत्र व दुसऱ्याही पुष्कळ ठिकाणीं पसरलेलीं आहेत. त्यांची संख्या अमुकच होईल हें जरी पूर्णपणें सांगवत नाहीं, तरी महाराष्ट्रभाषेंत व हिंदुस्थानीभाषेंत मिळून अजमासें संख्या ४००० होईल असें ह्मणतात. सोहिरोबांस गाण्याचें अंग उत्तम असल्यामुळें त्यांनीं सर्व पदें उत्तम रागरागिणीवर बांधलेलीं आहेत व तीं गायकजनांच्या ह्मणण्यांत वरचेवर येतात. शिवाय सवाया, श्लोक, अभंग, आरत्या, कटिबंध, वगैरे फुटकळ कविताही पुष्कळ आहे. सोहिरोबांनीं एक उत्कृष्ट बखर लिहिली आहे, ती ‘ सोहिरोबांची बखर ’ या नांवानें प्रसिद्ध असून तींत देहाचे रचनेसंबंधानें उत्कृष्ट विवेचन केलें आहे. यावरून सोहिरोबांनीं मराठी वाङ्मयांत केवढी भर घातली आहे याची सहज कल्पना होईल. हल्लीं ‘ योगिराज सोहिरोबानाथ ’ या नांवाचें एक त्रैमासिक पुस्तक रा. रा. भगवंत बाळकृष्ण पै हे प्रसिद्ध करीत आहेत, त्यांतून सोहिरोबांची सर्व उपलब्ध कविता छापून निघत आहे. रा. पै यांचे महाराष्ट्रजनांवर हे मोठे उपकार आहेत.

सोहिरोबांनीं आपला पहिला ग्रंथ ‘ अक्षयबोध ’ हा सावंतवाडी येथें शके १६७१ च्या वर्षीं रचिला. त्या ग्रंथाच्या शेवटीं सोहिरोबा ह्मणतात:—

‘ आज्ञानाचियें वाचे करवीं । बोलविलें पूर्ण ज्ञान अनुभवी ॥
एकीं एक सोहिरा नांवीं । लेखन केलें ॥ १ ॥

अभिधानें स्थळ वाडी ॥ ग्रंथ लिहिला आवडीं ॥
निजसुखाची वाडी । वाढिली पुढें ॥ २ ॥
शके सोळाशें एकाहत्तरीं । शुक्लनाम संवत्सरीं ॥
तद्दिनीं ग्रंथ निर्धारीं ॥ संपला जाण ॥ ३ ॥

या ग्रंथांत सोहिरोबांनीं केवळ स्वानुभवयुक्त असा उत्तम परमार्थ बोध केलेला आहे. याचीं आठ प्रकरणें आहेत व ओंवीसंख्या सुमारें ५०० आहे. हा ग्रंथ छापून प्रसिद्ध झालेला आहे. या ग्रंथांतील कांहीं वेंचे पुढें देण्यांत येतील. दुसरा ग्रंथ 'महदनुभवेश्वरी' हा प्रचंड वेदांतपर ग्रंथ शके १६७२ या वर्षीं रचिला. हा ज्ञानेश्वरीच्या धर्तीवर लिहिलेला, परंतु, ज्यांत कवीनें केवळ स्वानुभवाची गोष्ट मात्र सांगितली आहे असा असून याचे अध्याय १८ व ग्रंथसंख्या सुमारें ९०२२ आहे. हा ग्रंथ हल्लीं छापत आहे. तिसरा ग्रंथ पूर्णाक्षरी हा शके १६७३ या वर्षीं रचिला. यांत साधूचीं सर्व लक्षणें विस्तारपूर्वक सांगितलेलीं असून याची ओंवीसंख्या ५०० आहे, हा ही ग्रंथ अद्याप अप्रसिद्ध आहे. चौथा ग्रंथ 'अद्वयानंद' हा शके १६७५ या वर्षीं रचिला आहे. हा ग्रंथ वेदांतपर असून याचीं प्रकरणें १० व ग्रंथसंख्या १००० आहे. पांचवा ग्रंथ 'सिद्धांतसंहिता' हा शके १६७८ या वर्षीं लिहिला, याचे अध्याय १८ असून ओंवीसंख्या ४९४१ आहे. यांत मूळ संहितेच्या संस्कृत श्लोकावर मराठी ओंवीबद्ध टीका आहे. हा ग्रंथ रचण्यांत कवीनें आपल्या ज्ञानाची पूर्ण सीमा दाखविली आहे. हा ग्रंथ छापून प्रसिद्ध झाला आहे.

आतां सोहिरोबांच्या काव्यमृतसिंधूंतील कांहीं कण रसिक व प्रेमळ वाचकांपुढें ठेऊन हें चरित्र संपवितों.

सोहिरोबा जरी निर्गुणोपासक होते तरी सगुणोपासनेसंबंधानें त्यांनीं आपला अनुकूल अभिप्राय दिलेला आहे. भक्तिसंबंधानें ते लिहितात:—

ओंव्या.

'आतां भक्तीचा प्रसंग । गुरू बोलती यथासांग ।
जेणें पाविजे अव्यंग । आत्म विषयींचें ॥ १ ॥
जे हे भक्तीचेनि महिमे । निजसुख पाविजे अनुपमे ॥
ह्मणोनि जाणावी उत्तमें । मुमुक्षीं हे ॥ २ ॥

भक्तिभाव बहुतां रीतीं । जे कल्पनेनें भाविती ॥
कवण एक आराधिती । विषयसुखा कारणें ॥ ३ ॥
त्रिषय विषया भिन्नपण ॥ एक मागती निर्वाण ॥
पावोनियां सहजखुण । सुखें असो ॥ ४ ॥
ऐसें एक कल्पिती ॥ निजसुखीं रमती ॥
चुकविती पुनरावृत्ति । जन्ममरणांची ॥ ५ ॥
एक दृश्य दृष्टीचेनियोगें । ऐश्वर्य नाशवंत मागे ॥
पुनर्जन्माचेनि योगें । अवगतसे ॥ ६ ॥
सगुणाचि रूपासि येउनी ॥ निर्गुण परिक्षिजे निदानीं ॥
तरीच देहभावभंजनीं । दृष्टि चढे ॥ ७ ॥
भक्तिभावाचिये वेळे । मानस व्हावेंचि कोंवळें ॥
तें परब्रह्म कोंवळें । अनुभवावें ॥ ८ ॥
पडतां भक्तीचिये गळें । व्हावें अहंकारा वेगळें ॥
निजतत्व निराळें । दृष्टी दिसे ॥ ९ ॥
भक्तीचें प्रेम गोड । पुरते निवृत्तिची कोड ॥
आत्मसुखाची चाड । लागते जहीं ॥ १० ॥ अक्षयबोध.

सोहिरोबा वैराग्यनिरूपण करितातः—

" वैराग्य तरी बहुतांपरी ॥ ऐकपां निजनिर्धारीं ॥
दृष्टी भेदल्यावीण अंतरीं ॥ नव्हेचि तें वैराग्य ॥ १ ॥
अंतर दृष्टीविण ॥ वायांचि वैरागी होती निपुण ॥
तरी तें मूढपणाचें लक्षण ॥ सांगतों ऐक ॥ २ ॥
एक त्यागिती अन्न ॥ एक सेविती महावन ॥
एक लटिकेंचि करिती ध्यान ॥ डोळे झांकोनी ॥ ३ ॥
एक न शिवती वस्त्रीं ।. एक टाकिती स्त्री ॥
परी त्यातें चरित्री ॥ सोडीचना ॥ ४ ॥
एक न घेती धन ॥ बाह्यवृत्तीचें धरिती बंधन ॥
परी अंतर बंधविच्छेदन ॥ नाकळे जया ॥ ५ ॥
एक बोलती तीव्र प्रकारें ॥ विषयभोगातें निर्धारें ॥
एक मंजुळ बोल बोलुनी उत्तरें ॥ दाविती वैराग्य ॥ ६ ॥

एक उदासी नचि बोलती ॥ एक मग्नभावें मिरविती ॥
परि तयां नव्हिजे प्राप्ति ॥ निजसुखाची ॥ ७ ॥
एक नग्न फेरे करिती ॥ एक जटा मोकळीया सोडीती ॥
परी निजवर्म न कळतां करिती ॥ व्यापार ते गा ॥ ८ ॥
एक रखा लाविती वायां ॥ एक दंडिती काया ॥
परी आत्मकळा शिष्यराया ॥ न गमेचि कदां ॥ ९ ॥
आत्मकळा जाणीतलिया ॥ आणि कवणही वेशें विरुढलिया ॥
शोभा पावे वहिलिया ॥ निजतत्वीं ॥ १० ॥
निजतत्व पावलियाची खूण ॥ ते अनारिसी आहे जाण ॥
जये वृत्तीसी कडे विकडीपण ॥ नाहींच कदां ॥ ११
तया पुरुषाचें लक्षण ॥ स्फटिक शिळेपरी जाण ॥
उपाधीपणें जो जो गुण ॥ तो तो दिसे तया लागीं ॥ १२ ॥
तैसा तो आत्मबोधी ॥ शांति क्रोधाची नसे अवधी ॥
क्रोध शांति हे द्विविधबुद्धि ॥ न परिक्षे जो ॥ १३ ॥
तो क्रोधी ह्मणतां क्रोधी नव्हे ॥ शांत दिसतां शांत नव्हे ॥
ययापरी आहे ॥ अतर्क्यपणीं जो ॥ १४ ॥
ऐसेयापरी कवणही वर्णीं । असेल जो निज निर्वाणीं ॥
तोचि एक वाखाणीं । तत्ववेत्ता ॥ १५ ॥
आपण नोळखतां आचरण । तें अवघें उदरपोषण ॥
तयालागीं जाण । व्यापार तेची ॥ १६ ॥
स्वधर्म सोडुनी दुजें करणें । तें तयासी नागवणें ॥
संसारेंसीं विटंबणें । संसारांत ॥ १७ ॥
स्ववर्ण सांडुनि दुजा वर्ण । धरणें हें अश्लाघ्यपण ॥
न पवेचि तों निज खुण । आत्मतत्वाचि ॥ १८ ॥
अरे आत्मस्वरूप नोळखतां । आणि कर्मालागीं प्रवर्ततां ॥
माता पिता नकळतां । पोर जैसा ॥ १९ ॥
मुर्खा बोले अध्यात्म गोष्टी । परी अनुभवीं न पविजे दृष्टी ॥
तयाची जे शब्दवृष्टि । आश्लेशामेघासारिखी ॥ २० ॥ असत्यबोध

सोहिरोबांनीं, ब्रह्माचें वर्णन, खालील ओव्यांत दिलें आहे:-

" जेंवीं घटीं व्यापिजे आकाश । आणि घट पावलिया नाश ॥
उरलाचि असे अवकाश । जया परी ॥ १ ॥
शिवुनि सोवळा पवन । पोळुनि गुप्त हुताशन ॥
तेंवी सर्व निरसूनी निदान । उरे जें कां ॥ २ ॥
सर्व सेवितां न भरे रसना । सर्व श्रवणीं शून्य श्रवण ॥
सर्व देखत अंधत्व नयनां । होये जेथें ॥ ३ ॥
स्पर्श करितां निर्जिवा । उपरमेचि अनुभवा ॥
चरण घेती मांघौवा । प्रतिबिंब वाटे ॥ ४ ॥
उत्पत्तीचा हर्ष नाहीं । उद्वेग नुपजे प्रलयीं कांहीं ॥
गर्जत असतां अचल पाहीं । समुद्र जैसा ॥ ५ ॥
कठिणत्व दावुनि शीतळ । उदक जैसें निर्मळ ॥
कीं न हाले जेंवीं भूमंडळ । भूतोत्पातीं ॥ ६ ॥
जें अवयवांवीण स्वरूप । कीं वातीं विरहित दीप ॥
अतींद्रिय निष्कंप । परब्रह्म ॥ ॥ ७
आकार झालिया न होय । आकार लोपतां न जाय ॥
अविनाशपणें नित्य आहे । ते गा ! वस्तु ॥ ८ ॥
जेथ पाहतें पाहणें मावळलें । गगन सर्वांगीं गाळिलें ॥
नाशिवंत ह्मणोनि वाळिलें । दिसतें दृश्य ॥ ९ ॥
तेंवीं सर्व काळीं जें आहे । तेंचि निरंजन पाहें ॥
दृश्यदृष्टीस दिसेना हें । तेंचि जाण ॥ १० ॥
जयासि नाहीं आदि अंत । तेंचि निरामय सिद्धांत ॥
स्वानुभवें साद्यंत । जाण ऐसें ॥ ११ ॥
जेथ पैं पंचभूतें नाहीं । गुणत्रय लेश कांहीं ॥
तें पद परात्पर पाहीं । अर्थेवीण ॥ १२ ॥
क्षुधा नाशिवंत सेवी । ते रसना घेतसे चवी ॥
ते चवीची चवी बरवी । घेतसे जो कां ॥ १३ ॥

हें नित्यतृप्ताचें लक्षण । निरोपचारें तृप्त जाण ॥
स्वसंवेद्य संतुष्टपण । निरंतर ॥ १४ ॥
अविद्येचा आवर्त । जेथ न बाधे विवर्त ॥
सुटे जेथ पैं सांगात । गुणत्रयाचा ॥ १५ ॥
तें जाणावें निर्गुण । जेथ कुंठलें वेदवर्णन ॥
ते स्वयें जाणती खुण । योगेश्वर ॥ १६ ॥
अनंत रूपीं अनंत कळा । अनंत भजनें अनंत लीळा ॥
जयाचिया मुळीं निराळा । द्रष्टा जो कां ॥ १७ ॥
ऐसा जो कां परमेश्वर । परात्पर गुरु दिगंबर ॥
स्वयंप्रकाशें अंबर । व्यापुनि आहे ॥ १८ ॥
ऐसें जें कां शाश्वत ॥ अव्ययपद सदोदित ॥
न कळे मन बुद्धीस मात ॥ तेथील पैं ॥ १९ ॥
सर्व संसार भासला तरी ॥ सर्प जैसा दोरावरी ॥
तेंवीं स्थूल सूक्ष्म परी ॥ आभास पैं गा ! ॥ २० ॥
त्रिविध तापीं श्रम झाले । मुमुक्षु वीतरागा आले ॥
ईश्वरें संतुष्ट केले । निजात्मबोधें ॥ २१ ॥
त्रैलोक्या जेथुनी उद्भव । तो अनादि देवांचा देव ॥
देऊं पसरला खेंव । बाहुविणा ! ॥ २२ ॥

वरील उताऱ्यावरून, सोहिरोबांच्या वर्णनशैलीची योग्यता, त्यांचें अध्यात्मनिरूपण-पटुत्व व उपमाप्रचुरत्व इत्यादिकांसंबंधानें वाचकांची सहज खातरी होईल. सोहिरोबा अर्वाचिन कवि असतांही त्यांच्या कवितेंत ज्ञानेश्वरींतल्या शब्दांसारखे बरेच जुने व कठिण शब्द आढळतात:—

कर्मकांड व जातिभेद यांसंबंधानें सोहिरोबांचे विचार पुष्कळच पुढें गेलेले दिसतात.

" स्नान संध्या कर्मठपण । जेथ नाहीं प्रयोजन ॥
जेथ नाहीं स्थान मान । लक्ष अनुसंधान तेथें कैंचें ॥ १ ॥
वृथा आघवें मंत्र तंत्र । मिथ्या माया विचित्र ॥
सेवट उरे एक चिन्मात्र । तें ब्रह्म जाण निरंजन ॥ २ ॥

मनुष्ययोनिआंत । ब्राह्मण क्षत्रिय वैश्य ह्मणतात ॥
शूद्राचरणी बोलत । शूद्र ऐसा ॥ ३ ॥
सर्वघटीं एक ज्योति । त्यासि कैंची कुळयाती ॥
योगी जेथ तद्रूप होती । तें ब्रह्म जाण निरंजन ॥ ४ ॥

मूढ असे मनुष्यप्राणी संसारतापत्रयांत दुःख भोगीत पडलेले पाहून सोहिरोबांच्या हृदयास पाझर फुटून त्यांनीं खालील उद्गार काढिले आहेत:—

" केवळ जीव जे कां मूढ । अज्ञान जैसे दगड ॥
घेउनी उठती पाषांड । भलतेंची ! ॥ १ ॥
जे वैराग्याचिया शिवे । पावतीच ना कीं स्वभावें ॥
विवेकाचिया नांवें । झुरती सदां ॥ २ ॥
विरक्ति कैसी नेणती । विषयांसाठीं पैं शिणती ॥
दुःखचि आघवें जिणती । निसूकपणें ॥ ३ ॥
नेणती मोक्षाचें साधन । करिती संसारआराधन ॥
सदोदित अवधान । निंदेमाजी ॥ ४ ॥
जे परम चिंतेनें व्यापिले । अज्ञानभूतानें खोपिले ॥
आत्मज्ञानें पैं लोपिले । अन्यथा ज्ञानी ॥ ५ ॥
ऐशियांतें मोक्षासाठीं । बहुत पडली आटाआटी ॥
लाभेल न लाभेल शेवटीं । कवण जाणे ? ॥ ६ ॥

सोहिरोबा ह्मणतात, बरें अशा लोकांनां कर्मधर्मसंयोगानें एखादा साधु भेटलाच, तर तो साधु आहे हें ओळखण्याची त्यांना अकल नसते, कारण त्यांची साधुत्वाची व्याख्याही विलक्षणच असते:—

" सर्व प्राणीयां अन्न व्हावें । त्याणें निराहार असावें ॥
सर्वांचेंचि सोसावें । निंदिती तें ॥ १ ॥
कांहीं चमत्कार असावा । तरीच साधु ऐसा ह्मणावा ॥
न्यून पदार्थ तो द्यावा । मागेल त्या ॥ २ ॥
फुटला डोळा फिरोनि द्यावा । गेला जीव मागुती यावा ॥
दारिद्र्य आलिया वैभवा । द्यावें त्याणें ॥ ३ ॥

वचनें त्याच्या रोग जावा । वांझेसि पैं पुत्र द्यावा ॥
ऐसें असेल तरीच ह्मणावा । समर्थ ऐसा ! ॥ ४ ॥
जयाचिया मनीं ऐसें वसे । ऐसियासि साधु कैसेनि दिसे ? ॥
बहुतेकां पिसें । ऐसेंसि असे पैं ॥ ५ ॥

खऱ्या सत्पुरुषाचें लक्षण सोहिरोबा सांगतात :—

" स्फटिकामाजी हिरा । पारखिजे जेंवि पुरा ॥
तेंवी साधु सर्व नरां—माजी श्रेष्ठ ॥ १ ॥
जो सर्व घटीं एकचि पाहे । निरंजन वनीं नित्य राहे ॥
जो प्रपंचीं नसोनि आहे । उदासीन ॥ २ ॥
साधक जनांचा उद्धार करी । अज्ञानाचा पाड न धरी ॥
ज्ञानकळा जागृत करी ॥ हृदयामाजी ॥ ३ ॥
जो आत्मज्ञानाचा समुद्र । अद्वयकुमुदिनीचंद्र ॥
अत्यंत प्रळयीं रुद्र । केवळ पैं गा ! ॥ ४ ॥

सोहिरोबांचे सर्व ग्रंथ अशा प्रकारच्या अध्यात्मज्ञानानें भरलेले आहेत. सोहिरोबांनीं अद्वैतासंबंधानें पुष्कळ ठिकाणीं फार चांगला विचार केलेला आहे, योगासंबंधानें विस्तृत माहिती दिलेली आहे व मनुष्यदेहाचें सार्थक जेणेंकरून होईल असे सुलभ मार्ग दाखवून दिलेले आहेत; परंतु त्यांच्या ग्रंथांची योग्यता केवळ थोडेसे वेंचे येथें दिल्यानें ध्यानांत यावी तशी येणार नाहीं, याकरितां ज्या कोणास अध्यात्मज्ञानाची अपेक्षा असेल त्यांनीं सोहिरोबांचे ग्रंथ समग्र वाचून त्यांचा अभ्यासच केला पाहिजे.

सोहिरोबांची पदें तर फारच प्रेमळ व प्रासादिक असून मनावर परमार्थाचा ठसा उमटविणारीं आहेत. त्यांचीं कांहीं निवडक पदें येथें देतों.—

पद. ( हमीर त्रिवट. )

वंदियला भगवंत । तो म्यां ॥ ध्रु० ॥
भवसिंधुतारक । निजसुखकारक । सकळां आदि अंत । तो० ॥ १ ॥
सज्जनरंजन । अखिल निरंजन । भक्तजनां कृपावंत ॥ २ ॥
वेद झाले मुके । शेष न स्तवुं शके । ज्याचें रूप अनंत ॥ ३ ॥
नव्हे नरनारी । गैबी सूत्रधारी । हालवि जो जिवजंत ॥ ४ ॥
ह्मणे सोहिरा अनुभवें पहाणें । चित्सुखवनवसंत ॥ ५ ॥

पद. ( काफी दीपचंदी. )

भगवान भवार्णव तारी । अनन्यंगति शरणांगतवत्सल
भक्तजनां कैवारी ॥ धृ० ॥
पुण्यश्लोक जे धर्मपरायण । संस्थापन जो करी ॥
दुष्ट दानव मारी तो हा । युगायुगीं अवतारी ॥ १ ॥
काया माया नयेचि आया । निर्गुण पाया ज्याचा ॥
सर्व खेळ हा त्याचा विश्व हें । विचित्र चित्र चितारी ॥ २ ॥
परम प्रीति आभारी संभुत । संभव हा संभारी ॥
ब्रह्मांड उभारी ब्रह्मा हरिहर । सुरनर उरगां भारी ॥ ३ ॥
ह्मणे सोहिरा पतितपावनदीनदयाघन । गुप्त गहन आकारी ॥
सज्जनजनमन मोहन हा । जगजीवन दीनोद्धारी ॥ ४ ॥

पद. ( घ्या हरिच्या नामा—या चालीवर )

तो भगवंताचा दास । ज्याचें मनचि नित्य उदास ॥ धृ० ॥
टाकुनियां खेदास । न भुले मांस आणि मेदास ॥
निरसुनियां भेदास । अक्षय पावे ब्रह्मपदास ॥ १ ॥
जेंवी भुजंग हा नादास । किंवा चकोर हा चांदास ॥
चिंतनिं देव पावे सदास । सच्चिदानंदास ॥ २ ॥
शास्त्रें नलगेचि शोधास । किंवा प्रवर्तेना वादास ॥
जेवीं भ्रमर आमोदास । सेवी सुमन मकरंदास ॥ ३ ॥
कोठें न पवेची बंदास । जो कां देखे मूलकंदास ॥
नित्य आठवी गोविंदास । लागे भजनाच्या छंदास ॥ ४ ॥
न करी विषयाची आस । सोहिरा ह्मणे हे बरदास ॥
योग्य जो सद्गुरुच्या वरदास । न चुके आपुलिया ब्रीदास ॥ ५ ॥

पद ( सारंग—धुमाळी )

भगवंत दाता । स्वामी तो आठवि आतां ॥ धृ० ॥
परमानंद प्रकाशवंत । जो कां ध्याती अखंड संत ॥
धरुनी जाती निर्गुण पंथ ॥ अंतरसाक्ष हें लाउनिया लय दक्ष होऊनी
मोक्ष सुखाला सहज समाधी राहतां ॥ भगवंत० ॥ १ ॥ जेथुनि

झाली सकळ सृष्टि ॥ याचा कर्ता न दिसे दृष्टी ॥ ह्मणुनि होतें मन हें कष्टी ॥ ऐकुनि अवघ्या ग्रंथीं गोष्टी ॥ स्थावर जंगम नाना लीला विचित्रवर्णी शोभत धरणी तापत तरणी अगम्य करणी चरित्र हें पहातां ॥ २ ॥ ह्मणे सोहिरा आंगीं जडला ॥ आधींच आहे नव्हे घडला ॥ प्राणी हा संदेही पडला ॥ उपाधींत सांपडला ॥ त्याचे दृष्टी ईश्वर दडला ॥ ऐसा वेदांतीं निवडिला ॥ तो हा व्यापक आत्मा अंतरसाक्षी परिपूर्ण सनातन गोड दिसे गातां ॥ भगवंत० ॥ ३ ॥

वरील पदांत सोहिरोबांनीं ईश्वराच्या अस्तित्वाविषयीं थोडक्यांत पण किती उत्कृष्ट विवेचन केलें आहे बरें ?

## पद. ( झुमाळी )

आतां तरि सोडीं रे हा संग । जनिं वनिं हो निःसंग ॥ धृ ॥
विषयसंयोगें धरिसी सोंग, दुःखेंचि होसी दंग ॥
अभ्र साउली जेंविं बाहुली, बेगडिचा हा रंग ॥ १ ॥
परनारींसी करूनि परती, आवरिं हा किं अनंग ॥
ब्रह्मरसाचे भावाविण रज, तमें होय जिव वंग ॥ २ ॥
योगाभ्यासें करूनि साधीं, बैठक पवन तुरंग ॥
धांवे जेथ किं तेथ धरावा, हा मन चपल कुरंग ॥ ३ ॥
नसोनि दिसतें केवळ जग हें, मृगजळिंचें कीं तरंग ॥
चिद्भानु हा कारण आत्मा, पहा तूं कीं अंतरंग ॥ ४ ॥
ह्मणे सोहिरा निर्गुण ध्यानिं नये तरी स्मरीं, सांवळी मूर्ति सुरंग
वैकुंठपति हा व्यापक विष्णु, अवघाचि कीं श्रीरंग ॥ ५ ॥

## पद ( भैरवी–त्रिवट )

प्राण्या ! तुझा परिणामीं कठिण प्रकार ॥ धृ० ॥
न करिसि भजन । न करिसी पूजन ॥
नाहिं तुला आत्मज्ञानाचाही अधिकार ॥ प्राण्या० ॥ १ ॥
तुला संत भेटेल कोठिंचा ॥ परि लाभ नाहीं भेटिचा ॥
शिकविल्या बोला देसी । वेंठिचा हुंकार ॥ प्राण्या ॥ २ ॥

तुला याद नाहीं आदली । कल्पना हे तुज बाधली ॥
नाहीं योगारण्यीं साधली । मनमृगाची शिकार ॥ ३ ॥
आपणामाजी थोर । परि तूं देवापाशीं चोर ॥
अवघा पदरीं बांधुनि घोर । करिशी लटकी लकार ॥ ४ ॥
ज्याचें तुजपाशीं काज । तुला ह्मणती ते महाराज ॥
होय होय जी जी करूनी । करिती जयजयकार ॥ ५ ॥
अधःपदा घाडील । शेखीं पेंचा पाडील ॥
दोहींकडे नाडील । स्थूळ बुद्धिचा अहंकार ॥ ६ ॥
सोहिरा ह्मणे झांकळसी । जन्ममरणा आकळसी ॥
जोंवरि अंतर दृष्टीं नोळखशी । ब्रह्म निराकार ॥ ७ ॥

पद ( धुमाळी )

अशाचि खालीं गेला प्राण्या जन्म तुझा व्यर्थ ॥
कवण मी हा कोठिल तुजला नकळे परमार्थ ॥ धृ० ॥
अरूप आत्मा ब्रह्मस्वरूपीं नलगे लक्षांश ।
अनेक शास्त्राभ्यासें तुजला प्रियकर वाच्यांश ॥
जितुकी विद्या तितुका वृत्तिचा आढळतसे अंश ।
परतुनि दृष्टि न पाहे नाथ संकेतीं चिदंश ॥ १ ॥
ऋद्धि सिद्धी गारुड पाहतां लाभ काय तुजला ।
प्रमाण मानुनि देह केवळ भुलसी धातूला ॥
अंतरिं ज्ञानप्रवेश न होय नाशाचि हा तुला ।
अमुक ऐसा न कळे तुजला चाळक आंतुला ॥ २ ॥
गगनवनाचे ठायीं न होय मन हें विश्राम ।
संकट वाटे मोठें सोडितां इंद्रियग्राम ॥
तीर्थें व्रतें दान धर्मही तितुकीं सकाम ।
निरालंब हें निर्गुण येणें न मिळे निजधाम ॥ ३ ॥
ह्मणे सोहिरा कणासि टाकुनि उपणीसी कोंडा ।
आत्मज्ञानीं अनावडी जशि अवरूची तोंडा ॥
माया नदिचा हा तुजवरती आलासे लोंढा ।
वाहत वाहत जाशिल तेथें प्राप्त नव्हे धोंडा ॥ ४ ॥

पद. ( भैरव–त्रिवट )

विसरूं नको तो देव ॥ जो हरि साक्षिभूत स्वयमेव ॥ ध्रु० ॥
तारुण्यकाळीं पुण्यदशेचा होऊं पाहतो चेव ।
रंग रुपाला भुलूं नको तूं पाहत स्त्रियांचें टेव ॥ १ ॥
अंतकाळ हा पावे तोंवरि भवसागर हा पेव ॥
वैराग्यविवेकें संगाविरहित सदैव सुख हें सेव ॥ २ ॥
पराधीनता पावेल तेव्हां विस्मय पडेल भेव ॥
स्वइच्छ असणें यास्तव घर घर भिक्षा मागुनि जेव ॥ ३ ॥
ह्मणे सोहिरा त्यावांचुनि हें शरीर केवळ शव ॥
स्वयंप्रकाशक सत्ता ज्याची चालवि हे अवयव ॥ ४ ॥

सोहिरोबांचीं सर्वच पदें फार चांगलीं व उपदेशपर आहेत. मराठी पदांप्रमाणेंच त्यांचीं हिंदुस्थानी पदेंही फार प्रसादयुक्त आहेत. परंतु स्थलाभावास्तव त्यांतील कांहीं पदें येथें देण्यास सवड नाहीं. शेवटीं सोहिरोबांनीं देवाजवळ मागणें मागितलें आहे:—

पद ( दीपचंदी )

तुजविण रे! भगवान् कोठेंचि मन हें न जडो ॥ ध्रु० ॥
मिथ्या ऐसें दिसोनि सकळिक विषयसौख्य नावडो ॥
प्रारब्धास्तव जे जे समर्थी घडेल तें सुखि घडो ॥ १ ॥
योगलक्ष्य निज धैर्यबळें जीव मोहांत न सांपडो ॥
आयुष्य सरल्या कधीं तरी देह पडेल तेथें पडो ॥ २ ॥
वैराग्याग्नि प्रचंड होउनी अखंडीत कडकडो ॥
प्रपंचरहाटीं वर्तत असतां कुणिकडेचि ना अडो ॥ ३ ॥
ह्मणे सोहिरा विपरित बुद्धि कुसंग हा विघडो ॥
निमिष साधुनी शुद्ध ब्रह्मिंचें मोक्षद्वार उघडो ॥ ४ ॥

या एकाच पदावरून सोहिरोबांच्या कवित्वाची, कडकडीत वैराग्याची, प्रपंच-पराङ्मुखतेची व ईश्वरभक्तीची उत्कृष्ट कल्पना होते.

# हरि अंगापूरकर.

' कवि सभेचें मंडण । कवि भाग्याचें भूषण ॥
नाना सुखांचें संरक्षण । ते हे कवि ॥ १ ॥

समर्थ.

महाराष्ट्रजनांच्या कानीं, अद्यापपर्यंत, ज्या मराठी कवींचीं नुसतीं नांवेंही पडलेलीं नाहींत, त्या कवींपैकीं ' हरि अंगापूरकर ' हा एक होय. हा कवि शालिवाहन शके १७१४, इ. स. १७९२ च्या सुमारास ह्मणजे सुमारें ११२ वर्षांपूर्वी होऊन गेला. सोलापूरकर रामजोशी, आर्यापति मोरोपंत व सोहिरोबानाथ आंबिये या तीन सुप्रसिद्ध कविवरांच्या कालीं हरि अंगापूरकर हयात होता. या कवीचा ' केदारविजय ' नांवाचा एक ग्रंथ बेळगांव येथील ' रामतत्वप्रकाश ' छापखान्याचे मालक रा. रा. आबाजी रामचंद्र सावंत, यांनीं इ. स. १८९४ यावर्षी छापून प्रसिद्ध केला आहे, त्याच्या आधारानें या सत्कवींचें अल्प चरित्र येथें देण्याचा प्रयत्न करितों.

महाराष्ट्रांत अंगापूर या नांवाचा एक गांव आहे, तेथें गोपाळराव देशमूख अंगापुरकर या नांवाचे एक वासिष्ठ गोत्री ब्राह्मण गृहस्थ रहात असत. त्यांच्या स्त्रीचें नांव यमुनाबाई. उद्धव नामक कोणी भारद्वाज गोत्री ब्राह्मण गृहस्थ होते, त्यांची यमुनाबाई ही कन्या होय. तिच्या पोटीं हरि अंगापूरकर यांचा जन्म इ. स. १७५२ च्या सुमारास झाला. हरीची आपल्या आईबापांवर फार श्रद्धा होती, असें त्याच्या ' केदारविजय ' ग्रंथाच्या प्रथमाध्यायावरून दिसतें. कवि ह्मणतोः—

ओंव्या.

' ऐशिया प्रकाशाचा तरणी । उगवला हो जियेपासुनी ।
तीं नमियेलीं जनकजननी । ग्रंथारंभीं साष्टांगीं ॥ ६१ ॥
केलिया पुत्रें गयावर्जन । सांग करितां माघस्नान ।
मुक्त होय पितृव्यऋण । एकदां करितां साक्षेपें ॥ ६२ ॥
परी मातृऋणापासून मुक्त । न होय ऐसें शास्त्रसंमत ।
ह्मणोनि ग्रंथारंभीं सद्यचित्त । मातृचरण वंदिले प्रीतीं ॥ ६३ ॥

' न मातुः परदैवत ' जाण । ऐसें वदे शास्त्रींचें वचन ।
हें जाणती विजनीचे विद्वज्जन । सुजाण व्युत्पन्न समदर्शनी ॥ ६४ ॥
पुंडरिकादि पितृव्यभजनीं । निमग्न झाले भीमातटिनीं ॥
ज्याचे भक्तिस्तव उभा समचरणीं । पांडुरंग अठ्ठावीस युगें अद्यापि ॥ ६५ ॥
पितृभजनावांचोनि कांहीं । भगवत्प्राप्तीचा लेश नाहीं ।
ज्याचेनि आकारला नरदेही । ह्मणोनि हे गुरुकृपा लाधली ॥ ६६ ॥
जैसी गंगा अमळ जीवनीं । संताप निववी तृषा हरुनी ।
तैसी अंगारपुरकर देशमुखरमणी । गोपाळराव मृदुभाषणी ममपिता ॥ ६७ ॥
उद्धवनाम भारद्वाज गोत्री । तयाची यमुना पुत्री ।
ते वरियेली वसिष्ठगोत्री । अंगापुरकर गोपाळरायें ॥ ६८ ॥
वसिष्ठऋषीकुळभूषण । गोपाळराव जनक सुजाण ।
यमुना जननीपासोनि जनन । हरि नामाभिधान जन्मला ॥ ६९ ॥
साक्षात् यमुनेचा अवतार । धरिलाच वाटे सूक्ष्म विचार ।
कीं हा केदारविजय कवनार्थीं सार । जन्मासि केदारें घातलें ॥ ७० ॥

वरील उताऱ्यावरून, पूर्वीं ह्मटल्याप्रमाणें कवीची मातृपितृभक्ति उघड दिसून येते. हरीनें आपल्या गुरूसंबंधानें अशीच विस्तृत माहिती दिली आहे, ती येणेंप्रमाणें:— हरीच्या गुरूचें नांव ' हरिनारायण ' हें असून, ते मोठे योगी व ज्ञानी होते. स्वतः हरीनें त्यांस ' प्रतिसृष्टिकर्त्या विश्वामित्राचा अवतार व प्रळयरुद्र ' असें ह्मटलें आहे. त्यांनीं पहिल्यानें बारा वर्षें पारिजातकाचीं पानें भक्षण करून तपाचरण केल्यावर, ' भिल्लार गांवीं ( भिल्लवडी येथें ) जाऊन श्रीभुवनेश्वरीचें दर्शन घे, ' अशी त्यांस आकाशवाणी झाल्यावरून ते दक्षिणवाहिनी कृष्णानदीच्या कांठीं भिल्लवडी येथें जाऊन तेथें बारा वर्षें राहिले. नंतर श्रीभुवनेश्वरीचें वरदवचन प्राप्त झाल्यावर, ते कपित्थ नगरास ( कविटें येथें ) आले व श्रीसिद्धराजास त्यांनीं साष्टांग नमस्कार घातला. त्या दंडकारण्यांतील कपित्थ नगरांत राहून त्यांनीं श्रीसिद्धेश्वरी देवीची बारा वर्षें उपासना केल्यावर देवी त्यांस प्रसन्न होऊन, ' वर माग ' असें ह्मणाली. त्यावेळीं हरिनारायण यांनीं सद्गदित अंतःकरणानें देवीची स्तुति करून तिजपाशीं खालील मागणें मागितलें:—

' अंबे मजलागीं कांहीं । विषयपदार्थीं इच्छा नाहीं ॥
अखंडीत वसावें माझे हृदयीं । जिव्हाग्रीं अक्षयी असावें ॥ ४० ॥
तव चरणारविंदीं अखंडितें । चित्त असावें नवरसभरित ।
अंतीं देईं सायोज्यपदातें । ब्रह्म कल्पांतींही चळो न ॥ ४१ ॥

' तथास्तु ' ह्मणून श्रीसिद्धेश्वरी गुप्त झाली व हरिनारायण मूढजनांचा उद्धार करावा या हेतूनें फिरत कृष्णातटीं औंदुंबर येथें आले व तेथें श्रीदत्तात्रयाचें त्यांनीं प्रेमपुरस्सर दर्शन घेतलें. आपणास हरिनारायण यांनीं कधीं व कोठें उपदेश दिला ' याचा निर्देश कवीनें केलेला नाहीं. हरिनारायणाची गुरुपरंपरा येणेंप्रमाणें:—

' मूळ श्रीगुरुनाथ सदानंद । चतुःशास्त्री जीतेंद्रिय शुद्ध ।
काशींत प्रसिद्ध सच्चिदानंद । जो अपरोक्ष ज्ञानी ब्रह्मवेत्ता ॥ ७४ ॥
सच्चिदानंदापासानि ब्रह्मारण्य । अवतार धरिला नारायण ।
नारायणभट्टीचें प्राधान्य । चतुःशास्त्रीं अग्रगणी जे ॥ ७५ ॥
नारदाचार्य तयापासोनी । सिद्धांतकौमुदीचा मथितार्थ मथनीं ।
आनंदाचार्य व्याकरणी । काशीपट्टणीं प्रसिद्ध जो ॥ ७६ ॥
सहजानंदाचार्य सप्तम । पातले दक्षिणेसी तीर्थोत्तम ।
पाहोनि राहिले निवृत्तिसंगम । हरिनारायण तेथेंचि पातला ॥ ७७ ॥
जगद्गुरु प्रतापसूर्य । वंदोनि सहजानंदाचार्य ।
हरिनारायण गुणगांभीर्य । अनुग्रहस्था तपाचरला ॥ ७८ ॥

या उताऱ्यांतील हरि अंगापुरकरांच्या गुरुपरंपरेचे आदिपुरुष श्रीसदानंद यांजपासून हरिनारायण हे आठवे पुरुष होत. सहजानंदाचार्यांशिवाय सदाशिवनंदाचार्य या नांवाच्या दुसऱ्या एका सत्पुरुषांपासूनही हरिनारायण यांनीं उपदेश घेतला होता, असें कवि लिहितो. यावरून व ' निरंजनमाधव ' कवीच्या चरित्रावरून पूर्वीं एकापेक्षां अधिक गुरु करण्याची चाल होती असें दृष्टोत्पत्तीस येतें. असो.

हरि अंगापुरकर यांस हरिनारायणाचा उपदेश झाल्यावर, त्यांस श्रीबदरीकेदार येथें श्रीकेदारेश्वरानें दर्शन देऊन, अज्ञा केली कीं, ' श्रीकेदारविजय ' या नांवाचा प्राकृत ग्रंथ लिहून, मूढ जनांस माझ्या भक्तीचा सुलभ मार्ग दाखवून दे.' या

आज्ञेप्रमाणें कवीनें ग्रंथ लिहावयास प्रारंभ करून तो चार महिने, दहा दिवस, एवढ्या वेळांत पूर्ण केला. कवि हा ग्रंथ लिहित असतां स्वतः श्रीकेदारेश्वर त्यास सर्व माहिती देत असे व एका प्रसंगीं कवीपाशीं कागद शिल्लक नव्हते, त्यावेळीं श्रीकेदारनाथानें ते त्यास स्वतः आणून दिले. एवढा मोठा ग्रंथ इतक्या थोड्या वेळांत कसा लिहिला गेला याचें कोणास आश्चर्य वाटेल, परंतु कवि लिहितोः—

करोनियां प्रातःस्नान । शुचिष्मंत हें करविलें लेखन ।
स्नाना विरहित न लिहिलें जाण । ऐशीच नाथआज्ञा स्नान करोनि ल्याहावें ९०
हाचि श्रीकेदाराचा निश्चय । करवोनि लिहविला केदारविजय ।
माझे हृदयींचे तापत्रय । हरविले समूळ ग्रंथान्वयीं ॥ ९१ ॥
श्रीगुरुकृपारसभरितु । केदारविजय वरद ग्रंथू ।
पूर्ण करविला जेवीं नळाहातीं सेतु । रामायणीं ज्यापरी वानरहस्तीं ॥ ९२ ॥
नाहीं व्युत्पन्नाची संगती । नाहीं गीर्वाण रसोत्पत्ति ।
तर्कभाष्य व्याकरण अहंकृति । ऐसें स्वप्नीं ही नाहीं देखिलें ॥ ९३ ॥
सर्व विषय प्रतिकूळ असोनियां । हें कैसें करविलें विदित अवधियां ।
येथें यदर्थीं ल्याहावया । कारण कांहींच असेना ॥ ९४ ॥
नेणवे काय श्रीनाथराया । बळेंचि करविलें केदारविजया ।
सत्यमिथ्या अर्थान्वया । कर्ता यदर्थीं दक्षिणपति ॥ ९५ ॥
म्यांच हा ग्रंथ केला ह्मणावें । युग्मसंवत्सरपर्यंत लागे ल्याहावें
तें समाप्त होय कीं न होय अभावें । हेंचि सर्व मिथ्या मीपणें ॥ ९६ ॥
तैसें यदर्थीं अहंतालयीं । न बैसवी नाथ कालत्रयीं ।
अखंड विचरतां संतसमुदायीं । विभक्त हननार्थीं दर्शविलें ॥ ९७ ॥
कीं ज्योतिस्वरूपची केलें निर्विकारी । विभक्तहननार्थीं भक्तानुग्रह आकारी ॥
केदारविजयार्थांतर विकारी । हें संवत्सराचें फळ लाधलें ॥ ९८ ॥
तें कैसें ह्मणाल कृतनिश्चयें । षण्मास झाले विजयादशमीये ॥
चैत्र फाल्गुनमासादि तापत्रयें । संसार व्यावृत्ति मन गुंतविलें ॥ ९९ ॥
चार महिन्यावरी दहा दिवस । संसार व्यावृत्तीचा हव्यास ॥
करितां अध्याय पस्तीस । प्राकृत मनुष्य काय करी ? ॥ १०० ॥

वरील वेंच्यांवरून, व त्या ग्रंथांतील इतर ठिकाणीं आलेल्या उल्लेखांवरून, या कवीस श्रीकेदारनाथ प्रसन्न होता, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. शिवाय या 'केदारविजय' ग्रंथाचे अध्याय ३५ व ओंव्या ६,११० आहेत. एवढा मोटा ग्रंथ लिहावयास निदान एक वर्ष तरी सहज लागेल, असें असतां, चार महिने आणि दहा दिवस, एवढ्या अल्प काळांत आणि इतक्या चांगल्या रीतीनें ज्या अर्थी हा ग्रंथ लिहिला गेला आहे त्या अर्थी कवीनें केलेलें विधान सत्य मानिल्याशिवाय सुटका नाहीं.

या कवीनें लिहिलेला असा उपलब्ध ग्रंथ काय तो हा केदारविजयच्च होय. या शिवाय आपल्या बापाच्या आज्ञेनें महाभारताचीं, 'उद्योग' व 'भीष्म' हीं दोन पर्वें आपण प्राकृत भाषेंत लिहिलीं आहेत, असें कवि या ग्रंथाच्या प्रथमाध्यायांत लिहितो. हीं पर्वें आज उपलब्ध नाहींत, त्यास उपाय नाहीं, परंतु यावरून या कवीनें तीन मोठे ओंवीबद्ध ग्रंथ लिहून आपल्या शक्तीप्रमाणें आपल्या मातृभाषेची सेवा केलेली आहे, हें उघड होतें. कवीची वाणी प्रासादिक, प्रौट व हृदयंगम आहे. विशेषतः प्राकृत कवि श्रीमत्कृष्णदयार्णव याच्या भाषेनें व रचनाशैलीनें या कवीनें अनुकरण करण्याचा प्रयत्न केला आहे. केदारविजयांतील कांहीं उतारे आतांपर्यंत दिले, त्यावरून कवीच्या भाषेची व कवित्वाची वाचकांस सहज ओळख होईल. या शिवाय त्याच्या ग्रंथांतील आणखी थोडेसे महत्वाचे वेंचे येथें देऊन, हें चरित्र पुरें करण्याचा विचार आहे.

आपल्यापूर्वी होऊन गेलेल्या कवींस वंदन करितांना कवि ह्मणतो:—

'ज्याचे भक्तीचे सुरवाडे । विधिसी गणिजेना पहिलें कवाडें ।
शैशावदर्नी अवघडे । जयांनीं वेद घडघड बोलविला ॥ ५३ ॥
ऐसे विवेकसिंधूचे पोहणार । एकनाथ, निवृत्ति, ज्ञानेश्वर ।
सोपान मुक्ताक्षी मुक्तेश्वर । ग्रंथारंभीं वंदिले ॥ ५४ ॥
चोखामेळा रोहिदास । गोराकुंभार श्रीरंगनाथ रामदास ।
ज्यांच्या हस्तें घे देव ग्रास । तो नामदेव तुकोबा नमियेला ॥ ५५ ॥
सर्व कवींद्रामाजी मुकुटमणि । कीं जांबुनद जग नग जैसे सुवर्णीं ।
तैसे लोलिंबराज मुकुंदराज दोन्ही । सद्भक्तांसी वंदिलें. ॥ ५६ ॥

मुकुंदराजाचा ' विवेकसिंधु ' हा या कवीचा फार आवडता ग्रंथ होता, असें, त्या ग्रंथाचा त्यानें आपल्या ग्रंथांत टिकठिकाणीं उल्लेख केला आहे, त्यावरून दिसतें. गुरुचरित्र, भावार्थरामायण, एकनाथी भागवत व दासबोध या ग्रंथांचाही त्यानें क्वचित् स्थळीं उल्लेख केला आहे.

खालील ओव्यांत, या कवीच्या कालापूर्वीं होऊन गेलेल्या अनेक साधुजनांचीं नांवें आलीं आहेत:—

' महामुद्गल ब्राह्मण । आधीं करवितो पंचागश्रवण ।
तिथि वार नक्षत्र ग्रह गण । शुभश्रीकारक तुज असती ॥ १३ ॥
सेना न्हावी पातला जाण । दावीतसे सदय हृदय दर्पण ।
गोऱ्या कुंभारें कलश घेऊन । अमल गंगोदक आणिलें स्नाना ॥ १४ ॥
शुद्धसत्वाचा पीतांबर । परिधान करविला प्रभाकर ।
पदतळीं रंगला अरुणाकार । पूर्ण चरण देवडिया ॥ १५ ॥
नवार्णव नवनाथा केशरी । टिळक रेखी गोरखनाथ आदरीं ।
नामदेव वस्त्रें परिधान करि । दिव्यभक्ति ललामें मोलागळीं ॥ १६ ॥
चिद्रत्नाचे अळंकार । घेऊन नरहरी सोनार ।
लेववीतसे राजोपचार । ॐकार लकार अर्धमात्रेंसी ॥ १७ ॥
चरणसंपुष्ट रोहिदास । पुढें ठेवी मनोल्हास ।
स्तुति करि कूर्मदास । नामदेव जेव ह्मणतसे ॥ १८ ॥
हार तुळसी गुंफोनी सुमनकळीं । घेवोन पातला सावंतामाळी ।
वसिष्ठादिक सप्तऋषि सकळीं । पुष्पांजळी समर्पिल्या ॥ १९ ॥
भानुदास कुळभूषण । पूर्णानंद आनंदघन ।
गीत नृत्य संगीत गायन । श्रीजयदेव करीतसे ॥ २० ॥
भानुदास कुळभूषणमणि । एकनाथ अपरोक्ष ज्ञानी ।
ज्याची भागवतीं परमशिराणी । अठाविसाव्याध्यायीं अपूर्व असे ॥ २१ ॥
जीवन्मुक्त मुक्तेश्वर । वामन कलियुगीं व्यासावतार ।
कालिदास श्रेष्ठ कवीश्वर । कालिकावरदी भोजराजापाशीं ॥ २२ ॥

जुन्या मराठी कवीं पैकीं ज्यानें आपल्या ग्रंथांत कालिदासाचा उल्लेख केला आहे असा हा एकच कवि असावा असें वाटतें. ‘ केदारविजय ’ ग्रंथांत ‘ केदारनाथ ’ या नांवाचा एक नाथसंप्रदायी अवतारी पुरुष होऊन गेला, त्याचें चरित्र अग्निपुराण, भविष्योत्तरपुराण, ब्रह्मांडपुराण, वगैरे संस्कृत ग्रंथांच्या आधारानें वर्णिलेलें असून शिवाय कलियुगांत नाथांनीं जे जे चमत्कार केले व ज्या ज्या भक्तांस दर्शन देऊन त्यांचा उद्धार केला, त्यांचींही वर्णनें दिलीं आहेत. या केदारनाथाचें स्थान ह्मटलें ह्मणजे कोल्हापुरापासून ४ मैलांवर असलेला ‘ जोतीबाचा ’ डोंगर होय. यास वाडी रत्नागिरी, असेंही नांव आहे. येथें प्रतिवर्षीं चैत्र पौर्णिमेच्या दिवशीं मोठी यात्रा भरते. एकंदरींत ग्रंथ मोठा वाचनीय असून तो आपल्या नजरेखालीं एकवार घालण्याची मी माझ्या प्रिय वाचकांस शिफारस करितों. या ग्रंथाशिवाय ‘ केदार-कल्पतरु ’ या नांवाचा एक ग्रंथ या कवीनें, किंवा दुसऱ्या कोणी मराठी कवीनें, लिहिलेला असावा अशी केदारविजयावरून माहिती मिळते.

येथपर्यंत या कवीची जी थोडीशी माहिती त्याच्याच ग्रंथाच्या आधारानें देतां आली, ती दिली. या शिवाय अधिक माहिती मिळणें अगदीं अशक्य आहे असें नाहीं, तथापि तें बऱ्याच श्रमाचें काम आहे यांत संशय नाहीं.

---

# देवनाथ.

' विश्वात्म्याचे आत्मे झाले । केवळ निजानंदिं रंगले ।
त्यांसी ह्मणती मेले गेले । ते भ्रांतांचे शिरोमणी ॥ '

रंगनाथस्वामी.

हे महासाधु व कवि, सुमारें १०० वर्षांपूर्वीं वऱ्हाडांत होऊन गेले. त्यांचें चरित्र दोन तीन गृहस्थांनीं लिहिलें आहे. त्यां पैकीं रा. रा. परशुराम बाळाजी कावतकर या सद्‌गृहस्थांनीं, काव्यसंग्रहांत प्रसिद्ध केलेल्या चरित्राच्या आधारानें पुढील संक्षिप्त लेख लिहिला आहे.

वऱ्हाड प्रांतीं शाहणूर नामक नदीतीरीं सुर्जी अंजनगांव ह्मणून एक प्रसिद्ध गांव आहे, तेथें देवनाथ महाराजांचें जन्म इ. स. १७५४*च्या सुमारास झालें.

सुर्जी येथें देवनाथांचा मठ आहे व त्यांचा शिष्यपरिवारही मोठा आहे व त्यांपैकीं पुष्कळांस देवनाथांसंबंधानें बरीच माहिती असली पाहिजे; परंतु आपल्या लोकांच्या समजुतीप्रमाणें, सदर माहिती देण्यांत त्यांस गुह्यतमगोष्टींचा भेद केलासें वाटलें. अर्थात् तिकडून माहिती मिळण्याचा मार्ग खुंटला, हें उघडच आहे तथापि दंतकथा व लोकवार्ता यांच्या आधारानें जी काय थोडी बहुत माहिती उपलब्ध झाली आहे, ती येणेंप्रमाणें:—

---

* रा. कावतकर यांनीं आपल्या लेखांत, ' देवनाथांच्या जन्मकालासंबंधानें बरोबर माहिती मिळत नाहीं ' असें ह्मटलें आहे. ' पुढें, ' सुर्जी येथील स्पेशल म्याजिस्ट्रेट रा. रघुपतराव देशपांडे यांचे आजे ' खुशालराव बाबा ' हे देवनाथांचे लंगोटमित्र होते व या दोघांच्या वयांत सहा महिन्यांचें अंतर होतें; खुशालराव बाबांचें जन्म इ. स. १७५४ त झालें, अर्थात् त्याच सालीं देवनाथही जन्मले, असें लिहून शिवाय आणखी ' देवनाथांचे शिष्य मल्हारनाथ यांनीं लिहिलेल्या देवनाथांच्या आरतींतील शके १६७६ हा नाथांचा जन्मशक त्यांनीं दाखल केला आहे. अर्थात् हा शक व खुशालरावबाबांचा जन्मशक एकच असल्यामुळें व मल्हारनाथांच्या शकावर विश्वास ठेवण्यास कांहींच हरकत नसल्यामुळें, देवनाथांच्या जन्मकालासंबंधानें संशय असण्याचें माझ्यामतें बिलकूल कारण नाहीं.

देवनाथ हे ऋग्वेदी वासिष्ठगोत्री ब्राह्मण. त्यांचे वडील राजोपंत हे कमाविसदार होते. त्यांस मुलगे तीन; त्यांपैकीं वडील व्यंकटराव हे एलिचपुरचे रिसाल्यांत पांचशें स्वारांचे अधिकारी होते; दुसरे देवराव ( देवनाथमहाराज ) व तिसरे सुंदरपंत हे देशपांडेपणाचें काम करीत असत. देवनाथ महाराजांच्या लग्नासंबंधानें मतभेद आहे. कित्येक ह्मणतात कीं ते शेवटपर्यंत अविवाहित होते व कित्येकांच्या मतें ते विवाहित असून त्यांस एक कन्याही झाली होती. देवनाथांस समाधिस्थ होऊन नुकतीं कोठें ८०–८२ वर्षें झालीं, तोंच त्यांच्या चरित्रासंबंधानें इतका घोंटाळा असावा, ही केवढ्या आश्चर्याची गोष्ट !

देवनाथ बालपणीं अतिशय उनाड व हूड होते; व ही त्यांची वृत्ति पुढेंही कधीं कधीं दृष्टीस पडत असे. त्यांची प्रवृत्ति तालीमबाजीकडे फार असल्यामुळें त्यांजकडून विद्यार्जन फारसें झालें नाहीं. त्यांस लिहितां वाचतांही येत नव्हतें असें कित्येक सांगतात, परंतु त्यांच्या कवितेकडे पाहिलें ह्मणजे या सांगण्यांत कांहीं अर्थ नसावा, असें वाटतें. देवनाथांस संस्कृताचा फारसा संस्कार घडला होता असें दिसत नाहीं, तथापि मराठी भाषेचें ज्ञान त्यांस बरेंच चांगलें होतें असें ह्मणण्यास प्रत्यवाय नाहीं.

पुढें देवनाथांनीं सुर्जी येथें तालमीचा आखाडा काढिला व गांवांतील मुलें तालमीच्या नादीं लाविलीं. यासंबंधानें, घरांतील वडील माणसें त्यांस फार बोलत असत, परंतु त्यांनीं तिकडे कधीं लक्ष दिलें नाहीं. एकदां तालमीचा नाद लागल्यावर त्या विषयांतील सगळे गुणदोष देवनाथांनीं संपादन केले. शरीर पीळदार असणें, गर्दनमुंडे, दंड, पिंड्या वगैरे शरीरावयव कांहीं विशिष्ट प्रकारचे बनविणें, जानव्याची उपवीति ठेवणें, ऐटीनें चालणें वगैरे प्रकार त्यांच्याठायीं दृष्टीस पडूं लागले; त्याचप्रमाणें तामसवृत्ति, बेपर्वाई इत्यादि दुर्गुणही त्यांच्याठायीं दिसू लागले. सारांश, सुर्जींतील तालीमबाज मंडळीचे ते वस्ताद बनले. परंतु हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, या क्रीडापरायणतेबरोबरच, ईश्वराविषयीं मनापासून प्रेम व आस्तिक्यबुद्धि हीं त्यांच्या ठिकाणीं पूर्णपणें वास करीत होतीं. पुराणश्रवण, ईश्वरनामस्मरण वगैरे परमार्थिक विषयांची त्यांस फार आवड असे. तालीमबाज लोकांचें प्रिय दवत बलभीम, अर्थात् त्याचीही उपासना देवनाथांस प्रिय असे.

---

१ पुढें देवनाथांनीं हा आखाडा मोडून त्या ठिकाणीं आपला मठ बांधिला. हा मठ हल्लीं सुर्जी येथें आहे.

शारीरिक संपन्नता संपादिल्यावर, मारुतीची भक्ति करून तें दैवत प्रसन्न करून घेण्याच्या इराद्यानें देवनाथांनीं, तालमींत मारुतीची मूर्ति ठेवून, त्याची उपासना चालविली. सुर्जीपासून सुमारें २० कोसांवर जळगांव तालुक्यांत (वऱ्हाडांत) वारी ह्मणून एक खेडें आहे, तेथें हनुमंताचें एक मोठें जागृत स्थान आहे. ह्यामुळें त्या गांवास 'हनुमंताची वारी' असें ह्मणतात. ह्या ठिकाणीं, देवनाथ महाराज वरचेवर हनुमंताचे दर्शनास जात असत. याप्रमाणें क्रम चालू असतां, त्यांस एके दिवशीं दृष्टांत झाला कीं, 'मी सुर्जींतच असल्याकारणानें, तुला इतक्या दूर येण्याचें कारण नाहीं.' या दृष्टांताप्रमाणें, देवनाथ पुढें सुर्जींतील मारुतीची भक्ति करूं लागले. सुर्जींतील मारुती फार जागृत असून, त्याची स्थापना इ. स. १७०९ त, कै. विठोजी नारायण देशपांडे यांनीं केली, असें लेखी पुराव्यावरून समजतें. हा मारुती उघड्या चौथऱ्यावर बसविला आहे, व त्यानें वेळोवेळीं दृष्टांत देऊन, आपलें देवालय बांधूं नये, अशी इच्छा प्रदर्शित केल्याचें समजतें; व त्याप्रमाणें हा मारुती अद्याप उघड्या चौथऱ्यावर उभा आहे.

अशा प्रकारें देवनाथांचा काळ तालमींत व देवभक्तींत जात असतां, त्यांचे वडील बंधु व्यंकटराव यांस त्यांच्या या हूड वृत्तीबद्दल फार वाईट वाटलें, व त्यावरून ते एके दिवशीं आपल्या मातुश्रीस ह्मणाले, 'आई! आपला हा देवराव नेहमीं उनाड मुलांत खेळतो, तालमींत जातो, यास काय करावें? याचें पुढें कसें होईल? आज माझ्याकडे पाहून तरी त्यानें कांहीं लाज धरावी कीं, आपल्या वडील भावाचा मान केवढा, अधिकार केवढा, पालखी, घोडे, नोकर, सरंजाम केवढा; परंतु तें कांहीं नाहीं; तूं तरी त्यास चार गोष्टी सांगून पहा; त्या त्यानें ऐकल्या तर ठीक; नाहीं तर त्याचें नशीब!' हें ऐकून मातुश्रीसही फार वाईट वाटलें. शेवटीं, एके दिवशीं देवराव एकटेच भोजनास बसले असतां, वडील बंधूचे उद्गार तिनें त्यांस कळविले. परंतु देवनाथांसारख्या तेजस्वी पुरुषास ते उद्गार ऐकून स्वस्थ कसें बसवेल? त्यांनीं पुढचें वाढलेलें ताट एकीकडे केलें, व मातुश्रीकडे पाहून, 'ठीक आहे, ज्या दिवशीं पालखींत बसून येईन त्याच दिवशीं पुनः तुझें दर्शन घेईन.' इतकें बोलून ते घराबाहेर पडले!

पुढें, देवरावांची वृत्ति अगदीं विलक्षण झाली. गांवांत फिरावें, मारुतीचे दर्शनास जावें, वाटल्यास जेवावें, अशा रीतीनें ते दिवस घालवूं लागले. एके दिवशीं मध्यरात्रीं, ते देशपांडे यांचे गढीचे भिंतीचे बाजूस बसले असतां, सुर्जींतील एक

सत्पुरुष गबाभट कुंडले हे त्या मार्गानें देवदर्शनास जात होते; त्यांनीं देवरावांस तेथें बसलेले पाहून ह्मटलें कीं ' चला, तुह्मास मारुतीचें दर्शन करवितों ' त्यावर देवराव ' बरें आहे, ' असें ह्मणून त्यांजबरोबर मारुतीचे दर्शनास गेले. तेथें गबाभट यांनीं आपल्या नित्यक्रमाप्रमाणें मंत्रोच्चार करितांच मारुती प्रगट झाला व त्यानें त्यांस दर्शन दिलें. पुढें गबाभट यांनीं, देवराव यांच्या स्थितीसंबंधानें मारुतीस प्रश्न केला, त्यावेळीं मारुती ह्मणाला, त्याचे हातून थोडी चुकी झाल्यामुळें असें झालें आहे; पण आतां लवकरच त्याचा कार्यभाग होईल. ' हा संवाद देवराव मुकाट्यानें ऐकत होते. नंतर मारुती अंतर्धान पावला. पुढें देवरावांचें वैराग्यबळ वाढत चाललें. त्यांनीं श्रीमारुतीपाशीं केवळ धरणें घेतलें. कोणी मारुतीस नैवेद्य पाठविला तर तो खावा, नैवेद्य नसेल त्या दिवशीं उपाशी राहावें, असा क्रम त्यांनीं ठेविला. गांवांतील लोकांस, देवरावांची भक्ति पाहून फार आश्चर्य वाटलें, पण त्यांच्या घरच्या मंडळीस, त्यांच्या दुःस्थितीबद्दल अतिशय वाईट वाटलें.

इकडे, गोविंदनाथ या नांवाचे एक नाथपंथी सत्पुरुष प्रवास करीत होते. हे कोंकणस्थ ब्राह्मण; अकोल्यानजीक ' बुसर ' नामक गांव आहे, तेथील राहणारे. तेथें त्यांचें घर अद्याप आहे, असें सांगतात. त्यांस दृष्टांत झाला कीं, सुर्जी गांवीं ' देवराव ' नामक एक मनुष्य आहे, त्याची वैराग्यवृत्ति चांगली असून, चित्तशुद्धीही उत्तम प्रकारची आहे; तरी तिकडे जाऊन त्यास अनुग्रह द्यावा.' या दृष्टांताप्रमाणें गोविंदनाथ सुर्जीस आले. त्या वेळीं देवनाथ हे मारुतीचे चौथऱ्यावरील दीपमाळेजवळ आसन घालून बसले होते. त्यांची स्थिति व एकंदर लक्षणें पाहून, दृष्टांतांतले गृहस्थ हेच, हें गोविंदनाथांच्या लक्ष्यांत आलें. त्यांनीं त्यांस ' देवराव, इकडे ये. '

१ गबाभट कुंडले हे सुर्जीतील एक मोठे कर्मशील व मांत्रिक ब्राह्मण होते. त्यांस मारुती प्रसन्न असून, ते नित्य मध्यरात्रीं त्याच्या दर्शनास जात असत.

२ कोणी ह्मणतात कीं एका मांत्रिकानें देवनाथांस मंत्रसाधन करण्यास सांगितलें व त्यांत कांहीं चुकी झाल्यामुळें ते बुद्धिभ्रष्ट झाले. पुढें त्याच मांत्रिकानें तें अनुष्ठान त्यांजकडून यथासांग रीतीनें करविल्यावर त्यांस साक्षात्कार झाला; त्यावेळीं प्रसन्न झालेल्या देवतेपाशीं त्यांनीं जिव्हेस व मनास रामनामाचा कधींही विसर पडूं नये असा वर मागितला. देवतेनें, त्याप्रमाणें, ' श्रीराम ' हीं अक्षरें त्यांच्या जिव्हेवर लिहिलीं, व तीं त्यांचें जिव्हेवर असल्याचें कित्येकांनीं पाहिलें होतें असें ह्मणतात.

अशी हाक मारली. ती ऐकतांच देवरावांस मोठें आश्चर्य वाटलें. कारण त्यांची माहिती गोविंदनाथांस असण्याचा बिलकूल संभव नव्हता. अर्थातच त्यांनीं त्यांस कांहीं उत्तर दिलें नाहीं. नंतर गोविंदनाथांनीं आपल्या दृष्टांताची हकीकत त्यांस सांगितली व त्यांजवर अनुग्रह करण्याची आपली इच्छा व्यक्त केली. तें ऐकून देवरावांनीं मारुतीकडे बोट दाखवून सांगितलें कीं, ' माझा गुरु हा येथें बसला आहे, तो करील तें प्रमाण. दुसऱ्या गुरूचा अनुग्रह आह्मास नको.' हें उत्तर ऐकतांच, गोविंदनाथ यांनीं आपली गाडी नदीतिरीं एका पिंपळाच्या वृक्षाखालीं नेली व तेथेंच मुक्काम केला. त्यांचा नित्य नियम असा असे कीं, दिवसा झोंप घ्यावयाची व रात्रौ शौचमुखमार्जन व स्नानपूजा वगैरे विधि सारून, रात्रभर भजन पुराण वगैरे सांप्रदायिक प्रकार चालू ठेवावयाचे व उजाडण्याचे वेळीं पुनः निजावयाचें. ' या निशा सर्व भूतानां तस्यां जागर्ति संयमी । यस्यां जाग्रति भूतानि सा निशा पश्यतो मुनेः ' या गीतावाक्याप्रमाणें त्यांचें वर्तन होतें.

इकडे, रात्रौ, मारुतीनें देवनाथांस सांगितलें कीं, ' तूं गोविंदनाथांची भेट घे. ते तुजवर अनुग्रह करतील. ' त्यावर देवराव रागानें ह्मणाले, ' मी आपले पाय सोडून दुसरीकडे जाणार नाहीं. ' त्यावर मारुतीनें पुनः त्यांस गोविंदनाथांकडे जाण्याचा आग्रह केला. पुनः देवनाथांनीं ' मला गेलेंच पाहिजे ना ? ' ह्मणून तीन वेळां मारुतीस विचारलें व ' होय ' असें उत्तर मिळाल्यावर, त्याच वेळीं ते, गोविंदनाथ उतरले होते, तिकडे गेले. त्यांनीं नाथांस साष्टांग नमस्कार घातला व सर्व वृत्तांत निवेदन केला. गोविंदनाथ विनोदानें ह्मणाले ' पहिल्यानें येत नव्हतां, मग आतां कसे आलां ? ' देवनाथ ह्मणाले, ' ज्यानें आजवर आश्रय दिला, त्यानेंच ' जा ' ह्मटल्यावर मग काय उपाय ? ' मग गोविंदनाथ ह्मणाले, ' त्याच्याच आज्ञेवरून मी पहिल्यानें तुमच्याकडे आलों होतों. पण त्या वेळीं तुह्मीं जो रोखठोक जबाब दिला, त्यामुळें माझा निरुपाय झाला. ' त्यावर देवनाथांनीं गोविंदनाथांची क्षमा मागितली व अनुग्रह करण्याविषयीं विनंति केली. मग गोविंदनाथांनीं देवरावांस आपल्याबरोबर सहा महिने ठेवून घेतलें. ते त्यांस नित्य आपल्या बरोबर घेऊन सुर्जीच्या आसपास रानांतून व गांवोंगांव फिरवीत असत. एके दिवशीं, अकोट तालुक्यांत वाई ह्मणून गांव आहे, तेथें त्यांचा मुक्काम झाला. तेथें मध्यरात्रीं गोविंदनाथ देवरावांस बरोबर घेऊन गांवाबाहेरच्या रानांत गेले. तेथें त्यांच्या कांहीं पारमार्थिक गोष्टी चालल्या असतां गोविंदनाथ देवरावांस एकाएकीं ह्मणाले, ' देवराव !

या वेळीं मला अतिशय क्षुधा लागली आहे, पुरणाची पोळी पाहिजे. ' देवराव ह्मणाले ' ठीक आहे; आतांच सर्व सामग्री आणून पोळया करून देतों. ' असें ह्मणून, ते वाई गांवच्या शिवाजी पाटलाच्या घरीं गेले व त्याजकडून सर्व सामान आणून, स्वतः सर्व सैंपाक तयार करून, पुरणाच्या पोळींचें पात्र त्यांनीं गोविंदनाथांपुढें मांडिलें. तेव्हां गोविंदनाथांस मोठें आश्चर्य वाटून ते ह्मणाले, ' देवराव ? एवढ्या रात्रीं सामान मिळवून स्वयंपाक सिद्ध केलास काय ? ' त्यावर ' होय ' असें उत्तर मिळतांच गोविंदनाथ जेवावयास बसले. देवनाथांस समोर बसवून एक ग्रास आपण खावा व एक ग्रास देवनाथांचे तोंडांत घालावा; अशा प्रकारें भोजन चाललें असतां देवनाथांचे मस्तकीं हस्त ठेवून गोविंदनाथांनीं त्यांस अनुग्रह दिला; व त्याच वेळीं त्यांनीं देवरावांचें देवनाथ असें नांव ठेविलें. आणि त्यांस आज्ञा केली कीं, ' आतां लोकांवर अनुग्रह करून जगदुद्धार करावा. ' याप्रमाणें गोविंदनाथांनीं देवनाथांस अनुग्रह दिला, ही हकीकत खुशालरावबाबा देशपांडे यांच्याशिवाय दुसऱ्या कोणास माहीत नव्हती. खुशालरावबाबा हे देवनाथांचे समवयस्क मित्र, ह्मणून त्यांस देवनाथांनीं स्वतः ही हकीकत सांगितली होती; व तीच पुढें कर्णपरंपरेनें सर्वश्रुत झाली. असो. पुढें गोविंदनाथ लवकरच आपल्या प्रांतीं नागपुराकडे निघून गेले. इकडे, सद्गुरूचा अनुग्रह झाल्यामुळें, देवनाथांस ' आपण कृतार्थ झालों ' असें वाटूं लागलें. प्रत्यक्ष आत्मानुभव झाल्यामुळें त्यांच्या मुखावर समाधानवृत्ति व साधुत्वाचें तेज हीं एकसमयावच्छेदेंकरून दृश्यमान होऊं लागलीं.

गुरूपदेशग्रहणानंतर देवनाथ सुर्जीचे आसपास गांवोगांव फिरत असत; परंतु मारुतीचें नित्य दर्शन घेण्याचा नियम त्यांनीं कधीं मोडिला नाहीं. त्यांचा स्वभाव पहिल्यापासूनच रंगेल असल्यामुळें ते तोंडानें कांहींतरी कवित्व बडबडत असत. पुढें अनुग्रह घेतल्यावर तर स्वतः कवित्व करावें अशी उत्कट इच्छा त्यांस उत्पन्न झाली व त्याप्रमाणें बोलण्यांतही थोडथोडें कवित्व दिसून येऊं लागलें. पुढें एके-दिवशीं, मागें सांगितलेले गबाभट कुंडले यांची व देवनाथांची गांठ पडली. त्यावेळीं ते देवनाथांस ह्मणाले ' मारुती मला एकदां ह्मणाले कीं, ' देवरावानें अलीकडे आमचें दर्शन घेणें अगदीं टाकिलें हें काय ? तो आतां देवरावाचा देवनाथ झाला, ह्मणून त्यानें आह्मांवर इतका रोष केला कीं काय ? तरी त्यासंबंधानें त्यास विचारून त्यास आमचे दर्शनास एकवार आणावें. ' या करितां तुह्मी आतां मारुतीचे दर्शनास चला. " यावर देवनाथ 'एके दिवशीं दर्शनास येऊं' इतकेंच ह्मणाले. दुसरे दिवशीं

ते दर्शनास गेले त्यावेळीं मारुतीपुढें उत्तरादाखल त्यांनीं पुढील अधिकारयुक्त पद ह्मटलें:—

पद.

' प्यारे ! उलट कमलमों पलट देखले मौजा ।
सब घटमों नाथ विराजा ॥ धृ० ॥
नर लाल हुवा बेहाल पडा भ्रमजाला ।
क्यंव फिरता भटका भूला ।
तैं, डार सुधारस घटकु बिखयबिख प्याला ।
पीकर हुवा मतवाला ॥
चढ आवे तुजपर काल फौजसों आला ।
को होय तेरा रखवाला ॥
इस मायामों एक तरन गुरु महाराजा ॥ सब० ॥ १ ॥
मैं हूं वे कहांका कोन कहांसो आया ।
ये सार विचार न पाया ॥
मा बाप वहेन और भाई कबीला माया ।
मैं मेरा कह डुबवाया ॥
संसार नरकका मूल, नाहक लपटाया ।
कर याद गुरु वस्ताद पकर ले पाया ॥
सुन, छमा ढाल ले हात ग्यानका तेजा ॥ सब० ॥ २ ॥
कर हुकुम, फौजमें बाजे कालका डंका ।
तुझे फास नहीं, ले नाम पीर सुर्षदका ॥
हो सवार साबुत तो बे घोडा मनका ।
चढ सवार सले बडा सुरतगड बाका ॥
तुम सुनोजी, मनसिंग किलेदार है व्हांका ।
गुरु ग्यान चढा नीशान, पकड ले पडका ॥
भव जाल तोड जंजाल, कर ले हाजा ॥ सब० ॥ ३ ॥
हो निर्मल, आपने हितकु तवज्जु करना ।
गुरुग्यान सुनावे कान, बतावे नैना ॥

प्यारे, देख कमल बिच मगन आप हो रहेना ।
नहि कमाल ये धन माल रैनका सपना ॥
साचकर मान सिपाही दिल जान नहिरे ! तन अपना ।
जम छोड पटेकू तोड नजरमो रखना ॥
प्यारे ! अजब फौजमें बाजे अनुहात बाजा ॥ सब० ॥ ४ ॥
सुन मेहरबान हनुमान धनी है आला ।
तन पाक किया, है पाक कमल उजियाला ॥
अब दिया नाथके हात पिलाया प्याला ।
दस्तान चढा मस्तान हुवा मतवाला ॥
गैबतका बाजे तास घनन घडियाला ।
गुरु ग्यान समजकर बुझे लाख मों बिरला ॥
कहे देवनाथ सुन बात खुदा नहिं दूजा ॥ सब० ॥ ५ ॥

ह्या पदांत, दर्शनास न येण्याचें कारण व गोविंदनाथांच्या अनुग्रहानंतर स्वतःस प्राप्त झालेला अनुभव यांचें दिग्दर्शन देवनाथांनीं केलें आहे. नंतर, मारुतीनें प्रसन्न होऊन त्यांस वर दिला कीं, ' आजपासून तुझ्या मुखांतून जी वाणी निघेल ती काव्यमय होईल ! हा वर अगदीं शब्दशः खरा झाला. देवनाथ कीर्तनास उभे राहिले ह्मणजे, पदें, अभंग, लावण्या, जें काय सुचेल तें ह्मणत असत. मुद्दाम कविता रचावयास ते कधींही बसले नाहींत. त्यांची सगळी कविता प्रासंगिकच आहे. असें सांगतात कीं, वरील हिंदुस्थानी पद, हेंच त्यांच्या काव्यकुसुममालेंतलें पहिलें कुसुम होय. एकदां ह्मटलेली कविता पुनः ह्मणण्याचा त्यांस कधीं प्रसंग आला नाहीं, असें ह्मणतात. यावरून त्यांची कविता प्रासादिकच आहे, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. त्यांचे वेळीं जर लघुलेखनपद्धति अस्तित्वांत असती, तर हल्लीं जी त्यांची थोडीशी कविता उपलब्ध आहे, तिच्या दसपट तरी कविता आह्मांस वाचावयास मिळाली असती. परंतु ' गतं न शोचयेत् '.

यानंतर गोविंदनाथांचे आज्ञेप्रमाणें, जगदुद्धारार्थ प्रवास करण्याचें देवनाथांनीं योजिलें. त्यांनीं सर्व हिंदुस्थानभर प्रवास केला ह्मटलें तरी चालेल. पुणें, सातारा, नागपूर बडोदें, ग्वाल्हेर, काशी, रामेश्वर, द्वारका इत्यादि ठिकाणीं ते गेले होते, अशी माहिती मिळते. देवनाथांस बाळपणापासूनच शिपाईगिरीचा फार शौक होता. त्यांज-

पाशीं, नेहमी एक तलवार असे. अरण्यांतून एकटें फिरण्यास त्यांस लहानपणापासून भीति वाटत नसे. पुढें, गुरूपदेश झाल्यावर तर, 'सर्व विश्व ब्रह्ममय आहे' असा अनुभव येऊन ते अगदींच निर्भय झाले. सुर्जीचे आसपास कांहीं दिवस घालविल्यावर, देवनाथ बडोद्यास गेले. तेथें एक चमत्कार घडला, तो असा:—–

बडोद्यास नाथांनीं आपला मुक्काम एका गणपतीचे देवालयांत ठेविला; तेथें ते लिंबाचीं पानें खाऊन रहात असत. एके दिवशीं चार प्रवासी ब्राह्मण त्या ठिकाणीं आले व देवनाथांस पाहून, हे कोणी तरी मोठे साधु आहेत अशा भावनेनें 'आपल्याजवळ रहाण्याची आह्मांस आज्ञा असावी' अशी नाथांस त्यांनीं विनंति केली. त्यावर, देवनाथांनीं त्यांस सांगितलें कीं, 'मी नुसता लिंब खाऊन राहतों, तसें जर तुमच्यानें राहवेल, तर खुशाल रहा.' ही अट मान्य करून ते ब्राह्मण तेथेंच राहिले. लिंबाच्या पाल्यावर त्यांनीं चार दिवस कसेबसे काढिले; पण पुढें त्यांच्यानें टिकाव धरवेना. पांचव्या दिवशीं तर ते इतके अशक्त झाले कीं, त्यांस बसल्या जागेवरून उठण्याचीही ताकद राहिली नाहीं. ही त्यांची शोचनीय स्थिति पाहून देवनाथांस मोठा कळवळा आला; व त्या ब्राह्मणांपैकीं एकाच्या धोतराची झोळी करून, ते शहरांत भिक्षेस निघाले. अगदीं पहिल्यानेंच ते एका पुराणिकाचे घरीं गेले; पुराणिकबुवा बाहेर गेले होते. त्यांची पत्नी अत्यंत तामसी स्वभावाची होती. नाथांनीं मोठ्यानें श्लोक ह्मणून भिक्षा मागतांच, ती मोठ्या फणकाऱ्यानें बाहेर आली व 'कोण आला आहे मला गले लठ्ठ गोसावडा; कोठें तरी कामकाज करून पोटास मिळविण्यास काय झालें?' असल्या नेहमींच्या शब्दांनीं तिनें त्यांची चांगलीच पूजा केली! त्यावेळीं देवनाथांस भिक्षावृत्तीबद्दल मोठा खेद वाटला व 'जळो मागत्याचें जिणें। धिक् धिक् हें लाजिरवाणें।' या शब्दांनीं प्रारंभित होणारें एक पद त्यांनीं म्हटलें. नंतर, बाईपाशीं त्यांनीं पुनः भिक्षा मागितली. पुनः बाईनें त्यांजवर कठोर शब्दांचा वर्षाव केला. पुनः नाथांनीं पद ह्मणून भिक्षा मागावी; त्यावर बाईनें त्यांजवर दुर्वाक्यवृष्टि करावी, असा प्रकार चालू आहे, तोंच पुराणिकबुवा घरीं आले. देवनाथांस पाहतांच त्यांनीं त्यांस साष्टांग नमस्कार घातला व त्यांस त्रास दिल्याबद्दल आपला पत्नीची चांगली कानउघाडणी केली. नंतर, 'बाईस भिक्षा घालावयास सांगा' असें देवनाथांनीं पुराणिकबोवांस सांगितलें. बाईनें बरेचसे तांदूळ आणले, परंतु त्यांतले फक्त एक मुष्टि तांदूळ घेऊन देवनाथ तेथून दुसरीकडे भिक्षेस गेले. परंतु हा 'प्रथमग्रासे मक्षिकापात' झा.ल्यामुळें, पुढें त्यांस

त्या दिवशीं भिक्षा मिळाली नाहीं, असें सांगतात. शेवटीं कंटाळून नाथ देवळांत आले. गणपतीपुढें आसन घालून त्यांनीं गणपतीचें ध्यान केलें व त्यास जागृत करून, पुष्कळ विनंति केली. परंतु कांहीं उपयोग झाला नाहीं. शेवटीं रागानें तलवार उपसून नाथ गणपतीच्या अंगावर धांवून गेले, त्या वेळीं बिचारा गणपति भयानें चार हात मागें सरला, असें सांगतात ! कांहीं वेळानें, एक श्रीमंत गृहस्थ गणपतीच्या दर्शनास आला व त्याजपुढें कांहीं द्रव्य ठेवून, निघून गेला. देवनाथांनीं तेंच द्रव्य त्या बुभुक्षित ब्राह्मणांस देऊन, यथेच्छ भोजन करण्यास सांगितलें. नंतर त्यांपैकीं एकानें मोठ्या कष्टानें शहरांत जाऊन व शिधासामुग्री आणून, सर्वांस भोजन घातलें. थोडीशी दुपारीं आल्यावर ब्राह्मण देवनाथांस ह्मणाले, 'महाराज ! आतां आपले पाय सोडून आह्मीं जाणार नाहीं.' देवनाथ ह्मणाले 'अवघ्या चार दिवसांत तुह्मांस पुष्कळ अनुभव आला आहे; तेव्हां जें काय करावयाचें तें विचारपूर्वक कराल तर चांगलें.' परंतु, ब्राह्मणांनीं आपला निश्चय ढळविला नाहीं व त्यांची श्रद्धा पाहून, नाथांनीं आपल्यापाशीं राहण्याची त्यांस परवानगी दिली. ह्या वेळपर्यंत देवनाथ एकटे होते. त्यांचा कीर्तनाकडे फार ओढा असल्यामुळें, त्या कामीं या ब्रह्मचतुष्टयाचा त्यांस पुढें फार उपयोग झाला. त्यांपैकीं एकानें गायनाचा व एकानें वादनाचा बराच अभ्यास केला व अशा प्रकारें कीर्तनाची चांगली तयारी झाली. नाथ कीर्तनास उभे राहिले ह्मणजे हे दोन असामी त्यांची साथ करीत, व दुसरे दोघे दौत लेखणी घेऊन नाथांनीं शीघ्र कवित्व उतरून घेत असत. नंतर बिऱ्हाडीं आल्यावर, परस्परांचीं टिपणें ताडून पाहून, तीं ते शुद्ध करीत असत. अशा प्रकारें, या दोन सद्गृहस्थांच्या परिश्रमामुळें, नाथांची बरीच कविता आज उपलब्ध आहे व ह्याबद्दल सगळ्या महाराष्ट्रानें त्यांचे आभार मानिले पाहिजेत.

वर लिहिल्याप्रमाणें गांवोंगांव कीर्तन करीत करीत, नाथांची स्वारी पुण्यांत येऊन दाखल झाली. तेथें त्यांचीं कीर्तनें लोकांस इतकीं आवडलीं कीं, त्यामुळें थोड्याच दिवसांत त्यांची सर्वत्र प्रख्याति झाली. कीर्तनाचा नित्य नूतनविषय, नित्य नवकवित्व, वाणी रसाळ, ईश्वरी प्रसाद व असामान्य अधिकार इत्यादि कारणांमुळें पुण्यपत्तनस्थ जनांच्या मनांवर देवनाथांची चांगली छाप बसली. त्या वेळीं श्री. सवाई माधवराव पेशवे राज्य करीत होते. त्यांच्या मातुश्री श्री. गंगाबाई यांच्या कानीं देवनाथांची कीर्ति गेली व सत्पुरुषाचें दर्शन घ्यावें, या हेतूनें आपले लोक पाठवून देवनाथांस त्यांनीं निमंत्रण केलें. परंतु देवनाथांनीं 'आह्मी गरीब; आह्मांस श्रीमंतांच्या दर्शनानें

उपाधि होतो. तस्मात् आह्मांस येण्याचें प्रयोजन नाहीं.' असें उत्तर दिलें. शेवटीं, गंगाबाईनीं, मोठमोठ्या गृहस्थांस पाठवून त्यांजमार्फत अतिशय आग्रह केल्यामुळें व अनुग्रह घेण्याची इच्छा प्रदर्शित केल्यावरून, नाथ निरुपायास्तव वाड्यांत गेले. तेथें बाईनीं त्यांस चार दिवस ठेवून घेतलें व त्यांचा अनुग्रह घेतला. वाड्यांत नाथांचें चार दिवस कीर्तन झालें. नंतर नाथांनीं, स्वदेशीं जाण्याची इच्छा प्रदर्शित केल्यावरून, श्रीमंतांनीं बरोबर घोडेस्वार देऊन व पालखींत बसवून, नाथांची रवानगी केली. त्या सर्व सरंजामासह नाथ सुर्जीत आले व प्रथमतः त्यांनीं आपल्या मातुश्रीची भेट घेतली. 'आह्मांस उपाधि होतो' असें ह्मणणाऱ्या देवनाथांनीं या सगळ्या थाटमाटाचा स्वीकार कसा केला, असा प्रश्न येथें उत्पन्न होतो; तर त्याचें उत्तर इतकेंच कीं, 'जेव्हां मी पालखींत बसून येईन तेव्हांच तुझें दर्शन घेईन' असें नाथ रागाच्या सपाट्यांत आपल्या मातुश्रीस एकदां बोलले होते व तें भाषण खरें करण्यासाठींच या वैभवाचा त्यांनीं कांहीं वेळ स्वीकार केला. ह्या सगळ्या गोष्टीचें देवनाथांच्या मातुश्रीस व कुटुंबांतील मनुष्यांस केवढें कौतुक वाटलें असेल व केवढा आनंद झाला असेल, त्याची वाचकांनींच कल्पना करावी. सुर्जीत आल्यावर, पेशव्यांकडील सर्व सरंजाम नाथांनीं परत पाठविला; व सुर्जीत राहून आसपासच्या गांवांतील लोकांचें लक्ष्य भक्तिमार्गाकडे वळविण्याचा क्रम चालविला. सुर्जीत ज्या ठिकाणीं नदीतीरीं पिंपळाचे झाडाखालीं पूर्वी तालमीचे आखाडे होते त्याच ठिकाणीं नाथांनीं आपला मठ स्थापिला व तो अद्याप तेथेंच आहे. ज्या ठिकाणीं त्यांनीं लोकांस पूर्वी कुस्तीची तालीम दिली त्याच ठिकाणीं, लोकांस परमार्थाची तालीम देऊन, कामक्रोधादि मल्लांशीं लढून त्यांचा पराजय कसा करावा, हें शिकविण्याचा त्यांनीं उपक्रम केला. पुढें कांहीं दिवस गेल्यावर देवनाथ सुर्जीहून अकोटास गेले असतां, तेथें एक चमत्कार घडला. दर शनिवारीं[1] भजन करीत भिक्षेस निघण्याचा देवनाथांचा परिपाठ असे; त्याप्रमाणें एका शनिवारीं अकोट येथें, ते भिक्षा मागत फिरत असतां, तेथें कोणी दिवाकरभाऊ या नांवाचे नरनाळ्याचे[2] किल्लेदार राहात असत, त्यांच्या आळींत नाथांची दिंडी गेली. त्यावेळीं दिवाकरभाऊ कांहीं सरकारी कामांत गुंतले असल्यामुळें, ह्या भजनी मंडळीच्या

१ हा परिपाठ अद्याप चालू आहे.

२ हा डोंगरी किल्ला वऱ्हाडांत जळगांव तालुक्यांत आहे.

टाळाच्या गजराचा आपणास उपसर्ग होऊं नये म्हणून, त्यांनीं आपल्या घराचें दार बंद करविलें. इतक्यांत देवनाथांची स्वारी तेथें आली व आपणास टाळण्यासाठीं, दरवाजा बंद केला असें पाहून, 'दार बंद केलें काय ? ठीक आहे; असेंच बंद राहील ' असे त्यांनीं उद्गार काढिले. कांहीं लोकांनीं हे उद्गार दिवाकरभाऊंस कळविले व 'सत्पुरुषांचें वचन सहसा खोटें होत नाहीं, यासाठीं तुम्ही त्यांस शरण जा, असा हितोपदेशही केला. परंतु दिवाकरभाऊंचा स्वभाव अंमळ मानी असल्या-मुळें, त्यांनीं त्याच मंडळीस देवनाथांस घेऊन येण्यास सांगितलें, त्याप्रमाणें मंडळींनीं नाथांस मागें फिरण्याची विनंति केली. त्यावर नाथ म्हणाले, 'आम्हीं एक वेळ पुढें गेल्यावर मागें फिरत नसतों.' नंतर मंडळीनें नाथांस पुनः मागें फिरण्याचा आग्रह केला; त्यावेळीं नाथांनीं इतकेंच उत्तर दिलें कीं, 'आमची व दिवाकरभाऊंची पुढील शनिवारीं वाटेंतच गांठ पडेल.' या भाषणाचा अर्थ, त्यावेळीं, कोणाच्याही लक्ष्यांत आला नाहीं; परंतु लवकरच असा चमत्कार झाला कीं, पुढील शनिवारीं नाथ त्या आळींत भिक्षेस गेले तों समोरून दिवाकर-भाऊंचें प्रेत स्मशानाकडे जात होतें ! शेवटीं त्या दोघांची अशा रीतीनें गांठ पडली !!

नाथ अकोटास गेले, त्या वेळीं सुर्जीतील मठाची व्यवस्था पाहण्यासाठीं, त्यांनीं आपले शिष्य जगू व गणू यांस सुर्जीतच ठेविलें होतें. देवनाथ सुर्जीहून गेल्यावर कांहीं दिवसांनीं, एका रात्रीं, कांहीं चोर मठांत शिरले; त्यावेळीं ह्या शिष्यांनीं त्यांचा यथाशक्ति प्रतिकार केला. परंतु चोरांची संख्या मोठी असल्यामुळें, ह्या दोघांस जखमी करून व मठांत जें काय हातीं लागलें तें घेऊन, चोर पळून गेले. इकडे हे दोघे शिष्य मरणोन्मुख होऊन, केवळ नाथाच्या भेटीसाठीं कंठीं प्राण ठेवून पडले असतां, तिकडे नाथांस स्वप्न पडून ही एकंदर हकीकत कळून आली. ते तात्काळ अकोटाहून निघून सुर्जीस आले. त्यांच्या दोन्ही शिष्यांनीं, केवळ गुरु दर्शनासाठीं, कंठीं प्राण ठेविले होते. देवनाथ येतांच, त्यांनीं अश्रु ढाळले; आणि 'आपल्या चरणाचें दर्शन झालें, आतां आम्हीं येतों,' असें ते म्हणाले. त्यांजकडे कृपापूर्ण दृष्टीनें पाहून नाथ म्हणाले 'तुम्हांस उत्तम गति प्राप्त होईल.' शिवाय 'तुमची कांहीं इच्छा आहे काय ?' असेंही नाथांनीं त्यांस विचारलें. त्यावर, आपलें नांव मागें राहील, अशी कांहीं व्यवस्था व्हावी, अशी इच्छा त्यांनीं प्रदर्शित केली. ही त्यांची इच्छा पूर्ण करण्याचें नाथांनीं त्यांस अभिवचन दिलें व नंतर त्या शिष्यांनीं स्वर्गारोहण केलें. पुढें, नाथांनीं, आपल्या गुरूच्या पुण्यतिथीचे दिवशीं, ह्या दोघां

शिष्यांच्या नांवानें दोन शूद्र बोलावून त्यांची पूजाअर्चा करून त्यास भोजन घालण्याचा क्रम सुरू केला. त्याप्रमाणें, हा क्रम त्यांच्या मठांत अद्याप चालू आहे.

नाथ अकोटाहून सुर्जीस आल्यावर, तेथून एक मैलावर अर्जाजपूर नामक एक खेडेगांव आहे, तेथील अरण्यांत गेले. त्या वेळीं त्यांचा शिष्य सखाराम गुरव हाही, त्यांस नकळत, त्यांच्या मागून अरण्यांत गेला. त्या अरण्यांत देवजीबावा नामक एक सत्पुरुष राहत असत. ते अंजनगांवचे रहिवासी; जातीनें साळी होते. त्यांचा लहानपणापासून, योगाभ्यासाकडे फार ओढा असून, त्या शास्त्रात त्यांची बरीच गति झाली होती. याशिवाय, त्यांच्यासंबंधानें कांहींएक माहिती उपलब्ध नाहीं. नाथ देवजीबावांजवळ गेले, त्यावेळीं ते समाधिस्थ होते; हें पाहून नाथही त्यांच्या समोर समाधि लावून बसले. कांहीं वेळ गेल्यावर दोघेही जागृत झाले व पुढें योगशास्त्रांतील कांहीं गूढ प्रमेयांसंबंधानें त्यांचें थोडा वेळ संभाषण[१] झालें. या संभाषणाचे वेळीं, नाथांनीं, देवजीबावा समाधिस्थ असतांना, त्यांजकडून एक फळ आणविलें होतें. हें फळ घेऊन ते दोघेही सुर्जीत आले. सखाराम गुरवही त्यांचे मागोमाग येत होता. त्यास पाहून, तूं जें काय पाहिलें असशील, तें कोणासही सांगूं नकोस,' अशी नाथांनीं त्यास आज्ञा केली. पुढें पुष्कळ वर्षें, ही हकीकत त्यानें कोणास सांगितली नाहीं; परंतु तो बराच वृद्ध झाला, त्यावेळीं, देवनाथांच्या शिष्यपरंपरेंतील चौथे पुरुष रामकृष्णनाथ यांस, हा सर्व प्रकार त्यानें निवेदन केला. वर ज्या फळाचा निर्देश केला आहे, तें फळ सुर्जीतील मठांत बरेच दिवस होतें, असें सांगतात.

मोगलाईंत जाल्हने येथें आनंदीनाथ नामक एक सत्पुरुष रहात असत. देवनाथांचे गुरु गोविंदनाथ हे यावेळीं आनंदीनाथांच्या मठांत असून, देवनाथांस आपण अनुग्रह दिला, ही गोष्ट त्यांनीं आनंदीनाथांस सांगितली होती. इकडे देवनाथ प्रवासांत असतां, आपल्या गुरूंची फार दिवस भेट झाली नाहीं ह्मणून ते त्यांच्या शोधांत होते. पुढें, जाल्हने येथें आल्यावर गोविंदनाथांची व त्यांची गांठ पडली व त्यावेळीं देवनाथांचें साधुत्व व अनुभव पाहून आनंदीनाथांसही फार संतोष झाला. ह्या प्रसंगीं देवनाथांनीं तीन पदें[२] ह्मटलीं, त्यांत 'आनंदीनाथ हे दत्तात्रयाचा अवतार,' असा अर्थ ध्वनित केला आहे.

---

१ हें संभाषण रा. कावतकरांनीं काव्यसंग्रहांत दिलें आहे; परंतु विस्तारभयास्तव त्याचा समावेश मी येथें केला नाहीं.

२ देवनाथमहाराजकृत कवितासंग्रह (काव्यसंग्रह) १०२, १६६ व १६७ हीं पदें पहा.

पुढें, देवनाथ फिरत फिरत अकोल्यास आले; तेथें त्यांच्या कीर्तनाची, साधुत्वाची वेदांतनैपुण्याची व शीघ्रकवित्वाची फार प्रख्याति झाल्यामुळें, तेथील कित्येक शास्त्री लोकांस, त्यासंबंधानें मोठा विषाद उत्पन्न झाला. परंतु, देवनाथांशीं वाद-विवाद करण्याचें एकाही शास्त्र्यास धैर्य होईना. शेवटीं, आकोला येथेंच, बाळा-पूरचे नाना गावली नामक एक विद्वान् गृहस्थ राहात असत, त्यांस देवनाथांशीं वादविवाद करण्यासाठीं बोलावण्याचा सगळ्या शास्त्र्यांनीं विचार केला. हे नाना गावली मोठे विद्वान् व भगवद्भक्त असून त्यांच्या विद्वत्तेवरून काशीचे पंडित त्यांस व्यासजी असें ह्मणत असत; इतकेंच नव्हे तर श्रीव्यासांनीं त्यांस एक भागवताची पोथी[1] दिली होती, अशीही आख्यायिका आहे. ह्या गृहस्थांस पोटशूळाची व्यथा असून, पोटशूळ चालू असला ह्मणजे ते अधिक जोरानें वादविवाद करीत असत, असें सांगतात. सर्व शास्त्री नानाकडे गेले, त्यावेळीं ' माझा पोटशूळ चालू असला तर मी देवनाथांशीं वादविवाद करीन, चालू नसला तर करणार नाहीं ' ह्या अटीवर नानांनीं देवनाथांच्या कीर्तनास येण्याचें कबुल केलें. मग नाना व इतर शास्त्री त्याच दिवशीं रात्रौ नाथांच्या कीर्तनास गेले; परंतु नानांचा पोटशूळ, कीर्तन सुरू होतांच, कोणीकडे गेला कोण जाणे ! कीर्तन संपेपर्यंत शूळ उत्पन्नच झाला नाहीं ! शेवटीं, कीर्तन आटोपल्यावर, नाना उभे राहिले व सर्व शास्त्र्यांस ह्मणाले ' बाबांनों, तुह्मी सर्व अज्ञानी आहां; हा अवतारी पुरुष आहे; याची योग्यता ओळ-खण्यास तुह्मी असमर्थ असल्यामुळें त्याच्याशीं वादविवाद करून त्याचा पराजय करण्याची दुरिच्छा तुह्मीं धारण करितां. तरी आतां, सगळा अभिमान सोडून देवनाथांस तुह्मीं शरण जा. ' नानाचें हें भाषण ऐकतांच सर्व शास्त्र्यांनीं देवनाथांचे पाय धरिले व सगळ्या शास्त्र्यांची समजूत करून, देवनाथ तेथून सुर्जीस यावयास निघाले. वाटेंत, मुर्तिजापुर येथें एक यजुःशाखी ब्राह्मण होता, त्याची संतति जगत नसे. त्यासाठीं कित्येक देवांस त्यानें नवस करून पाहिले, परंतु कांहींएक उपयोग न झाल्यामुळें तो अगदीं उदासीन झाला होता. त्यावेळीं त्यास श्रीहरी नामक एक लहान मुलगा होता तो देवास अर्पण करावा, असें त्याच्या मनांत होतें.

---

१ कांहीं वर्षांपूर्वी सातारा जिल्ह्यांत ज्योतीबुवा महाभागवत नामक एक साधु होऊन गेले, त्यांच्यासंबंधानेंही अशीच आख्यायिका प्रसिद्ध आहे.

इतक्यांत, देवनाथ नामक सत्पुरुष आपल्या गांवीं उतरले आहेत, ही हकीकत त्यास कळतांच, आपल्या मुलास घेऊन तो त्यांजकडे गेला व ' माझी आजपर्यंतची संतति नष्ट झाली; हा एवढा मुलगा हयात आहे, तो मी आपणास समर्पण करितों ' असें ह्मणून आपल्या मुलास त्यानें नाथांच्या पायांवर घातलें. नाथांनीं त्या मुलास आपल्यापाशीं ठेवून घेतलें व पुढें योग्य कालीं त्यास अनुग्रह देऊन त्याचें दयाळनाथ असें नांव ठेविलें. हे दयाळनाथ देवनाथांचे पट्टशिष्य असून, ते कविता व कीर्तन करीत असत. त्यांची बरीच कविता[१] उपलब्ध असून, ती अगदीं चांगल्यापैकीं आहे.

देवनाथ व दयाळनाथ हे प्रवास करीत असतां, एके दिवशीं नागपुरास आले. तेथें दयाळनाथांचीं पुष्कळ कीर्तनें झालीं. तीं ऐकून लोक देवनाथांस ह्मणाले कीं, ' आपले शिष्य दयाळनाथ कीर्तन फार चांगलें करितात. ' आपल्या शिष्योत्तमाची ही सत्कीर्ति श्रवण करून, देवनाथांस मोठा हर्ष झाला. तथापि तो बाहेर न दाखवितां ते त्या लोकांस विनोदानें ह्मणाले, ' आह्मी दयाळनाथांपेक्षांही चांगलें कीर्तन करितों. ' मग त्याच रात्रीं देवनाथांनीं कीर्तन करण्याचें कबूल केलें. ही बातमी सगळ्या शहरात पसरतांच, कीर्तनासाठीं हजारों लोक जमा झाले. कीर्तनाची वेळ होऊन गेली तरी देवनाथ आपल्या बिऱ्हाडीं दयाळनाथांशीं बोलत बसले होते. लोक आपली वाट पहात बसले आहेत, असें समजतांच देवनाथांनीं दयाळनाथांस पुढें जाऊन कीर्तनास प्रारंभ करण्यास सांगितलें. त्याप्रमाणें दयाळनाथांनीं कीर्तनास सुरवात केली. मागाहून देवनाथ निघाले, ते जातांना, ज्या घरीं उतरले होते, त्या घरांतील एक दोन वर्षांचें मूल बरोबर घेऊन कीर्तनास गेले. देवनाथ येतांच दयाळनाथ खालीं बसले व देवनाथांनीं कीर्तन पुढें चालविलें. त्यांनीं तें लहान मूल आपल्या समोर बसविलें व त्याची समाधि लावून दिली. कीर्तन संपेपर्यंत तें मूल त्या स्थितींत होतें. त्याची दृष्टी निश्चलपणें देवनाथांकडे लागलेली होती. हा चमत्कार पाहून सगळ्या प्रेक्षकांस मोठें आश्चर्य वाटलें. त्याचप्रमाणें देवनाथांच्या कीर्तनाचीही फार वाहवा झाली.

---

१ देवनाथांची कविता छापून निघाल्यावर दयाळनाथांची कविता आपण प्रसिद्ध करणार, असें कै. ओकांनीं काव्यसंग्रहांत प्रसिद्ध केलें होतें, पण पुढें काय कारण झालें असेल तें असो, पण हा कालपावेतों दयाळनाथांची कविता कांहीं प्रसिद्ध झाली नाहीं. खेदाची गोष्ट आहे !

नागपुराहून देवनाथ उत्तर हिंदुस्थानांत प्रवास करीत करीत काशीयात्रेस गेले. काशी येथें त्यांचें नित्य भजन कीर्तन होऊं लागलें. एके दिवशीं कीर्तन चालू असतां, श्रोतेमंडळी पैकीं एका बाईचें लहान मूल अकस्मात् मरण पावलें. बाईनें दुःखावेगानें मुलाचें प्रेत देवनाथांसमोर आणून ठेविलें. ती त्यांस ह्मणाली 'आपल्या सारख्या सत्पुरुषांच्या मुखांतून भगवन्नामामृताचा वर्षाव होत असतां, माझ्या मुलाचा प्राण जावा, हें आपल्या साधुत्वास भूषणास्पद नाहीं!' हा विलक्षण प्रकार पाहून नाथ मोठ्या संकटांत पडले. ते त्या बाईस ह्मणाले, 'तुमचें ह्मणणें खरें आहे. ज्याच्या नामावर तुह्मी इतका विश्वास ठेवितां, त्याचेंच स्मरण मी आतां करितों.' इतकें बोलून नाथांनीं भजनाचा मोठा घोष सुरू केला, त्या प्रसंगीं त्यांनीं जें पद ह्मटलें त्याचीं ८२ कडवीं होतीं असें सांगतात; परंतु हें पद हल्लीं उपलब्ध नाहीं. फक्त त्याचें ध्रुवपद तेवढें रा. कावतकर यांस मिळालें; तें येणेंप्रमाणें:—

'तूं धांव धांव श्रीहरि! विश्वेश्वर! विश्वंभरणा! ॥
ओढवलें संकट अति राखीं ब्रीद जात रमारमणा ॥ ध्रु० ॥

हें समग्र पद ह्मणून होतांच, तें मृत मूल जीवंत होऊन एकदम खडबडून उठलें व सर्वांस मोठा चमत्कार वाटला. त्या बाईस तर केवढा आनंद झाला असेल याची कल्पनाच केली पाहिजे. या प्रसंगीं भगवंतास मोठें संकट घालावें लागल्यामुळें, पुढें कीर्तन न करण्याचा देवनाथांनीं निश्चय केला होता, असें सांगतात.

पुढें लवकरच, देवनाथ काशीहून सुर्जीस आले. देवनाथ हे जरी मोठे साधु होते, तरी सुर्जीतील लोकांशीं ते अगदीं सलगीनें व मिळून मिसळून वागत असत. फाल्गुनमासीं धुळवडीच्या दिवशीं गावांतील कित्येक लोकांबरोबर ते उखाणे घालीत व धुळवड खेळत चालले असतां, तिकडून एक गवळण येत होती, तिचें नांव घेऊन देवनाथांनीं एक उखाणा घातला. त्यामुळें त्या गवळणीस मोठा राग येऊन आपल्या मस्तकावरील दह्यांदुधाचें भट तिनें देवनाथांवर ओतिलें! ह्या गोरसस्नानामुळें देवनाथांस मोठा आनंद झाला; व त्या गवळणीस एक चांगला आशीर्वाद देऊन ते तेथून चालते झाले. पुढें ती गवळण आपल्या घरीं गेल्यावर तिचा किंचित् डोळा लागला व लागलीच ती खडबडून जागी झाली; त्याक्षणीं तिची चित्तवृत्ति एकदम पालटून गेली. तिच्या अंगांत एकाएकीं इतकी शांतता आली कीं त्याबद्दल गांवांतील सगळ्या लोकांस मोठें आश्चर्य व कौतुक वाटलें. पुढें ती

गवळण देवनाथांच्या दर्शनास नित्य येत असे. नंतर एके दिवशीं नाथांनीं तिला अनुग्रह दिला व या भवसागरांतून मुक्त केलें.

पुढें लवकरच देवनाथ सुर्जीहून प्रवासास निघाले. यानंतर ते पुनः सुर्जास कधीं आले नाहींत व आपणास पुनः सुर्जास येतां येणार नाहीं, हेंही त्याच वेळीं त्यांस कळून चुकलें होतें. सुर्जीहून निघतांना, देवनाथांनीं आपले बालमित्र खुशालरावबाबा देशपांडे यांसें पुढील पद म्हणून दाखविलें:—

रमते नाथ फकीर । कुइ दिन याद करोगे ॥ ध्रु० ॥
कुइ दिन ओढे शाल दुशाला । कुइ दिन भगवे चीर ॥ १ ॥
कुइ दिन खावे मेवा मिठाई । कुइ दिन पीवे नीर ॥ २ ॥
कुइ दिन हाथी कुइ दिन घोडा । कुइ दिन पाव जंजीर ॥ ३ ॥
कुइ दिन बस्ती कुइ दिन जंगल । कुइ दिन भयसुशीर ॥ ४ ॥
कुइ दिन महलेम्याने सोते । कुइ दिन गंगातीर ॥ ५ ॥
तुम अहो खुशाला रहो खुष हाला । फिर न मिले ये शरीर ॥ ६ ॥
देवनाथ प्रभुनाथ गोविंदा । तूं है सचा पीर ॥ ७ ॥

ह्या पदांतील 'तुम अहो खुशाला रहो खुष हाला' व 'फिर न मिले ये शरीर' या श्लेषात्मक शब्दसमुच्चयानें आपण पुनः तुमच्या दृष्टीस पडणार नाहीं, हें देवनाथांनीं खुशालरावांस ध्वनित केलें होतें, परंतु 'फिर न मिले ये शरीर' या वाक्याचा 'हा नरदेह पुनः मिळणार नाहीं.' असा अर्थ करून, खुशालरावबाबा त्यावेळीं चुकले. पुढें, देवनाथांनीं ग्वाल्हेर येथें निर्याण केल्याची हकीकत जेव्हां बाबांस समजली, त्या वेळीं वरील पद्यांतला व्यंग्यार्थ त्यांच्या लक्ष्यांत आला व अशा सत्पुरुषाच्या समागमांत राहूनही स्वतःचा उद्धार आपण करून घेतला नाहीं याबद्दल त्यांस फार वाईट वाटलें. असो.

देवनाथ सुर्जीहून निघाले ते फिरत फिरत ग्वाल्हेरीस गेले. त्यांच्या कीर्तनशैलीची पूर्वींच प्रख्यात झाली होती. शिवाय ते दिवस रामनवमीच्या उत्सवाचे होते. ग्वाल्हेर येथिल मंडळीनें उत्सवासाठीं राजवाड्यासमोर मोठा प्रशस्त मंडप उभारला होता. देवनाथांची स्वारी ग्वाल्हेरीस आली आहे, हें ऐकून, त्या दिवशींचें कीर्तन त्यांजकडून

१ देवनाथांचें हें पद आणि तुकारामाचा 'कईं वाहावें जीवन । कईं पलंगीं शयन ॥' हा अभंग, हीं दोन पद्यें अगदीं सारख्या अर्थाचीं आहेत.

करवावें, असें मंडळीनें ठरविलें व त्याप्रमाणें नाथांस विनंति केली. नाथ ह्मणाले ' हरिकीर्तन करावयास मी सदैव तयार आहें; परंतु कांहीं कारणामुळें कीर्तन न करण्याची मीं प्रतिज्ञा केलेली असून, ती प्रतिज्ञा मोडल्यानें जर कांहीं विघ्न उपस्थित झालें, तर त्याबद्दल तुह्मीं मला दोष देऊं नये. ' ह्या भाषणाचें मर्म मंडळीच्या लक्ष्यांत न येतां, त्यांनीं नाथांस कीर्तन करण्याचा अतिशय आग्रह केला व त्याप्रमाणें सदर मंडपांत नाथांनीं कीर्तन केलें. ' नैनं छिंदन्ति शस्त्राणि नैनं दहति पावकः ' ( गीता, अध्याय २ श्लोक २३ ) हें गीतावाक्य कीर्तनाचा विषय होता. पुढें रामजन्म झाला. पण दैवयोग विलक्षण ! आरतीच्या वेळीं गुलाल व कापूर यांचा एकदम भडका होऊन मंडपास आग लागली ! त्या वेळीं श्रोतेजनांची भीतीनें अगदीं धांदल उडून गेली. तथापि देवनाथांनीं अगदीं निर्भयपणें कीर्तन पुरें केलें व आपल्या सांप्रदायाचें कीर्तनाचे शेवटीं ह्मणावयाचें पद ह्मणून ते तसेच उभे राहिले. इतक्यांत एक कुत्सित गृहस्थ नाथांजवळ येऊन त्यांस ह्मणाला, ' महाराज ! परमात्मा अग्नीनें जळत नाहीं, असें आपण आतांच सांगितलें. तरी याचा अनुभव आतां कसा काय येतो, पाहूं. ' हें ऐकतांच देवनाथांनीं त्या ब्राह्मणाचा हात धरला व ते त्यास ह्मणाले ' आपण श्रोते व मी वक्ता; आपण दोघेही वरील विधानाची सत्यता आतांच पाहूं. ' हें ऐकतांच ब्राह्मण भयानें पळून जाण्यासाठीं हिसकाहिसकी करूं लागला. परंतु नाथांनीं त्यास बळकट धरून ठेवलें व स्वतः पुढील पद ह्मणून समाधि लाविली.

तुज काय ह्मणावें आह्मीं । दयाळू नाथ जगाचा तूं स्वामी ॥ ध्रु० ॥
पावन ब्रीद तुझें गा कंसारी, वेद गर्जती चारी ।

१ ' हा अनादि नित्यसिद्ध । निरुपाधि विशुद्ध । ह्मणऊनि शस्त्रादिकीं छेद । न घडे यया ॥ हा प्रळयोदकें नाप्लवे । हा अग्निदाहो न संभवे । एथ महा शोष न प्रभवे । मारुताचा ॥ ' ज्ञानेश्वरी.

२ पूर्वीं, बडोदें येथें जे ब्राह्मण नाथांपाशीं राहिले ह्मणून सांगितलें त्यांपैकीं दोन ब्राह्मण या प्रसंगीं नाथांच्या कीर्तनांत त्यांच्या मागें उभे होते. त्यांनीं हें पद उतरून घेतलें. नाथांनीं रचिलेली ही अगदीं शेवटची कविता होय. मंडपास आग लागून जळकीं लांकडें अंगावर पडूं लागलीं त्या वेळीं खुद्द देवनाथांनीं या ब्राह्मणांस बाहेर जाण्यास आज्ञा दिली व त्यामुळें ते वांचले.

पतित तारिले त्वां बहु भारी, गज गणिका व्यभिचारी ॥
ऐकुनि कीर्ति तुझी बा पुतनारी । शरणागत मी द्वारीं ।
आलों ठेविं मला निजपद्पद्मीं ॥ १ ॥
आदौ पल्लविं उचलुनियां घ्यावें । मग परतें लोटावें ॥
दिसतें उचित हें का बरवें, कृपाघना ! बोलावें ॥
दास तुमचा जगीं ह्मणवावें, तेणें विलया जावें ।
नवल वाटतें अंतरयामीं ॥ २ ॥
करुणासागरा श्रीगोपाळा ! कृष्णा ! त्रिभुवनपाळा ! ।
पांडवपाळका ! जी घननीळा, नंदयशोमतिबाळा ! ॥
झालें मानस हें अति विकळा, तवविरहाग्नीज्वाळा ।
दुःखित झालों मी बहुत श्रमी ॥ ३ ॥
विश्वोद्धारका गुरुगोविंदा, किती भोगावी आपदा ।
सरली आयुष्याची मर्यादा, काळें काढिल्या फरदा ॥
अजुनि दया येईना का मर्दा, बोल परमानंदा ।
रतला देवनाथ प्रभु या नामीं ॥ ४ ॥

हें पद अगदीं करुणरसपूर्ण आहे. जुन्या कवींत आणि नव्या कवींत जें मोठें अंतर आहे, तें हेंच होय. सगळेच जुने कवि मोठे व्युत्पन्न होते असें नाहीं. परंतु त्यांच्या साधुत्वामुळ देवी सरस्वती त्यांजवर इतकी खुष होती कीं, कोणत्याही स्थलीं आणि कोणत्याही कालीं, त्यांनीं कवित्व करण्याचें मनांत आणिलें कीं सरस्वतीनें आपलें सगळें शब्दभांडार त्यांच्या सेवेस सादर करावें ! तुकाराम कीर्तनास उभे राहिले ह्मणजे ‘ तुका सहज बोले वाणी । तेथें वेद वाहे पाणी ॥ ’ असा प्रकार व्हावयाचा ! देवीनें समई चालविलेली पाहून, गोपाळनाथांनीं तेथल्या तेथें त्या देखाव्याचें वर्णन एका पदांत केलें. जन्मापासून ज्या भाषेचा फारसा परिचय नाहीं अशा भाषेंत आयत्या वेळीं कवित्व करून, सोहिरोबांनीं महादाजी शिंद्यांची कानउघडणी केली. त्यांस अमरकोश पहावा लागला नाहीं, किंवा एक कविता रचण्यासाठीं दौत लेखणी घेऊन तासाचे तास थोबाडांत मारल्यासारखें तोंड करून बसावें लागलें नाहीं. असो.

वर लिहिल्याप्रमाणें देवनाथ समाधिस्थ होऊन बसले असतां कांहीं वेळानें सगळा मंडप दग्ध होऊन गेला व कांहीं मनुष्यें मरण पावलीं. त्यांत देवनाथ व त्यांच्या-जवळ बसलेला श्रोता हेही जळून गेले ! दुसरे दिवशीं, दग्ध झालेल्या माणसांच्या वरचीं मनुष्यें येऊन सांपडलेल्या प्रेतांचें त्यांनीं और्ध्वदेहिक केलें. देवनाथांचें प्रेत मुळींच सांपडलें नाहीं. दुसरे दिवशीं देवनाथांचे शिष्य ' मल्हारनाथ ' हे ग्वाल्हेरीस आले. त्यांस हा वृत्तांत ऐकून किती वाईट वाटलें असेल, याची कल्पना वाचकांनींच करावी. त्यांनीं, 'देवनाथांचें प्रेत सांपडल्याशिवाय अन्नग्रहण करणार नाहीं ' असा निश्चय केला. नंतर दुसरे दिवशीं त्यांस दृष्टांत झाला कीं ' मी कीर्तनास ज्या ठिकाणीं उभा होतों, तेथें उकरावें, ह्मणजे मी तुमच्या दृष्टीस पडेन. ' दृष्टांताप्रमाणें मल्हारनाथांनीं त्या ठिकाणीं उकरून पाहिलें; तेव्हां तेथें मारुतीची तांब्याची एक मूर्ति त्यांस सांपडली. ती मूर्ति आसनस्थ होती व हें आसन हल्लीं सुर्जी येथील मठांत आहे, असें समजतें. नंतर, मल्हारनाथांनीं ग्वाल्हेर येथें देवनाथांची समाधि बांधून तींत वरील मूर्तीची स्थापना केली. ह्या मूर्तीच्या चेहऱ्याशीं देवनाथांच्या चेहऱ्याचें बरेंच सादृश्य आहे असें ह्मणतात. देवनाथ हे मारुतीचा अवतार, अशी लोकांची समजूत आहे. जेथें मूर्ति सांपडली, तेथेंच देवनाथांचीं वस्त्रें सांपडलीं होतीं व तीं पुढें बरेच दिवस रामराव काळी नामक देवनाथांच्या एका शिष्यापाशीं होतीं, असें समजतें. ग्वाल्हेर येथील देवनाथांच्या समाधींतील सदर मूर्ति आठ दहा वर्षांपूर्वीं गुप्त झाली, असें ऐकतों. असो. अशा प्रकारें महासाधु देवनाथ यांची इहलोकींची यात्रा संपली.

देवनाथांची गुरुपरंपरा काव्यसंग्रहांत दिली असून, शिवाय त्यांच्या संप्रदायासंबंधानें कांहीं पद्येंही दिलीं आहेत, परंतु विस्तारभयास्तव तीं येथें उतरून घेण्यास सवड नाहीं. देवनाथांपासून चौथे पुरुष रामकृष्णनाथ हे ता. १ मे १८८१ या दिवशीं निजधामास गेले. हल्लीं देवनाथांपासून पांचवी व संप्रदायाची १८ वी पिढी चालू आहे.

देवनाथांचे शिष्य पुष्कळ होते; त्यांपैकीं कित्येकांचा नामोल्लेख पूर्वीं आलाच आहे. तथापि त्या सर्वांत दयाळनाथ हे श्रेष्ठ असून तेच देवनाथांचे पट्टशिष्य होते. त्यांची कविता बरीच असून ती देवनाथांच्या कवितेसारखीच सरस व प्रासादिक आहे.

देवनाथांची कविता पुष्कळ आहे, परंतु त्यांतली थोडीशी कविता काव्यसंग्रहांत प्रसिद्ध झाली आहे. देवनाथांच्या सुर्जी येथील मठांत त्यांची बहुतेक कविता अद्याप

आहे, परंतु ती कोणास दाखविण्यास किंवा प्रसिद्ध करण्यास मठाचे अधिकारी तयार नाहींत; त्यामुळें हें सगळें ज्ञानामृत महाराष्ट्रास असून नसल्यासारखें झालें आहे. देवनाथांची बहुतेक कविता कटाव व पदें यांच्या रूपानें लिहिलेली आहे. देवनाथांस लोकांचा उद्धार कसा होईल यासंबंधानें इतकी काळजी लागलेली दिसते कीं, कविता रचितांना, मात्रा, गण, यमक, छंद किंवा भाषाशुद्धि इत्यादि कवितेच्या बाह्य स्वरूपाकडे लक्ष देण्यास त्यांस सवड झाली नाहीं, ते आपला अनुभव आणि भक्तिभाव लोकांच्या अंतःकरणांत, जणूं काय, मोठ्या घाईनें ओतीत गेले आहेत. अशा स्थितींत, वामन, मोरोपंत, रघुनाथ पंडित यांजप्रमाणें मोठमोठ्या कथानकांवर लांब लांब काव्यें देवनाथांकडून लिहिलीं गेलीं नाहींत, याबद्दल कोणास आश्चर्य वाटावयास नको. त्यांची जी कविता काव्यसंग्रहांत प्रसिद्ध झाली आहे, तींत श्रावणाख्यान व श्रीकृष्णजन्म हीं दोनच काव्यें असून, बाकी सगळीं पदें आहेत. देवनाथांच्या कवितेसंबंधानें ज्ञानसंग्रहकारांचा अभिप्राय सर्वांस मान्य होण्यासारखा आहे, ह्मणून तोच येथें देतों. "देवनाथाचे देवस्तुतिपर सर्व कटिबंधांत राम, कृष्ण, मारुती, गणपति, पांडुरंग वगैरे सर्व देवांची स्तुति केलेली आहे. परंतु त्या सर्वांत रामाच्या व कृष्णाच्या वर्णनाचीं पदें फारच मनोहर असून शब्दसौंदर्य, अर्थमाधुर्य, वचनकोमलता, अनुप्रास, अर्थलालित्य वगैरे असंख्य गुणांनीं परिपूर्ण आहेत, तीं इतकीं कीं त्यांतील सरस कोणतें, याचा निवाडा मुळींच करितां येत नाहीं. प्रत्येक कटिबंधांतील भाषालाघव व शब्दरचना मोठी मनोहर व चित्रविचित्र भासूं लागते. देवनाथ कवीनें जितकीं भक्तिपर व देवस्तुतिपर पदें केलीं आहेत, तितकीं इतर थोड्याच कवींनीं केलेलीं आढळतात. यावरून देवनाथास आख्यानकवीपेक्षां साधुकवि ही पदवी जास्त शोभते. रामजोशाच्या बोधपर लावण्याप्रमाणें देवनाथकवीचे कांहीं उपदेशपर व वेदांतपर कटिबंध आहेत. त्यांपैकीं 'अमोलकाया जाइल वायां' हें देवनाथाचें बोधपर पद आबालवृद्धांच्या तोंडीं असून, तें इतकें सुरस व वैराग्यपर आहे कीं ऐकणाऱ्यास तात्कालिक स्फूर्ति उत्पन्न होते. देवनाथाच्या काव्यसौंदर्याचा, शब्दसौष्ठवाचा व अर्थलालित्याचा मासला पाहणें असल्यास त्याचे देवस्तुतिपर, वेदांतपर व बोधपर वेंचे 'काव्यसंग्रहांत दिले आहेत ते वाचून पहावे. एकंदरींत देवनाथ कवीच्या काव्याचें सर्वांगांनीं अवलोकन केलें असतां, याची कविता अमृतरायाच्या कवितेशीं बरोबर साम्य पावते. याच्या काव्यांत छंदोभंग व वृत्तवैचित्र्याभाव हे खेरीज करून दुसरे कोणतेही दोष आढळून येत नाहींत. याच्या भाषेंत ग्राम्यत

कोठेंही नसून, भाषा प्रौढ व अलंकारयुक्त आहे. एकंदरींत या कवीला अमृतराय, आनंदतनय, वामन, मुक्तेश्वर वगैरे कवींच्या मालिकेंत ओंवण्यास आह्मांस कोणतीही शंका वाटत नाहीं. " ( ज्ञानसंग्रह, पुस्तक ५ वें, अंक १ ला. )

देवनाथ हे शीघ्रकवि होते, यामुळें क्वचित् प्रसंगीं त्यांच्या कवितेंत शब्दांची ओढाताण झालेली आढळते व कित्येक अपरिचित शब्दही सांपडतात. देवनाथांस संस्कृत भाषेचें फारसें ज्ञान होतें, असें त्यांच्या कवितेवरून दिसत नाहीं. मात्र हिंदी भाषा त्यांस चांगली अवगत होती व त्या भाषेंतील त्यांची कविता मराठी कवितेइतकीच सरस आहे. त्यांच्या वाणींत एक प्रकारचा अधिकार व औत्सुक्य यांचें अस्तित्व प्राचुर्यानें अनुभवास येतें व यासाठीं मुक्तेश्वर, वामन इत्यादि कवींच्या मालिकेंत त्यांस ओंवण्यापेक्षां रामदास, रंगनाथ, जयराम, सोहिरोबा इत्यादि साधु-कवींच्या मालिकेंत त्यांची योजना करणें अधिक समर्पक होईल असें मला वाटतें.

देवनाथांचीं पदें कोणी नवीन चालींवर ह्मणूं लागल्यास बराच रसभंग होतो. तीं ह्मणण्याच्या ज्या चाली परंपरेनें चालत आल्या आहेत, त्याच चालींत तीं ह्मटलीं पाहिजेत. देवनाथांच्या कवितेंतील थोडेसे उत्कृष्ट वेंचे पुढें दिले आहेत.

श्रावणाख्यानांत दशरथाच्या बाणानें घायाळ होऊन मरणोन्मुख झालेला श्रावण दशरथास ह्मणतो.

**दिंड्या.**

येरु बोले ' मी ऋषी नव्हें साचा । वैश्यवंशीं जन्मलों सत्यवाचा ॥
असो, जन्माची गती घोर साची । परी चित्ता चिंताचि फार जाची ॥ १ ॥
वृद्ध मातापितरांसि वृक्षिं ठेवीं । सलिल न्याया त्यां चरण पुढें ठेवीं ॥
इथें येतां प्रारब्ध आड आलें । असो, होणारें तेंचि सिद्ध झालें ॥ २ ॥
हृदयिं सलतो शर काढ लागवेगें । जाय घेऊनि सलिल तूं सवेगें ॥
मुकाट्यानें तूं सलिल त्यांस पाजीं । मृत्यु वार्ता तूं कथन करीं माजी ॥ ३ ॥
प्रथम सांगसि तूं जरिहि वर्तमान । श्राप देतिल ते नव्हे उदकपान ॥
असें ऐकुनि हृद्रोग तया जाला । उदक हस्तीं तो वृद्धनिकट आला ॥ ४ ॥

**पद.**

न्हाणि हरितें सप्रेम नंदराणी । खाणी तीच्या भाग्याचि कोण वानी ॥ ध्रु० ॥
ज्याच्या स्नेहें देहभावा केलें परतें । ज्याच्या स्नेहें जाळिलीं सब दुरितें ।
ज्याच्या स्नेहें सायुज्यसौख्य भरितें । स्नेहें त्याचें जाऊळ माखि करिं ते ॥ १ ॥

गंगा जन्मे ज्याचिया चरणकमळीं । त्यावरि पाणी घालिती हस्तकमळीं ।
ब्रह्मादिक वंदिती पदरजधूळी । पदींची ती घेवोनि लावि भाळीं ॥ २ ॥
देवनाथ प्रभु अंबर या विश्वा कीं । अंग त्याचें पुसोनि वस्त्रें झांकी ।
सर्वांला जो व्यापक अणुरेणु कीं । सुख अनिळें तयाचे कर्णं फुंकी ॥ ३ ॥

पद.

अमोल काया जाइल वायां जशी कांच कीं फुटे फटकन् ॥
उभा काळ विकाळ लक्षितो वेळ होय सावध झटकन् ॥ खुप समजा ॥ ध्रु.॥
कृतिं त्रेतिं द्वापारीं होती आयुष्याची बहु भरती ॥
कळीमाजि शतवर्षें नेमिलीं परि तींहि न भरति पहा पुरतीं ॥
बारा चौदा पंधरा विंशति पचावसांमधिं किति मरती ॥
मागें मेले पुढेंही मरणार कोण करिल याची गणती ॥
आजा काका मामा मेला याचि साक्ष घ्या चित्तीं ॥
त्यांच शोकें दुःखित मानस शेवट तुमची तेचि गती ॥
देह आपुला जाइल याहो धरा सोय कांहीं चटकन् ॥
समय पातल्या उशिर न लागे गिळी काळ येउनि गटकन् ॥ खुप समजा० ॥
हत्ती घोडे माल खजीना कोणाची मंदिर माडी ॥
शेवटिं जाइल कांहिं न राहिल काय धरुनि याची गोडी ॥
तारुण्याच्या भरें घालशिल विषयभरें दाटुनि फुगडी ॥
आहा रांडेच्या ! समय कठिण तो जेव्हां काळ येउनि रगडी ॥
कांता सुंदर रंभा जैशी तिची मनाला प्रित गाढी ॥
जबरदस्त हा पाश स्त्रियेचा जशी कवाडा कुलुप कडी ॥
मोहसूसरी वोंगळ जी जळ पाय धरुन ओढी मटकन् ॥
जशी नंगि समशेर देहाचे तुकडे तुकडे करि कटकन् ॥ फिर मागें ॥ २ ॥
श्रीगुरु गोविंदनाथ निरंजन पादरेणु जेव्हां वरिला ॥
आत्मात्मी ब्रह्मानुभव शुद्ध भाव तेव्हां कळला ॥
जिकडे पाहे तिकडे अवघा चराचरी चित्घन भरला ॥
देवनाथ ह्मणणेंचि आटली लवण जळीं जैसा विरला ॥
विरला पुरला भरोनि उरला तो सुमनें गिळिला गटकन् ॥
देह विदेही स्थिति बाणली जन्ममरण चुकलें खटकन् ॥ धन्य गुरु० ॥३॥

पद.

अभयवरदकर गुरुवर स्मर मग स्मरबाधा न घडे ॥
सुखकर गुरु तर नित्य निरंतर चिन्मय सुख उघडे ॥ ध्रु० ॥
क्षणभरि तरि वरि सावध राहतां जों वरि वरि करणें ॥
करकर वर वर टाळुनि हरिहरगुणिं रसना भरणें ॥
गौरव हा तिस रौरव नामक गोष्पद भव तरणें ॥
श्रुतिमति अति गति अधिष्ठितां स्थिरली सत्संगति करणें ॥
चाल ॥ सत्संग करिल भवभंग भ्रांति उडवी ॥
अभंग सहज निजरंग प्राप्ति घडवी ॥
निःसंग त्यागि वैराग्य वृत्ति जडवी ॥
टीप ॥ सांग शुद्ध चिद्रांगप्राशनीं अंतर्मळ उपडे ॥
आत्मसाधना विनटे नर मग भव पाशीं न पडे ॥ अभय० ॥ १ ॥

आत्मसाधना गुरुचिन्नामृतरस रसना चाखी ॥
तादृश तद्भक्तांसीं गोष्टी नाम असे निरखी ॥
स्वानुभवोद्भव स्वसुखासाठीं निजमानस पोखी ॥
ब्रह्मसत्त्वाभ्यंतर भरलें परि भ्रांति नये पारखी ॥
चाल ॥ गुरुनाथ व्यापुनी स्थावर जंगम हा ॥
समरसें चित्त आत्मांतरिं संगम हा ॥
सद्भावें होतां वरि वा सत्संग महा ॥
टीप ॥ संगानें त्या सुखात जाहल्या मनमळ जळे न सुटे ॥
एकलें सुखशयनीं वृत्ती निजस्वरूपीं पहुडे ॥ अभय० ॥ २ ॥

होतां ऐक्य उरी न उरे कर्पूर दीप जैसा ॥
मिळतां येणें रिति स्वानंदें निजस्वरूपीं तैसा ॥
पाहतां पाहणें श्रमलें न चले शब्दांचा ठसा ॥
तें तूं तूं तें तें मी नाहीं नाहीं आहेसा ॥
चाल ॥ हें समरसभर भरलेंसे सर्वस्वीं ॥
अनंत रवी तेजाहुनि तेजस्वी ॥
हें वर्म जाणती तादृश न तपस्वी ॥

टीप ॥ स्वानुभवें ज्या तद्रुप जे त्यां हे झाडेझूडे ॥
ब्रह्मरूप करि घोडे सर्वहि मुंगी माकोडे ॥ अभय० ॥ ३ ॥
सच्चित्सुख आनंद गुरू गोविंद कृपाघन हा ॥
वळला तैं मग गळला भवभ्रम व्यापक जनिं वनिं हा ॥
निर्घोट जो अतिथाट दाटला निजात्मजीवन हा ॥
पाहति त्याप्रति लोचन पाहतेपण गाळुनि पण हा ॥
चाल ॥ हें परमपरात्पर गुज दे गुरु दाता ॥
जो विश्वांतरगत नांदे भय त्राता ॥
वर्णितां शीणल्या श्रुति मुखिं गुण गातां ॥
टीप ॥ देवनाथ पदकमळा मोदा सेविति सुरवाडे ॥
वाढे तैं साम्राज्यसमाधी सुख सुमना गाढे ॥ अभय० ॥ ४ ॥

## पद.

कोणिकडे तुह्मीं जातां, जात जिवलगा । घडीभर बसा, गोष्ट सांगा ॥ ध्रुवपद ॥
विरह तुमचा जी ! तुमचा जी ! साहीना । चित्त पायाविण पाहीना ॥
माझी कशी दया, दयाच येईना । कठिणता काय ह्मणुनि स्वमना ॥
तुह्मी धरियली, धरियली जगजीवना । हात जोडितें विनंति माना ॥
दासी मी तुमची, तुमची जिवलगा; । घडीभर० ॥ १ ॥
आधिं घेतलें, घेतलें मला पदरीं । लोटितां काय ह्मणुनि दूरी ? ॥
उपेक्षूं नये, नये जी निर्धारी । शरण आलिया दिनोद्धारीं ॥
चाला या घरीं, घरीं लागवेगा ॥ घडीभर० ॥ २ ॥
साधनांतरीं, अंतरीं लक्ष कोटी । साधली बहु तुह्मांसाठीं ॥
गिरीकंदरीं, कंदरी जी कपाटीं । बैसलें धैर्य धरुनि पोटीं ॥
योग साधिला, साधिला महाहाटी । झालें मी फार हिंपुटी ॥
दृष्टि तुह्मी न पडा, न पडा भवभंगा । घडीभर० ॥ ३ ॥
अंतरगृहीं गृहीं जी सातबंकी । अष्टभावाच्या पर्यंकीं ॥
प्रेमभरित म्यां, भरित म्यां रचलें कीं । भक्तिनें सुमनसेज निकी ॥
लहर मदनाची, मदनाची महाबांकी । दुःख दे मला जाचते कीं ॥
चला या त्वरें, त्वरें अंगसंगा । घडीभर० ॥ ४ ॥

द्वैत अद्वैत, गाळुनियां सहजे । स्वरूपीं अखंड मन विरजे ॥
अक्षयीं पहुडूं, पहुडूं सुखसेजे । भोगुं स्वानंदसायोज्ये ॥
हेंचि मागणें, मागणें गुरुराजे ! । इतुकें दान मला दीजे ॥
देवनाथाच्या, नाथाच्या अंतरंगा ॥ घडीभर० ॥ ५ ॥

पद.

निबिड सघन हे मध्यशार्वरी हरि वाजवि मुरली ।
मम मानस वश झालें विशेषें मति त्या रवि मुरली ॥ ध्रुव० ॥
भर्ता भोक्ता अलिसुमशर तनु अळिज ऐक्य असतां ।
भव्य सुखद रव मंजुळ गुरुतर तैं श्रवणीं बसतां ॥
हिमनगजापतिचा अरिसायक होय हृदयीं सलता ।
पद चाली अलि तसीच वृंदावनि कोणी नसतां ॥
चाल ॥ लागला छंद त्या रवांत सुमनाचा ।
विगलीत वसन पथ धरीत भ्रमणाचा ।
लक्षोनि अयन चालत फणिशयनाचा ॥
टीप ॥ प्रपंचि अरुची धरि रुचि हरिपदसरोजाचि वरिली ।
तग मग अति जिवीं लगबग करुनी वनवृंदीं शिरली ॥ निबिड ॥ १ ॥
कनककमलमृदुमृणाल अशनी वहन गहन ज्याचें ।
मुक्ती मुखगत प्रमुख मनोहर मुख तत्पितयाचें ॥
बाल मेहरशत लज्जित गति बा ! भालचंद्र ज्याचे ।
नाम जपत शम दाह्या गरगळ रूप याध प्रभुचें ॥
चाल ॥ मनमीन आकळी वळें प्रेमसूत्रें ।
रवबाण हाणितां भेदि मोहयंत्रें ॥
तनु भावरहित जाहली गलित गात्रें ॥
टीप ॥ रमारमण निजवदन विलोकुनि मति जी अनुसरली ॥
गरसम घर करि हर हर रवगति हृदयीं संचरली ॥ निबिड ॥ २ ॥
सजल सघन घन वळला गरगर सभर स्रवति बिंदू ।
सजल चीर अति रुचिर समीरण ये साधित द्वंद्वु ॥
न गणुनि श्रम मम मानस धरी ईशपदांबुजि छंदू ॥
आनंदुसिंधु दिनबंधु रवि ज्या तटि ब्रह्मानंदू ।

चाल ॥ स्वानंद पूर्ण निरखितां रूप नयनीं ।
समरसे चित्त सांठवी हृदयभुवनीं ॥
नासला भास जाहला ऐक्य मिळणी ॥
टीप ॥ पूर्ण ब्रह्म गोविंदजिची श्रीमूर्ति मनीं भरली ॥
देवनाथ सायुज्यवृत्ति त्या सुखांत तरतरली ॥ निबिड० ॥ ३ ॥

पद.

पार्था ! ते तरले ते तरले । जे नामीं अनुसरले ॥ ध्रु० ॥
वैराग्यें गरगरले । जे चित्सुखांत कीं तरतरले ॥ पार्था० ॥ १ ॥
शांतिसुखें आभरले । जैसें लवण जळीं कीं विरलें ॥ पार्था० ॥ २ ॥
देवनाथिं मन मुरलें । स्वरुप ब्रह्म दिठीं जग भरलें ॥ पार्था० ॥ ३ ॥

पद.

बिना भगत ! भगवानभजनबिन कहु कैसे भवतरण ।
काल शिर करनें बैठा हरन ॥ ध्रुवपद० ॥
नहीं फाम बेफाम हुवा तैं, नहीं खबर तुझे जरा ।
बिखय बिख गर्द जर्दमे परा ॥
हुवा सर्द तैं, मर्द नही बेब्हा दर्दने घेरा ।
अकलगुंग बेसुध होकर परा ॥
याद पकर मन ठौरहि धरके, गुरु दरवाजे खरा ।
जाय बेनाहक भ्रमसो भरा ॥
दयाल श्रीगुरुराज देव रसराज दर्दका पुरा ।
पलखमे चुके कालका फेरा ॥
मान बचन, अनुमान डारके जाय, पकर गुरुचरन ॥ कालका ॥ १ ॥
कहां माडि और कहां अटारी कहां दौलत रथ घोडे ।
काल जब आन छातिसों भिडे ॥
माइबाप और भाइ कबीला लडके छोटे बडे ।
कोइ नहि नजीक रहते खडे ॥
जलदी जलदी उठाव मट्टी, पुकार यहि सब पडे ।
कि जब तन तेरा अचेतन पडे ॥
झूटी काया झूटी माया घटे रोग ये बडे ।

खुसी हो बजाय जम चौघडे ॥
कोउ नहिं अपना सपना सारा पकड ग्यानकी धरन ॥ कालका० ॥ २ ॥
ग्यान दे येही अपना देख सुरत कर जरा ।
बनाया अजब तऱ्हे पींजरा ।
अंदर तोता राज करता घट घट मे है भरा ॥
सुरत महबूब पाक चेहरा ॥
नहिं काला नहिं पीला नीला नहीं लाल नहिं हरा ।
रंगबिन रंग खूब एक तरा ॥
वो तो तूंही, तुजबिन कोई और नहीं दूसरा ।
गुरूबिन ग्यान मिलेना पुरा ॥
मन साफीसो गुरूचरणसो भाव पकर, हो शरन ॥ काल० ॥ ३ ॥
गुरुमेहरसो चुके कहर, दिलदार बहार वो मिले ।
हमेषा मस्त मगनमो झुलें ॥
रामनामकी नौबत बाजे ग्यानगोधडी गले ।
सुनोजी भाग उनोके खुले ॥
आपहि अपने साथी गुरु फिर आपहि अपने चेले ।
आपमो आप भये मतवाले ॥
अजब खेल साहबका जिसका भाग उसीकू मिले ।
कि निगुरे मायामो ज्या भुले ॥
देवनाथ कहे साच चुकावे गुरू जनम और मरन ॥ काल० ॥ ४ ॥

पद.

योगीयांच्या नये ध्यानीं । वर्णितां शिणली श्रुतीची वाणी ।
तो नंदाच्या आंगणीं । सांवळि ग ! माझी ॥ १ ॥
नकळे जो कां ब्रह्मादिकां । बाळलीला करी कौतुका ।
उंबरा चढतां धरितो टेंका । सांवाळि ग ! माझी ॥ २ ॥

दुडदुड आंगणीं रांगत जाये । 'माय यशोदे' ह्मणवुनि बाहे ।
स्मरतां निगमासी होतें साह्य । सांवाळि ग ! माझी ॥ ३ ॥
रडतां किमपी उगलि न राहे । माता उचलुनि घे जे कडिये ।
विश्वीं व्यापुनि अलिप्त राहे । सांवाळि ग ! माझी ॥ ४ ॥
माता नेउनियां निजसदना । चुंबन देउनि पाहे वदना ।
स्वरुपें उणे आणी मदना । सांवाळि ग ! माझी ॥ ५ ॥
आंगणीं गडबड घे लोळणी । माता देताहे खेळणीं ।
नेउनि निजवी पाळणीं । सांवाळि ग ! माझी ॥ ६ ॥
निजवितां निज घेना । बाहेर आणितांही येना ।
बाळलीला दावी नाना । सांवाळि ग ! माझी ॥ ७ ॥
धरितां हातीं....धंदा । अकस्मात आली राधा ।
तिचिया जवळी देत यशोदा । सांवाळि ग ! माझी ॥ ८ ॥
राधा बोलत....नेटें । कां गे; रडतेसी गोरटे ? ।
राधा देखुनि हर्षे दाटे । सांवाळि ग ! माझी ॥ ९ ॥
राधिकेनें ते अवसरीं । उचलुनि घेतां कडिये वरी ।
उगी राहे निर्विकारी । सांवाळि ग ! माझी ॥ १० ॥
राधे लागीं बोलत माता । मातें श्रमविलें....ता ।
उगी राहे गे ! त्वां घेतां । सांवाळि ग ! माझी ॥ ११ ॥
आतां स्वगृहीं घेउनि जाईं । राधा 'अवश्य' ह्मणवुनि पाहीं ।
घेउनि आली ते निजगेहीं । सांवाळि ग ! माझी ॥ १२ ॥
दूधभात कालवोनी । पुढें ठेवित कामिनी ।
राधा घाली पाहुनि नयनीं । सांवाळि ग ! माझी ॥ १३ ॥
श्रीमुख लक्षित उभी राधा । कामबाणें केली बाधा ।
जाणुनि तिचिया अंतरंगा । सांवाळि ग ! माझी ॥ १४ ॥
तिचें विठ्ठल पाहुनि मन । राधे मुख कां झालें म्लान ? ।
हळुच बोलताहे वचन । सांवाळि ग ! माझी ॥ १५ ॥

मी तों मुग्धा वयसा पाही । उगेंच बोलुनि होतें कांहीं ।
मोठी असती जरी कान्हाई । सांवळि ग ! माझी ॥ १६ ॥
धापा दाटुनियां पोटीं । हळुच बोले ते गोरटी ।
मूर्ति सगुण धाकुटी । सांवळि ग ! माझी ॥ १७ ॥
राधेलागीं चढला कीं मद । बोलूनि हृदयीं झाली सद्गद ।
ऐकुनि हंसे तो खदखद । सांवळि ग ! माझी ॥ १८ ॥
मोठी होऊं बोले वचना । ऐकुनि हांसे व्रजांगना ।
पुरवी भक्ताची कामना । सांवळि ग ! माझी ॥ १९ ॥
तेव्हां धरुनी तरुण रूप । पुरवी मनींचा संकल्प ।
हरी दासाचे त्रीताप । सांवळि ग ! माझी ॥ २० ॥
देहभाव समूळ त्यागी । राधा समाधिसौख्या भोगी ।
व्यापक बाह्य अंतरंगीं । सांवळि ग ! माझी ॥ २१ ॥
देवनाथाची निज जननी । गातां कुंठित श्रुतीची वाणी ।
जींची अघिटत न कळे करणी । सांवळि ग ! माझी ॥ २२ ॥

पद.

येउंदे दया, दया देवदेवा ! । शरण मी तुला वासुदेवा ! ॥ ध्रु० ॥
गुंतलों माया, माया मोहपाशीं । जीव दुःखित बहु परदेशी ॥
कशी गत करूं, करूं हृषीकेशी । प्राण घाबरा कधीं येशी ॥
आज कीं उद्यां, उद्यां किंवा परवां ॥ शरण मी० ॥ १ ॥
कमळलोचना, लोचना कनकवसना । कर्ममोचना गरुडवाहना ॥
पतितपावना, पावना जी ! मनमोहना ! । कशी तुज नये माझी करुणा ॥
दीन मी नेणें, नेणें भक्तिभावा ॥ शरण मी० ॥ २ ॥
कुंदरद्युती द्युती मंदहासा ! । दीन बांधवा श्रीनिवासा ॥
विश्वजीवना, जीवना काय ऐसा । किती मजविशीं धरशी आळसा ॥
वर्णूं मी किती, किती कीर्ति केशवा ॥ शरण मी० ॥ ३ ॥

पतित तारिले, तारिले बहु भारी । कीर्ति ऐकूनि आलों द्वारीं ॥
रमानायका ! नायका जी ! कंसारी ! पतित एवढा भव भारी ॥
कीर्ति यशध्वजा, ध्वजा आजि उभवा ॥ शरण मी० ॥ ४ ॥
भक्ति वाहतों, वाहतों हरी ! तुजला । कदा बससी ना बा ! उगला ॥
ऐसी धांवुनी, धांवुनी कसा प्याला । मिराबाईस्तव विषप्याला ॥
माझी कां नये, नये सख्या ! कणवा ॥ शरण मी० ॥ ५ ॥
चिरें पुरवुनी, पुरवुनी सत्य साची । लाज रक्षिली त्वां भगिनीची ॥
होसी माउली, माउली निजदासांची । चित्सागरा दयावीची ॥
लोटिं मजवरी, मजवरी दे निज विभवा ॥ शरण मी० ॥ ६ ॥
स्वामी सद्गुरू, सद्गुरू श्रीगोविंदा ! । परमपुरुषा परमानंदा ॥
अविट अक्षया, अक्षया परमसुखदा । तोडिं हे मायिक अघआपदा ॥
होऊं नेदिं या, नेदिं या ज्ञानगर्वा ॥ शरण मी० ॥ ७ ॥
प्रार्थितों अती, अती विनित भावें । श्रवण देवोनि ऐकावें ॥
कृपासागरा ! सागरा त्वरित यावें । देवनाथासी अपंगावें ॥
दीन आपुला, आपुला ह्मणवा ॥ शरण मी० ॥ ८ ॥

देवनाथांचे शिष्य रंगनाथ व गोपाळनाथ यांचीही बरीच कविता असल्याचें समजतें.

---

# रामजोशी.

जसी जनकें दिधली निजकन्या राम जो सिता त्याला ॥
तसी मयुरें दिधली निज आर्या रामजोशि तात्याला ॥ १ ॥

रामजोशी हे सोलापुरचे राहणारे. यांचें घराणें तेथें वतनदार असून जोशीबुवांचे आजे, बाप व बंधु मुद्गलशास्त्री हे चांगले वेदशास्त्रसंपन्न होते. जोशीबुवांचे वंशज अद्याप सोलापुर शहरीं आहेत. जोशीबुवा पहिल्या बाजीरावांचे वेळीं होऊन गेले असें कविचरित्रांत लिहिलें आहे, परंतु तें यथार्थ नसून ते दुसऱ्या बाजीरावाचे वेळीं होऊन गेले अशी सप्रमाण माहिती मिळते. या रावबाजींच्या कारकीर्दीवर जोशीबुवांनीं केलेली एक लावणीही प्रसिद्ध आहे.

यांचा जन्म शके १६८४ ह्मणजे इसवीसन १७६२ यावर्षीं झाला व ते शके १७३४ इसवीसन १८१२ यावर्षीं मृत्यु पावले. त्यावेळीं त्यांचें वय ५० वर्षांचें होतें. जोशीबुवांस पहिल्यानें लावण्या ह्मणण्याचा व तमाशे पाहण्याचा फार नाद होता; त्यामुळें, " हा आपल्या सोज्वळ शास्त्री घराण्यास कलंक लावील " ह्मणून वडील बंधूंनीं त्यांस घरांतून घालवून दिलें. त्यावेळीं जोशीबुवा पंढरपुरास, प्रसिद्ध विद्वान् धर्मसिंधुकार काशीनाथ बाबा पाध्ये या ईश्वरभक्त व प्रेमळ गृहस्थांकडे शिकावयास गेले. तेथें संस्कृत शिकण्यांत त्यांनीं तीन वर्षें काढिलीं. परंतु पुढें बाबांसही बुवांचा छंद कळल्यामुळें त्यांस तेथून रजा मिळाली. पुढें कांहीं वर्षें फिरत फिरत बुवांची स्वारी कर्नाटक प्रांतीं गेली. तेथें त्यांनीं कानडी भाषेचा अभ्यास केला व संस्कृतांतही चांगली गति मिळविली. ते विलक्षण बुद्धिवान, रसिक व ग्राहक होते. कांहीं वर्षांनीं फिरून बुवा परत गुरुगृहीं आले व तेलंगी ब्राह्मणाच्या वेषानें, तशीच भाषा व सूर काढून, बाबा पाध्यांच्या घरांत शिरले. ते तेथें भोजन होत असतांनाच बाबांस ह्मणाले " महाराज! आपणापाशीं कांहीं याचना करावयाची आहे. भोजनोत्तर करीन " नंतर त्या विलक्षण शिष्यानें संस्कृतांत गुरुंशीं वाद करून त्यांस आपली ओळख दिली व त्यांचे पाय धरिले. बाबा फार खुष झाले व बुवांच्या अचाट बुद्धीची तारिफ करून ' तूं वरदी पुरुष आहेस ' असें त्यांनीं ह्मटलें.

नंतर जोशीबुवा सोलापुरीं आले. त्यांचा भाऊ पुराण सांगत असे. एके दिवशीं तो आजारी आहे असें पाहून जोशीबुवांनीं व्यासपीठावर आरोहण करून इतकें उत्कृष्ट पुराण सांगितलें कीं साऱ्या गांवभर त्यांची तात्काळ प्रसिद्धि झाली व भाऊही खूष होऊन त्यानें तें काम बुवांकडेच सोंपविलें.

जोशीबुवांच्या घरासमोर एक मठ आहे, तेथील मठाधिकारी जोशीबुवांचा फार तिरस्कार करीत व त्यांच्या स्वेच्छाचाराबद्दल उघड निंदा करीत असत. जोशीबुवांनीं एकदां मठासमोर असें सुरस कीर्तन केलें कीं तें ऐकावयास सहस्रावधी लोक जमले होते. बुवांचा आवाज फार मधुर व पहाडी होता. त्यांत चित्ताकर्षकत्व पराकाष्ठेचें होतें. लोक रंगांत येऊन डोलत आहेत अशावेळीं "भला जन्म हा तुला लाधला। हटानटानें पटा रंगवुनि जटा धरिसि कां शिरीं। मठाची उठाठेव कां करी॥" ही प्रसिद्ध लावणी बुवांनीं ताबडतोब रचून ह्मटली. त्यावेळीं त्या मठाधिकाऱ्यांची काय अवस्था झाली असेल याची कल्पनाच केली पाहिजे! ही लावणी शंकराचार्यांवर केली असें कोणी ह्मणतात पण तें खरें नाहीं. बालबोध मासिक पुस्तकांत बुवांसंबंधानें एक आख्यायिका दिली आहे. 'असें सांगतात कीं कोणे एके वेळीं रामजोशीबावांचें कीर्तन श्रीमंत घोरपडे यांनीं करविलें. पुष्कळ मंडळी बसली होती आणि कीर्तनास रंग चांगला चढला होता. इतक्यांत बुवांस बिदागी काय द्यावी, याविषयीं बारीक कुच-कूच कारभारी मंडळीत चालली. तेव्हां अर्थातच त्यांचें लक्ष्य कीर्तनाकडे नाहींसें झालें. तें सगळें वर्तमान बुवांच्या लक्ष्यांत आलें. तेव्हां, बुद्ध्या तसा ओघ आणून, त्यांनीं यजमानाच्या गुणांचें वर्णन आरंभिलें; आणि तेव्हांच्या तेव्हां रचून त्यांनीं आर्यार्ध ह्मटलें, तें:—

"भोजासम कविताप्रिय कर्णासम दानशूर घोरपडे ॥"

हें ऐकून महाराज संतुष्ट झाले, आणि कारभारी मंडळीही, कुजबुज करीत असतां खूष झालीशी दिसली; इतक्यांत त्यांजकडे हात करून, किंचित् हंसून बुवांनीं उत्तरार्ध ह्मटलें:—

"ऐसें असतां माझ्या देणगिचा कां तुह्मांस घोर पडे?" ॥ १ ॥

तें कानीं पडतांच, त्यांचीं तोंडें हिरमुसलीं झालीं; आणि ते माना खालीं घालून चूप बसले. श्रीमंतांनाही त्याचें किंचित् वाईट वाटलें.

या आख्यायिकेवरून, जोशीबुवांचें धोरण, निस्पृहता व शीघ्र कवित्व हे तीन गुण चांगले व्यक्त होतात.

कविवर्य मोरोपंत व रामजोशी यांचा फार स्नेह होता. दोघेही चांगले विद्वान्, कवि व रसिक असल्यामुळें त्यांचा स्नेह होणें साहजिकच होतें. मोरोपंत कविता लिहीत ती पसंतीकरितां जोशीबुवांकडे पाठवीत असत. एके दिवशीं पंत निरोष्ठ रामायणावर आर्या लिहीत बसले असतां जोशीबुवांनीं " तुह्मी काय करीत आहां " असें त्यांस विचारण्यास सांगून आपला गडी पाठविला. गड्यानें तसें विचारितांच पंतांनीं एका कागदावर " रघुनाथचरित लिहित आहें. " असें लिहून तो कागद जोशीबुवांकडे पाठवून दिला. बुवांनीं तें वाचून पाहतांच त्यांच्या ध्यानांत तात्काळ आलें कीं, पंत आज " निरोष्ठ रामायण " लिहीत असावे; कारण पंत त्या वेळीं अष्टोत्तरशत रामायणें लिहीत होते हें जोशीबुवांस माहितच होतें, व वरील वाक्यांत " रामायण लिहीत आहें " असें लिहिण्याचे ऐवजीं " रघुनाथचरित लिहित आहें " इतकें लांबलचक लिहिण्याचें कारण काय हें त्या वाक्यांच्या अक्षररचनेवरून त्यांच्या ध्यानांत आलें व पंतांच्या करारीपणाबद्दल त्यांस मोठें आश्चर्य वाटलें. जोशीबुवा लावण्या रचीत व तमासे करीत असत. यामुळें त्यांच्या कांहीं जातिगृहस्थांनीं त्यांस वाळींत टाकण्याचा प्रयत्न केला होता. " बुवा संध्या करीत नाहींत; हलकट लोकांशीं आपला स्नेह ठेवितात, वेश्येशीं ( हिचें नांव चिमा नायकीण ) उघड व्यवहार ठेवितात " वगैरे गोष्टी सांगून त्यांनीं शंकराचार्यांस, बुवांस जातींतून बाहेर टाकण्याविषयीं विनंति केली. आचार्यांनीं बुवांस पाचारण करून वरील हकीकत खरी कीं खोटी याबद्दल जाब विचारिला व तुह्मांस संध्या ह्मणतां येते कीं नाहीं, असेंही विचारिलें. बुवांनीं तत्क्षणींच " केशव करणी अघटित लीला नर नारायण हरी ॥ " ही चोवीस नांवांची सुप्रसिद्ध लावणी रचून आचार्यांस ह्मणून दाखविली. आचार्यांस याचें फार कौतुक वाटून त्यांनीं बुवांची पाठ थोपटली व त्यांस दोषमुक्त केलें. हें पाहून वरील उपद्व्यापी मंडळीचा चांगलाच नक्षा उतरला.

रामजोशी खरोखरच जर एवढे कर्मभ्रष्ट व हलकट लोकांशीं स्नेह ठेवणारे असते तर मोरोपंतासारख्या विद्वान् व सच्छील कविवरानें त्यांच्याशीं मैत्री करण्यांत एवढें भूषण मानिलें नसतें. यावरून जोशीबुवांच्या निंदकांनीं, त्यांचा सन्मान कमी करण्याच्या हेतूनें अशा कंड्या पिकविल्या असाव्या, असें दिसतें. मोरोपंतांचा व बुवांचा फार स्नेह होता. पंतांनीं आपल्या लावण्या ऐकाव्या ह्मणून जोशीबुवांनीं फार खटपट केली, पण " नटाचें तोंड पहाणें अशास्त्र " असें ह्मणून पंत त्यांचा

तमाशा पहाण्यास जाईनात. एकदां मंडळीकडे पाठ करून ते ऐकत बसले होते, पण जोशीबुवा पक्के त किंक ! त्यांनीं आपल्या लावण्यांत भक्तिरस असा ओतून दिला कीं, पंत फारच खुष झाले व बुवांस ह्मणाले, 'तुमची वाणी फार रसाळ आहे, ती कीर्तनांत योजावी व तमाशाचा नाद सोडावा.' जोशीबुवा ह्मणाले, 'मजजवळ कीर्तनाचें साहित्य नाहीं.' पंत ह्मणाले "मी काव्यें रचितों तीं कोणाकरीतां ? तुमच्यासारख्याकरितांच तो उद्योग आहे." नंतर बुवा पंतांच्या आर्या कीर्तनांत योजूं लागले. या लेखाच्या शिरोभागीं दिलेली आर्या या आख्यायिकेसंबंधानेंच रचिली आहे.

मोरोपंत एकदां बुवांच्या कीर्तनास बसले असतां, बुवांनीं द्रोणपर्वांतील एका आर्येचे दोन अर्थ करून सांगितले, व नंतर पंतांकडे वळून ते ह्मणाले, माझ्या अल्पबुद्धीला सुचले ते दोन अर्थ मी सांगितले, परंतु या आर्येंत आणखी किती अर्थ आहेत हें त्या 'विशालोदरासच' ठाऊक ! यांत गणपतीकडे व पंतांच्या स्थूलपणाकडे बुवांचा कटाक्ष होता. जोशीबुवा स्वतः उंच, सडपातळ व फार देखणे होते.

इसवी सन १८१२ मध्यें जोशीबुवा पुण्यास आले व त्यांनीं काशियात्रेची तयारी केली. ते इतके लोकप्रिय होते कीं, एका दिवसांत २५००० रुपये त्यांच्या पुढें येऊन पडले. परंतु जोशीबुवा दुसरे दिवशीं एकाएकीं वारले. त्यांस पुत्र नव्हता; स्त्री माहेरीं गेली. सोलापुरचा वंश त्यांच्या भावाचा आहे.

एकदां रामजोशी यांचें कीर्तन पंतांच्या आर्यांवर चाललें असतां, प्रसिद्ध वीरमणि परशुरामभाऊ पटवर्धन सभेंत होते. कर्णपर्वाच्या आर्या निघाल्या होत्या. कर्णाच्या मरणसमयीं पृथ्वीनें रथचक्र गिळिलें व एकंदर जो अधर्म झाला त्याचें जोशीबुवांनीं असें सुरस व वीररसोद्दीपक वर्णन केलें कीं, परशुरामभाऊंनीं ताबडतोब अस्तन्या मागें सारल्या व त्वेषानें तलवारीच्या मुठीवर हात ठेऊन ह्मणाले, 'काय ! मी असतां, असा अधर्म माझ्या डोळ्यांसमोर होतो काय ?' जोशीबुवांनीं त्यांस शांत करून पंतांच्या वीररसवर्णनकौशल्याची तारीफ केली. मराठी कवींनीं मराठे वीरांस कशी स्फूर्ति दिली, याचें हें एक उदाहरण आहे. जोशीबुवांस पंतांच्या आर्येचें वेड फार लागल्यामुळेंच त्यांच्या हातांतला डफ सुटून त्याच्या जागीं वीणा आला. पंतांच्या भागवतानें मूळ शुकाचार्यांच्या भागवतावर ताण केली, हा अभिमान जोशीबुवांनीं आपल्या खालील सरस आर्येंत व्यक्त केला आहे:—

'वाणी मयूरवदनीं जी न शुकातें द्विजोत्तमा यावी ।
पक्ष श्रीहरि धरि जरि काय न करि तरि अनंत मायावी ॥ १ ॥

या आर्येतील ‘ मयूर, शुक, द्विजोत्तम व पक्ष ’ या शब्दांतील श्लेष सहज लक्षांत येण्यासारखा आहे.

मोरोपंतांसंबंधानें जी कांहीं नवीन माहिती अलीकडे उपलब्ध झाली आहे तीवरून पाहतां पंत जोशीबुवांस फार मान देत असत असें दिसतें. पंतांनीं जोशीबुवांस पाठविलेलें एक पत्र मिळालें आहे, त्यांत पंतांनीं बुवांस “ कविप्रवर रामज्योतिर्विद यांस, सा. न. भेटि घडावी हे विनंति ” असें लिहिलें आहे. हें वाक्य फार महत्वाचें आहे. रामजोशी पंतांच्या मृत्युकालीं ३२ वर्षांचे होते व वरील पत्र बुवांच्या २७ व्या वर्षीं लिहिलेलें आहे. यावरून जोशीबुवांपेक्षां पंत वयानें मोठे होतें हें उघडच आहे, आणि मोरोपंतासारख्या कसलेल्या विद्वान् कविकुलमणीकडून आपल्या वयाच्या २७ व्या वर्षीं “ कविप्रवर ” पदवी प्राप्त करून घेणें कांहीं सामान्य गोष्ट नव्हे. यावरून जोशीबुवा आपल्या भर तारुण्यांतच चांगले नांवाजलेले कवि होते असें ह्मणण्यास हरकत नाहीं. शिवाय पंतांचीही दुसऱ्याच्या उत्तम गुणाबद्दल त्याचा योग्य सन्मान ठेवण्याची भूषणीय पद्धत त्यांच्यासारख्या सुशील स्वभावाच्या प्रेमळ कवीस शोभण्यासारखी नाहीं असें कोण ह्मणेल ? असो.

जोशीबुवांनीं “ छंदोमंजरी ” या नांवाचा छंदःशास्त्रावर एक ग्रंथ लिहिला आहे. त्यांतील कांहीं श्लोक निरनिराळ्या वृत्तांचीं उदाहरणें ह्मणून वृत्तदर्पण या पुस्तकांत दिले आहेत. या शिवाय त्यांच्या लावण्या पुष्कळ आहेत. त्यांतील कांहीं छापून प्रसिद्ध झाल्या आहेत व कांहीं सोलापुरास कवीच्या वंशजांपाशीं आहेत. त्या मिळविण्याकरितां शोधकांनीं फार खटपट केली, परंतु वंशजांच्या अज्ञानामुळें त्या अद्याप हातीं येत नाहींत ही निरुपायाची गोष्ट आहे. अशा प्रकारच्या गोष्टींत सुद्धां अद्याप अज्ञान आड यावें हें मराठी भाषेचें दुर्दैव होय ! जोशीबुवांची कविता प्रौढ व सरस असून निरनिराळ्या रसांनीं युक्त अशी आहे. जोशीबुवांस संस्कृत, मराठी, हिंदुस्थानी व कानडी या चार भाषांचें चांगलें ज्ञान होतें असें त्यांच्या कवितेवरून दिसतें. जोशीबुवांची चटकदार कविता ऐकून ज्याला आनंद झाला नाहीं असा मनुष्य विरळा.

जोशीबुवांच्या कांहीं लावण्यांत धोंडी शाहिराचें नांव आढळतें. यावरून त्या लावण्या त्यानेंच केल्या आहेत अशी काहीं लोकांची कल्पना होते. परंतु खरा प्रकार तसा नाहीं. सोलापुरांत जोशीबुवांच्या घरासमोर धोंडी शाहीर या नांवाचे एक गृहस्थ राहात असत. त्यांचा व बुवांचा चांगला परिचय असून बुवांचें जाणें येणें व बैठक बहुधा तेथेंच असे. बुवांचे वडील व मातुश्री ते लहान असतांनांच निवर्तलीं होतीं

तेव्हां वडील बंधूचे पंक्तीस भोजन करून बुवांनीं शाहिराचे घरीं रात्रंदिवस बैठक टेविली होती. तेथें रोज रात्रीं मंडळी जमून लावण्या ह्मणत असत. त्यांजबरोबर जोशीबुवांसही लावण्याचा फार नाद लागला व ते स्वतः लावण्या रचूं लागले. त्यांनीं नित्य एक लावणी रचावी व ती शाहीर यांचे घरीं रात्रौ ह्मणून दाखवावी. पहिल्यानें त्यांनीं शृंगारपर लावण्या रचण्यास प्रारंभ केला व लावण्याचे शेवटीं आपलें नांव न घालितां आपले मित्र घोंडीशाहिर यांचें नांव घालण्याचा त्यांनीं परिपाट ठेविला. परंतु शाहीर हे फार सरळ मनुष्य असल्यामुळें त्यांस हें बुवांचें कृत्य आवडलें नाहीं. त्यांनीं जोशीबुवांस साफ सांगितलें कीं, मला कविता करण्याचें ज्ञान नसतां, माझें नांव तुह्मीं लावणींत घालावें हें बरोबर नाहीं. यानंतर बुवांनीं तो प्रकार बंद केला व ते आपला कुलस्वामी जो व्यंकटपती त्याचें नांव लावण्यांत घालूं लागले; तेव्हां त्यांचा कोणी मित्र त्यांस ह्मणाला कीं 'असें करितां त्यापेक्षां तुह्मीं आपलेंच नांव लावणींत कां घालित नाहीं?' हें ऐकून जोशीबुवा पुढें आपलें नांव "राम" असें लावणींत घालूं लागले. परंतु त्यामुळें तर फारच घोंटाळा होऊं लागला. कारण कीं, त्याचवेळीं, रामा रंगारी ह्मणून कोणी होता तो लावण्या रची व "राम" असें नांव लावण्यांत घाली. तेव्हां रामजोशांचा लावणी कोणती व रामा रंगाऱ्याची कोणती, याचा निर्णय सामान्य जनांस करितां येईना. हें वर्तमान बुवांच्या कानावर येतांच त्यांनीं 'कविराय' या नांवानें लावण्या लिहिण्यास प्रारंभ केला व हाच प्रघात शेवटपर्यंत चालू होता.

बुवांच्या कवितेंतील कांहीं निवडक वेंचे येथें देतों. खालील लावणी अपन्हुति अलंकाराचें चांगलें उदाहरण आहे. मराठी कवितेंत या अलंकाराचें हें एवढेंच एक प्रमुख पद्य आहे.

## लावणी.

राधासखिसंवादीं छेकापन्हुती हे आयका ॥
रसिक हो! काय चतुर बायका ॥ ध्रु० ॥

अंबरगत परि पयोधरातें रगडुनि पळतो दुरी। काय हा धीट ह्मणावा तरी ॥
तो नंदाचा मूल काय गे सांग कन्हैया हरी। नव्हे गे मारुत मेघोदरीं ॥
सासु सासरा पति यांदेखत अधरामृत माधुरी। घेतसे काय वदावी परी ॥
तो नंदाचा मूल काय गे सांग कन्हैय्या हरी। नव्हे गे मधुप व्रज हा करी ॥

पट विघटित कुचतटहि वसंतीं हळुच येउनी उरीं । शीतळ स्पर्शें सुगंधित करी ॥
तो नंदाचा मूल काय गे सांग कन्हय्या हरी । नव्हे गे मलयज करि चातुरी ॥
सुवर्ण पाहुनि तनुवरि वंचक रातीं शिरतो घरीं । टाकितो हस्त तसा तनुवरी ॥
तो नंदाचा मूल काय गे सांग कन्हय्या हरी । नव्हे हा दस्यु समज अंतरीं ॥
सुंदर रतिजोगता मिळाला पति ही सुभगा खरी । दुजिला असा मिळल काय तरी ॥
तो नंदाचा मूल कायगे सांग कन्हय्या हरी । नव्हे गे रतिला मन्मथ वरी ॥
चाल ॥ गुणवंत कुचावरी लोळे, अति शोभला ॥
तो कृष्ण काय नव्हे, हार कळेना तुला ॥
बाइ अंगमर्दनीं अति सुखकर वाटला ॥
तो कृष्ण काय, नव्हे कर दूतीचा भला
मज शीतळ करितो श्रमि होउनियां भला ॥
तो कृष्ण काय, नव्हे व्यजन सुवंशांतला ॥ चाल ॥
यापरि निजसंतोषें वर्णी पुसतां यदुनायका । लपवी मुरलीच्या गायका ॥राधा.॥ १ ॥
कंठीं लपटुनि सदा असावी सुभगा गुणशालिनी । वाटते पुष्पवती शोभिनी ॥
वृषभानूची सुता काय रे ! राधा लकुचस्तनी । नव्हेरे माळ आठवली मनीं ॥
अधर चुंबिनी वंशसंभवा लालस मधुरध्वनी । आवडते फारच हृदयांतुनी ॥
वृषभानूची सुता काय रे राधा लकुचस्तनी । नव्हेरे मुरली मनमोहिनी ॥
विपरीताही तनुवरि घेतां सुदशा सुखदायिनी । लहानशी श्यामा गुणशालिनी ॥
वृषभानूची सुता कायरे राधा लकुचस्तनी । नव्हेरे मत्कंबल भोगिनी ॥
सरला ती सद्वंशा गौरा अतिशय संयोगिनी । येतसे करीं धरुनि जे वनीं ॥
वृषभानूची सुता कायरे राधा लकुचस्तनी । नव्हेरे यष्टी सहचारिणी ॥
नखक्षतानें मृदु क्वणंती नवनव गुणरागिणी । धरावी वाटे कंवटाळुनी ॥
वृषभानूची सुता कायरे राधा लकुचस्तनी । नव्हेरे वीणा मृदुभाषिणी ॥
चाल ॥ वांकडी दिसे परी बहिरंतर निर्मळा ॥
ती काय राधिका नव्हे इंदुची कळा ॥
जी चांगट बसली धरुनि रसेच्या तळा ॥
ती काय राधिका नव्हे भुजंगाबळा ॥
किति मंजु वसंतीं रसाळ जीचा गळा ॥
ती काय राधिका नव्हे गड्या कोकिळा ॥

चाल ॥ यापरि हरि राधेला वर्णुन पुसतांक्षणिं लोपवी ।
चतुर हा यदुकुलपंकजरवी ॥
श्रीकृष्णाची सख्यासवें ही छेकापन्हुति नवी ॥
करी हा कविरायाहुन कवी ॥ राधासखि० ॥ २ ॥

जोशीबुवांनीं कांहीं लावण्यांच्या शेवटीं किंचित् गर्वोक्ति केली आहे. उदाहरणार्थ, त्यांनीं एके ठिकाणीं असें ह्मटलें आहे:—

" कविता सोलापुरी.
अशी रचाया दुजी कुणाची माय व्यालि भूवरी ? "

परंतु जोशीबुवा हे साधु नसून रसिक कवि मात्र होते, तेव्हां त्यांनीं असे उद्गार काढल्यास त्यांत कांहीं नवल नाहीं; शिवाय जोशीबुवांसारख्या खऱ्या कवीस अशी उक्ति शोभत नाहीं असें कोण ह्मणेल ?

श्रीरामचंद्र गर्भांत असतांना कौसल्येची स्थिति फार आश्चर्यकारक झाली होती, आणि पुढें नववा महिना पूर्ण होण्याच्या संधीस तर कौसल्या केवळ रामरूप होऊन कांहीं अमानुष व विलक्षण चाळे करूं लागली. तेव्हां दशरथ भिऊन गेला व त्यानें कुलगुरु वसिष्ठ यांस बोलावून आणून विचारिलें. त्यावेळीं:—

लावणी.

वसिष्ठ मुनिवर ह्मणे नृपाळा काय सांगु मी तरी ।
पातला हरि कौसल्योदरीं ॥ ध्रु० ॥
भाग्य उदेलें तुझें, सुकृतवान् धन्य वंश हा तुझा ।
जगाचा तुजहुनि झाला खुजा ॥
अनंत जन्मीं परमात्म्याची तुलाच घडली पुजा ।
पातला ब्रह्म तुझ्या हितगुजा ॥
या दैवाचा तुला ह्मणावें असा न कोणी दुजा ।
पाहिला म्यां तुझ्या आजाचा आजा ॥
चाल ॥ या ब्रह्म असे हें कौसल्येच्या कुशीं ।
या तेज फांकलें अद्भुत हें तिजपशीं ॥
तूं बावनकशिला काय लाविशील कशीं ।
मज जन्म वाटतो सत्याचि नवमीं दिशीं ॥

चाल ॥ गर्भ जाहला पूर्ण पातला रवि माध्यान्हावरी ।
समय हा गुलाल घ्यावा करीं ॥ १ ॥

खालील संस्कृत लावणी फार सुरस आहे:—

लावणी.

तरुणि तवेदं कुचतटि मति गुरु कुरु ममहृदि सादरं ।
मनोमे भवति मनोभव दरं ॥ ध्रु० ॥
अधर मधुर मधुरस रसिकमामुज्जीवय तावकं ।
प्रिये मे शमय विरहपावकं ॥
मुंचति मदनःस्वीकृत कदनो मयि विषमं सायकं ।
निवारय तं सखि रतिनायकं ॥
कोपादरुणं कुरु मयि करुणं सखि निर्जितधावकं ।
दृगतं पाहि निजं सेवकं ॥
जहिहि जहिहि मानं मानज मौनं अनु कुरुषे किंवकं ।
त्वदीयं लपितं सुखयति न कं ॥ चाल ॥
त्वं मुधा भजसि मयि सर्वं किमिति कातरे ।
किं कृतं मया नव भामिनि रुचिराधरे ॥
कुरु कृपामरुण सखि पल्लवकोमलकरे ।
साहसं किमिदमति कोपभरे मंथरे ॥
मंजुलतर मृदु सिंजित मणिमय मंजिरध्वनि भरं ।
नतोहं तावक पदपुष्करं ॥ १ ॥

# रामचंद्र बडवे.

'कीं हा ईश्वराचा पवाड । पाहतां गगनाहून वाड ।
ब्रह्मांडरचनेहून जाड । कविप्रबंध रचना ॥ १ ॥

समर्थ.

रामचंद्र बडवे हे अनंत बडव्यांचे पुत्र व प्रल्हादबोवांचे पणतू होत. या कवीच्या चरित्राची फारशी माहिती प्रसिद्ध नाहीं व त्याची कविताही ह्मणण्यासारखी अधिक आहे असें नाहीं. परंतु महाराष्ट्रकविवर्य मोरोपंत यांच्या कवितेसंबंधानें या कवीनें ज्या २४ सुंदर आर्या लिहिल्या आहेत त्या महाराष्ट्रांत फार प्रसिद्ध असल्यामुळें, त्याच्या या त्रोटक चरित्राचा समावेश या ग्रंथांत करणें मला योग्य वाटलें. या कवीची वाचकांस चटकन् ओळख पटावी ह्मणून पुढील आर्या येथें देतों.

'सुश्लोक वामनाचा, अभंग वाणी प्रसिद्ध तुकयाची ।
ओंवी ज्ञानेशाची किंवा आर्या मयूरपंताची ॥ १ ॥'

ही सुप्रसिद्ध मार्मिक आर्या याच कवीची होय. ही आर्या जोंपर्यंत महाराष्ट्रांतलि लोकांच्या स्मरणांत राहील तोंपर्यंत या कवीचें नांव महाराष्ट्रवाङ्मयाच्या इतिहासांत चमकत राहील यांत संशय नाहीं. यानें आपल्या २४ आर्यांतच पंतांच्या काव्य-गुणाची पारख फार नामी केली आहे. या आर्यांतील कांहीं आर्या येथे उतरून घेतों:—

'मोरेश्वरपंताची ऐकुनि कविता मनीं सुकवि लाजे ।
पावे विवर्णता तें मी किति वर्णूं ? जनीं सकविला जे ॥ १ ॥
अक्षरसंगति यमकें सुशब्द अर्थाचिया चमत्कृतिला ।
पाहुनि भुले कवि ह्मणे 'बुडवूं या काय मीच मत्कृतिला ?' ॥ २ ॥
अष्टोत्तरशत केलीं जेणें रामायणें पृथग्रस तीं ।
भारतभागवतादि ग्रंथ करी मान्य जे समग्र सतीं ॥ ३ ॥
कठिण ग्रंथ ह्मणुनि या आर्यांतें निंदिती न सुकवी ते ।

मोठ्या मोठ्या कविंचे मान्या यद्गणति ओष्ठ सुकवींते ॥ ४ ॥
कवन सुरेंद्राद्यमरा मिळतें तरि हे सदार सिकते तें ।
साखर मिळतां सेविल नामाभासें उदार सिकतेतें ? ॥ ५ ॥
कवनश्रवण करुनि खळ मानव न रमेल येथ न रमो तें ।
परि सज्जनश्रुतीतें भूषविलचि तेंवि जेंवि नर मोतें ॥ ६ ॥
आर्या ग्रंथ रचुनि बहु विठ्ठलचित्तास तोषवी फार ।
त्या मोरेश्वरपंता माझा साष्टांग हा नमस्कार ॥ ७ ॥
आर्याकेका करितचि शिरला वाटे मयूर यमकवनीं ।
सुजनांसि फार पीडिल ह्मणुनि बुडविला किरातयम कवनीं ॥ ८ ॥
सुस्वरकंठें रसिकें आर्या गातां मयूरबाबांची ।
वेधी सुजनमनातें न तशी धुन ऐकतां रबाबाची ॥ ९ ॥
ज्या उपजतांचि गेल्या काशी रामेश्वरा नमायाला ।
आर्यांना प्रौढपणीं जगतीतल हें पुरे न मायाला ॥ १० ॥

शेवटच्या आर्येंतील रामचंद्र बडव्यांचें भविष्य मोरोपंतांच्या जीवंतपणींच खरें ठरलें हें कागदपत्रांवरून सिद्ध होतें. हे रामचंद्र बडवे, प्रल्हादबुवांचे पुत्र होते असें कोणी ह्मणतात, परंतु तें बरोबर दिसत नाहीं. आपलीं नातवंडें पाहून खेळवून प्रल्हादबोवा इ० स० १७१८ मध्यें समाधिस्थ झाले, तर त्यांचा मुलगा १७२९ मध्यें जन्मलेल्या मोरोपंतांचे समवयस्क विठोबादादा चातुर्मासे यांचें शिष्यत्व पतकरून मैराळबोवांचा मृत्युशक ( शके १७२६ ) देईल हें मुळींच संभवनीय नाहीं. हे रामचंद्र बडवे विठोबादादांचे शिष्य असून त्यांजवरही त्यांचे दहा बारा श्लोक आहेत. एकंदरींत रामचंद्र बडवे हे प्रल्हादबुवांचे पणतूच ठरतात.

# दाजीबा जोशीराव.

' कीं हे अमृताचे मेघ ओळले । कीं हे नवरसांचे ओघ लोटले । नाना सुखांचे उचंबळले । सरोवर हे ॥ '[1]

श्रीसमर्थ

या कवींची माहिती कशी मिळाली, हें पहिल्यानें येथें सांगणें अवश्य आहे. मेजर डी. सी. ग्रॅहाम या नांवाच्या एका इंग्रज गृहस्थानें 'Statistical Report of the Principality of Kolhapur' या नांवाचें एक महत्वाचें पुस्तक इ. स. १८५४ या वर्षी प्रसिद्ध केलेलें असून, त्यांत कोल्हापूर संस्थानांतील प्राचीन इमारती, देवस्थानें, तलाव, लोकस्थिति, वाङ्मय इत्यादिकांसंबंधाची विस्तृत माहिती दिलेली आहे. हा ग्रंथ चाळून पहात असतां, एके ठिकाणीं दाजीबा जोशीराव, चिंतामणी जोशीराव, बाबा महाराज, नाना महाराज, बापू महाराज, रावजी महाराज, व बाबाजी श्रीखंडे या कोल्हापूर प्रांतीं होऊन गेलेल्या सात ग्रंथकारांच्या ग्रंथांची यादी दिलेली माझ्या अवलोकनांत आली. वरील सात ग्रंथकारांपैकीं पहिले सहा ग्रंथकार कोल्हापूर येथील जोशीराव व गुरुमहाराज यांच्या सुप्रसिद्ध घराण्यांत सुमारें ५० वर्षांपूर्वीं होऊन गेलेले असतां त्यांची महाराष्ट्रांत बिलकुल प्रसिद्धी नसावी व त्यांच्या ग्रंथांची यादी एका इंग्रज ग्रंथकारानें आपल्या ग्रंथांत दिलेली पाहून, त्या ग्रंथकारांची माहिती मिळविण्याचा प्रयत्न करण्याची बुद्धि व्हावी, या मोठ्या आश्चर्याच्या गोष्टी आहेत. या ठिकाणीं इंग्रजांच्या शोधक बुद्धीची तारीफ व महाराष्ट्रीयांच्या अनास्थेची निंदा केल्याशिवाय माझ्यानें राहवत नाहीं. विशेष दुःखाची व शरमेची गोष्ट ही कीं वरील ग्रंथकार ज्या घराण्यांत होऊन गेले त्या घराण्यांतील आजच्या लोकांस त्यांची किंवा त्यांच्या ग्रंथांची बिलकुल माहिती नाहीं !

इसवीसनाच्या एकोणीसाव्या शतकाच्या आरंभीं कोल्हापूर प्रांतांत वरील सात

---

१ कोल्हापूर प्रांताच्या वाङ्मयासंबंधानें ग्राहाम साहेब ह्मणतात:—

'Kolhapur in ancient days was held in high repute for the learning of her Pandits, but amidst the desolations occasioned by continued war the spirit of the time proved unfavourable to the votaries of learning, and whilst in other portions of the Country, Science was lighting-up the ancient obscurity, its complete isolation tended to enwrap this little state in comparative darkness.'

Statistical Report of the Principality of Kolhapur.

ग्रंथकार होऊन गेलेले असून त्यांनीं लिहिलेल्या लहान मोठ्या संस्कृत व प्राकृत ग्रंथांची संख्या सुमारें १५० व या ग्रंथांची श्लोकसंख्या सुमारें १,००,००० होईल. या ग्रंथकारांपैकीं दाजीबा जोशीराव, चिंतामणी जोशीराव व बाबा महाराज या तीन ग्रंथकारांनीं ज्या अर्थीं संस्कृत ग्रंथांप्रमाणें अनेक प्राकृत ग्रंथही लिहिले आहेत व इतरांनीं फक्त संस्कृत ग्रंथ लिहिले आहेत, त्याअर्थीं या 'महाराष्ट्रकविचरित्र' ग्रंथांत पहिल्या तीन ग्रंथकारांच्या चरित्रांचा मात्र समावेश करावयाचा असून, त्यांतील प्रमुख ग्रंथकार 'दाजीबा जोशीराव' यांचें अल्प चरित्र येथें देतों.

स्वराज्यसंस्थापक छत्रपति शिवाजी महाराज यांच्या कारकिर्दींत, रत्नागिरी जिल्ह्यांतील संगमेश्वर गांवीं बल्लाळराव या नांवाचे एक चित्पावन ब्राह्मण गृहस्थ रहात असत. ते श्रीनरहरीचे उपासक असून उत्तम ज्योतिषी होते. कोंकणांत राहून उदरनिर्वाह करणें कठीण पडूं लागल्यामुळें, बल्लाळराव श्रीक्षेत्र काशी येथें गेले व तेथें त्यांनीं 'बल्लाळयति' या नांवाच्या एका सत्पुरुषाचा उपदेश घेतला. कांहीं दिवस गुरुसमागमांत घालविल्यावर, बल्लाळराव दक्षिणेंत आले व त्यांनीं शिवाजी महाराजांची भेट घेतली. त्यांचें ज्योतिर्विदत्व व इतर गुण अवलोकन करून महाराज फार खुष झाले व 'त्यांस 'जोशीराव' अशी पदवी देऊन, त्यांनीं त्यांस आपल्या संग्रहीं ठेऊन घेतलें. युद्धांत होणाऱ्या जयापजयासंबंधानें बल्लाळराव जोशीराव यांनीं भविष्य वर्तवून तें महाराजांस सांगावें व त्याप्रमाणें महाराजांनीं आपलें धोरण ठेवावें, असा क्रम चालू होता. महाराज कैलासवासी झाल्यावर संभाजी व राजाराम यांच्या कारकीर्दींतील या जोशीराव घराण्याची हकीकत आज उपलब्ध नाहीं. पुढें इ० स० १७०९ या वर्षीं राजाराम महाराजांची पत्नी ताराबाई हिनें कोल्हापूरचें राज्य स्थापिलें, त्या वेळीं मराठी राज्यांतील जी पुढारी मंडळी ताराबाईच्या पक्षास अनुकूल झाली, त्यांतच हें जोशीराव घराणेंही असून, त्या घराण्यांतील त्या वेळीं हयात असलेला प्रमुख पुरुष कोल्हापूर येथें येऊन राहिला. ताराबाईनें कोल्हापुरास आपलें कायमचें ठाणें देऊन तें आपलें राजधानीचें शहर केल्यामुळें, 'शहरांत राजवाडा कोणत्या ठिकाणीं बांधावा' असा ज्यावेळीं प्रश्न उपस्थित झाला, त्या वेळीं, जोशीराव यांनीं अशी सल्ला दिली कीं शहराच्या मध्यभागीं जें पटांगण आहे तेथें, उत्तराभिमुख अशी राजवाड्याची इमारत बांधावी, म्हणजे ती राजवंशास मंगलप्रद होईल. हें मत महाराजांस पसंत पडलें, व त्यांनीं त्याप्रमाणें राजवाड्याची इमारत बांधिली. ह्याच

सांप्रतचा कोल्हापूर येथील जुना राजवाडा होय. यानंतर महाराजांनीं जोशीराव यांस राजवाड्याचे पिछाडीस एक मोठा वाडा बांधून दिला व तेव्हांपासून या जोशीराव घराण्यांतील लोक याच वाड्यांत रहात आले आहेत.

आमचे चरित्रनायक दाजीबा जोशीराव हे याच वाड्यांत रहात असत. इ. स. १८०० पासून १८५५ पर्यंतचा जो काल तो त्यांच्या अस्तित्वाचा काल होय. दाजीबांची वंशावळ येणेंप्रमाणें:—




दाजीबा जोशीराव हे चांगले संस्कृतज्ञ व जोतिःशास्त्रज्ञ होते. त्यांच्या पुस्तकसंग्रहांत सुमारें ३००० पेक्षां अधिक निरनिराळ्या विषयांवर लिहिलेले संस्कृत ग्रंथ असून त्यांवरून त्यांचा विद्याव्यासंग व विद्वत्ता यांची सहज कल्पना होते. दाजीबांनीं जे संस्कृत व प्राकृत ग्रंथ लिहिले आहेत त्यांची यादी येथें देतों.

## संस्कृत ग्रंथ.

| ग्रंथाचें नांव | श्लोकसंख्या | ग्रंथरचनाकाल |
|---|---|---|
| १ चित्तविनोद | १,६०० | १८२३ |
| २ चित्तानंद | ४,३०० | १८२६ |

| | | | |
|---|---|---|---|
| ३ | रामेश्वरयात्रा | १,००० | १८२८ |
| ४ | लक्ष्म्यालंकार | १७५ | १८२९ |
| ५ | लक्ष्मीवर्णन | १५० | १८३० |
| ६ | कार्तिकस्वामी यात्रा | ८५० | १८३० |
| ७ | गणपतीवर एक सं. ग्रंथ | ९०० | १८३२ |
| ८ | संस्कृत भाषेवर एक ग्रंथ | ७०० | १८२५ |
| ९ | ज्योतिर्लिंग यात्रा | ६७५ | १८३९ |
| १० | विश्वगुणादर्श टीका | ५,००० | १८४२ |
| ११ | गोकर्ण यात्रा | २२५ | १८४२ |
| १२ | अष्टविनायकयात्रा | २,००० | १८४० |
| १३ | करवीरमाहात्म्य टीका | १०,००० | १८५० |

यांशिवाय लहान लहान स्तोत्ररूप ८ संस्कृत ग्रंथ आहेत.

## प्राकृत ग्रंथ.

| | ग्रंथाचें नाव | श्लोकसंख्या | ग्रंथरचनाकाल |
|---|---|---|---|
| १ | करवीरमाहात्म्य ( ओं. ब ) | ८,००० | ( १८२३ पासून |
| २ | मल्हारीमाहात्म्य | ३८५ | १८५० पर्यंत ) |
| ३ | कार्तिकमाहात्म्य | ७९ | |
| ४ | गालवाख्यान | ८७ | |
| ५ | ईशस्तोत्र | ४० | |
| ६ | वीरभद्रमाहात्म्य ( आर्या ) | ४५६ | |
| ७ | सीताजन्म | ४४ | |
| ८ | एकादशीमाहात्म्य | ३०० | |
| ९ | सुलोचनाख्यान | १०० | |
| १० | शिवपार्वतीविवाह ( आर्या ) | १२५ | |
| ११ | मारुतीबलरामयुद्ध ( ,, ) | ९० | |
| १२ | वीरभद्रमाहात्म्य ( ओंवी ) | ७७४ | |
| १३ | रामअंजनीभेट ( आर्या ) | ५४ | |
| १४ | चोपडाई जोतीबा ( ,, ) | ४३ | |

| | | |
|---|---|---|
| १५ | कृष्णदान ( ,, ) | ६५ |
| १६ | अहिमह्याख्यान | ९९ |
| १७ | वत्सला | १७४ |
| १८ | मयूरध्वजाख्यान | ७५ |
| १९ | श्रीयाळाख्यान | ४९ |
| २० | चंद्रहासचरित्र | १३४ |
| २१ | अंबाबाईवर आर्या | १५ |
| २२ | अद्भुतरामायण ( आर्या ) | ७०१ |
| २३ | मारुतीस्तुति | |
| २४ | लहुकुशाख्यान ( आर्या ) | ३२१ |
| २५ | केदारमाहात्म्य ( आर्या ) | |

दाजीबा जोशीराव यांनीं केलेल्या संस्कृत प्राकृत ग्रंथांची वर जी यादी दिली आहे ती वरून दाजीबांनीं संस्कृत व प्राकृत या दोन्ही भाषांच्या सेवेंत आपलें बहुतेक आयुष्य घालविलें, असें दिसतें. या यादींतील संस्कृत ग्रंथांपैकीं बहुतेक ग्रंथ अद्याप जोशीराव यांच्या घराण्यांतील ग्रंथसंग्रहालयांत प्रकाशकाची उत्सुकतेनें वाट पहात बसलेले असून, 'काव्यमाले' सारख्या संस्कृतग्रंथप्रकाशक मासिकपुस्तकांनीं, या ग्रंथांस आपल्या उदरांत ठाव दिल्यास त्यांचेंही पोट भरेल व एका अप्रसिद्ध कवीच्या सुरस ग्रंथांचा जीर्णोद्धार केल्याच्या श्रेयाचीं तीं पूर्ण अधिकारी होतील.

वरील यादींत प्राकृत ग्रंथांची संख्या २५ दिलेली आहे, परंतु सखेदाश्चर्याची गोष्ट ही कीं, आज त्यांपैकीं फक्त ७ च ग्रंथ मला मिळाले. या ग्रंथांची नांवें येणेंप्रमाणें:—

| | | |
|---|---|---|
| १ | करवीरमाहात्म्य | ( ओंवीबद्ध ) |
| २ | वीरभद्राख्यान | ( ,, ) |
| ३ | वीरभद्रमाहात्म्य | ( आर्या ) |
| ४ | अद्भुतरामायण | ( ,, ) |
| ५ | केदारमाहात्म्य | ( ,, ) |
| ६ | कार्त्तिकमाहात्म्य | ( ,, ) |
| ७ | लहुकुशाख्यान | ( ,, ) |

या सात ग्रंथांशिवाय बाकीच्या १८ ग्रंथांचा, जोशीरावांच्या ग्रंथसंग्रहालयांत बिलकुल पत्ता लागत नाहीं ! हे ग्रंथ कोणीतरी वाचनाच्या मिषानें दाजीबांच्या

वंशजांकडून नेले असावेत व त्यांबद्दल पुनः कोणी चौकशी न केल्यामुळें ते नेणाराच्या घरांत पडून राहिले असावेत किंवा त्याच्या निष्काळजीपणामुळें नाश पावले असावेत, अशांतला प्रकार दिसतो. कवींनीं मोठ्या परिश्रमानें आह्मांकरितां अनेक ग्रंथ निर्माण करून ठेवावे व आह्मीं आमच्या हलगर्जीपणानें त्या ग्रंथांचा नाश करून टाकावा, हें अगदीं अप्रशस्त होय. आमची संपत्ति गेली, स्वातंत्र्य गेलें, पराक्रम गेला व अभिमानही गेला, परंतु आमची भाषा व त्या भाषेंत तयार झालेले ग्रंथ हीं या आमच्या पडत्या वेळांत आह्मांस धीर देऊन, आमचें घटकाभर समाधान करणारीं साधनें, ईश्वरकृपेनें हा कालपावेतों आमच्या हातीं राहिलीं असतां, त्यांचा योग्य तो उपयोग करून न घेतां, आह्मी त्यांस लाथाडावयास प्रवृत्त व्हावें, हें 'बुडत्याचा पाय खोलांत' या शिष्टवचनाप्रमाणें ठीकच चाललें आहे ह्मणावयाचें ! अशा प्रकारें, महाराष्ट्र वाङ्मयाचा केवढा मोठा भाग आज अस्तंगत होऊन गेला असेल, हा विचार मनांत येऊन, ज्यास जुन्या कवींच्या प्रासादिक ग्रंथांची योग्यता समजण्याइतकी अक्कल आहे, अशा सहृदय माणसाच्या डोळ्यांतून खचित अश्रुपात झाल्याशिवाय राहणार नाहीं ! असो.

दाजीबांचा पहिला ग्रंथ करवीरमाहात्म्य, हा ग्रंथ फार मोठा असून त्याची ओंवीसंख्या सुमारें ८,००० आहे. हा ग्रंथ संस्कृत पद्मपुराणांतर्गत करवीरमाहात्म्याच्या आधारानें लिहिलेला असून त्यांत, करवीर क्षेत्राच्या उत्पत्तीसंबंधानें व माहात्म्यासंबंधानें पौराणिक माहिती दिलेली आहे. आपल्या राजाच्या राजधानीच्या शहरासंबंधानें उपलब्ध असलेली पौराणिक माहिती मराठी भाषेंत प्रसिद्ध व्हावी या स्तुत्य उद्देशानें दाजीबा जोशीराव यांनीं हा ग्रंथ इ. स १८५० मध्यें लिहिला. दाजीबांचा दुसरा ग्रंथ 'वीरभद्राख्यान' हा ओंवीबद्ध असून त्याचे अध्याय १० व ओंव्या ७७४ आहेत. शामजीपंत मुतालीक देसाई या नांवाचे कोणी राजकारस्थानीं व वीरभद्रोपासक गृहस्थ होऊन गेले, त्यांचे नातु बापूराव मुतालिक यांनी दाजीबांस विनंति केली कीं आमचें कुलदैवत जो वीरभद्र त्याजवर आपण एक ग्रंथ लिहावा. या विनंतीस मान देऊन दाजीबांनीं हें ओंवीबद्ध 'वीरभद्रोपाख्यान' व दुसरें आर्याबद्ध 'वीरभद्रमाहात्म्य' असे वीरभद्रावर दोन मराठी ग्रंथ लिहिले. यांपैकीं पहिला ग्रंथ शके १७५१ कार्तिक वद्य २ गुरुवार, या दिवशीं पूर्ण झाला. हा ग्रंथ वेदव्यासकृत 'श्रीशिवरहस्य' या नांवाचा जो एक महाभारताएवढा मोठा शिवपर संस्कृत ग्रंथ आहे त्याच्या आधारानें लिहिलेला असून त्यांत वीरभद्रावताराच्या

पौराणिक गोष्टी सांगितल्या आहेत. या ग्रंथांतील अल्प वेंचे येथें देतों. ग्रंथाचा मंगलाचरण असा आहेः--

ओंव्या.

"विष्ण्वादि देव जया नमिती । जो नाशूनि विघ्नतति ।
भक्तांसि दे भुक्तिमुक्ति । त्या गणपतीस नमन असो ॥ १ ॥
जो प्रल्हादार्थ स्तंभांतून । घोररूपें प्रकटून ।
घे हिरण्यकशिपूचे प्राण । त्या नृसिंहा नमन असो ॥ २ ॥
जी स्ववासें कोल्हापूर । शोभवी, शीघ्र वधी कोल्हासुर ।
राखी देवसंघ मुनिवर । त्या महालक्ष्मीस नमन असो ॥ ३ ॥
जो शिवरूप घोरतर । नाशी दक्षाचा अध्वर ।
तेथें वधी विष्ण्वाद्यमर । त्या वीरभद्रास नमन असो ॥ ४ ॥
आणि ज्या सूर्यादि देवव्यक्ति । पार्वत्यादि सकल शक्ति ।
त्याही नमितों व्हावया शक्ति । मज कवित्वादिकीं ॥ ५ ॥
श्रीमद्भगवद्गीतासागर । ज्यानें ओंव्या नौका सुरुचिर ।
करोनि केला लोक सुतर । जो योगीश्रेष्ठ ॥ ६ ॥
जो विष्ण्वतार सुमति । ज्यानें चालविली भिंत्ति ।
बोलविला वेद रेड्याहातीं । त्या ज्ञानेश्वरास नमन असो ॥ ७ ॥
एकादश स्कंधावर । जो ओंव्या करी प्रवर ।
ज्याचे घरीं गदाधर । द्वादश वर्षें सेवा करी ॥ ८ ॥
ज्यानें श्राद्धीं पितर । जेवविले, जो साधुवर ।
ज्यासम नसे भूमीवर । त्या एकनाथा नमितों मी ॥ ९ ॥
ज्यानें तरावया संसारसिंधु । नौकारूप विवेकसिंधु ।
करोनि तारि जो अज्ञानांधु । त्या मुकुंदराजा नमितों मी ॥ १० ॥
जो हनुमदवतार सिद्ध । ज्यानें केला दासबोध ।
यत्स्मरणें जाय बाध । त्या रामदासा वंदितों मी ॥ ११ ॥
ज्यानें भारतपर्वांवर । केल्या ओंव्या सुंदर ।
जो भगवद्भक्तवर । त्या मुक्तेश्वरा नमन असो ॥ १२ ॥
जे जे ओंव्या प्राकृत । कर्ते झाले बहुत ।
श्रीधरादिक संत । त्यांस माझें नमन असो ॥ १३ '

खालील शिवपार्वतीसंवाद वाचनीय आहेः—

‘ पूर्वी कैलासीं बैसला ईश्वर । नमूनि दाक्षायणी बोले सुंदर ।
‘ करुणानिधे ! तुतें नमस्कार । विनंति माझी परिसावी ॥ ११ ॥
‘ भूतळीं यज्ञ करी मत्पिता दक्ष । तो पहावासा वाटे, वन्हिमदक्ष ! ।
आज्ञा द्यावी जावया प्रत्यक्ष । पाहूनि येईन सत्वर ’ ॥ १२ ॥
मग शिव हांसोनि बोले, ‘ सुंदरी ! । तुझा पिता माझा द्वेष करी ।
मातें नेणें, त्याचे अध्वरीं । तुवां न जावें सर्वथा ’ ॥ १३ ॥
ती ह्मणे, ‘ ब्रह्मस्वरूपा ! दयासागरा ! । काय वदसी वेदवेद्या शंकरा ।
तुझी भक्ति नसे जयां नरां । ते क्षणमात्र न वांचती ॥ १४ ॥
तुज जाणावया देव तप करिती । तेही तुझें तत्त्व न जाणती ।
यास्तव एक नमनभक्ति । वारंवार करीतसें ॥ १५ ॥
देवा ! मागेन तें द्यावें मज । मखीं विष्ण्वादि सुर सहज ।
आले मुनि यज्ञ किन्नरगंधर्वराज । त्यांचें दर्शन इच्छितें मी ॥ १६ ॥
शिव वदे, ‘ जा पित्यासमीप सत्वरीं । परी सावधपणें व्यवहार करीं ।
तुजवांचून न गमे क्षणभरी ’ । ह्मणोनि आलिंगन दीधलें ॥ १७ ॥
अध्याय १ ला.

पार्वती दक्षगृहासमीप गेल्यावर दूतांनीं, ‘ भूत पिशाचादिकांनीं परिवेष्टित व वृषभारूढ अशी कोणी दिव्य देवता आपल्या यज्ञसमारंभास येत आहे ’ अशी दक्षास वर्दी दिली, तेव्हां दक्ष त्यांस ह्मणतोः—

‘ शिव किंवा सती असेल । जाऊनि तिला बोला माझे बोल ।
तुझा पिता दक्ष, विशाळ । शाळेंत यज्ञ करी ॥ ५६ ॥
तेथें द्विजमुनि गंधर्व । अप्सरा राजे आणि मानव ।
पर्वतही आणि देव । सहपरिवारें असती ॥ ५७ ॥
त्या मंडपीं न व्हावी दाटी । ह्मणोनि सैन्य ठेवोनि पाठीं ।
तूंच मात्र एकटी । सभेमाजी ये ॥ ५८ ॥
मी धरितों मौनव्रता । घेतों दीक्षा तत्वता ।
मज बोलावया आतां । अवकाश नसे सत्वर चला ॥ ५९ ॥’

पुढें पार्वती दक्षाच्या यज्ञशाळेंत गेल्यावर दक्षानें व दक्षयज्ञाप्रीत्यर्थ जमलेल्या विष्ण्वेंद्रादि देवांनीं तिचा अपमान केला. त्यावेळीं पार्वतीनें दक्षाची व सर्व

देवांची कठोर शब्दांनीं निर्भर्त्सना करून, क्रोधानें यज्ञकुंडांत उडी टाकिली. ही हकीकत शिवानें अंतर्ज्ञानानें जाणल्यावर, त्याची कशी स्थिति झाली, हें दाजीबा सांगतात:—

‘ कडकड दांत खावोन । कटकटा शब्द करोन ।
तो भृकुटि कुटिलानन । विकट नेत्र शिव ॥ २ ॥
जयाचें अंग जाज्वल्यमान । जो करी काय कीं जगद्रक्षण ।
तो कोपें उडोन लक्ष योजन । थोर शिळेवर बसे ॥ ३ ॥
त्याच्या ललाट देशांतून । झाले घर्मबिंदु पतन ।
तेणें होय शतयोजन । चूर्ण शिलातल ॥ ४ ॥
मग किलकिल शब्द झाला । आणि ज्वालासंघ निघाला ।
शिळेंतून, आणि नभाभूतला । तेजही व्यापी ॥ ५ ॥
त्या तेजांतून रक्तनयन । जो मुखें करी वन्हिवमन ।
आणि जो स्वजटाग्रानें । अग्निमंडल भेदी ! ॥ ६ ॥
जया नेत्र अनेक । चंद्राढ्य सहस्रमस्तक ।
भुजहि द्विसहस्र संख्यांक । नानायुध भीषण ॥ ७ ॥
ज्या किंकिणाढ्य मेखला । नेत्राग्नीनें जाळी अखिला ।
सूर्याभ अनेक कुंडलां । धरी जो विकट ॥ ८ ॥
अनेक विद्युत्सदृशांस । धरी जो खड्गलतांस ॥
हस्त हलवी कांपवी भुजांस । जो पायही नाचवा ॥ ९ ॥

या ग्रंथाच्या शेवटीं कवीनें आपली व आपल्या पूर्वजांची हकीकत दिली आहे, ती अशी:—

‘ शककर्ता राजा शिवाजी । त्याचा ज्येष्ठ पुत्र संभाजी ।
दुसरा राजाराम, राजी । ज्यास सर्व प्रजा ॥ १ ॥
संभाजीचा शाहू नृपवर । तो राज्य करी सातार्‍यावर ।
राजारामाचा कुमर । राज्य करी कोल्हापुरीं ॥ २ ॥
त्याचा पुत्र शिवाजी राजा । शिवाजीचा शाहाजी दुजा ।
संभाजी तो चालवी राज्याच्या काजा । तेव्हां हा ग्रंथ तदाश्रितें केला ॥ ३ ॥
संगमेश्वरकर जोशीकुल । त्यांत होय, ज्यास बल्लाळ ।
काशींत संन्यास दे सकळ । ज्योतिषही पढवी ॥ ४ ॥

नृसिंह ज्याची कुळदेवता । ग्रामदैवत जाखमाता ।
जो ज्ञानी सिद्धांतवेत्ता । बाळजोशी जया ह्मणती ॥ ५ ॥
शककर्तृ शिवाजीपासोन । ज्यानें करोन प्रश्नाचा पण ।
मिळविलें जोशीरावपण । तैं पासोन ज्यां जोशीराव ह्मणती ॥ ६ ॥
त्याचा पुत्र दशरथ । त्याचा चिंतामणी ख्यात ।
त्याचा बाळजोशी सुत । ज्ञानी सर्वमान्य जो ॥ ७ ॥
तयाचे पांच सुत मान्य । पहिला रामचंद्र वदान्य ।
दुसरा पुत्र नारायण । तिसरा जीव विद्वान् ॥ ८ ॥
चौथा राघव सुत । न्यायशास्त्रादिकीं पारंगत ।
दाजी ह्मणोन प्रख्यात । पांचवा पुत्र ॥ ९ ॥
शके सत्राशें एकावन्न । शालीवाहन शकीं जाण ।
कार्तिक वद्य द्वितीया दिन । गुरुवासर सुंदर ॥ १० ॥
ते दिनीं वीरभद्रोपाख्यानाच्या । या ओंव्या संपल्या साच्या ।
येणें करून वीरभद्राच्या । भद्रकालीच्या मना तोष होवो ॥ ११ ॥
नृसिंह गणपति भक्ताभिमानी । महालक्ष्मी करवीरवासिनी ।
संतुष्ट होऊन माझी जनीं । कीर्ति करून मुक्त करोत ॥ १२ ॥

या उताऱ्यांतील शेवटच्या ओंवीच्या शेवटच्या चरणावरून दाजीबा जोशीराव यांस, लोकांत आपली कीर्ति व्हावी अशी फार इच्छा होती, असें वाटतें. दाजीबा हे साधु नसून, बोलून चालून प्रापंचिक गृहस्थ होते, तेव्हां आपली कीर्ति वाढावी व आपणांस लोकांनीं मोठे ह्मणावें अशी त्यांची इच्छा असणें साहजिक आहे. दाजीबांनीं जरी पुष्कळ ग्रंथ लिहिले आहेत तरी त्यांजवरून जशीं त्यांचीं, संस्कृत भाषाप्रावीण्य व विद्वत्ता हीं दिसून येतात तसें खरें कवित्व व मार्मिकता हीं दिसून येत नाहींत. त्यांच्या कवितेंत त्या मानानें प्रसादही कमीच आहे.

दाजीबांचा तिसरा ग्रंथ 'वीरभद्रमाहात्म्य' हा आर्याबद्ध असून त्यांतही वीरभद्रावताराचेंच वर्णन दिलें आहे. या ग्रंथाचे अध्याय १० व आर्या ४५६ आहेत. दाजीबांच्या ओंव्यांपेक्षां त्यांच्या आर्या अधिक चांगल्या असून, त्या रचितांना पंतांचें अनुकरण करण्याचा त्यांनीं ठिकठिकाणीं प्रयत्न केलेला आढळतो. दाजीबांच्या ओंव्या जितक्या सुलभ आहेत तितक्याच त्यांच्या आर्या, संस्कृतशब्द-

प्राचुर्यामुळें दुर्लभ झालेल्या आहेत. प्रस्तुत ग्रंथांतील कांहीं आर्या येथें देतों. पार्वती दक्षगृहीं जातांना कशी दिसली ? :— आर्या.

' मग ती ताटंकमुकुटमुक्ताविधुशकलयुक्ततनु बसली ।
त्या स्यंदनीं मिहिरविधुभगणाढ्य द्योतसी जनां दिसली ॥ १८ ॥
वाजविति अशीत्यर्बुद कोटि गणहि दुंदुभीस ढक्कास ।
तद्रवचल भूगजन स्वत्राणा कां न घालितिल कास ॥ १९ ॥
लंघूनि अशीत्यर्बुद कोटिप्राकार विष्णुसदनासी ।
रथ जाय तद्गत निजेक्षणैत सुरदीप्तिमत्वमद नासी ॥ २० ॥
मी पूर्वी मी पूर्वी हें वदुनि तदीक्षणा करिति गमना ।
सुरशैवयष्टिहतमुख किरीट दूरूनि करिति मग नमना ॥ २१ ॥
इतुक्यांत पुष्पक रथहि देवीचा दूर लंघुनी अयन ।
गेला तत्तेजानें जाती वैकुंठगत विबुधनयन ! ॥ २२ ॥ अध्याय १ ला.

पार्वती दक्षगृहीं गेल्यावर दक्षानें तिचा अपमान केला, त्यावेळीं ती रागानें ह्मणते:—

' विष्णुविधींद्रादिहि शिवदासाचे दास त्यांस लवमात्रें ।
मारील कुपित शिव कां तद्वेषें करुन घेतसां मात्रें ॥ १७ ॥
हे शंभो ! त्वन्मायायुत सुर तुजला न जाणती अधम ।
तूं करुणाराशि कुठें ! कोठें हे दुष्ट ह्यांस तूं विधम ॥ १८ ॥
शिवनिंदा तदितर गुणकथनहि मज साहिना स्वतातजन ।
प्रथम करिति इतरहिजे ते चांडालत्व पावतात जन ॥ १९ ॥
दुष्टा मूढा विष्णो ! रे तूं सताधियुत युगसहस्र ।
भैरव मध्यग पूर्वी शिवभजक शिवद्विजभवनिं अजस्र ॥ २१ ॥
झालासि द्वारस्थचि इंद्रा ! शिवपूजनें सुमेरुवर ।
इंद्रत्व नंदि दे तुज. रे विधि काशींत होउनी विवर ॥ २२ ॥

' शंकरानें आपणांस वरावें ' या हेतूनें उमा तपश्चर्या करीत असतां, विष्णु तिला प्रसन्न झाला व ' वर माग ' असें ह्मणाला, त्या वेळीं:—

' हें ऐकुनि तुष्ट उमा ह्मणे, हरे ये, खुशाल कीं अमर ? ।
सुखि असति किं शिवपरहि ? कां तुज दुर्बुद्धि द्यावयासि वर ? ॥ १ ॥
जरि वर देसी तरि शिव मत्पति कर हेंचि मागतें मजला ।
दे विष्णो हें ऐकुन हंसुनि वदे विष्णु चतुरवर तिजला ॥ २ ॥

भसितास्थि भुजंग जटा गजचर्मकपालधरहि भिक्षाशी ।
विषभक्षकस्मशानस्थित त्रिलोचनहि जो मदन नाशी ॥ ३ ॥
आवासवास आकृति आहार जया न विभव कांहीं न ।
त्या शंभुपसुनि का यश तुज होइल करिशि बुद्धि कां हीन ॥ ४ ॥

या तीन ग्रंथाशिवाय अद्भुत रामायण, आर्या सुमारें ७०१, केदारमाहात्म्य, आर्या सु. ५०, कार्तिकमाहात्म्य, आर्या सुमारें १२५ व लहुकुशाख्यान, आर्या ३३१ हे दाजीबांचे चार ग्रंथ उपलब्ध असून, सरस आहेत, परंतु विस्तारभयास्तव त्यांतील कांहीं आर्या येथें देतां येत नाहींत, ही निरुपायाची गोष्ट आहे. दाजीबांच्या या सर्व ग्रंथांपैकीं फक्त 'करवीरमाहात्म्य' हा ग्रंथ मात्र शिळा छापावर छापून प्रसिद्ध झालेला आहे. दाजीबा जोशीराव यांच्या वंशजांत प्रतिवर्षीं गणेशोत्सव करण्याची चाल आहे, व त्यांच्या वाड्याच्या बाहेरच्या बाजूस एक गणपतीचें देवालय, त्यांनीं बांधिलेलें असून, त्यास जोशीरावांचा गणपती असें ह्मणतात. या घराण्यास कोल्हापूर सरकारांतून १२,००० रुपये उत्पन्नाची जमीन देण्यांत आलेली असून, या घराण्याचा समावेश या प्रांतांतील पहिल्या वर्गाच्या सरदार घराण्यांत केला जातो. सध्यांच्या प्रमुख पुरुषाचें नांव 'बल्लाळराव जोशीराव' ऊर्फ 'तात्यासाहेब' असें आहे.

१ छत्रपति शिवाजी महाराज हे रामदास, बल्लाळ जोशीराव वगैरे सत्पुरुषांस व गुणी लोकांस फार चाहतात व त्यांस आपल्या आश्रयास ठेवितात, त्यांचेच वंशज कोल्हापूरचे रामराजे हे मुक्तेश्वरांच्या समाधीच्या वार्षिकोत्सवाकरितां 'तेरवाड' गांव इनाम देतात, 'आपल्या राजाची राजधानी जें कोल्हापूर शहर, त्याच्यासंबंधाची पौराणिक माहिती महाराष्ट्रजनांस विदित व्हावी अशा उदात्त हेतूनें दाजीबा जोशीरावांसारखे विद्वान् गृहस्थ करवीरमाहात्म्य ग्रंथ लिहीतात आणि त्याच राजांच्या वंशजांच्या कारकीर्दींत करवीरमाहात्म्य ग्रंथांत वर्णिलेलीं कोल्हापुरांतील कपीलतीर्थ, इंद्रकुंड कोटीतीर्थ इत्यादि पुराणप्रसिद्ध तीर्थें, म्युनिसीपालिटीच्या सार्वजनिक आरोग्यरक्षणाच्या सबबीवर, लोकमताविरुद्ध बुजवून टाकण्यांत येतात; तस्मात् हा सर्व कालमहिमाच ह्मणावयाचा काय ? कोणी तीर्थयात्रा करीत फिरणारे सत्पुरुष जर कोल्हापुरास गेले व करवीरमाहात्म्यांत वर्णिलेल्या कपिलतीर्थ व इंद्रकुंड या तीर्थांचा शोध करूं लागले तर तीं तीर्थें त्यांच्या आतां दृष्टीस पडणें शक्य तरी आहे काय ? ज्या पुराणांत वर्णिलेलीं तीर्थें आज नष्ट होऊन गेलीं किंवा नष्ट करण्यांत आलीं, तीं पुराणेंच खोटीं असें लोक ह्मणूं लागले तर त्या पातकाबद्दल जबाबदार कोण ?

# पूर्णदास ऊर्फ बाबा उसपकर.

ओ नर नहि बारे नहि बारे । सब दुनियांसो न्यारे ।
राजा रंक बराबर लेखे । हरदम साहेब देखे ॥

मानपुरी.

जगांत, माणसाच्या अंगीं साधुत्व येण्याचे जेवढे ह्मणून उपाय आहेत, तेवढे केवळ सिद्धांतरूप असून, योग्य परिस्थितींत त्यांचें अवलंबन केलें असतां ते फलद्रूप व्हावयास उशीर लागत नाहीं. परंतु खडकावर पेरिलेलें धान्य जसें नष्टप्राय होतें तसेंच या सिद्धांतांचें अवलंबन अपात्र माणसानें केलें असतां तें केवळ निष्फळ होतें. तथापि या स्वतःसिद्ध उपायांचा नाश करणें मात्र मनुष्यमात्रास बिलकुल शक्य नाहीं. जेथें मनुष्याची गति नाहीं अशा एखाद्या अटव्य अरण्यांत किंवा गिरिगव्हरांत एखादा स्वच्छ पाण्याचा झरा वाहात असतो. या झऱ्याची जरी कोणास माहिती नसली तरी त्याचें नैसर्गिक कार्य त्याच्या कांठच्या प्रदेशावर घडतच असतें. त्याच्या ओलाव्यानें आसपासच्या वनस्पती आपला निर्वाह करीत असतात व त्याचें पाणी पिऊन वन्य पशु आपली तहान भागवितात. हाच झरा एखाद्या उद्योगी व कल्पक माणसाच्या दृष्टीस पडला तर तो त्या झऱ्याचा पाट काढून, त्याच्या पाण्यानें जमीनींत पुष्कळ धान्य उत्पन्न करील व देशाची संपत्ति वाढवील. तर याचप्रमाणें कित्येक महान् सत्पुरुषांच्या व प्रासादिक कवींच्या चरित्रांचा लोप झाला आहे, असें जरी सकृद्दर्शनीं वाटतें, तरी तो कवि अथवा साधु ज्या प्रांतांत होऊन गेला असेल त्या प्रांतावर त्याच्या काव्यांचा व कृत्यांचा थोडा बहुत तरी परिणाम झालेला असल्याशिवाय राहणार नाहीं व कोणी शोधक मनुष्यानें त्या प्रांतीं जाऊन शोध केल्यास त्या सत्पुरुषाचें चरित्र व काव्यें त्यास उपलब्ध होणें अशक्य आहे, असें नाहीं. अशा प्रकारचे एक सत्पुरुष वेंगुर्लें प्रांतीं सुमारें ५० वर्षांपूर्वी होऊन गेले, त्यांचें त्रोटक चरित्र येथें देतों.

इसवी सन १८३८ च्या सुमारास सावंतवाडी संस्थानांतील उसप तर्फेंत कांहीं बंडवाल्या लोकांनीं बंडाची मोठी धामधूम चालविली होती त्यामुळें कित्येक लोक

त्या बंडवाल्यांच्या छळानें त्रस्त होऊन, तो प्रांत सोडून दुसऱ्या ठिकाणीं जाऊन राहिले. त्यावेळीं तिकडे असे बंडावे सुरू झाले म्हणजे रयत लोक स्वसंरक्षणार्थ एखाद्या बलिष्ट सरदाराच्या आश्रयास जाऊन रहात असत. पेशवाईतील प्रसिद्ध मुत्सद्दी व प्रतापी पुरुष अलिजा बहाद्दर महादजी शिंदे यांचे सेनापति व प्रधान प्रसिद्ध जिवबा दादा बक्षी यांचे वंशज सगुणराव बक्षी व नरोबादादा ऊर्फ बाबासाहेब बक्षी हे यावेळीं गोंवें प्रांतांत पेडणें महालीं ‘ नरोबाची केरी ’ या नांवाचें त्यांचें इनाम गांव आहे, तेथें रहात असत. बंडखोरांच्या छळास भिऊन, जे लोक त्यांचा आश्रय करीत, त्यांची बक्षी यांजकडून चांगली संभावना होत असे व याबद्दलची साक्ष बक्षी यांचे घरीं असलेलीं अनेक जुनीं पत्रें आज देत आहेत. यावेळीं भाऊ उसपकर या नांवाचे एक सारस्वत ब्राह्मण ज्ञातीचे गृहस्थ, आपले धाकटे बंधु व आमचे चरित्रनायक बाबा उसपकर यांसह बक्षींच्या आश्रयास केरी येथें येऊन राहिले होते. यावेळीं बाबांचें वय ५० वर्षांचें होतें. यावरून त्यांचा जन्म सन १७८८ सालीं किंवा त्या सुमारास झाला असावा, असें म्हणतां येईल. आलेल्या लोकांची केरकर बक्षी यांजकडून चांगली संभावना होत असे म्हणून वर लिहिलेंच आहे. त्याप्रमाणें या दोन्ही बंधूंना केरकरांनीं इनाम प्रकारें परामर्ष केला. पुढें हे दोन्ही बंधू केरी येथें कायमचेच राहिले. त्यांची स्थिति फार गरीबीची असल्यामुळें केरकर यांनीं त्यांस घर बांधून दिलें व त्यांना चरितार्थ वेतन चालूं लागलें. बाबा उसपकर यांचा स्वभाव फार सात्विक व मनोमिळाऊ होता. त्यांचा ओढा प्रपंचापेक्षां परमार्थाकडेच अधिक असल्यामुळें, देवपूजा व भजन यांतच त्यांचा बहुतेक वेळ जात असे. यांचा मूळचा गांव उसप हा सावंतवाडी संस्थानांत असून, त्या गांवावरून बाबांस उसपकर असें आडनांव प्राप्त झालें. हे कौंडण्यगोत्री सारस्वत गौड ब्राह्मण. यांचें उपनांव राजाध्यक्ष. संसारांत वरचेवर फार त्रास होऊं लागल्यामुळें बाबा यांची देवभक्ति अधिकच वाढत चालली. ते नित्य मोठ्या पहाटेस उठून, स्नानसंध्या व भजन पूजन आटपून नंतर भगवद्गीता वाचीत असत व संध्याकाळीं ज्ञानेश्वरी व भागवत या ग्रंथांचें परिशीलन करीत असत. पुनः रात्रौ जेवण झाल्यावर भजन

---

१ माझे गुरु रा. रा. परशुराम रामचंद्र शिनारी यांनीं, बक्षी घराण्यांतील या जुन्या कागदपत्रांच्या आधारानें जिवबादादा बक्षी यांचें विस्तृत चरित्र लिहिलेलें असून तें लवकरच छापून प्रसिद्ध होणार आहे.

करून नंतर निजावयाचें, असा बाबांचा नित्यक्रम होता. अशा प्रकारें कांहीं वर्षें गेल्यावर, एके दिवशीं कपिलाषष्ठीचा योग आला. त्यावेळीं सर्व लोक केरी गांवीं समुद्रतीरावर स्नानास गेले, त्यांत बाबा उसपकरही होते. गेलेले लोक आपापला स्नानविधि उरकून घरीं आले तरी बाबांचा पत्ता नाहीं. यामुळें त्यांच्या घरच्या माणसांनीं पुष्कळ ठिकाणीं जाऊन चौकशी केली व केरकरांच्या शिपायांनींही तीन दिवस समुद्रकांठीं व नजीकच्या गांवीं जाऊन शोध केला परंतु बाबांचा मुळींच पत्ता लागेना. तिसरे दिवशीं, समुद्रकांठीं, एक मोठें केतकीचें बन आहे, त्यांत बाबा प्रेतवत् पडलेले एका गृहस्थाच्या दृष्टीस पडले. लोकांनीं त्यांस घरीं आणून सावध करण्याचे बहुत उपाय केले परंतु बाबांस समाधि लागली होती, त्यामुळें त्यांचा कांहींच उपयोग झाला नाहीं. अशा स्थितींत आणखी तीन दिवस गेल्यावर बाबा चांगले शुद्धीवर आले व तेव्हांपासून त्यांच्या चित्तवृत्तींत विलक्षण पालट झालेला दृष्टीस पडूं लागला. बाबांस, त्या केतकीवनांत गुरूपदेश झाला व त्यामुळें समाधि लागून त्यांची अशी स्थिति झाली !

बाबा अगोदरच मोठे सत्वस्थ व देवभक्त होते, त्यांत आतां त्यांस गुरूपदेश झाला, मग काय विचारावें ? त्यांचें साधुत्व फारच वाढलें व तेव्हांपासून त्यांच्या अंगीं कवित्वशक्तीही वास करूं लागली. जें तोंडांतून येईल तें देवाचें पद, अभंग, याप्रमाणें त्यांची वाणी केवळ देवस्वरूप होऊन गेली !

बाबा उसपकर यांस गोपाळदास नामक एका दत्त सांप्रदायांतील सत्पुरुषांचा उपदेश झाला होता असें, बाबा यांनीं पुढें जो ‘ ज्ञानघन ’ या नांवाचा अध्यात्मपर ग्रंथ लिहिला व इतर कविता केली त्यांत सांगितलें आहे. ‘ गुरुदत्तात्रय अवधूता । स्वामी गोपाळ पूर्णनाथा हो ॥ ’ अशी बाबांनीं आपली गुरुपरंपरा दिलेली आहे. गोपाळदास हे श्रीदत्तमहाराजांचे प्रसिद्ध शिष्य असून ते चिरंजीव आहेत असें म्हणतात. केतकीवनांत ज्या दिवशीं बाबांची व या गोपाळदासांची गांठ पडली त्या दिवशीं दासांनीं बाबांस वेदांतोपदेश करून त्यांचें नांव ‘ पूर्णदास ’ असें ठेविलें व त्यांस समाधि लावून ते अदृश्य झाले. यानंतर पूर्णदास व गोपाळदास यांची अनेक वर्षें गांठ न पडल्यामुळें, पूर्णदास हे अनेक क्षेत्रांच्या व तीर्थांच्या जागीं त्यांचा शोध करीत फिरत होते, परंतु गोपाळदासांचा मुळींच पत्ता लागला नाहीं. नंतर पूर्णदास यांनीं प्रतिवर्षीं पंढरपुरास जाण्याचा क्रम ठेविला, तेव्हां एक वेळ गोपाळदासांची तेथें भेट होऊन पूर्णदासांच्या मनांतील संदेह फिटला व त्यांचें समाधान झालें.

ह्याच वेळेच्या सुमारास, मालवण तालुक्यांतील 'आचरें' नामक गांवीं श्रीरामाचें सुप्रसिद्ध देवस्थान आहे तेथें 'शिवराम मुनीश्वर' या नांवाचे एक प्रसिद्ध योगी रहात असत. त्यांनीं केलेले अनेक चमत्कार त्या प्रांतीं प्रसिद्ध असून, त्यांचा 'निःसंदेह दिवाकर' या नांवाचा एक वेदांतपर लहानसा ग्रंथ, काव्यसंग्रहांत छापून प्रसिद्ध झालेला आहे. ज्या मूळ प्रतीवरून हा ग्रंथ छापला आहे ती प्रत बाबांच्या हातची असून ग्रंथाच्या शेवटीं बाबांनीं ४ ओव्यांत आपली संक्षिप्त हकीकत निवेदन केली आहे. शिवराम मुनीश्वरांचा व बाबांचा मोठा स्नेह होता. हे मुनीश्वर सुमारें ५० वर्षांपूर्वीं आचरें येथें समाधिस्थ झाले.

बाबा उसपकर, वामनपंडित व सोहिरोबा आंबिये या तीन सत्पुरुषांच्या चरित्रां-वरून एका महत्त्वाच्या सिद्धांतास पुष्टीकरण मिळतें; तो सिद्धांत हा कीं जर मनुष्य खरोखर मनापासून परमेश्वरप्राप्तीप्रीत्यर्थ प्रयत्न करीत असेल व परमार्थविषयांत तो व्हावा तेवढा पारंगत झाला असेल तर त्यास गुरूपदेश होऊन परब्रह्मस्वरूपाचें दर्शन व्हावयास उशीर लागत नाहीं. बाबा लहानपणापासूनच विरक्त होते व पुढें तारुण्यकाळीं त्यांजवर संसाराचा बोजा पडल्यामुळें तर ते अधिकच विरक्त झाले. शेवटीं परमार्थांत त्यांची पूर्ण तयारी होऊन ते खरे साधक होतांच गोपाळदासांनीं स्वतः त्यांस शोधीत येऊन, उपदेश दिला. तर 'आपणास गुरु कसा मिळेल' अशी विवंचना ज्यांच्या मागें लागलेली असेल त्यांनीं आपल्या आचारांत व विचारांत पहिल्यानें योग्य ती सुधारणा करून साधकत्वाचें खरें तेज आपल्या अंगीं आणण्याचा प्रयत्न केला पाहिजे. तसें तेज अंगीं आल्यावर गुरूच्या शोधार्थ हिंडत फिरण्याची मुळींच आवश्यकता नाहीं. फूल फूललें कीं भ्रमर आपोआप यावयाचे हें ठरलेलें आहे. असो.

पूर्णदास केरी येथें असतांना ते नित्य भागवत वाचीत असत, त्यावेळीं बरीच भाविक मंडळी तेथें जमत असे. याच गांवीं 'पडते' उपनांवाचे वाणी गृहस्थ आहेत, त्यांच्या घरांतील एक गृहस्थ नित्य भागवतश्रवण करावयास येत असे. या गृहस्थाच्या वडील बंधूकडून बाबांनीं भागवत लिहिण्याकरितां पांच रुपये किंमतीचे कागद उधार आणिले होते. पुढें बरेच दिवस गेले तरी त्याचे रुपये त्यास द्यावयास बाबा समर्थ झाले नाहींत. यामुळें, त्याचा धाकटा भाऊ जेव्हां बाबांचे घरीं भागवत ऐकण्याकरितां जाई तेव्हां 'बाबांकडून कागदांचे पैसे मागून आणावयास विसरूं नकोस' असें तो त्यास नित्य सांगत असे. परंतु तो बाबांच्या घरीं आला व भागवताकडे त्याचें चित्त वेधून

गेल ह्मणजे त्यास आपल्या भावाच्या सांगण्याची बिलकुल आठवण रहात नसे. अशा प्रकारें सुमारें दोन महिने गेल्यावर, एके दिवशीं वडील भावानें त्यास दरडाऊन सांगितलें कीं जर तूं आज बाबांकडून पैसे मागून आणिले नाहींस तर आज मी तुला उपाशीं ठेवीन. आपला भाऊ खरोखरच बोलल्याप्रमाणें करण्यास चुकणार नाहीं, या भीतीनें तो बिचारा बाबांकडे गेला व 'माझा भाऊ कागदांचे पैसे मागतो' असें त्यानें त्यांस मोठ्या नम्रतेनें कळविलें. 'ठीक आहे. तुमचे पैसे परवां देतों.' असें बाबा ह्मणाले व त्याप्रमाणें, घरीं येऊन त्यानें आपल्या वडील बंधूस सांगितलें. इकडे, देव-भक्तीच्या नित्यकर्मांत गढून गेल्यामुळें बाबांस पैशांची आठवण राहिली नाहीं व शेवटीं मुदतीचा तिसरा दिवस येऊन ठेपला. आतां जर सावकाराचे पैसे दिले नाहींत तर बाबांची खचीत अब्रू जाते असें सर्वांस वाटूं लागलें. पण आंधळ्याच्या गायी राखणारा देव आहे हें कोणाच्याही लक्षांत आलें नाहीं. तिसरा दिवस गेला, चौथे दिवशीं सकाळीं प्रत्यक्ष परमेश्वरानें एका कुणब्याच्या वेषानें जाऊन, सावकाराचे पैसे देऊन टाकिले! तो सावकारास ह्मणाला 'शेटजी! बाबांचा हिशोब काय झाला आहे तो काढा, मी त्यांजकडून तुमचे पैसे घेऊन आलों आहे.' सावकारानें बाबांचें खातें काढून पाहिलें व सांगितलें कीं बाबांनीं मजकडून पांच रुपये किंमतीचे कागद उधार नेले होते, तेवढे पांच रुपये त्यांजकडून आह्मांस मिळावयाचे आहेत. कुणबी गड्यानें तात्काळ पांच रुपये देऊन सावकाराची पावती घेतली, व ती गुप्तरूपानें बाबांच्या भगवद्गीतेच्या पोथींत घालून ठेविली.

इकडे बाबा आपली स्नानसंध्या आटोपून नित्यक्रमानुसार गीता वाचण्याच्या उद्देशानें भगवद्गीतेची पोथी सोडून पाहतात तों त्या दिवशीं त्यांस जो अध्याय वाचावयाचा होता त्यांत ही पावती त्यांच्या दृष्टीस पडली! ती वाचून पाहतांच बाबांस मोठें आश्चर्य वाटलें! ते ह्मणाले 'मी रुपये तर आद्याप दिलेले नाहींत, असें असत ही पावती या पोथींत कशी आली?' नंतर त्यांनीं घरांतील माणसांस विचारिलें, परंतु त्यांस यासंबंधानें कांहींच माहिती नसल्यामुळें त्या सर्वांनीं आपल्या कानावर हात ठेविले. पुढें सावकारास विचारिल्यावर तो ह्मणाला 'आज सकाळीं कोणीएक अनोळखी कुणबी मजकडे येऊन ह्मणाला कीं बाबांनीं तुमचे पांच रुपये पाठविले आहेत हे घ्या व त्याबद्दल मला तुमच्या सहीची पावती द्या. त्याप्रमाणें मी ते रुपये घेऊन तुमच्या खातीं जमा केले व त्याबद्दलची पावती लिहून दिली. ती पावती घेऊन तो कुणबी निघून गेला. तो कोण होता किंवा कोठें गेला वगैरे चौकशी

मी मुळींच केली नाहीं. ' हें सावकाराचें भाषण ऐकिल्यावर सर्वांची खातरी होऊन चुकली कीं हें कृत्य माणसाचें नसून प्रत्यक्ष पंढरीनाथानें कुणब्याचा वेष धारण करून बाबांवरचें संकट टाळिलें. सर्व लोकांस बाबांच्या हरिभक्तिपरायणतेचें मोठें आश्चर्य व कौतुक वाटलें व ते प्रेमानें हरिनामाचा घोष करीत व ईश्वरीलीलेचे गुणानुवाद गात आपल्या घरीं गेले. यानंतर, पूर्णदास हे आपल्या नांवाप्रमाणें साधुत्वाच्या अगदीं पूर्णावस्थेप्रत पोहोंचले.

पूर्णदास जरी एवढे सात्विक वृत्तीचे सत्पुरुष होते तरी गांवांतील लोकांस त्यांचा एक प्रकारचा दरारा होता. याचें कारण असें कीं, कोणी एकाद्यानें चोरी चहाडी किंवा तत्सदृश दुसरें एकादें वाईट कृत्य दुसऱ्या कोणास न समजूं देतां केलेलें असलें व पुढें तो मनुष्य बाबांच्या दर्शनास आला ह्मणजे बाबांनीं चार चौघांत ती त्याची गुप्त गोष्ट उघड करून सांगावी. अशाप्रकारें फजिती झाल्यावर, त्यास आपल्या दुष्कृत्यांचा साहाजिकच पश्चात्ताप व्हावा व त्यानें अतःपर असली गोष्ट कधींहीं करणार नाहीं अशी आपल्या मनांत प्रतिज्ञा करून तदनुसार वागण्याचा प्रयत्न ठेवावा. अशा रीतीनें, काळोखांत केलेलीं गुप्त कृत्यें चवाठ्यावर येऊं लागल्यामुळें, सर्व लोकांस बाबांची मोठी दहशत उत्पन्न झाली होती व त्यामुळें अनेक लोकांनीं वाईट कृत्यें करण्याचें सोडून देऊन ते परमार्थाकडे वळले. शेंकडा पोलिसांकडून जें काम होणें अशक्य तें काम सत्पुरुषाच्या एका शब्दानें कसें सहज घडून येतें पहा. कायद्यानें सुधारणा घडवून आणण्यापेक्षा स्वतःच्या आचरणानें लोकांस कित्ता घालून दिल्यानें होणारी सुधारणा अधिक महत्वाची होय. कारण कायद्यानें घडलेली सुधारणा, कायद्याचें बंधन नष्ट झालें कीं, नष्टप्राय होऊन जाईल, तशी दुसरी सुधारणा कधींही नाश न पावतां जनतेवर आपला कायमचा पगडा बसवील असो.

या नंतर कांहीं वर्षें गेल्यावर, पूर्णदास केरी गांव सोडून वेंगुर्लें येथें येऊन कायमचे राहिले. पंढरपुराहून श्रीविठ्ठलरुक्मिणीच्या मूर्ति आणून, एक देवालय बांधून त्यांत त्यांनीं त्या स्थापन केल्या. याच ठिकाणीं श्रीरामानंद गौडपादाचार्य, सारस्वत ब्राह्मणांचे गुरु यांनीं शंकरपार्वतीच्या काश्मिरी दगडाच्या मूर्ति स्थापन केलेल्या आहेत. जगद्गुरु श्रीशंकराचार्य हे वेंगुर्लें प्रांतीं आले ह्मणजे पूर्णदास यांस ते मुद्दाम येऊन भेटत असत व त्यांस ते मोठा मान देत असत.

नारायण ऊर्फ नारगौडा या नांवाच्या मनुष्यास पंढरपुरास श्रीपांडुरंगानें दृष्टांत दिला कीं तूं कोंकणांत जाऊन, वेंगुर्लें येथें पूर्णदास या नांवाचे एक साधु वास करीत आहेत,

त्यांस भेट. नारायण, या दृष्टांताप्रमाणें वेंगुर्लें येथें आला व पूर्णदासांपुढें हात जोडून उभा राहिला. त्यास पाहतांच पूर्णदासांनीं, त्यास पंढरपुरास दृष्टांत झाल्याची हकीकत सांगितली, त्यामुळें त्यांच्या अंतर्साक्षीपणाचें त्यास व इतर लोकांस मोठें आश्चर्य वाटलें. पुढें, पूर्णदास यांनीं त्यास उपदेश दिला व कांहीं साक्षात्कार वगैरे होऊन ब्रह्मस्वरूपाची ओळख मिळाल्यावर तो आपल्या देशीं निघून गेला. येथें एक गोष्ट सांगणें अवश्य आहे. ती ही कीं असल्या चमत्करांच्या गोष्टी सांप्रतकालीं कोणास सत्य व विश्वसनीय वाटण्याचा संभव नाहीं; व याकरितां असल्या गोष्टींचा या ग्रंथांत समावेश करूं नये असें माझें व माझ्या कांहीं विद्वान् मित्रांचें मत होतें. परंतु, जेव्हां असें आढळून आलें कीं बहुतेक मराठी कवि साधु असून त्यांतील प्रत्येकाच्या चरित्रांत कांहींना कांहीं चमत्काराची गोष्ट सांगितलेलीच आहे, तेव्हां, असल्या गोष्टींस अजिबात फांटा देण्याचा माझा विचार मला सोडून द्यावा लागला व तसें करणें केवळ अपरिहार्य आहे हें थोड्याशा विचारांतीं कोणाही चाणाक्ष वाचकाच्या लक्षांत आल्याशिवाय राहणार नाहीं, अशी माझी खातरी आहे.

पूर्णदास हे केवळ टाळकुटे भजनीबुवा नसून त्यांचें वैराग्य व साधुत्व हीं फार कडकडीत होतीं. ते गोमांतकांतून एकदां आपल्या गांवीं येत असतां वाटेंत हरमल या नांवाचा एक गांव आहे, तेथील केणी आडनांवाच्या एका सारस्वत ब्राह्मणाच्या घरांत एक माणूस मेलें होतें व त्याचें प्रेत बाहेर आणून तें स्मशानांत नेण्याची लोकांनीं तयारी चालविली होती. इतक्यांत, पूर्णदासांबरोबर असलेला त्यांचा नोकर बाबण नाईक हा, तेथें कांहीं फुलझाडें होतीं त्यांचीं फुलें तोडण्यास गेला. तेथें गेल्यावर तो प्रेतयात्रेचा भीषण देखावा अवलोकन करितांच त्यास फार वाईट वाटलें व तो त्या मृतमनुष्याच्या आप्तांस ह्मणाला 'बाबांनों, तुमच्या दारीं आज कामधेनु चालून आली आहे, तर आतांच जाऊन तिचे पाय धरा'. हें त्याचें भाषण ऐकतांच त्या लोकांनीं पूर्णदासांच्या पुढें साष्टांग नमस्कार घालून, रडून ओरडून एकच आकांत केला. आधींच विष्णुदासांचें मन नवनीतापेक्षांही कोमल, त्यांत असला करुणास्पद प्रसंग आल्यावर तें अगदीं विरघळून गेलें तर त्यांत काय आश्चर्य आहे? पूर्णदासांनीं आपल्या गुरुदेवतेचें स्मरण करून त्या मृतमनुष्याकडे कृपादृष्टीनें पाहतांच, तो तात्काळ उठून बसला व हा अलौकिक चमत्कार पाहतांच तेथें जमलेल्या सर्व लोकांनीं पांडुरंगनामाचा एकच जयजयकार केला. याचप्रमाणें उपदेशानें अगदीं मरणोन्मुख झालेल्या एका मनुष्यास बाबांनीं देवाचें तीर्थ देऊन बरें केलें.

पूर्णदासांचे गुरु गोपाळदास हे एके दिवशीं दोन प्रहरीं अवधूत बैराग्याच्या वेषानें त्यांजपाशीं आले. पूर्णदासांनीं, आपला पुतण्या यशवंत उसपकर यास त्यांच्या जेवणाची तयारी करावयास सांगितलें. हा यशवंतराव थोडासा कृपण होता. अतित अभ्यागतांचा परामर्ष घेण्यांत व गोसावी वगैरे लोकांस जेऊं घालण्यांत पैसा खर्च करणें त्यास बिलकुल आवडत नसे. परंतु पूर्णदासापुढें त्याचें कांहीं चालत नसल्यामुळें, निरुपायास्तव, त्यांच्या आज्ञेप्रमाणें त्यानें थोडेसे तांदूळ एका भांड्यांत घालून ते शिजत ठेविले. पूर्णदासांस, आपल्या गुरूंची क्षुधा इतक्या थोड्या भातानें शांत होणार नाहीं हें पक्कें ठाऊक असल्यामुळें त्यांनीं, आणखी तीन शेर तांदुळ दुसऱ्या एका भांड्यांत घालून त्यांचा भात कर, असें यशवंतास सांगितलें. यावेळीं तर यशवंतास त्या बैराग्याचा व पूर्णदासांचा मोठा राग आला, परंतु उपाय नाहीं ह्मणून पुनः त्यानें आणखी तीन शेर तांदळाचा भात करून बैराग्यास जेवावयास बोलाविलें. हे बैरागीबुवा एक राक्षसच होते, त्यांनीं तो सर्व भात चट्ट करून वर आणखी कांहीं आंबे व केळीं खाऊन पाण्याचे एक दोन तांबे रिकामे केले व ढेंकर देत स्वारी आपल्या मार्गास लागली ! हे बैरागीबुवा पूर्णदासांचे गुरु होते हें त्यांनीं सांगितल्यावरून लोकांस समजलें.

याप्रमाणें अनेक जडमूढांचा उद्धार करून व शेंकडो लोक भक्तिमार्गास लावून पूर्णदासांनीं, आपल्या वयाचे ९२ वे वर्षीं, ह्मणजे इ० स० १८७० शके १७९२ ज्येष्ठ शुद्ध २ या दिवशीं देह ठेविला. ते आपल्या वयाचे मानानें वृद्ध दिसत नसत व त्यांची अंगकांति फार दिव्य होती. ज्या ठिकाणीं त्यांच्या शवाचें दहन केलें त्या ठिकाणीं तुळशीचा एक रोप उगवला होता, त्यावरच त्यांची समाधि बांधलेली आहे. ही समाधि व पूर्णदासांनीं बांधिलेलें श्रीपांडुरंगाचें देवालय हीं ज्या जमीनींत आहेत ती जमीन रा. नारायण केरकर यांनीं पूर्णदासांस अर्पण केली आहे. पूर्णदासांचे शिष्य रा. रा. घनःशाम सूर्याजीराव देसाई डिचोलकर यांजकडून देवास नैवेद्य व नंदादीप हीं चालू आहेत. तसेंच देवाच्या व समाधीच्या वार्षिक खर्चासाठीं मुंगी वाणी यांनीं मळगांव गांवीं व पांडू लाडू प्रभू यांनीं तुळस गांवीं जमिनी दिलेल्या आहेत. शिवाय सरदार केरकर बक्षी यांजकडूनही कांहीं रकम वर्षासनादाखल देण्यांत येते. पूर्णदासांची समाधि व त्यांनीं बांधिलेलें देवालय हीं वेंगुर्लें येथें ‘ उभा दांडा ’ या नांवाची एक वाडी आहे तेथें असून, पूर्णदासांच्या पुण्यतिथीच्या दिवशीं तेथें त्यांच्या शिष्य व भक्तमंडळीची मोठी जत्रा

भरते. शिवाय आषाढमासीं गोपाळकाल्याचा व मार्गशीर्षमासीं दत्तजयंतीचा असे उत्सव होतात. पूर्णदासांच्या वंशजांकडून हे उत्सव करण्यांत येतात. येथपर्यंत, एक सत्पुरुष या दृष्टीनें बाबा उसपकर ऊर्फ पूर्णदास यांच्या चरित्राचें साधारण निरूपण केलें. आतां कवि या नात्यानें त्यांनीं जी मराठी भाषेची स्वशक्त्यनुसार सेवा केली आहे, तिच्यासंबंधानें थोडासा विचार करून हा चरित्रलेख पुरा करितों.

बाबा उसपकर हे मोठे विद्वान् होते असें नाहीं, तथापि खरें साधुत्व त्यांच्या अंगीं मुरून गेलेलें असल्यामुळें त्यांच्या तोंडांतून प्रसंगविशेषीं जी परमेश्वराची स्तुति बाहेर पडली ती सर्व काव्यरूपानें आज उपलब्ध आहे. त्यांस वेदांत विषयाची फार आवड असल्यामुळें त्याच एका विषयावर त्यांचे, ‘ ज्ञानघन ’ व ‘ स्वात्मानुभव ’ या नांवांचे दोन मोठाले ओंवीबद्ध ग्रंथ आहेत. यां पैकीं पहिल्या ग्रंथाच्या ओंव्या सुमारें ६,००० आहेत. दुसरा ग्रंथ अद्याप माझ्या हातीं आलेला नसल्यामुळें त्यासंबंधानें येथें कांहींच माहिती देतां येत नाहीं ही निरुपायाची गोष्ट आहे. या दोन ग्रंथांशिवाय त्यांचीं निरनिराळ्या देवतांच्या स्तुतिपर व भक्ति, ज्ञान, वैराग्य इत्यादि विषयांवर अनेक पदपदांतरें व अभंग आहेत. ही सर्व कविता प्रसादपूर्ण, सुलभ व वाचकास परमार्थ विषयांचें ज्ञान प्राप्त करून देणारी असून तिची संख्या जवळ जवळ १०,००० होईल. यावरून बाबांनीं, आपल्या प्रासादिक व रसाळ वाणीचा आपल्या मायभाषेची सेवा करण्याकडे किती उपयोग केला, हें वाचकांच्या सहज लक्षांत येईल. रा. रा. विष्णु रंगाजी सेलडेकर यांनीं १८९६ सालीं, बाबांचा ‘ पूर्णसार ’ या नांवाचा एक लहानसा ग्रंथ, गोवें येथें छापून प्रसिद्ध केला आहे. त्यांच्या कवितेंतील कांहीं वेंचे येथें देतों.

अभंग १.

‘ निर्गुण निधर्म निर्विकार रूप । केवल अरूप परब्रह्म ॥ १ ॥
ऐशिया स्वरूपीं मूळ माया झाली । गुणमाया आली तिच्या पोटीं ॥ २ ॥
गुणमायेपोटीं होय सत्वगुण । सत्वें रजोगुण उद्भवला ॥ ३ ॥
रजापासोनियां तमोगुण होय । ह्मणे पूर्ण सोय ऐका पुढें ॥ ४ ॥

अभंग २.

तमोगुणीं व्योम जाइलें उत्पन्न । व्योमीं प्रभंजन प्रसवला ॥ १ ॥
प्रभंजनापोटीं तेज प्रसवलें । तेज तेंही व्यालें आपालागीं ॥ २ ॥

आपाचिये पोटीं भूमि उपजली । ऐशीं विस्तारलीं पंचभूतें ॥ ३ ॥
अष्टधा प्रकृति झाली ऐशापरी । पूर्ण ह्मणे थोरी ऐका पुढें ॥ ४ ॥

अभंग ३.

विराट हिरण्यगर्भ अव्याकृति । चौथें मूळाकृति देह जाण ॥ १ ॥
उत्पत्ति पालन संहार साक्षता । चारी या अवस्था ब्रह्मांडींच्या ॥ २ ॥
अकार उकार मकार झकार । औटमात्रापर निरंजन ॥ ३ ॥
ब्रह्मा विष्णु शिव चौथा तो सर्वात्मा । पूर्ण तो महिमा न वर्णवे ॥ ४ ॥

पद. ( हरि भजनावीण काळ० ) या चालीवर.

धांव पाव दीनबंधु श्रीदत्तदेवा ॥ ध्रु० ॥
कमंडलु माळ करीं । डमरु त्रिशूलासि धरी ॥
शंख चक्र, भवा हरीं । द्यावि पायसेवा ॥ १ ॥
त्रयमूर्ति विराजिता । रसिक भाव भक्तहिता ।
अहंगजा विदारिता । वारिं जन्म भेवा ॥ २ ॥
कल्युगीं भक्तपति । होउनि श्रीपाद क्षितीं ।
नरसिंह सरस्वती । अर्पि प्रेममेवा ॥ ३ ॥
धुसुरकांति दिव्यराज । विभुति अंगिं भव्य साज ।
भक्तजना पूर्ण काज । तूंचि गुप्त ठेवा ॥ ४ ॥

पद. ( निजवदनीं हरि नाम वसावें० ) ही चाल.

तारक तो सये विठ्ठल गावा । साधन हेंचि अनन्य भजावा ॥ धृ० ॥
मुनिजन हृदयीं ज्याला जपती । अर्पुनि मानस प्रेमसुभावा ॥ १ ॥
तारक सर्वांतिरिं प्रभु हरि हा । चरणीं त्या रहिवास घडावा ॥ २ ॥
कटिकर वरदायक भक्तांसी । कोमलमूर्ति जीवात्मविसावा ॥ ३ ॥
पूर्णपरात्पर प्रियकर साचा । पदाब्जीं जिवभाव कसावा ॥ ४ ॥

श्रीदत्ताष्टक,

( वसंततिलक वृत्त. )

माला कमंडलु करांवुज पुण्यशीला । ज्या मध्य हस्त धरितो डमरू त्रिशूला ॥
पाणि स्वऊर्ध्व धरि शंखहि चक्र यांतें । भावें नमो नमन दत्तदिगंबरातें ॥ १ ॥

माथां जटा विभुति चर्चित भव्य साजे । आंगीं स्वयें धुसुर कांतिहि ते विराजे ।
आकर्ण नेत्रयुगुलीं हरितो भयातें । भावें नमो नमन दत्त दिगंबरातें ॥ २ ॥
रुद्राक्ष ते रुळति दिव्यहि देहधारी । जो भक्तवत्सल कृपाघन दीन तारी ।
नामामृतें स्वसुख दे निजमोक्षदातें । भावें नमो नमन दत्त दिगंबरातें ॥ ३ ॥
ब्रह्मा हरी हर तनुत्रय ऐक्यकारी । पूर्णेंदु इंदु ह्मणजे निजसौख्यकारी ।
ज्याचा सुवेग अति दुस्तर त्या मनातें । भावें नमो नमन दत्त दिगंबरातें ॥ ४ ॥
कृष्णातटीं निकट वास असे जयाला । स्वेच्छा निरिच्छ फिरणें भुवनत्रयाला ।
औदुंबरासुतळिं आसन स्वस्थ ज्यातें । भावें नमो नमन दत्त दिगंबरातें ॥ ५ ॥
मी दीन केवळ असें मतिमंद साचा । वाचा नसे मधुर अप्रिय हो असाचा ।
जाणोनियां करि कृपा मज बाळकातें । भावें नमो नमन दत्त दिगंबरातें ॥ ६ ॥
जो जाणता सकल अंतर हृद्गतातें । तैसाचि तारक जना पद इच्छितातें ।
देखोनि भाव प्रगटे प्रिय दे वरातें । भावें नमो नमन दत्त दिगंबरातें ॥ ७ ॥
ब्रह्मादि देव तुज इच्छिति लोक सारे । तो मी तुतें सुखघना विसरूं कसा रे ।
द्यावें सदैव निज प्रेमहि पूर्ण मातें । भावें नमो नमन दत्त दिगंबरातें ॥ ८ ॥

पूर्णनाथांच्या ‘ ज्ञानघन ’ ग्रंथांतील कांहीं ओव्या येथें देतों. मुमुक्षूनें मनोनिग्रह कसा करावा, हें नाथ सांगतात:—

‘ ऐसें न करवे साधन । तरी मैत्रता करावी आपण ।
मनासारिखा मित्र पूर्ण । दुसरा नसेची ॥ ३५ ॥
जन्मार्जित दुःख जाण । मनासि निवेदावें आपण ।
जें जें मागां भोगिलें दारुण । गर्भवासींचें ॥ ३६ ॥
तूं जरी मित्र होसी । तरी हरील भवदुःखासी ।
शोधोनि काढीं मुळासी । आपुल्या आतां ॥ ३७ ॥
ऐसें ऐकतांचि मन । वैराग्यें खवळे दारुण ।
आपुलें आपण बंधन । तोडी विषयांचें ॥ ३८ ॥
आपणही परोपकारीं । मरोनि जाय निर्धारीं ।
जीवासी ब्रह्मसाक्षात्कारीं । ठाव पाववी ॥ ३९ ॥

ऐसा मनाचा उपकार । नेणोनि जे कां पामर ।
प्राकृत मित्राचार । करूं धांवती ॥ ४० ॥
हें न टके तरी तत्त्वता । तिसरें साधन ऐक आतां ।
निरंतर उदासीनता । असावी ते ॥ ४१ ॥
मन जें जें कां योजीतसे । आपण न उठावें त्यासरिसें ।
तरी मनिंचा मनीं अर्थ निरसे । निष्कारणत्वें ॥ ४२ ॥
जो जो पदार्थ मन धरी । आपण उदासत्वें अव्हेरी ।
तरी मनिंचा मनीं परस्परीं । निमोनि जाय ॥ ४३ ॥
अथवा मनासी प्रबळ । द्यावी विवेकाची मोकळ ।
तो हालूं नेदी चंचळ । मनाकारणें ॥ ४४ ॥
मन जेथ धांवोनि जातसे । विवेक तेथ आधींच पैसे ।
मुरडुनी स्वरूपीं लावीतसे । निजानंदीं ॥ ४५ ॥
अथवा मनाचे मुळीं । आपण बैसावें निश्चळीं
तरी कार्यकारण होळी । सहजें होय ॥ ४६ ॥
मग मन जें जें कां पाहों बैसे । स्वरूपावीण आन न दिसे ।
अंतर्बाह्य स्वप्रकाशें । आत्माचि असे ॥ ४७ ॥
द्रष्टासी दृश्य पाहतां । आत्माचि भासे तत्वता ।
दृश्य द्रष्टा दर्शनता । निमोनि नेली ॥ ४८ ॥
जेथ जेथ चरण चालती । तेथ सहज प्रदक्षणा होती ।
चराचरीं निजात्मा निश्चितीं । जाणतांचि ॥ ४९ ॥
श्रवणीं हरिगुणश्रवण । वाचे करावें हरिकीर्तन ।
सदां सर्वदा नामस्मरण । करीत जावें ॥ ५० ॥
हस्तें करावें देवतार्चन । पायीं तीर्थयात्रा प्रदक्षिणा ।
घ्राणीं अमोल्य निर्माल्य जाणा । करणें सेवन ॥ ५१ ॥
भक्ति ह्मणिजे सर्व भूतीं । आत्माचि जाणावा निश्चितीं ।
मग समविषमतेची भक्ति । निमोनि गेली ॥ ५२ ॥

विषम पाहतां भूताकृति । आत्मा देखे सम निश्चितीं ।
पिपीलिका श्रेष्ठासमान मति । पाहणें जयाचें ॥ ५३ ॥
देहाभिमान त्यागुनी । नामरूपातें गाळोनी ।
आत्मा देहीं जाणुनी । असावें बा रे ॥ ५४ ॥
दया असावी सर्व भूतीं । आत्मा ओळखोनि भूतव्यक्तीं ।
तैसीच ते निर्मळ शांती । असावी आधीं ॥ ५५ ॥
कोणी निंदा स्तुति करितां । क्रोध न यावा सर्वथा ।
मीचि व्यापक आत्मा तत्वता । जाणोनियां ॥ ५६ ॥
जैसें गगन व्यापूनि असे । संगीं असोनि निःसंग जैसें ।
आतमस्वरूप तैसें । संगातीत ॥ ५७ ॥
क्षण क्षणा विचार करावा । वायां श्वासोच्छास जाऊं न द्यावा ।
आपुला आपण उगावा । करणें बापा ॥ ५८ ॥
मायामय सकळ सृष्टि । आणि अविद्यात्मक तुझी दृष्टी ।
नामरूपें भरली सृष्टी । साच नसे ॥ ५९ ॥
विश्व नाहीं आत्माचि असे । जैसा रज्जूवरी सर्प विलसे ।
तैसा जगभास भासतसे । भ्रांतिमय ॥ ६० ॥

'ज्ञानघन, रेषा ३'

वरील ओंव्यांवरून, या कवीची वेदांतवाणी किती अस्खलित आहे, हें स्पष्ट दिसून येतें. पूर्णनाथांची संस्कृत भाषेवर फारशी सत्ता होती असें दिसत नाहीं. तथापि मराठी भाषेंत ते चांगले प्रवीण होते, असें वाटतें. त्यांची कविता अत्यंत अर्वाचीन आहे, परंतु तींत जुने मराठी शब्द व शब्दांचीं जुनी रूपें बरींच आढळतात.

---

# कुडचीवीर.

'कवि सृष्टीचा अलंकार । कवि लक्ष्मीचा शृंगार ।
सकळ सिद्धींचा निर्धार । ते हे कवि ॥"

श्रीसमर्थ.

दक्षिण महाराष्ट्रांत शहापूर शहरापासून एका कोसावर कुडची या नांवाचा एक लहानसा गांव आहे, तेथें हा कवि सुमारें ३०-४० वर्षांपूर्वीं होऊन गेला. यानें 'व्यंकटेशविजय' या नांवाचा एक ओंवीबद्ध ग्रंथ लिहिलेला असून त्यांत त्यानें स्वतःची सविस्तर हकिकत निवेदन केलेली आहे, तिचा सारांश येणेंप्रमाणें:—कुडची नामक गांवांत, संकरसपंत या नांवाचा शांडिल्यगोत्री ब्राह्मण कुळकर्णी रहात असे. तो या कुडचीवीर कवीचा मूळपुरुष होय. या पुरुषापासून कुडचीवीरापर्यंतची या घराण्याची वंशावळ खालीं दिल्याप्रमाणें:—

संकरसपंत
|
वीर
|
रुद्र
|
संकरस
|
वीर
|
रुद्र

रुद्रास औरस पुत्र नसल्यामुळें, मूळ वंश येथें खुंटला, परंतु या घराण्यांतील एक मुलगी कोणा विश्वामित्रगोत्री गृहस्थाचे घरीं दिली होती, तिचा मुलगा दत्तक घेऊन वंश पुढें चालू केला. या दत्तक पुत्राचें नांव नामदेव होतें. नामदेवापासन पुढची वंशावळ अशी आहे:—




ह्मणजे मूळपुरुष संकरसंपन्नापासून कुडचीवीराची १२ वी पिढी होते. या घराण्यांतील सर्व पुरुष मोठे विद्वान् व हरिभक्तिपरायण होऊन गेले. विशेषतः कुडचीकवीचा बाप यशवंत ऊर्फ बाळाजीपंत हा महाज्ञानी पुरुष होता. याच्या संबंधानें कुडचीवीर ह्मणतोः—

' त्यांत वडील यशवंत । दुसरें नाम बाळाजीपंत ।
तो माझा पिता यथार्थ । महाज्ञानी भक्तराज ॥ १ ॥

कुडची वीराच्या आईचें नांव कृष्णाबाई. कुडची वीराच्या गुरुपरंपरेवरून असें समजतें कीं, सुमारें २५० वर्षांपूर्वीं मोगलाईत राघव चैतन्य व केशव चैतन्य या नांवाचे जे सुप्रसिद्ध महापुरुष होऊन गेले त्यांपैकीं राघवचैतन्य हे या कुडचीवीराच्या गुरुपरंपरेचे मूळ पुरुष होत. ही सर्व हकीकत कवीच्याच शब्दांनीं येथें देतों.

' ज्यांचेनि जाहला ज्ञानबोध । ऐका गुरुमालिका अगाध ।
सज्जनरंजन घराणे प्रसिद्ध । चैतन्यसांप्रदायिक पैं ॥ ५६ ॥
मूळपुरुष राघव चैतन्य । जो ज्ञानियांमाजी चूडारत्न ।
इंदापुरीं समाधिस्थ होऊन । अखंडवस्ती केली असे ॥ ५७ ॥
त्यापासोनी राव गिरिधर । केवळ ज्ञानाचें आगर ।
मुरहर नामें साधु थोर । तयापासूनि जाहले ॥ ५८ ॥
यशवंतराव तेथून । जाहले अद्भुत ज्ञानसंपन्न ।
अमृतराव तयापासून । भक्तराज जाहले ॥ ५९ ॥

पाहूनि त्याची कवित्वरचना । मान तुकविती विद्वज्जन ।
गोड केवळ अमृतासमान । नामासारिखी करणी ज्याची ॥ १६० ॥
त्यापासोनि राव गोविंद । जो साक्षात् अवतरला मुकुंद ।
ज्याच्या दृष्टीसी भेदाभेद । नसे कांहीं सर्वथा ॥ ६१ ॥
तो माझा सद्गुरु साचार । त्याचेनि जाहला ग्रंथ परिकर ।
करोनियां जयजयकार । वंदिले चरण तयाचे ॥ ६२ ॥ '

वेंकटेशाविजय, अ० १२ वा.

या वेंच्यांतील राघव चैतन्य हे तुकारामबुवांचे गुरु जे केशवचैतन्य, त्यांचे गुरु होत. राघवचैतन्याची समाधि मोंगलाईत कलबुर्ग्यानजीक दीड योजनावर ' आळंद गुंजोटी ' या गांवीं असल्याचें, निरंजन नामक कवीनें शके १७०९ या वर्षी लिहिलेल्या ' केशवचैतन्यचरित्र ' या नांवाच्या ग्रंथांत लिहिलें आहे व हें विधान खरें आहे असें मोगलाईंतील एका गृहस्थानें पूर्ण चौकशी करून, केसरीपत्रांत प्रसिद्ध केलें आहे. आतां ' कुडचीवीर ' लिहितो कीं राघवचैतन्यांनीं ' इंद्रापूर ' येथें समाधि घेतली. तेव्हां वरील विधान व कुडचीवीराचें विधान यांचा मेळ पडत नाहीं. यावरून राघवचैतन्य या नांवाचे दोन पुरुष होऊन गेले असावेत, असें ह्मणण्यापलीकडे गत्यंतर नाहीं. किंवा वरील दोन विधानांपैकीं कोणतें तरी एक विधान–विशेषतः कुडचीवीराचें विधान–चुकीचें तरी असलें पाहिजे. तसेंच, प्रख्यात महाराष्ट्रकवि अमृतराय यांनीं आपले समकालीन मध्वमुनीश्वर यांच्या गुरूंकडून उपदेश घेतला अशी आख्यायिका प्रसिद्ध आहे. परंतु कुडचीवीर ह्मणतो कीं अमृतरायांनीं चैतन्यसांप्रदायांतील ह्मणजे राघवचैतन्यापासून ५ वे पुरुष यशवंतराव यांजपासून उपदेश घेतला होता. या दोन विधानांचाही मेळ पडत नाहीं, तथापि आख्यायिकेंतील माहितीपेक्षां कुडचीवीराची माहिती अधिक विश्वसनीय मानणें भाग आहे. कारण अमृतराय हे कुडचीवीर कवीचे प्रत्यक्ष आजेगुरु असल्यामुळें, त्यास त्यांची खरी हकीकत माहित असण्याचा अधिक संभव आहे. वर दिलेल्या उताऱ्यांत कुडचीवीरानें, अमृतरायांच्या कवितेची व त्यांच्या अमृतवाणीची स्तुति केलेली आहे, त्यावरून प्रसिद्ध अमृतरायांहून हे अमृतराय कोणी निराळे पुरुष होते असेंही ह्मणतां येणें अशक्य आहे. असो.

हा कुडचीवीर कवि मोठा विद्वान् होता असें नाहीं, तथापि त्याची कविता फार सरस आणि प्रौढ अशी आहे. याचा ' व्यंकटेशविजय ' हा एकच ग्रंथ प्रसिद्ध असून, त्याचे अध्याय १२ व ओंवीसंख्या २१०० आहे. हा ग्रंथ भविष्योत्तर

पुराणाच्या आधारानें लिहिलेला असून, त्यांत कर्नाटकांतील गिरीच्या व्यंकटेशाचें चरित्र व अवतार यांचें वर्णन आहे. शहापूर येथें कोन्हेरराव सवणूरकर या नांवाचे कोणी गृहस्थ होते. त्यांचा कुलदेव 'गिरीचा व्यंकटेश' असून, त्यांनीं विनंति केल्यावरून कवीनें हा 'व्यंकटेशविजय' ग्रंथ लिहिला. ही सर्व माहिती कवीनें या ग्रंथाच्या शेवटच्या अध्यायांत दिलेली आहे, ती अशी:—

'श्रीकृष्णवेणीचे दक्षिणतीरीं । पट्टण एक पांच योजनावरी ।
शहापूर नामें निर्धारी । विख्यात नगरी असे ती ॥ १ ॥
तेथील रहिवासी ब्राह्मण । श्रीनिवासराव नामाभिधान ।
सवणूरकर उपनांव पूर्ण । भारद्वाज गोत्र पैं ॥ २ ॥
चौथे पुत्र त्यासी उत्तम । नामें ऐकावीं अनुक्रमें ।
कोन्हेर राघव भास्कर राम । परम निःसीम हरिभक्त ॥ ३ ॥
वडील पुत्र कोन्हेरराव । श्रीवेंकटेश त्याचा कुलदेव ।
प्रतिवर्षीं करिती उत्सव । नवरात्रामाजी प्रीतीनें ॥ ४ ॥
श्रीकृष्ण वेणीचे तीरीं । कंकणवाडी नाम नगरी ।
तेथील रहिवासी विप्र निर्धारी । नृसिंहाचार्य नाम तयाचें ॥ ५ ॥
वेदशास्त्रप्रवीण । हरिभक्त सुशील ब्राह्मण ।
कर्मनिष्ठ क्रियावंत पूर्ण । श्रीहरीसी आवडता ॥ ६ ॥
ऐसा तो नृसिंहाचार्य । कोन्हेरायाचा पुरोहित होय ।
जाणोनियां उत्साहसमय । घरा आला अकस्मात ॥ ७ ॥
कोन्हेरायें आदर करोन । ठेऊन घेतलें उत्साहाकारण ।
नित्य सायंकाळीं पुराण । त्याच्या मुखें श्रवण करी ॥ ८ ॥
भविष्योत्तर पुराणोक्त । श्रीवेंकटेशमाहात्म्य विख्यात ।
श्रवण केलें साद्यंत । अमृताहूनि गोड जें ॥ ९ ॥
कोन्हेरायाच्या मनांत । उत्पन्न जाहला हाचि हेत ।
हा ग्रंथ आहे संस्कृत । अबळा अज्ञान न जाणती ॥ १० ॥
प्राकृत भाषेंत करून । करावें ग्रंथनिर्माण ।
मग सांगितलें मजकारणें । एवढा ग्रंथ करावा ॥ ११ ॥
ग्रंथ करावयालागुनी । आल्हाद वाटला माझे मनीं ।
परी संस्कृत ज्ञान मुळींहूनी । मज नकळे सर्वथा ॥ १२ ॥

घुंगुरड्याएवढें वदन । ह्मणे मी सगळा पर्वत गिळीन ।
खद्योत स्वतेजेंकरून । झांकों इच्छित सूर्यातें ॥ १२ ॥

असो; पुढें नृसिंहाचार्यांनीं कवीस वर दिला कीं, 'श्रीवेंकटेश कृपा करून, हा ग्रंथ लिहिण्याचें तुला सामर्थ्य देईल; व या त्यांच्या वचनावर विश्वास ठेवून कवीनें ग्रंथ लिहिण्यास आरंभ करून तो शके १७९३, प्रजापति संवत्सरीं, आषाढमासीं शुद्ध त्रयोदशी, शुक्रवार या दिवशीं पूर्ण केला. वरील उताऱ्यावरून हा कवि संस्कृतज्ञ नव्हता असें दिसतें, परंतु, 'मला संस्कृत येत नाहीं' असें जें कवीनें विधान केलें आहे तें फक्त त्याच्या शालीनतेचें लक्षण असून, त्याचा ग्रंथ वाचून पाहिल्यास त्यास संस्कृताचें बरेंच ज्ञान होतें, असें उघड दिसून येतें. ज्या कोन्हेर-रायाचे विनंतीवरून कवीनें हा ग्रंथ लिहिला त्याचे वंशज सध्यां शहापुरास आहेत. कवीच्या वंशजांसंबंधानें माहिती मिळविण्याचा प्रयत्न मी केला नाहीं.

येथें 'व्यंकटेशविजय' ग्रंथांतील थोडेसे वेंचे देऊन हा अल्प चरित्रलेख पुरा करितों.

ग्रंथारंभीं गणेशसरस्वतीस्तवन केल्यावर कवीनें आपल्या सद्गुरूचा महिमा वर्णिला आहे:

'ऐसे सद्गुरु चैतन्यघन । गोविंदराज नामाभिधान ।
ज्याचें देखतां महिमान । गोविंदची अवतरला ॥ १८ ॥
जोक्रोध नगभंजन वज्रधर । जो कामगजविदारक हरिवर ।
जो अपरोक्ष ज्ञानाचा सागर । जो मंदिर धैर्याचें ॥ १९ ॥
ज्याची ऐकतां कवित्वरचना । आश्चर्य वाटे सर्वांच्या मना ।
ज्याणें भक्तीबळें नारायणा । आपणाधीन केला असे ॥ २० ॥

या उताऱ्यांतील गोविंदराजाची 'सर्वांच्या मनाला आनंद देणारी' कवित्व-रचना आज उपलब्ध नाहीं ही दुर्दैवाची गोष्ट होय.

खालील ओंव्यांवरून कवीची शालीनता व देवावर पूर्ण विश्वास, हे गुण स्पष्ट दिसून येतातः— 'बोलणें अरस बहुत । परी संतीं घालावें पोटांत ।
जैसें बाळक बोबडें बोलत । जनक जननीसी आवडे तें ॥ ३६ ॥
मी नव्हें चतुर पंडित । संस्कृत व्युत्पत्ति नाहीं किंचित ।
ग्रंथ वदावयाचा हेत । मनीं धरिला निर्धारीं ॥ ३७ ॥

कवि ज्ञानी पुरुषाचें लक्षण सांगतो—

'ज्ञानियाचें मुख्य लक्षण । सुख दुःख असावें समान ।
कामक्रोधादिक जिंकून । द्वंद्वातीत सर्वदा ॥ ५४ ॥

मृत्तिका आणि कांचन । ज्यासी भासावें समान । '

वायु आणि शेष यांचा खालील संवाद मनोरंजक व बोधप्रद आहेः—

' साक्षात् प्राणेश आपण । दर्शनालागीं पातला जाण ।
त्यासी नागेंद्र बोले वचन । आंत सर्वथा जाऊं नको ॥ ४० ॥
स्पर्शून ह्मणे तयासी । काय कारण अवरोधावयासी ।
अही ह्मणे तुजसी । न सोडीं मी सर्वथा ॥ ४१ ॥
मग क्रोधावला प्रकंपन । ह्मणे मी आंत जाईन ।
हरिद्वारीं अवरोधन । नाहीं कोणाशि आजिवरी ॥ ४२ ॥
जयविजय सनकादिकांशीं । अवरोधितां गति जाहली कशी ।
तुज ठाऊक असतां निश्चयेंसी । आडविसी तूं किंनिमित्त ॥ ४३ ॥
यावरी तो काद्रवेयनायक । परम कोपारूढ जाहला देख ।
वायूसी ह्मणे तूं मूर्ख । सांगतांही न ऐकसी ॥ ४४
माझे प्रताप नेणोन । भलतेंचि जल्पसी येऊन ।
मी हरीचें प्रियपात्र गहन । प्राणाहूनि आवडता ॥ ४५ ॥
माझ्यावरी सर्वेश्वर । शयन करी निरंतर ।
कैलासपति श्रीशंकर । भूषणरूपें वाहे मज ॥ ४६ ॥
म्यां सर्षपप्राय धरिली अवनी । माझा प्रताप जाणे चक्रपाणी ।
मशका मातें न गणोनी । आंत कैसा संचरशी ? ॥ ४७ ॥
प्राणेश बोले ते अवसरीं । स्वमुखें स्वगुणवर्णन करी ।
तो शतमूर्ख पुरुष निर्धारीं । तुजऐसाचि जाण पां ॥ ४८ ॥
माझे तुझे पराक्रम । जाणतसे मेघःशाम ।
व्यर्थ वल्गना करिता अधम । नाहीं दुसरा तुजऐसा ॥ ४९ ॥
यावरी बोले अहिनायक । मी हरीचा निकट सेवक ।
मजवरी प्रीति विशेष देख । ऐशी नाहीं दुसरीकडे ॥ ५० ॥
तुह्मीं सर्व इतर भक्त । हरीसी आवडतां यथार्थ ।
परी मजवरी जैशी हरीची प्रीत । तैशी नाहीं इतरांकडे ॥ ५१ ॥
प्राणेश ह्मणे, ' बिडाळका । अंतरगृहीं प्रवेश देखा ।
बाहेर असतो करिनायका । परी प्रीति अधिक कोणाकडे ? ॥ ५२ ॥
पर्यंकावरी चढे चरणसेवक । परी पुत्राहूनि नव्हे अधिक ।

# पुरवणी.

# महाराष्ट्रकविचरित्र

## भाग १ ला.

## मुकुंदराज.

या ग्रंथांतील मुकुंदराजावरील लेख छापून निघाल्यावर करमणूक पत्राच्या, तारीख २५ मे, १९०७ च्या अंकांत, मुकुंदराजांच्या समाधीसंबंधानें पुढील माहिती प्रसिद्ध झाली आहे:—' मध्यप्रांतांत बदनूर ह्मणून जिल्ह्याचें ठिकाण आहे. त्यापासून सरासरी पांच मैलांवर एक किल्ला आहे. नजीकच खेरला ह्मणून एक लहानसें खेडें आहे, व त्याच नांवानें किल्लाही प्रसिद्ध आहे. कितीएक शतकेंपर्यंत येथें गोंड राजांची राजधानी होती. असें सांगतात कीं त्यांच्यापूर्वी तेथें रजपूत राजे राज्य करीत होते. आणि मुकुंदराजानें क्षणार्धांत मोक्षप्राप्ति करून दिली, तो जयत्पाल राजा त्यांपैकींच एक होता. त्या रजपूत राजांसंबंधानें हल्लीं कांहींच माहिती उपलब्ध नाहीं. मात्र चौदाव्या शतकांत खेरला येथें गोंड राजे होते व ते इतके बलाढ्य व श्रीमंत होते कीं, दिल्ली तख्तनशीन मुसलमान पादशहांशीं टक्कर घेण्यास ते समर्थ होते, असा उल्लेख फिरस्ता नांवाच्या इतिहासलेखकानें आपल्या लेखांत केला आहे. इसवी सन १४३३ सांत माळव्याचा हुसेनशहा राजा यानें खेरला प्रांतांवर स्वारी करून तो हस्तगत करून घेतला. त्याचा सरदार रहमानशहा खेरला येथें लढाईंत मरण पावला. त्याचें थडगें किल्ल्यापासून अर्ध्या मैलाच्या अंतरावर दृष्टोत्पत्तीस येतें. अशी आख्यायिका सांगतात कीं, या थडग्यांत रहमानखानाचें फक्त धडच पुरलें आहे, त्याचें शिर तेथून दहा कोसांवर जाऊन पडलें व तेथेंच पुरलें गेलें! स्मरणार्थ, शिर पुरलें गेलें त्या

ठिकाणींही थडगें बांधलें आहे. सोळाव्या शतकांत माळवा प्रांत मोगलांनीं काबीज केला, त्याबरोबर खेरल्याचें राज्यही त्यांच्याकडे गेलें. मात्र त्यांच्यांच वतीनें देवगडचे महमदधर्मानुयायी गोंड राजे खेरला प्रांतांवर राज्य करूं लागले. पुढें अठराव्या शतकांत जेव्हां मध्यप्रांतांत सर्वत्र मराठ्यांचा अंमल झाला, तेव्हां खेरलाही देवगडाबरोबर मराठ्यांकडे गेला. १८१८ त हा प्रांत इंग्रज सरकाराकडे आला. पूर्व वैभवाची साक्ष देण्यास, मुकुंदराजांची ज्या किल्ल्यांत समाधि आहे, त्याशिवाय दुसरें कांहीं नाहीं. हा किल्ला चौफेर दोन एक मैल लांब आहे. वरकोटाच्या बहुतेक भिंती आतां पडून गेल्या आहेत. समाधीच्या पश्चिम भागीं जो पहाड आहे, त्यावरही एक लहान दुसरा किल्ला आहे व त्याचीही तीच दशा आहे. किल्ल्यांत व किल्ल्याच्या आसपास खूप रान उगवलें आहे, त्यामुळें सगळा प्रदेश ओसाड भासतो.

महाराजांची समाधि किल्ल्याच्या बहुतेक मध्यभागीं आहे ह्मटलें तरी चालेल. लागूनच एक तलाव आहे. समाधि भुयारांत आहे. तीवर महादेवाची पिंडी आहे. इतर ठिकाणाप्रमाणें पादुका नाहींत. कांहीं वर्षांपूर्वी समाधीवर एक मोडकेंसें घर होतें ह्मणतात; पण आतां त्या ठिकाणीं चुन्याचें लहानसें देऊळ दृष्टीस पडतें. देवळाला सभामंडप नाहीं, पण ' मुकुंदराजाच्या समाधीवर मंडप करावयाचा आहे, कांहीं मदत करा, स्वतः होत नसेल तर दुसऱ्याकडून करवा, तसेंही होत नसेल तर पुढें करीन ह्मणून आश्वासन द्या, व यालाही तयार नसाल तर नारळ फोडून घरचा रस्ता धरा ' अशा अर्थाचें यात्रेकरूंस उद्देशून विनंतिपत्र देवळाजवळच्या झाडास चिकटविलेलें आहे. त्यावरून सभामंडप होण्याचा सुयोग दिसतो. शिवरात्रीस समाधीपाशीं मोठी यात्रा भरते. इतर वेळेस आसपास एक माणूसही दृष्टीस पडत नाहीं.'

वरील माहितीपैकीं ऐतिहासिक भागाबद्दल मला कांहीं लिहावयाचें नाहीं. ' जयत्पाळ ' हें नांव एखाद्या रजपूत राजाचें नसेल, असेंही ह्मणतां येत नाहीं; परंतु ' विवेकसिंधु ' हा मराठी ग्रंथ रजपूतराजासाठीं मुकुंदराजांनीं लिहिला असेल, असें ह्मणणें बरोबर दिसत नाहीं. कदाचित्, एकापेक्षां अधिक मुकुंदराज जर महाराष्ट्रांत

आजपर्यंत होऊन गेले असतील, तर त्यांपैकीं कोणत्या तरी एका मुकुंदराजाची ही समाधि असणें संभवनीय आहे. असल्या बाबतींत खरी हकीकत मिळवून ती प्रसिद्ध करावयाची ह्मणजे मोठ्या श्रमाचें आणि पैशाचें काम आहे. पण ग्रंथकारास तितकें साहाय्य करण्याकडे आमच्या लोकांची अद्याप प्रवृत्ति झाली नसल्यामुळें, तूर्त तरी, मिळालेल्या माहितीवरच निर्वाह करून घेणें भाग आहे.

---

# मुक्तेश्वर.

प्रस्तुत ग्रंथांतील मुक्तेश्वरावरील निबंध छापून निघाल्यावर धुळें येथील सत्कार्योत्तेजक सभेनें भिमाजीबावाकृत भक्तलीलामृत ग्रंथ प्रसिद्ध केला; त्यांत मुक्तेश्वरासंबंधानें पुढील अभंग दिला आहेः—

एकनाथकन्या नाम लीलाबाई। प्रीति तिचे ठायीं बहु असे ॥ १ ॥
वरुषें जालीं सात लग्नाची योजना। लोक करिती जाणा ठाईं ठाईं ॥ २ ॥
विश्वंभरनामें विप्र एक आला। कोणी नाहीं त्याला मागें पुढें ॥ ३ ॥
भोजना बैसतां विचारिती स्वामी। दीन हें जी मी ह्मणे मुखें ॥ ४ ॥
आली दया ह्मणती काय इच्छा आहे। लग्न करावें हें मनीं वाटे ॥ ५ ॥
गोत्र विचारिलें घटितार्थी आलें। कृष्णापांनीं दिल्हें अनुमोदन ॥ ६ ॥
मोठमोठे आले न देवोनि त्यांसी। देवोनिदां यांसीं लग्न केलें ॥ ७ ॥
घरींच ठेविले भजन कीर्तन। अनुग्रह जाण दिला तया ॥ ८ ॥
लीलाबाईचीया नारळ ओटींत। कृपेनें ह्मणत पुत्र होय ॥ ९ ॥
जाला पुत्र त्याचें नांव मुक्तेश्वर। भारत अपार केलें ज्यांनीं ॥ १० ॥

ही माहिती १०९ वर्षां पूर्वींची आहे; व मुक्तेश्वरांच्या वेळेपासून त्या कालापर्यंत परंपरेनें ती चालत आली होती; अर्थात् तिच्यावर बराच विश्वास ठेवण्यास हरकत नाहीं. वरील अभंगांत मुक्तेश्वराच्या तीर्थरूपांचें नांव विश्वंभर व आईचें लीलाबाई;

असें स्पष्ट ह्मटलें आहे, यावरून, प्रस्तुत ग्रंथांतील मुक्तेश्वरावरील निबंधांत मी नुसत्या तर्कांनें जीं अनुमानें काढिलीं आहेत, तींच पुष्कळ अंशीं खरीं आहेत. असें ह्मणण्यास आतां मला अधिक धैर्य आलें आहे. ' लीलाविश्वंभर ' या पदाशीं मुक्तेश्वरांच्या आईबापांना कांहीं संबंध नसून, तें मुक्तेश्वरांच्या गुरूचें नांव आहे, ; हें आपलें विधान खरें आहे असें भासविण्यासाठीं रा. भिडे यांनीं आपल्या मुक्तेश्वरावरील निबंधांत जें अकांडतांडव केलें आहे, तें व्यर्थ होय, असें ह्मणावें लागतें.

# वामन.

प्रस्तुत ग्रंथांतील वामनावरील निबंधांत, ' वासिष्ठ गोत्री वामन व शृंगारप्रिय वामन ' असे जे एका वामनाचे दोन वामन रा. भिडे यांनीं केले आहेत, ते तसे नसून, तो एकच वामन आहे ' असें मी ह्मटलें आहे. माझा निबंध छापून निघाल्यावर रा. भिडे यांनीं, रा. राजवाडे यांस उत्तर ह्मणून, सरस्वतीमंदिरांत वामनावर एक लहानसा लेख प्रसिद्ध केला आहे, त्यांत त्यांनीं आपली मागील चुकी कबूल केली आहे, हें कळविण्यास आनंद वाटतो.